अध्याय ०७ ते १२



श्रीगुरु सारवरे महाराज सांप्रदायिक

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी



किसन महाराज साखरे ब्र.भू. विनायक नारायण जोशी
( साखरे महाराज )

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सातवा

श्रीभगवान् उवाच:—

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः । असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥
ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः । यज्ज्ञात्वा नेह भुयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

आइका मग तो श्रीअनंतु । पार्थातें असे म्हणतु । पैं गा तूं योगयुक्तु । जालासि आतां ॥ १ ॥ मज समग्रातें जाणसी ऐसें । आपुलिया तळहातींचें रत्न जैसें । तुज ज्ञान सांगेन तैसें । विज्ञानेंसीं ॥ २ ॥ एथ विज्ञानें काय करावें । ऐसें घेसी जरी मनोभावें ॥ तरी पैं आधीं जाणावें । तेंचि लागे ॥ ३ ॥ मग ज्ञानाचिये वेळे । झांकती जाणिवेचे डोळे । जैसी तीरीं नाव न ढळे । टेकलीसांती ॥ ४ ॥ तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुता पाउलीं निघे । तर्कु आंयणी नेघे । आंगीं जयांच्या ॥ ५ ॥ अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हें विज्ञान । तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ॥ ६ ॥ आतां अज्ञान अवघें हरपे । विज्ञान निःशेष करपे । आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥ ७ ॥ जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन तुटे । हें जाणणें सानें मोठें । उरों नेदी ॥ ८ ॥ एसें वर्म जें गूढ । तें किजेल वाक्यारूढ । जेणें थोडेन पुरे कोडें । बहुत मनींचें ॥ ९ ॥

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्वतः ॥ ३ ॥

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां-। माजीं विपाइले याचि धिंवसा । तैसें या धिंवसेकरां बहुवसां । माजीं विरळा जाणे ॥ १० ॥ जैसा भरलेया त्रिभुवना-। आंतु एकएकु चांगु अर्जुना । निवडूनि कीजे सेना । लक्षवरी ॥ ११ ॥ कीं तयाही पाठीं । जे वेळीं लोह मांसातें घांटी । ते वेळीं विजयश्रियेच्या पाटीं । एकुचि बैसे ॥ १२ ॥ तैसें आस्थेच्या महापुरीं । रिघताती कोटिवरी । परी प्राप्तीच्या पैलतीरीं । विपाइला निगे ॥ १३ ॥ म्हणौनि सामान्य गा नोहे । हें सांगतां वडिल गोठी आहे । परी ते बोलों येईल पाहें । आतां प्रस्तुत ऐकें ॥ १४ ॥

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सातवा

अन्वयार्थ–[हे] पार्थ–हे अर्जुना!– मयि–माझ्यामध्यें–आसक्तमनाः–ज्याचें मन आसक्त झालें आहे–मदाश्रयः–माझाच ज्याने आश्रय केला आहे व योगं युञ्जन्–योगाभ्यास करणारा–मन समाधान करणारा असा तूं–समग्रं मां–विभूति–बल–ऐश्वर्य इत्यादि समस्त गुणांनीं युक्त अशा मला–यथा–ज्या प्रकारें–असंशयं–निःसंशय–ज्ञास्यसि–जाणशील–तत् शृणु–तें ऐक १. अहं–मी–ते–तुला–इदं–हें–सविज्ञानं–ज्ञानं– साक्षात्कारासह–अनुभवासह ज्ञान–अशेषतः–संपूर्णपणें– वक्ष्यामि–सांगेन– यत्–जें ज्ञान–ज्ञात्वा–जाणून–इह–येथें–भूयः–पुनः–अन्यत्–दुसरें–ज्ञातव्यं–जाणण्यास योग्य असें कांहीं– न अवशिष्यते–रहात नाहीं २.

संत श्रोतेहो! ऐका. मग श्रीअनंत पार्थाला म्हणाले:–अरे! आतां तूं निश्चयेंकरून योगसंपन्न झालास १. आतां मी तुला ब्रह्मज्ञान प्रपंचज्ञानासह अशा रीतीनें सांगेन कीं, ज्या योगें तूं आपल्या तळहातावरील रत्नाप्रमाणें मला समग्राला पूर्णपणे ओळखशील २. या ठिकाणीं प्रपंचज्ञानाशीं काय करावयाचे आहे? असा जर तुझ्या मनाचा ग्रह असेल तर, आधीं खरोखर तेंच समजून घेतले पाहिजे ३. मग स्वरूपज्ञानाच्या साक्षात्काराच्या वेळीं बुद्धीची नजर झांकते. ज्याप्रमाणें तीराला टेकलेली नाव हालत नाहीं ४. त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं बुद्धीचा शिरकाव होत नाहीं, जेथून विचार मागच्या पाउलीं परततो आणि ज्याच्या स्वरूपीं तर्काचें चातुर्य चालत नाहीं ५. अर्जुना! त्यालाच ज्ञान असें म्हणतात. बाकीचीं सर्व प्रपंचज्ञानें त्याला ज्ञाते विज्ञान असें म्हणतात, आणि तो प्रपंच खरा मानणें हेंच अज्ञान होय, असेंहि तूं समज ६. आतां सर्व अज्ञान नाहींसें होईल, विज्ञान समूळ जाईल. म्ह. बाधित होईल आणि शुद्ध ब्रह्मज्ञान अंतःकरणांत आत्मत्वानें अभिव्यक्त होऊन तत् स्वरूप होऊन जातें ७. अरे! त्या ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचे ऐश्वर्य काय सांगावें! ज्यामुळें सांगणाराचे बोलणे खुंटते, ऐकणाऱ्याच्या मनांतील सर्व इच्छा म्हणजे सर्व दुःख निवृत्तींची व निरतिशय आनंद प्राप्तीची तीव्र इच्छा पूर्ण होते, एवढेच नव्हे तर ऐकणाऱ्याची "हा लहान, हा मोठा" अशी भेददृष्टि शिल्लक राहूं देत नाहीं ८. एवढे ज्या ज्ञानाचे मोठे फल आहे; ते गूढ व मार्मिक ब्रह्मज्ञान वाक्यद्वारा सांगेन, की ज्या थोडक्यानेच; पण मनांतील पुष्कळ इच्छा पूर्ण होतील ९.

अन्वयार्थ—मनुष्याणां सहस्रेषु कश्चित्–हजारों मनुष्यांतील कोणी एखादाच–सिद्धये–ज्ञानप्राप्तीसाठीं–यतति–यत्न करतो–यतताम् अपि सिद्धानां–यत्न करणाऱ्याहि सिद्धांतील–कश्चित्–कोणी एखादाच–मां–मला–तत्त्वतः–वस्तुतः– खरोखर–यथार्थपणें–वेत्ति–जाणतो ३.

अरे! पण या ब्रह्मज्ञानाचा अधिकारी फार विरळा!! हजारों मनुष्यांत एखाद्यालाच या ज्ञानाची इच्छा असते, आणि तशी ज्ञानाची इच्छा उत्पन्न झालेल्या पुष्कळांत मला म्ह. ब्रह्माला निःसंदेहपणानें यथार्थ जाणणारा क्वचित सांपडतो १०. अर्जुना! ज्याप्रमाणें मनुष्यांनीं भरलेल्या या त्रिभुवनांत फौजेमध्यें ठेवण्याकरितां एकेक चांगला शूर निवडून लक्षावधि फौज तयार केली तरी, ११. त्यांतूनहि ज्या वेळेस तरवारीचे घाव शरीरावर बसतात त्या वेळेस ते सहन करून विजयश्रीच्या सिंहासनावर एखादाच बसतो १२. त्याप्रमाणें माझ्या ज्ञानप्राप्तीच्या आस्थेच्या म्ह. इच्छेच्या पुरांत कोट्यवधि लोक उड्या टाकतात, परंतु एखादाच मत्प्राप्तीरूप तिच्या पैलथडीस जातो १३. म्हणूनच निःसंदेह ब्रह्मज्ञान होणे ही सामान्य गोष्ट नसून मोठी श्रेष्ठ आहे; परंतु ती पुढें सांगतां येईल. प्रस्तुत [तुला विज्ञानाचे स्वरूप सांगतों] ऐक १४.

---

१ सर्व प्रकारें. २ प्रपंचज्ञान, विपरीतज्ञान, व्यवहारज्ञान यांसहित. ३ असा ग्रह होईल. ४ जाणतेपणाचें ५ नौका. ६ जमिनीवर टेकवली असतां. ७ हुरूप, ईर्ष्या. ८ ज्याच्या [ब्रह्माच्या]. ९ संकट, चट, दुःख. १० सखोल, गुप्त. ११ बोलण्यांत आणीन, सांगेन. १२ आवड, इच्छा. १३ विरळा, एखाद्याला. १४ धैर्य, छंद. १५ धैर्यवंतांमध्यें.

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च । अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

तरी अवधारीं गा धनंजया । हे महदादिक माझी माया । जैसी प्रतिबिंबे छाया । निजांगाची ॥ १५ ॥ आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा भिन्न जाणिजे । लोकत्रय निपजे । इयेस्तव ॥ १६ ॥ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि धरिसी जरी मानसीं । तरी तेचि गा आतां परियेसीं । विवंचना ॥ १७ ॥ आप तेज गगन । मही मारुत मन । बुद्धि अहंकारु हे भिन्न । आठै भाग ॥ १८ ॥

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीवु ऐसी ॥ १९ ॥ जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी । मना करवीं मानवी । शोक मोहो ॥ २० ॥ पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें । तें जिये जवळिकेचें करणें । जिया अहंकाराचेनि विंदाणें । जगचि धरिजे ॥ २१ ॥

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय । अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

ते सूक्ष्म प्रकृति कोडें । जैं स्थूळाचिया आंगा घडे । तैं भूतसृष्टीची पडे । टांकसाळ ॥ २२ ॥ चतुर्विध ठसा । उमटों लागे आपैसा । मोलें तरी सरिसा । परी थरेचि आनोन ॥ २३ ॥ होती चौऱ्यांशीं लक्ष थरा । येरा मिती नोणिजे भांडारा । भरे आदिशून्याचा गाभारा । नाणेयांसी ॥ २४ ॥ ऐसें एकतुके पांचभौतिकें । पडती बहुवस टांकें । मग तिये समृद्धीचे लेखे । प्रकृतीचि धरी ॥ २५ ॥ जे आखूनि नाणें विस्तारी । पाठी तयाची आटणी करी । माजीं कर्माकर्माचिया व्यवहारीं । प्रवर्तु दावी ॥ २६ ॥ हें रूपक परी असो । सांगों उघड जैसें परियेसों । तरी नामरूपाचा अतिसो । प्रकृतीच कीजे ॥ २७ ॥ आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं । बिंबे येथें आन नाहीं । म्हणौनि आदि मध्य अवसान पाहीं । जगासि मी ॥ २८ ॥

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

हें रोहिणीचें जळ । तयाचें पाहतां येइजे मूळ । तैं रश्मि नव्हती केवळ । होय तें भानु ॥ २९ ॥ तयाचिपरी किरीटी । इया प्रकृति जालिये सृष्टी । जैं उपसंहरूनि कीजेल ठी । तैं मीचि आहें ॥ ३० ॥ ऐसें होय दिसे न दिसे । हें मजाचि माजीं असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें मणि ॥ ३१ ॥ सुवर्णाचे मणी केले ।

**अन्वयार्थ—भूमिः**-गंधतन्मात्र – **आपः**–रसतन्मात्र–**अनलः**–रूपतन्मात्र – **वायु** :–स्पर्शतन्मात्र –**खं** – शब्दतन्मात्र–**मनः**–मनाचें कारण अहंकार–**च बुद्धिः एव**–आणि अहंकाराचें कारण महत्तत्त्व–**अहंकारः**–अहंकाराच्या वासनेनें युक्त असलेलें अव्यक्त–**इति**–अशी–**इयं**–ही–**मे प्रकृतिः**–माझी प्रकृति–माया शक्ति-**अष्टधा**-आठ प्रकारें–**भिन्ना**–भेदाला प्राप्त झाली आहे ४.

हे धनंजया ! ऐक. आपल्या अंगाची पडछाया पडत असते त्याचप्रमाणें महत्तत्त्वादिक ही कार्यरूपानें माझी मायाच होय; १५. आणि हिलाच 'प्रकृति' असें म्हणावें व हिचे आठ निरनिराळे प्रकार आहेत, असें समज, आणि हिच्यापासून हें त्रैलोक्य उत्पन्न होतें १६. ही आठ प्रकारांनी कशी निराळी आहे, असा अभिप्राय जर तूं मनांत आणशील, तर तोच विचार सांगतों, ऐक १७. पाणी, तेज, आकाश, पृथ्वी, वायु, मन, बुद्धि आणि अहंकार, हे तिचे निरनिराळे आठ प्रकार आहेत १८.

**अन्वयार्थ—इयम् अपरा**–ही अपरा–निकृष्ट प्रकृति आहे–**तु**–पण–**महाबाहो**–हे पराक्रमी अर्जुना ! **इतः**–या अपरा प्रकृतीहून–**अन्यां**–दुसऱ्या प्रकारच्या–**जीवभूतां**–क्षेत्ररूप–**मे**–माझ्या – **प्रकृतिं**–प्रकृतीला तूं–**परां**–परा प्रकृति–**विद्धि**–समज– **यया**–ज्या पराप्रकृतिकडून–**इदं जगत्**–हें जगत्–**धार्यते**–धारण केलें जातें ५.

पार्था! ह्या आठ भागांची जी साम्यावस्था म्हणजे [लयरूप स्थिति ] हीच माझी परमप्रकृति होय, आणि तीच परमात्म्याचे ठिकाणीं जीवमात्र उत्पन्न करिते, म्हणून तिला जीवभूता ही संज्ञा आहे १९. ही अचेतन शरीरादिकांना चेतनत्व आणते, ज्ञानाला अभिव्यक्त करते आणि मनाला शोक व मोह मानण्यास लाविते २०. हें पहा ! बुद्धीच्या अंगीं जें ज्ञान उत्पन्न होतें, ते हिच्या सान्निध्यामुळेच व ही अहंकाराच्या कुशलतेनें जगाला धारण करिते २१.

**अन्वयार्थ—सर्वाणि भूतानि**–सर्व भूतें– **एतद्योनीनि**–या दोन प्रकृतींपासून उत्पन्न झालेलीं आहेत, या दोन प्रकृति सर्वभूतांचें कारण आहे–**इति**–असें–**उपधारय**–जाण–**अहं कृत्स्नस्य जगतः**–मी सर्व जगाची–**प्रभवः**–उत्पत्ति – **तथा** – त्याचप्रमाणें–**प्रलयः**–विनाश आहें ६.

हीं सूक्ष्म [ परा ] प्रकृति जेव्हां स्वेच्छेनें स्थूल प्रकृतीशीं संयुक्त होते, तेव्हां सृष्टींतील प्राणीवर्गरूपी नाणी पाडण्याची टांकसाळ सुरू होते २२. त्या टांकसाळींत आपोआप चार प्रकारचे ठसे उमटूं लागतात. त्यांतील पंचमहाभूतांची योग्यता सारखीच असते, परंतु आकार मात्र भिन्न भिन्न असतात २३. त्याच्या चौऱ्यांशीं लक्ष योनींचे आकार असून, त्या शिवाय इतर जातींत आणखी किती पोटजाति आहेत त्यांची गणती नाहीं. अशा पुष्कळ नाण्यांनीं आदि शून्याचा म्हणजे अव्यक्त मायेचा गाभारा भरून जातो २४. याप्रमाणें पंचमहाभूतांची एकसारखी पुष्कळ नाणी तयार होतात. व त्यांच्या वाढीची गणती प्रकृति हीच ठेवते २५. ती नाण्यांवर खुणा करून त्यांचाच विस्तार करिते, व पुनः त्यांची आटणीहि करिते. दरम्यानच्या काळांत जीवांच्या कर्माकर्माचा व्यवहार करून दाखविते २६. हें नाण्याचे रूपक असो आतां तुला समजेल अशा उघड रीतीनें सांगतो. तर ही प्रकृतिच प्राण्यांच्या नामरूपांचा विस्तार करितें २७. आणि प्रकृतिच तर निःसंशय माझ्याच आश्रयावर मिथ्या भासते. यांत अन्यथा नाहीं, आणि जगाची उत्पत्ति स्थिति आणि लय यांस मीच कारण आहे [असें ती भासवितें ] असें समज २८.

**अन्वयार्थ—हे धनंजय**–अर्जुना ! **मत्तः**–मजहून **परतरम् अन्यत्**–अधिक श्रेष्ठ असें दुसरें–**किंचित् न अस्ति**–कांहीं एक नाहीं–**सूत्रे मणिगणाः इव**–दोऱ्यांत जसे मणिगण–पुष्कळ मणी त्याप्रमाणें–**मयि इदं सर्वं प्रोतं**– माझ्या ठिकाणीं हें सर्व ओंवलेलें आहे ७.

हें दृश्य विश्व मृगजळासारखें आहे ! मृगजळाचें मूळ पाहूं गेलें असतां तें केवळ सूर्यकिरण नसून सूर्यच होय २९. त्याचप्रमाणें अर्जुना ! ज्या प्रकृतीपासून ही सृष्टी झाली आहे, तिचा उपसंहार होऊन शेवटीं तिचे ज्यांत पर्यवसान होते ते अवशिष्ट राहणारे तत्त्व मीच आहें ३०. अशा प्रकारें जें उत्पन्न होऊन दिसतें व नाहींसे होते तें माझ्याच ठिकाणीं होतें. ज्याप्रमाणें दोऱ्यानें मणि धरलेले असतात, त्याप्रमाणें मीं हें विश्व धारण केलें आहे ३१. सोन्याचे मणि करून ते सोन्याच्याच सुतांत ओंवावेत

१ महत्तत्वादि. २ पडछाया फिरते. ३ माया. ४ आठ प्रकारें. ५ उत्पन्न होते. ६ इच्छेपासून. ७ शंका, संशय. ८ विचार. ९ ऐक्यावस्था. १० श्रेष्ठ. ११ अचेतनाला. १२ उत्पन्न करितें. १३ सन्निधपणाचें. १४ कौसल्यानें. १५ आवडीनें. १६ महाभूतांच्या. १७ प्राण्यांच्या उत्पत्तीची. १८ जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज, या चोहोंचा. १९ किंमतीला, योग्यतेला. २० सारखा. २१ जाति. २२ वेगळाल्या. २३ गणती. २४ जातीभाग. २५ आकाशाचा. २६ नाण्यांनीं. २७ एकसारखे. २८ पंचमहाभूतांची. २९ नाणें, ठसे. ३० जमाखर्च. ३१ मायाच. ३२ रेखाटून. आकारून. ३३ नंतर. ३४ गाळणी. ३५ प्रवृत्ति.

ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं ॥ ३२ ॥

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः । प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥
पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ । जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

म्हणौनि उदकीं रसु । कां पवनीं जो स्पर्शु । शशिसूर्यीं जो प्रकाशु । तो मीचि जाण ॥ ३३ ॥ तैसाचि नैसर्गिकु शुद्धु । मी पृथ्वीच्या ठायीं गंधु । गगनीं मी शब्दु । वेदीं प्रणवु ॥ ३४ ॥ नराच्या ठायीं नरत्व । जें अहंभाविये सत्त्व । तें पौरुष मी हें तत्त्वं । बोलिजत असे ॥ ३५ ॥ अग्नि ऐसें आहाच । तेजें नामाचें आहे कवचें । तें परतें केलिया साच । निजतेज तें मी ॥ ३६ ॥ आणि नानाविध योनी । जन्मोनि भूतें त्रिभुवनीं । वर्तत आहाति जीवनीं । आपुलाल्या ॥३७॥ एकें पवनेंचि पिती । एकें तृणास्तवें जिती । एकें अन्नाधारें राहती । जळें एकें ॥ ३८ ॥ ऐसें भूतांप्रति आनानें । जें प्रकृतिवशें दिसे जीवनें । तें आघवाठायीं अभिन्न । मीचि एक ॥ ३९ ॥

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् । बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥
बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् । धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

पैं आदिचेनि अवसरें । विरूढे गगनाचेनि अंकुरें । जे अंतीं गिळी अक्षरें । प्रणवपीठींचीं ॥ ४० ॥ जंव हा विश्वाकारु असे । तंव जें विश्वाचिसारिखें दिसे । मग महाप्रळयदशे । कैसेंही नव्हे ॥ ४१ ॥ ऐसें अनादि जें सहज । तें मी गा विश्वबीज । हें हातातळीं तुज । देइजत असे ॥ ४२ ॥ मग उघड करूनि पांडवा । जें हे आणिसील सांख्याचिया गांवा । तें ययाचा उपेगु बरवा । देखशील ॥ ४३ ॥ परी हे अप्रासंगिक आलाप । आतां असतु न बोलों संक्षेप । जाण तपियांच्या ठायीं तप । तें रूप माझें ॥ ४४ ॥ बळियांमाजीं बळ । तें मी जाणें अढळ । बुद्धिमंतीं केवळ । बुद्धि तें मी ॥ ४५ ॥ भूतांच्या ठायीं कामु । तो मी म्हणे आत्मारामु । जेणें अर्थास्तव धर्मु । थोरु होय ॥४६॥ एऱ्हवीं विकाराचेनि पैसें । करी कीर इंद्रियांचि ऐसें । परी धर्मासि वेखासें । जावों नेदी ॥ ४७ ॥ जे अप्रवृत्तीचा अंव्हांटा । सांडूनि विधीचिया निघे वाटा । तेवींचि नियमाचा दिवटा । सवें चाले ॥४८॥ कामु ऐसिया वोजा प्रवर्ते । म्हणौनि धर्मासि होय पुरतें । मोक्षतीर्थींचें मुक्तें । संसार भोगी ॥ ४९ ॥ जो श्रुतिगौरवाच्या

त्याचप्रमाणें हें सर्व जग अंतर्बाह्य मीच व्यापलें आहे ३२.

**अन्वयार्थ—कौन्तेय**–हे अर्जुना! **अहं**–मी-**अप्सु**–जलांत–**रसः**–रस-**अस्मि**-आहे–**शशिसूर्ययोः**–चंद्र व सूर्य यांमध्यें–**प्रभा**–तेज–[ अस्मि ] मी आहें–**सर्ववेदेषु**–सर्व वेदांमध्यें–**प्रणवः** [ अस्मि ] मी ओंकार आहे–**खे**–आकाशांत–**शब्दः**–मी शब्द आहे व–**नृषु**–पुरुषांमध्यें मी–**पौरुषं**–पुरुषत्व आहें ८.–**च**–आणि–**पृथिव्यां**–पृथिवीमध्यें–**पुण्यः गन्धः**–पुण्यगंध–सुवास–**च**–आणि–**विभावसौ**–अग्नीमध्यें–**तेजः**–दीप्ति–**अस्मि**–मी आहें–**सर्वभूतेषु**–सर्व भूतांमध्यें–**जीवनं** – जीवनशक्ति –**च** –**तपस्विषु**–व तपस्व्यांमध्यें–**तपः** [ अहं ]–**अस्मि**–तप मी आहें ९.

म्हणून पाण्यांत जो रस आहे किंवा वाऱ्यांत जो स्पर्श आहे आणि चंद्र व सूर्य यांच्यांत जो प्रकाश आहे, ते मीच आहें, असें समज ३३. त्याचप्रमाणें, पृथ्वीच्या ठिकाणीं स्वभावतःच असणारा जो शुद्ध सुवास तो मीच आहे, आकाशांत शब्द म्हणून जो आहे, तो मीच आहे, तसेंच वेदांत ॐकार म्हणून जो आहे, तोहि मीच आहे ३४. मनुष्याच्या ठिकाणीं अहंभावाचे सारभूत जे पुरुषत्व तें पौरुष मी आहे हें तत्त्व मी तुला सांगून ठेवतों. ३५. तेजाला अग्नि या नांवाचें जें वरवर दिसणारे पांघरूण आहे, तें दूर केलें असतां त्याचें खरें तेज-स्वरूप तें मी आहे ३६. आणि या त्रिभुवनांत प्राणी पुष्कळ प्रकारच्या योनींत जन्म घेऊन आपापल्या योनींच्या अनुरोधानें अन्नादि आहार सेवन करून जगतात ३७. कोणी [ सर्पादि ] वारा पिऊन असतात, कोणी [पश्वादि] गवतावर उपजीविका करतात, कोणी ! [ मनुष्यादि ] अन्नावर राहतात आणि कोणी [ मत्स्यादि ] पाण्यावर आपलें उपजीवन करितात; ३८. असें प्रत्येक प्राण्याचें ज्याच्या त्याच्या प्रकृतीच्या मानानें जें निरनिराळें जीवन आहार दिसतें त्या सर्व ठिकाणीं अभिन्नत्वानें एक मीच आहें ३९.

**अन्वयार्थ—हे पार्थ**–हे अर्जुना!–**मां**–मला–**सर्वभूतानां**-सर्व भूतांचें-**सनातनं बीजम्**-अनादि नित्य बीज-**विद्धि**– तूं जाण–**बुद्धिमतां बुद्धिः**–बुद्धिमान् लोकांची बुद्धि–विवेकशक्ति–**अस्मि**–मी आहें–**तेजस्विनां**-तेजस्वी लोकांतील–**तेजः**–तेज प्रगल्भता–**अहं** [ **अस्मि** ] मी आहे,–**बलवतां**–बलवान् लोकांचें–**कामरागविवर्जितं**–तृष्णा व आसक्ति यांनीं रहित असें–**बलं**–बल–**अस्मि**–मी आहे–**हे भरतर्षभ**–हे अर्जुना!–**भूतेषु**–भूतांतील–**धर्माविरुद्धः**–धर्माशीं-शास्त्राच्या अर्थाशीं विरुद्ध नसलेली–**कामः**–अवश्य वस्तूविषयींची इच्छा–**अस्मि**–मी आहें १०–११.

खरोखर, उत्पत्तीचे वेळी जें तत्त्व आकाशाच्या अंकुरानें विस्तार पावतें, आणि जें अंतःकाळीं ॐकारात्मक पीठावरील अक्षरेंहि गिळून टाकतें; ४०. जोंपर्यंत हा जगद्रूपी आकार आहे, तोंपर्यंत जें तत्त्व जगासारखेंच दिसतें, परंतु महाप्रलयाचे वेळेस तें कोणत्याहि आकाराचें नसतें; ४१. असें जें ह्या जगाचें अनादि व स्वतःसिद्ध जे ब्रह्मबीज तें मी आहे; तें आज तुला तुझ्या तळहातांत देतो म्ह. अगदी स्पष्ट सांगतों ४२. मग अर्जुना! तें नीट समजून घेऊन जर तूं त्याचा विचार करशील तर त्याचा चांगला उपयोग तूं पाहशील म्ह. तुला योग्य महत्त्व कळेल ४३. ब्रह्मस्वरूप प्रतिपादन करतेवेळीं मध्येंच आलेला प्रसंग व अप्रासंगिक बोलणें राहूं दे प्रथम तुला मी विभूति–व्याप्ति थोडक्यांत सांगतो ती ऐक, अरे! तपस्व्यांचे ठायीं तप, म्हणून जें आहे ती माझीच विभूति होय ४४. बलवानांत अढळ बल म्हणून जें आहे, तें मी असें निःसंशय समज, आणि बुद्धिमंतांत बुद्धि म्हणून जी आहे ती माझीच विभूति होय ४५. ज्याच्या आचरणापासून धर्म व अर्थ हे पुरुषार्थ साध्य होतात, तो प्राणिमात्रांचे ठिकाणीं असणारा काम मी आहे असें आत्माराम म्हणाला ४६. एऱ्हवीं, विकारांच्या वाढीमुळें इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें अनुकूल आचरण केलें, तरी तो काम ती कर्में धर्माविरुद्ध जाऊं देत नाहीं ४७. कारण, तो काम निषेधाची आडवाट सोडून विधीच्या वाटेनें नीट जातो, आणि त्याचप्रमाणें त्याच्याबरोबर नियमरूपी मशालजी चालत असतो ४८. अशा व्यवस्थेनें हा काम चालतो, म्हणून धर्माचें आचरण पूर्ण होतें व त्यामुळें संसारांत राहणारालाहि मोक्षरूपी तीर्थांतील मुक्ति प्राप्त होते ४९. तो

१ अंतर्बाह्य, आंतबाहेर. २ स्वाद. ३ वायूंत. ४ स्वाभाविक. ५ सुवास. ६ ॐकार. ७ मीपणा. ८ बळ. ९ पराक्रम. १० खरें. स्वरूप. ११ प्रकाश. १२ आवरण. १३ खरें तेज. १४ प्राणिमात्र. १५ अन्नानें. १६ वाराच पितात. १७ गवतावर उपजीविका करितात. १८ प्रत्येक प्राण्याला. १९ निरनिराळें. २० अन्न. २१ सर्व ठिकाणीं. २२ वाढतें. २३ ॐकाराचीं अक्षरें. २४ स्वतःसिद्ध. २५ जगाचें आदिकारण. २६ मुठींत, हातात. २७ आत्मानात्मविचाराच्या. २८ उपयोग. २९ प्रसंगास अयोग्य. ३० बोल. ३१ असू दे. ३२ तपस्व्यांच्या. ३३ हेतु, वासना. ३४ स्वरूपांत रममाण होणारा. ३५ ज्या हेतूस्तव. ३६ पैसपणानें, प्रसारानें. ३७ विरूद्ध. ३८ जो काम. ३९ निषेधाचा. ४० आडमार्ग.

मांडवीं । काम सृष्टीचा वेलु वाढवी । जंव कर्मफळेंसि पालवी । अपवर्गीं टेंके ॥ ५० ॥ ऐसा नियुंत[२] कां कंदर्पु[३] । जो भूतां या बीजरूपु[४] । तो मी म्हणे बापु । योगियांचा ॥ ५१ ॥ हें एकेक किती सांगावें । आतां वस्तुजातचि आघवें । मजपासूनि जाणावें । विकारलें असे ॥ ५२ ॥

ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये । मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

जे सात्त्विक हन भाव । कां रजतमादि सर्व । तें ममरूपसंभव । वोळखें तूं ॥ ५३ ॥ हे जाले तरी माझ्या ठायीं । परी तयामाजीं मी नाहीं । जैसी स्वप्नींच्या डोहीं । जागृति न बुडे ॥ ५४ ॥ जैसी रसाचीच सुघट । बीजकणिका घनवट । परी तियेस्तवें[१२] होय काष्ठ । अंकुरद्वारें ॥ ५५ ॥ मग तया काष्ठाच्या ठायीं । सांग पां बीजपण असे काई ? । तैसा मी विकारीं नाहीं । जरी विकारला दिसे ॥५६॥ पैं गगनीं उपजे आभाळ । परी तेथ गगन नाहीं केवळ । अथवा आभाळीं होय [१३]सलिल । तेथ अभ्र नाहीं ॥ ५७ ॥ मग तया उदकाचेनि आंवेशें[१४] । प्रगटलें तेज जें लखलखीत दिसे । तिये विजूमाजीं[१५] असे । सलिल कायी ? ॥ ५८ ॥ सांगें अग्नीस्तव धूम होये । तिये धूमीं[१६] काय अग्नि आहे ? । तैसा विकारु[१७] हा मी नोहें । जरी विकारला असे ॥ ५९ ॥

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् । मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

परी उदकीं जाली बाबुळी[१८] । ते उदकातें जैसी झांकोळी । कां वायांचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ६० ॥ हां गा स्वप्न लटिकें म्हणों ये । परि निद्रावशें बाणलें[२०] होये । तंव आठवु काय देत आहे । आपणपेयां ? ॥ ६१ ॥ हें असो डोळ्यांचें । डोळांचि पडळ[२१] रचे । तेणें देखणेंपणें[२२] डोळ्यांचें । न गिळिजे कायी ? ॥ ६२ ॥ तैसी हे माझीच बिंबली[२३] । त्रिगुणात्मक साउली । कीं मजचि आड वोडवली[२४] । [२५]जवनिका जैसी ॥ ६३ ॥ म्हणौनि भूतें[२६] मातें नेणती । माझीच परी मी[२७] नव्हती[२८] । जैसी जळींची जळीं नें[२९] विरती । मुक्ताफळें[३०] ॥ ६४ ॥ पैं पृथ्वीयेचा[३१] घटु कीजे । सवेंचि पृथ्वीसि मिळे तरी मेळविजे । एऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे[३२] । तरी वेगळा होय ॥ ६५ ॥ तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव[३३]- । दशे आले ॥ ६६ ॥ म्हणौनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममताभ्रांती[३४] । विषयांध जाले ॥ ६७ ॥

काम, वेदांनीं गौरव केलेल्या कर्मरूपी मांडवावर कर्मफलांचीं पानें मोक्षाला जाऊन भिडतील तोपर्यंत आपला वेल वाढवितो ५०. योग्यांचे जनक श्रीकृष्ण म्हणतात:–अशा नियमानें राहाणारा व प्राणिमात्रास बीजभूत असा जो काम तो मी आहें ५१. आता हें एकेक तुला किती सांगत बसूं ? तर वस्तुमात्र म्हणून जें कांहीं आहे, तें सर्व माझ्यापासून आकाराला आलेले आहे, असें समज म्हणजे झाले ५२.

**अन्वयार्थ—च**–आणि–**ये**–जे–**सात्त्विकाः भावाः**–सात्त्विक पदार्थ आहेत–**ये**–जे–**राजसाः च तामसाः एव**–[ **भावाः** ]–राजस व तामस भाव आहेत–**तान् मत्तः एव**–त्यांना माझ्यापासून झालेलें **इति–विद्धि**–असें तूं जाण–**तु अहं**–पण मी–**तेषु न**–त्यांच्यामध्यें नाहीं–त्यांच्या आधीन नाहीं–**ते मयि**–ते माझ्या आधीन आहेत १२.

जे सात्त्विक पदार्थ किंवा राजस व तामसादि विकार आहेत, ते सर्व माझ्या स्वरूपापासूनच उत्पन्न झाले आहेत, असें समज ५३. ते जरी माझ्यापासून झाले आहेत, तरी मी त्यांच्यांत नाहीं. ज्याप्रमाणें स्वप्नाच्या डोहांत जागृति बुडत नाहीं ५४. [ किंवा ] ज्याप्रमाणे भरीव बीं म्हणजे पूर्ण गोठलेला रसच असतो व त्याचेपासून अंकुर फुटून पुढें लांकूड बनतें; ५५. मग त्या लांकडाचे ठिकाणीं 'बीजपण' असते कां सांग बरें ? त्याचप्रमाणें सात्विकादि सर्व विकार जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत; तरीं त्यांमध्यें मी नाहीं म्ह० त्यांच्या आश्रयावर मी नाहीं कारण माझ्या आश्रयावर ते अध्यस्त आहेत ५६. खरोखर आकाशांत जे ढग उत्पन्न होतात, त्यांत शुद्ध आकाश नसतें; किंवा ढगांत पाणी असतें, पण त्या पाण्यांत ढग नसतात ५७. नंतर त्या पाण्याच्या घर्षणानें उत्पन्न होणारें तेज [ वीज ] जें चकचकीत दिसतें, त्या विजेमध्यें पाणी असतें काय ? ५८. सांग अग्नीपासून जो धूर उत्पन्न होतो, त्या धुरांत अग्नि आहे का ? त्याचप्रमाणें सात्त्विकादि सर्व पदार्थ जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांत मी नाहीं ५९.

**अन्वयार्थ—इदं सर्वं जगत्**–हें सर्व जगत्–**एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः**—या तीन गुणमय–गुणविकाररूप पदार्थांनीं–राग–द्वेष मोह इत्यादि प्रकारांनीं–**मोहितं** [ **सत्** ]–मोहित होत्सातें–अविवेकावस्थेस प्राप्त झालेलें जगत्–**एभ्यः परम् अव्ययं मां**–या गुणांहून व्यतिरिक्त अगदीं विलक्षण व अविनाशीं अशा मला–**न अभिजानाति** जाणत नाहींत १३.

तरीपण जसें पाण्यापासून उत्पन्न झालेलें गोंडाळ पाण्यालाच झांकून टाकतें, किंवा ढगाच्या योगानें आकाश व्यर्थ लोपलें जातें ६०. अरे अर्जुना ! स्वप्न हें खोटें आहे असें म्हणता येते; पण आपण निद्रेच्या स्वाधीन झाल्यामुळे तें खरें भासतें. त्या वेळी तें स्वप्न आपली आपल्याला आठवण होऊं देतें कां ? ६१. हे असो डोळ्यांतील पाण्याचा गोठून तयार झालेला पडदा डोळ्याची दृष्टि मंद करीत नाहीं का ? ६२. त्याचप्रमाणें माझ्याच ठिकाणीं मिथ्या भासलेलीं सत्त्व, रज व तम या गुणांनीं युक्त अशी माझीच जी माया ती पडलेली सावली आहे ती जणुं काय पडद्याप्रमाणें माझ्याच स्वरूपाच्या आड आली आहे, [माया 'स्वाश्रया' 'स्वविषया' आहे हा शास्त्रसिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं वरील चार पांच दृष्टान्तांत स्पष्ट करून सांगितला आहे] ६३. म्हणून प्राणी मला जाणत नाहींत आणि माझे म्ह० मद्रूप असूनहि मद्रूप होत नाहींत, ज्याप्रमाणें मोती हे पाण्यापासूनच उत्पन्न होतात पण ते पाण्यांत वितळून जात नाहींत ६४. अथवा मातीचा घट करून तो कच्चेपणीं मातीस मिळविला असता मातींत मिळतो परंतु तो विस्तवांत भाजला असता मातीशीं न मिळतां वेगळाच राहतो ६५. त्याचप्रमाणें सर्व प्राणी हे खरोखर माझेच अवयव–अंश आहेत; परंतु मायेच्या योगानें जीवपणाला आले ६६. म्हणून माझेच असून मद्रूप होत नाहींत, माझेच असून मला ओळखीत नाहींत, कारण तें जीव 'मी' आणि 'माझें' या भ्रांतीनें विषयांध झालेले आहेत ६७.

---

१ मोक्षापर्यंत. २ नियमाने वागणारा. ३ काम. ४ कारणभूत. ५ सर्व दृश्य पदार्थ. ६ विस्तार पावले. ७ विकार. ८ केवळ रसाचीच. ९ चांगली बनलेली. १० बीं, दाणा. ११ घट्ट. १२ तिजपासून. १३ पाणी. १४ घर्षणानें. १५ विजेत. १६ धूर. १७ स्वभाव. १८ शेवाळ. १९ आच्छादीते. २० अनुभवास येतें, सत्य भासतें. २१ पडदा. २२ दृष्टि. २३ प्रतिबिंबित झालीं. २४ प्राप्त झाली. २५ पडदा. २६ प्राणी. २७ मद्रूप. २८ होत नाहींत. २९ विरघळत नाहीत. ३० मोत्यें. ३१ मातीचा. ३२ भाजला असतां. ३३ जीवपणाला. ३४ मी व माझें या भ्रांतीनें.

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥

आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया । मी होइजे हें आया । कैसेनि ये ? ॥ ६८ ॥ जिये ब्रह्माचळाँचा आधाँडा । पाहिलिया संकल्पजळाचा उभंडा । सर्वेंचि महाभूतांचा बुडबुडा । साँना आला ॥ ६९ ॥ जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें । चढत काळकळनेचेनि वेगें । प्रवृत्तिनिवृत्तीचीं तुंगें । तटें सांडी ॥ ७० ॥ जे गुणघनांचेनि वृष्टिभरें । भरली मोहोंचेनि महापुरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥ ७१ ॥ जे द्वेषाच्या आँवर्तीं दाटत । मत्सराचे वळँसे पडत । माजीं प्रमादादि तंळपत । महाँमीन ॥ ७२ ॥ जेथ प्रपंचाचीं वंळणें । कर्माकर्मांची वोभाँणें । वरी तरंताती वोसाँणें । सुखदुःखांचीं ॥ ७३ ॥ रतीचियां बेटा । आदळती कामाचिया लाटा । जेथ जीवंफेन संघटा । सैंघ दिसे ॥ ७४ ॥ अहंकाराचिया चळियाँ । वरि मदेंत्रयाचिया उकाळिया । जेथ विषंयोर्मींच्या आकाँळिया । उल्हाळे घेती ॥ ७५ ॥ उदयास्ताचे लोंढे । पाडीत जन्ममरणाचे चोंढे । जेथ पांचंभौतिक बुडबुडे । होती जाती ॥ ७६ ॥ सम्मोह विभ्रंम मासे । गिळिताती धैर्याचीं आँविसें । तेथ देंव्हडे भाँवत वंळसे । अज्ञानाचे ॥ ७७ ॥ भ्रांतीचेनि खंडुळें । रेवंले आस्थेचे अवगाँळें । रजोगुणाचेनि खळाँळें । स्वर्गु गाजे ॥ ७८ ॥ तमाचे धाँरसे वाँडे । सत्त्वाचें स्थिरपण जाड । किंबहुना हे दुर्वाँड । मायानदी ॥ ७९ ॥ पैं पुनरावृत्तीचेनि उभंडें । झळंबंती सत्यलोकींचे हुंडे । घाँयें गडबडती धोंडे । ब्रह्मंगोळकाचे ॥ ८० ॥ तया पाणियाचेनि वाहिलेंपणें । अझुनी नैं धरिती वोभाँणें । ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ? ॥ ८१ ॥ येथ एक नवलाँवो । जो जो कीजे तरणोपाँवो । तो तो अँपावो । होय तें ऐक ॥ ८२ ॥ एक स्वयंबुद्धीच्याँ बाँहीं । रिगाले तयांची शुंद्धीचि नाहीं । एक जाँणिवेचे डोहीं । गर्वेंचि गिळिले ॥ ८३ ॥ एकीं वेदंत्रयाचिया सांगडी । घेतल्या अहंभावाचियाँ धोंडी । ते मदंमीनाच्या तोंडीं । सगळेचि गेले ॥ ८४ ॥ एकीं वंयसेचें जौंड बांधंले । मग मन्मथाँचिये कांसे लागले । ते विषंयमगरीं सांडिले । चघळूनियां ॥ ८५ ॥ आतां वार्धक्याच्या तरंगा- । माजीं मतिभ्रंशाचा जरंगा । तेणें कवळिजताती पैं गा । चहूंकडे ॥ ८६ ॥ आणि शोकाचा कडा उपडत । क्रोधाच्या आवर्तीं दाटत ।

**अन्वयार्थ**—हि–कारण–**एषा मम दैवी गुणमयी माया**–ही माझी अलौकिक सत्त्वादि गुणरूप शक्ति–**दुरत्यया**–[ **अस्ति** ]–जिचें उल्लंघन मोठ्या कष्टानेंच करतां येतें, अशी आहे–**ये**–जे लोक–**माम् एव**–मलाच–**प्रपद्यन्ते**–शरण येतात–**ते**–ते–**एतां मायां**–या मायेला **तरन्ति**–तरून जातात १४.

आतां अर्जुना ! ही महत्तत्त्वादि जी माझी माया ती पार तरून मद्रूप व्हावें, ही स्थिति साध्य होणे कसें शक्य आहे ? ६८. [ कारण ] जी मायानदी निर्गुण ब्रह्मरूपी पर्वताच्या त्या तुटलेल्या कड्यांतून मूळ संकल्परूप उसळीने उगम होऊन लागलीच तिच्यांत पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला; ६९. जी [मायानदी] सृष्टीच्या विस्ताररूपी ओघानें व कालगतीच्या वेगानें वाढून कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांचे उंच कांठ ओलांडून वाहते ७०. जी सत्त्वादि गुणरूपी मेघांची जोरदार वृष्टि झाल्यामुळें भ्रांतीरूप महापुरानें भरून यमनियमरूपी शहरें वाहून नेते ७१. जी द्वेषरूपी भोंवऱ्यानें गच्च भरली असून मत्सररूप वळणे जिला पडली आहेत, जिच्यांत अनवधानता इत्यादि मोठाले मासे तळपत आहेत; ७२. जिच्यांत प्रपंचरूपी बेटांची वळणें असून कर्माकर्माचा पूर येतो व जिच्यावर सुखदुःखरूपी केरकचरा–पुराड तरंगत आहे ७३. जीच्यामधील रतीच्या बेटावर कामरूपी लाटा आदळतात व त्या ठिकाणीं जीवसमुदायरूपी पुष्कळ फेंस एकत्र झालेला दिसत आहे; ७४. अहंकाररूपी ओघ आहे व त्यावर विद्या, धन आणि सामर्थ्य या तीन मदांच्या चिळकांड्या येतात व विषयरूपी तरंगाच्या लाटाहि उसळत आहेत; ७५. जिच्यांत उदय आणि अस्तरूपी लोंढे हे जन्ममरणांचे धोंडे पडून तेथें पंचभूतात्मक शरीररूप बुडबुडे उत्पन्न होतात व लयास जातात; ७६. जिच्यांत अविवेक व भ्रांति हेच कोणी मासे ते सात्त्विक धैर्यरूपी आमिष गिळून टाकतात; ज्या नदीत अज्ञानरूपी मोठे भोंवरे वक्रगतीनें फिरतात ७७. जे भ्रांतिरूप गढूळ पाण्यानें आशारूप गाळांत रुतले व रजोगुणाच्या खळखळाटानें स्वर्गप्राप्तीची गर्जना होत असते; ७८. जिच्यांत तमोगुणरूपी मोठी धार असतें व सत्त्वगुणरूपी स्थिर पाण्याचा सखोल डोह असतो फार काय सांगावें, ही मायानदी तरून जाण्यास अतीव अवघड आहे ७९. हिच्यामधील पुनर्जन्मरूपी पुराचा लोंढा सत्यलोकाचे बुरुजावर आदळतो आणि त्या आघातामुळें ब्रह्मांडरूप धोंडे तेव्हांच गडबडून पडतात ८०. त्या पाण्याच्या वेगानें आजवर वाहात आलेला पूर अजूनही ओसरत नाहीं ! अरे ! असा हा मायापूर कोण तरून जाईल ? ८१. आणखी येथें एक मोठेंच नवल आहे ! ते हे कीं, या नदींतून तरून जाण्याला जे जें म्हणून उपाय करावेत ते ते अपायच होतात ! ते कसे ते ऐक ८२. कोणी स्वतःच्याच बुद्धिरूपी बाहुबळावर हिच्यामधून तरून जावें म्हणून हिच्यांत उडी टाकतात, पण ते कोणीकडे गेले त्याचा तर पत्ताच नाहीं; दुसरें कोणीएक ज्ञानरूपी डोहांत, गर्वानेच पार गिळून टाकले ८३. कित्येकांनी वेदत्रयाचीं 'सांगडी 'चा आश्रय केला; पण त्यावर मीपणाचे धोंडे बांधून घेऊन तरून जाण्यास निघाले; ते मदरूपी माशांच्या तोंडात संबंधच गेले ८४. कोणी एकानी तारुण्याच्या बळरूपी कांसपेटा कमरेस कसून मदनाच्या कासेला लागले, तों त्यांना विषयरूप मगरीनेंच चघळून टाकिले; ८५. मग ते वार्धक्यरूप लाटांमध्यें तरंगत जात असतां मतिभ्रंशरूप जाळ्यांत सांपडतात व त्यायोगें चहूंकडून जखडले जातात ८६. आणि शोकरूप कड्यावर आपटले

१ महत्तत्त्व आदि. २ पार पडून, अतिक्रमून. ३ समजुतीस, अनुभवास. ४ ब्रह्म हाच कोणी एक पर्वत त्याच्या. ५ अर्धकड्यांत. ६ लोंढा. ७ लहानसा. ८ जीवोत्पत्तीच्या, विस्ताराच्या ओघाने. ९ कालगतीच्या. १० कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांची. ११ उंच. १२ तीरें, डगरी. १३ सत्वादि गुण हेच कोणी मेघ त्यांच्या. १४ भ्रांतीच्या. १५ यम–मनोनिग्रह, नियम–इंद्रियनिग्रह. १६ भोवऱ्यांत. १७ वळणें. १८ उन्मत्तपणा वगैरे. १९ चमकतात. २० मोठे मासे. २१ वळसे, बांकणें. २२ पूर. २३ तरंगतात. २४ पुरांतील लांकडे, केरकचरा इत्यादि. २५ विषयसुखाच्या. २६ जीव हेच कोणी फेंस, त्यांचा समुदाय. २७ पुष्कळ. २८ लाटा. २९ विद्या, धन व सामर्थ्य हे तीन मद. ३० विषयतरंगांच्या. ३१ लाटा. ३२ उसळतात. ३३ पूर. ३४ धरण, धोंडे. ३५ शरीरें. ३६ अत्यंत मोह. ३७ भ्रांति. ३८ मांस. ३९ वांकडे, मोठें. ४० भोंवरे. ४१ गढूळ पाणी. ४२ रुतले. ४३ दलदल. ४४ खळखळ वाहणारे ओढे, प्रवाह. ४५ प्रवाह. ४६ मोठें. ४७ कठीण, द्वाड. ४८ पुराने. ४९ खचतात. ५० बुरूज. ५१ आघाताने. ५२ ब्रह्मांडगोलाचे. ५३ वाहणीने, प्रवाहाने. ५४ पूर थांबत नाही. ५५ आश्चर्य. ५६ तरण्याचा उपाय. ५७ अपाय. ५८ आत्मबुद्धीच्या, अभिमानाच्या. ५९ बाहुबळाने. ६० थांग. ६१ ज्ञानाच्या. ६२ ऋक्, यजु व साम. ६३ मीपणाच्या. ६४ गर्वरूप माशाच्या. ६५ वयाचे. ६६ बळ धरिलें, कंबर बांधली. ६७ मदनाच्या. ६८ विषयरूप सुसरीनी.

आपदागिधीं चुंबिजते । उधवला ठायीं ॥ ८७ ॥ मग दुःखाचेनि बरबटें बोंबेलें । पाठीं मरणाचिये रेवें रेवले । ऐसे कामाचे कांसे लागले । ते गेले वायां ॥ ८८ ॥ एकीं यंजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं । ते स्वर्गसुखाच्या कपाटीं । शिरंकोनि ठेले ॥ ८९ ॥ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा भरंवसा । परी ते पडिले वळसां । विधिनिषेधांच्या ॥ ९० ॥ जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लगे । वरि कांहीं तरों ये योगें । तरी विपाय तो ॥ ९१ ॥ ऐसें तरी जीवाचिये आंगवणें । इये मायानदीचें तरणें । हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥ ९२ ॥ जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी । कीं रागी सांडी रिद्धी । आली सांती ९३ ॥ जरी चोरां सभा दाटे । अथवा मीनां गळु घोटे । ना तरी भेडौ उलटे । विवंसी जरी ॥ ९४ ॥ पोंडस वागुरे कांडी । कां मुंगी मेरु वोलांडी । तरी मायेची पैलथडी । देखती जीव ॥ ९५ ॥ म्हणौनि गा पंडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनिता । तेवीं मायामय हे सरिता । न तरवे जीवां ॥९६॥ येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां ऐलीचें थडी सरलें । मायाजळ ॥ ९७ ॥ जयां सद्गुरुतारू फुडे । जे अनुभवाचे कांसे गाढे । जयां आत्मनिवेदनतरांडें । आंकळलें ॥९८॥ जे अहंभावाचें वोझें सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकाउनी । अनुरागाचा निरुता होउनि । पाणिढाळु ॥ ९९ ॥ जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा । मग निवृत्तीचिया पैल तीरा । झेंपावले जे ॥१००॥ ते उपरतीच्या वांवीं सेलत । सोऽहंभावाचेनि थावें पेलत । मग निघाले अनकळित । निवृत्तितटीं ॥१॥ येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले । परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥ २ ॥

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः । माययाऽपहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥
चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन । आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

जे बहुतां एकां अव्हांतरु । अहंकाराचा भूतसंचारु । जाहला म्हणौनि विसरु । आत्मबोधाचा ॥ ३ ॥ ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे । पुढील अधोगतीची लाज नेणवे । आणि करितातित जें न करावें । वेदु म्हणे ॥४॥ पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा । तो कार्यार्थु आघवा । सांडूनियां ॥ ५ ॥ इंद्रियग्रामींचें

जातात आणि पुढें क्रोधरूपी भोवऱ्यांत गुरफटले असतां त्यांतून कोठें वर डोकें काढतात तोच कीं,आपत्तिरूप गिधाडें त्यास टोंचटोंचून खाऊं लागतात, ८७. मग ते दुःखरूप चिखलाने माखले जातात व मग मरणरूप गाळांत रुतले जातात! अशा प्रकारें जे कामाच्या मार्गे लागले ते असे फुकट जातात ८८. कोणीं यज्ञादिक क्रियारूपी 'पेटी' बांधून आपल्या पोटाखालीं घेतात. ते स्वर्गसुखरूपी कपारींत अडकून राहतात ८९. कोणी मोक्षरूपी पैलतीराला लागावें या आशेनें कर्मरूप बाहुबलावर विश्वास ठेवतात. परंतु ते विधीनिषेधाच्याच भोवऱ्यांत सांपडतात ९०. ज्या नदीमध्यें वैराग्यरूप नाव प्रवेश करूं शकत नाहीं, आणि जिला विचाराचा टिकावच लागत नाहीं; तरीपण ती मायानदी योगानेंच कांहींशीं तरून जाता येईल पण असें फार क्वचितच घडतें ९१. याप्रमाणें जीवाच्या अंगबळानें ह्या मायारूप नदींतून तरून जाता येतें, हें म्हणणें कशासारखें आहे म्हणून म्हणावें? ९२. जर पथ्य न करणाराचा रोग टळेल, किंवा साधूला दुर्जनाची बुद्धि कळेल किंवा एकादा लोभी पुरुष ऐश्वर्य प्राप्त झालें असतां त्याचा त्याग करील ९३. जर चोरांच्या सभेस गर्दी भरेल, अथवा माशाला गळ गिळतां येईल; किंवा एकादा भित्रा पिशाच्चाला हल्ला करून परत फिरवील ९४. हरणाचें पाडस जाळें कुरतडील किंवा मुंगी मेरूपर्वत ओलांडील, अर्थात् इतक्या गोष्टी घडून येणें शक्य होईल तरच जीवांना [ आपल्या स्वतःच्या शहाणपणानें ] मायानदी तरून पलीकडल्या तीरीं जातां येईल! असें म्हणतां येईल ९५. म्हणून, हे अर्जुना! ज्याप्रमाणें विषयासक्त पुरुषाला स्त्री जिंकवतच नाहीं त्याप्रमाणें ही मायारूप नदी जीवाला तरवत नाहीं ९६. मग माया नदी तरून जाणे शक्यच नाहीं असें झाले, असें म्हणशील तर तसें नाहीं त्यास एकच उपाय आहे तो असा— जे मला सर्व भावानें शरण येतील ते एकच ह्या दुस्तर नदींतून सहज तरून जातील इतकेच नव्हे तर त्यास अलिकडच्या कांठावरच मायारूप नदीचे जल पार नाहींसे होईल, कारण, परमार्थदृष्ट्या ते वस्तुतः नसतेच ९७. असो, मायानदी तरून जाण्यास ज्यांना सद्गुरु हाच कोणी चांगला नावाडी मिळाला आहे व ज्यांनीं ब्रह्मसाक्षात्काराची कांस बळकट बांधली आहे व ज्यांना आत्मनिवेदनरूपी हाच कोणी 'ताफा' हस्तगत झाला आहे ९८. जे अहंभावाचें ओझें टाकून, विकल्परूपी वाऱ्याच्या झुळुका चुकवून आणि संसारावरील प्रेमरूपी पाण्याची धार चुकवून ९९. जीव ब्रह्माचे ऐक्य हाच 'उतार' असलेल्या पाण्यांत बोधरूपीं ताऱ्याच्या आश्रयाने निवृत्तीच्या पलीकडील तीरावर झेप घालून सत्वर निघाले १००. अथवा वैराग्यरूप हातांनी पाणी तोडीत 'अहं ब्रह्म' ह्या भावाच्या बळावर पोहत अनायासे मुक्तितटावर अचूकपणे बाहेर निघतात १. या एकाच उपायानें जे मला भजतात, तेच ह्या मायारूप नदींतून तरून जातात; परंतु असे भक्त अगदी थोडे आहेत फार नाहींत २.

**अन्वयार्थ—दुःष्कृतिनः**—दुराचार करणारे—**मूढाः**—अविवेकी—**मायया अपहृतज्ञानाः** मायेनें ज्यांच्या ज्ञानाचा अपहार केला आहे असे—**आसुरं भावम् आश्रिताः**—आसुर भावाचा आश्रय केलेले—**नराधमाः**—अधम लोक—**मां**—मला— **न प्रपद्यन्ते**—शरण येत नाहींत १५. **अर्जुन**—हे अर्जुना! —**चतुर्विधा सुकृतिनः जनाः**—चार प्रकारचे पुण्यवान् जन **मां**—मला—**भजन्ते**—भजतात—**भरतर्षभ**—हे भरतश्रेष्ठ! ऐक—**आर्तः**—पीडा होत असलेला—**जिज्ञासुः** भगवानाचें तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा—**अर्थार्थी**—धनाची इच्छा असलेला—**च ज्ञानी**—व भगवत्तत्त्व जाणणारा १६.

कारण त्या एकाशिवाय इतर सर्व जीवांना अनादि कालापासून अहंकाररूप भूतांचा संचार झाल्यामुळें आत्मस्वरूपाचा विसर पडला आहे ३. अशा स्थितींत त्यांस शास्त्रीय यम नियमरूपी वस्त्राचें भान राहात नाहीं, अर्थात् पुढें असलेल्या अधोगतींचीं लाज वाटत नाहीं इतकेच काय पण वेद जें करूं नये म्हणून सांगतो तेंच अवश्य करितात ४. अर्जुना! असें पहा कीं, तें या शरीररूप गांवांत ज्या म्ह. परमात्मप्राप्तिरूपी कार्याकरितां आले तो सर्व कार्यभाग सोडून देऊन ५. या इंद्रियसमुदायरूपी गांवाच्या राजमार्गावर अहंममतेची

१ आपत्तिरूप गिधाडांनी. २ टोंचले जातात. ३ वर डोकें काढतांच. ४ चिखलांत. ५ माखले. ६ वाळूत. ७ रुतले. ८ यज्ञादिकांची. ९ कपारींत, भगदाडांत. १० अडकून. ११ कर्मरूप बाहूचा. १२ वळणांत, भोंवऱ्यांत. १३ कर्तव्याकर्तव्याचा. १४ टिकाव. १५ क्वचित्. १६ शक्तीने. १७ पथ्य न करण्याची. १८ विषयासक्त. १९ प्राप्त झाली असता. २० भय पावे. २१ माश्याला. २२ भित्र्या. २३ पिशाच्च. २४ हरणाचें पोर. २५ जाळे. २६ कुरतुडी, तोडी. २७ परतीर. २८ विषयी पुरुषास स्त्री जिंकवत नाही. २९ नदी. ३० सहज. ३१ अलीकडच्याच कांठी. ३२ नावाडी, तारणार. ३३ ब्रह्माच्या. ३४ बळकट. ३५ आत्मस्वरूप जाणणें. ३६ तराफा, ताफा. ३७ सांपडले.

राजेंबिदीं । अहंममतेचिया जलेंवादीं । विकारांतरांचि मांदीं । मेळवूनियां ॥ ६ ॥ दुःखशोकांच्या घाईं । मारिलियाची सेचि नाहीं । हे सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ॥ ७ ॥ म्हणौनि ते मातें चुकले । ऐका चतुर्विध मज भजले । जिहीं आत्महित केलें । वाढतें गा ॥ ८ ॥ तो पहिला आर्तु म्हणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे । तिजा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥ ९ ॥

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते । प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥

तेथ आर्तु तो आर्तीचेनि व्याजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे । तिजेनि तेणें इच्छिजे । अर्थसिद्धि ॥ ११० ॥ मग चौथियाच्या ठायीं । कांहींचि करणें नाहीं । म्हणौनि भक्तु एकु पाहीं । ज्ञानिया जो ॥ ११ ॥ जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाभेदांचें कडवसें । मग मीचि जाहला समरसें । आणि भक्तुही तेवींचि ॥ १२ ॥ परि आणिकांचिये दिठी नावेक । जैसा स्फटिकुचि आभासे उदक । तैसा ज्ञानी नव्हे कौतुक । सांगतां तो ॥ १३ ॥ जैसा वारा कां गगनीं विरे । मग वारेपण वेगळें नुरे । तेवीं भक्त हे पैजें न सरे । जरी ऐक्या आला ॥ १४ ॥ जरी पवनु हालवूनि पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे । एऱ्हवीं गगन तो सहजें । असे जैसें ॥ १५ ॥ तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्तु ऐसा गमे । परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाहला ॥ १६ ॥ आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणें । म्हणौनि मीही तैसेंचि म्हणें । उचंबळला सांता ॥ १७ ॥ हां गा जीवापैलीकडिलीये खुणे । जो पावोनि वावरों जाणें । तो देहाचेनि वेगळेपणें । काय वेगळा होय ? ॥ १८ ॥

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् । आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥१८॥

म्हणौनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोहि भक्त झोंबे । परी मीचि करी वालभें । ऐसा ज्ञानिया एकु ॥ १९ ॥ पाहें पां दुभतयाचिया आशा । जगचि धेनूसि करीतसे फांसा । परि दोरेंवीण कैसा । वत्साचा बळी ॥ १२० ॥ कां जे तनुमनुप्राणें । तें आणिक कांहींचि नेणें । देखे तयातें म्हणे । हे माय माझी ॥ २१ ॥ तें येणें मानें अनन्यगती । म्हणौनि धेनुही तैसीचि प्रीति । यालागीं लक्ष्मीपती । बोलिले साचें ॥ २२ ॥ हें असो मग म्हणितलें । जे कां तुज सांगितलें । तेही भक्त भले । पाढियंते आम्हां ॥ २३ ॥ परि जाणोनियां मातें ।

बडबड करण्याने इतर कामक्रोधादि विकारांचा समुदाय गोळा केला आहे ६. अशा स्थितींत दुःख व शोक यांचे घाव अंगावर कितीहि मारले तरीहि त्यांना त्यांची आठवणसुद्धां रहात नसते. हें सांगावयाचें कारण इतकेच की असे ते मायेनें ग्रासलेलें असतात ७. म्हणून तें मला मुकले. हे असो आतां या जगांत माझे भजन करणारे असें चौघेच आहेत, कीं ज्यांनीं आपले आत्महित वाढते केलें ते असे ८. पहिला आर्त म्हणावा, दुसरे ते म्हणावे जिज्ञासु, तिसरे ते अथार्थी म्हणावे व चौथा तो ज्ञानी होय, असें समज ९.

**अन्वयार्थ**—**तेषां**–त्या चार प्रकारच्या भक्तांपैकीं–**ज्ञानी**–ज्ञानी–तत्त्ववेत्ता–**नित्ययुक्तः**–सतत भगवाना-मध्यें ज्याचें चित्त स्थिर झालेलें असतें व–**एकभक्तिः**–एका भगवानामध्येंच ज्याची भक्ति आहे असा ज्ञानी–**विशिष्यते**–सर्वांत अधिक आहे–**हि**–कारण–**अहं**–मी **ज्ञानिनः**–आत्मतत्त्वज्ञाला–**अत्यर्थम्**–अतिशय–**प्रियः**–प्रिय असतो–**च**–व–**सः**–तो–**मम**–मला–**प्रियः**–प्रिय असतो १७.

आर्त हा आपले दुःखनिवारण्यासाठींच मला भजतो, मुमुक्षु ज्ञानप्राप्तीकरितां मला भजतो तिसरा जो अर्थार्थी तो द्रव्य, पुत्र इत्यादि प्राप्तीच्या इच्छेनें मला भजतो ११०. आणि चौथा ज्ञानी भक्त त्याला जगांत खरोखरी कांहींच कर्तव्य नसतांहि मला भजतो, म्हणून तो एक ज्ञानी पुरुषच माझा आवडता भक्त होय, हें ध्यानांत ठेव ११. कारण त्या ज्ञानाच्या प्रकाशाने त्याचा भेदा-भेद भ्रमरूप अंधःकार नाहींसा झालेला असतो म्हणून तो एकरूपतेनें मद्रूपच असतो. तरीहि त्याची निष्काम भक्ति ही तशीच कायम असते १२. परंतु स्फटिक मणि पाण्यांत टाकला असतां तो इतरांच्या दृष्टीला पाण्याहून वेगळा असा दिसत नाहीं; तशी गोष्ट ज्ञान्याची नाहीं; कारण तो शरीराच्या उपाधीनें इतरांच्या दृष्टीला माझ्याहून वेगळा दिसला तरी तसा वेगळा नाहीं तर मद्रूपच असतो त्याचे कौतुक काय सांगावे ? १३. वारा गगनांत शांत झाल्यावर मग त्याचें वारेपण वेगळें उरत नाहीं त्याप्रमाणें हा जरी मद्रूप झाला तरी पूर्व संस्कारानें त्याचा भक्तपणाचा बाणा जात नाहीं १४. जर वारा हालवून पाहिला तर तो गगनाहून वेगळा दिसतो. एऱ्हवीं गगन आणि तो ज्याप्रमाणें सहजच एकरूप असतो १५. त्याप्रमाणें, तो ज्ञानी शरीरासंबंधीं सर्व कर्मांच्या आचरणानें तो माझा भक्त असा वाटतो; तरीपण अंतःकरणगत स्वानुभवाच्या योगानें तो मत्स्वरूपच होऊन असतो; १६. आणि आत्मज्ञानाच्या प्रकाशानें मीच त्याचा आत्मा आहे असें तो जाणतो. म्हणून मीहि संतोषयुक्त होऊन ' ज्ञानी हा माझा आत्मा आहे ' असें म्हणतो १७. जो जीवपणाच्या पलीकडील जी परमात्मस्वरूपाची खूण ती प्राप्त करून घेऊन व्यवहारांत वागतो. तो केवळ देहधारी असल्या-मुळें दिसणाऱ्या वेगळेपणाने माझ्यापासून सत्यत्वानें वेगळा होईल काय ? सांग बरें ! १८.

**अन्वयार्थ**—**सर्वे एव एते उदाराः**–हे सर्वच उत्कृष्ट आहेत–**तु**–पण–**ज्ञानी**–आत्मवेत्ता–**मे**–माझा–**आत्मा एव**–आत्माच–**मतं**–मानलेला आहे–**हि**–कारण–**सः**–तो–**युक्तात्मा**–समाहित चित्त होऊन–**माम् एव**–मलाच–**अनुत्तमां गतिम्**–उत्तम गतीला–**आस्थितः**–येऊन पोंच-ण्यास प्रवृत्त झाला आहे १८.

म्हणून आपआपल्या हिताकरितां हवा तो मनुष्य माझी भक्ति करितोच आहे परंतु मीच ज्याच्यावर प्रीति करितों असा एक भक्त म्हणजे फक्त ज्ञानीच होय १९. हे पहा दुधाच्या आशेनें गाईला कोण भाला घालीत नाहीं ? सगळेच घालतात. कसा त्या वत्साचा बलवत्तर प्रेमभाव आहे पहा ! म्हणूनच दोराच्या भाल्यावांचून वासरास वाटेल त्यावेळीं दूध पाजते २०. कां तर त्याला दुसरे कांहींएक माहीत नसते; आपल्या तनमनप्राणानें तें आईलाच ओळखीत असतें, आणि जी वस्तु पुढें पाहील ती माझी आईच आहे असें ते म्हणते २१. अशा प्रकारें, वासरूं गाईचे अनन्यभक्त असतें; म्हणून त्याच्यावर गायहि तशीच प्रीति करिते, यास्तव लक्ष्मी-पति [ भगवान् श्रीकृष्ण ] जें बोललें तें अगदीं खरें. असें महाराज म्हणतात २२. हें असो. मग भगवान् म्हणतात–ज्ञान्याशिवाय जे तुला इतर तीन भक्त सांगितले, तेहि माझे चांगले आवडते आहेत २३. पण जे

---

१ राजमार्गांत. २ बडबडीने. ३ कामक्रोधादिकांची. ४ समुदाय. ५ आठवण. ६ चार प्रकारचे लोकमात्र. ७ संसारपीडित, रोगी. ८ ज्ञानप्राप्ति इच्छिणारा. ९ धनादि-कांची इच्छा करणारा. १० ज्ञानी, जाणता. ११ निमित्ताने. १२ तिसऱ्या अर्थार्थ्यांने. १३ द्रव्यप्राप्ति. १४ अंधार. १५ एकरूप होऊन, ऐक्याने. १६ लोकदृष्ट्या. १७ क्षणभर. १८ शांत होतो. १९ प्रतिज्ञा, बाणा. २० स्वानुभवाने. २१ उदयाने. २२ हर्षयुक्त होऊन, सांता–होत्साता, होऊन. २३ व्यवहार करण्याला जाणतो. २४ वाटेल तो. २५ प्रिय जिवलग. २६ भाला, आढी घालणें. २७ वासराचा.

जे पाहों विसरले मागौतें । जैसें सागरा येऊनि सरितें । मुरडावें ठेलें ॥ २४ ॥ तैसी अंतःकरणकुहरीं जन्मली । जयाची प्रतीतिगंगा मज मीनली । तो मी हे काय बोली । फार करूं ? ॥ २५ ॥ एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें । हें न म्हणावें परि काय कीजे । न बोलणें बोलों ॥ २६ ॥

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

जे तो विषयांची दाट झाडी- । माजीं कामक्रोधांचीं सांकडीं । चुकावूनि आला पोंडीं । सद्वासनेचिया ॥ २७ ॥ मग साधुसंगें सुभटा । उजू सत्कर्माचिया वाटा । अप्रवृत्तीचा अव्हांटा । डावलूनि ॥ २८ ॥ आणि जन्मशतांचा वाहतवणा । तेविंची आशेचिया नें लेचि वाहणा । तेथ फलहेतूचा उगाणा । कवणु चाली ॥ २९ ॥ ऐसा शरीरसंयोगाचिये रातीं- । माजीं धांवतां सडियां आयती । तंव कर्मक्षयाची पाहाती । पाहांट जाली ॥ १३० ॥ तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली । तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥ ३१ ॥ ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥ ३२ ॥ हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं । जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥ ३३ ॥ तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरी । हें सांगिजेल बोलवरी । तैसें नव्हे ॥ ३४ ॥ म्हणौनि असो हें इयापरी । तो देखे ज्ञानाची वाखारी । तेणें संसरलेनि करी । आपु विश्व ॥ ३५ ॥ हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो । म्हणौनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि ॥ ३६ ॥ जयाचिये प्रतीतीचा वाखारां । पवाडु होय चराचरा । तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभु आथी ॥ ३७ ॥ येर बहुत जोडती किरीटी । जयांचीं भजनें भोगासाठीं । जे आशातिमिरें दृष्टी । विषयांध जाले ॥ ३८ ॥

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः । तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥

आणि फळाचिया हांवा । हृदयीं कामा जाला रिगावा । कीं तयाचिये घसणी दिवा । ज्ञानाचा गेला ॥ ३९ ॥ ऐसे उभयतां आंधारीं पडले । म्हणौनि पासींचि मातें चुकले । मग सर्वभावें अनुसरले । देवतांतरां ॥ १४० ॥ आधींच प्रकृतीचे पाइक । वरी भोगालागीं तंव रंक । मग तेणें लोलुपत्वें कौतुक । कैसेनि

मला आत्मत्वानें जाणून मग ते पुनः संसाराकडे पाहण्यास विसरले ज्याप्रमाणें नदी सागराला मिळाल्यावर तिचें माघारी वळणे रहात नाहीं २४. त्याप्रमाणें ज्याच्या अंतः-करणरूपी गुहेंतून उगम पावलेली अनुभूतिरूप गंगा माझ्या स्वरूपाला मिळाली आहे. तो मीच आहे, हे शब्दद्वारां विस्तार करून काय सांगूं ? १२५. एऱ्हवीं ज्ञानी ज्याला म्हणतात, तो केवळ माझा आत्माच होय. हें सांगूं नये, पण काय करावें ? ही न बोलण्याची गोष्ट तुला प्रसंगाने सांगितली २६.

**अन्वयार्थ**––**बहूनां जन्मनाम् अन्ते**–अनेक जन्मांच्या शेवटीं–**ज्ञानवान्**–ज्याचें ज्ञान परिपक्व झालें आहे असा ज्ञानी–**वासुदेवः सर्वम् इति**–वासुदेवच हें सर्व आहे, असा–**मां प्रपद्यते**–मला प्राप्त होतो–**सः महात्मा**–तो ज्ञानी–**सुदुर्लभः**–अत्यंत दुर्लभ आहे. १९

कारण, तो विषयरूप दाट झाडींतून कामक्रोधादि-कांची संकटें टाळून, व चांगल्या वासनारूपी पहाडावर चढून आला; २७ नंतर, हे अर्जुना ! साधूंच्या संगतीनें, सत्कर्मांच्या सरळ वाटेनें, दुराचरणाच्या आडमार्गाला डावलून २८. आणि शेंकडों जन्म भक्तीची वाटचाल कर-णारा जो ज्ञानी भक्त, फलाशेच्या वाहणा पायांत घालीत नाहीं तेथें फलाच्या हेतूचा हिशेब कोणी करावा ? २९. याप्रमाणें शरीर संबंधी अज्ञानरूप रात्रींत उपाधिरहित एकटा वाट चालत असतां, सहज कर्मक्षय होऊन ज्ञानोदयाची पहाट होते १३०. त्याच वेळेस गुरुकृपारूप उषःकाल होतो, आणि मग ज्ञानरूप सूर्याचीं कोंवळीं किरणें पडतात त्यावेळीं ब्रह्मात्मैक्य दृष्टीचें ऐश्वर्य त्याच्या दृष्टीस पडतें ३१. त्या वेळीं तो जिकडे जिकडे पाहतो, तिकडे तिकडे त्याला मीच एक आहे अथवा तो जरी स्वस्थ बसला, तरीहि त्याला मीच आहे ३२. हे असो. त्याला सर्व ठिकाणीं माझ्यावांचून दुसरें कांहीं एक [दिसत] नाहीं; ज्याप्रमाणें पाण्याच्या डोहांत बुडालेल्या घटाच्या आंत व बाहेर पाणीच असतें; ३३. त्याप्रमाणें तो माझ्या आंत असतो व मी त्याच्या अंतर्बाह्य असतो हें शब्दद्वारां बोलून दाखविता येईल असे नाहीं ३४. म्हणून हें असो. याप्रमाणें तो ज्ञानाची वखारच पाहतो आणि तो ज्ञानानें सांवरल्यामुळें अखिल विश्व आत्मरूपच आहे असें पाहतो ३५. हे संपूर्ण विश्व श्रीवासुदेवस्वरूपच आहे, अशा अनुभूतिरूप रसाचाच त्याचा भाव [निश्चय] ओतलेला असतो. म्हणून सर्व भक्तांमध्यें तोच सर्वश्रेष्ठ राजा आहे आणि ज्ञानीहि तोच आहे ३६. धनुर्धरा ! [व्यापक] अनुभूतिरूपी भांडारांत सर्व चराचरात्मक विश्वाचा समावेश होतो असा हा महात्मा फार दुर्लभ आहे ३७. अर्जुना ! यांच्याशिवाय इतर असें भक्त मला पुष्कळ मिळतात कीं, ज्यांची भक्ति-भजने फक्त विषयसुखोपभोगासाठीं असतात. कारण, आशा-रूपी तिमिरानें त्यांची दृष्टि मंद-विषयांध झालेली असते ३८.

**अन्वयार्थ**––**तैः तैः कामैः**––त्या त्या पुत्र–पशु–स्वर्गादिकांच्या कामांनीं–**हृतज्ञानाः** – ज्यांचें विवेकज्ञान हरण केलें आहे, तें–**स्वया प्रकृत्या**–आपल्या प्रकृती-कडून–**नियताः**–नियमित होत्साते–**तं–तं** – **नियमं**–त्या त्या नियमांचा–**आस्थाय**–आश्रय करून–**अन्यदेवताः**–दुसऱ्या देवतांना–**प्रपद्यन्ते**–शरण जातात. २०

आणि फळाच्या तीव्र इच्छेनें त्यांच्या अंतःकरणांत कामाचा प्रवेश झाला व त्याच्या संसर्गानें ज्ञानरूपी दिवा मालवला गेला ३९. अशा दोन्ही प्रकारांनी [अंतर्बाह्य] ते अंधारांत पडले. म्हणून मी त्यांच्याजवळच असूनहि ते मला अंतरतात, आणि मग सर्वभावें करून इतर देवतांना भजूं लागतात १४०. अगोदरच ते प्रकृतीच्या आधीन झालेले दास आणि त्यांत भोगप्राप्तीकरितां दीन झालेले, [मग काय?]

१ माघारे. २ नदीला. ३ माघारें उलटणें राहिले. ४ अंतःकरणरूपी गुहेंत. ५ अनुभवरूपी गंगा. ६ मिळाली. ७ जीव. ८ संकटे, अडचणी. ९ पहाडावर. १० वीरश्रेष्ठ, अर्जुना. ११ नीट. १२ दुराचरणाचा. १३ आडमार्ग. १४ डावीकडे टाकून. १५ वाटसरु, प्रवासी. १६ न घालता. १७ वाहाणा, पादुका. १८ हिशेब, गणना. १९ कोण चालतो. २० रात्रीमध्यें. २१ सडा, संगरहित, एकटा. २२ उजेडाची. २३ ज्ञानोदयाची वेळ. २४ उषःकाल. २५ कोवळे ऊन. २६ ऐश्वर्य. २७ वाट, मार्ग. २८ तेथें. २९ आंत बाहेर, सर्वत्र. ३० वाचेने, शब्दांनी. ३१ वखार, कोठी. ३२ ह्या ज्ञानाचे भांडवलावर सर्व खरेदी केले [आपलेसें केले]. ३३ वखार, कोठी. ३४ विस्तार. ३५ इच्छारूप अंधकाराने. ३६ इच्छेने. ३७ संघटनाने, झपाट्याने. ३८ आंत व बाहेर, आशारूपी अंधार व आंतील ज्ञानादिक.

भजती ॥ ४१ ॥ कवणीं तिया नियमबुद्धि । कैसिया हन उपचारसमृद्धि । कां अर्पण यथाविधि । विहित करणें ॥ ४२ ॥

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति । तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१॥

पैं जो जिये देवतांतरीं । भजावयाची चाड करी । तयाची ते चाड पुरी । पुरविता मी ॥ ४३ ॥ देवोदेवीं मीचि पाहीं । हाही निश्चयो त्यासि नाहीं । भावो ते ते ठायीं । वेगळा धरिती ॥ ४४ ॥

स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते । लभते च ततः कामान् मयैव विहितान् हि तान् ॥ २२ ॥

मग तियां श्रद्धायुक्त । तेथिंचें आराधन जें उचित । तें सिद्धीवेंरी समस्त । वर्तों लागे ॥ ४५ ॥ ऐसे जेणें जें भाविजे । तें फळ तेणें पाविजे । परी तेंही सकळ निपजे । मजचिस्तव ॥ ४६ ॥

अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् । देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥ २३ ॥

परी ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणौनि कल्पित फळ पावती । अंतवंत ॥४७॥ किंबहुना ऐसें जें भजन । तें संसाराचेंचि साधन । येर फळभोग तो स्वप्न । नावेंभरी दिसे ॥ ४८ ॥ हें असो परौतें । मग हो कां आवडे तें । परी यजी जो देवतांतें । तो देवत्वासीचि ये ॥४९॥ येर तनुमनुप्राणीं । जे अनुसरले माझेयाचि वाहणीं । ते देहाच्या निर्वाणीं । मीचि होती ॥ १५० ॥

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः । परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

परी तैसें न करिती प्राणिये । वायां आपुलिया हितीं वांणिये । जे पोहताती पाणियें । तळहातींचेनि ॥ ५१ ॥ नाना अमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडा कां वज्रमिठी पाडिजे ? । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें ? ॥ ५२ ॥ हें ऐसें कासया करावें । जें अमृतींही रिगोनि मरावें । तें सुखें अमृत होऊनि कां नसावें । अमृतामाजीं ? ॥ ५३ ॥ तैसा फळहेतूचा पांजरा । सांडूनियां धनुर्धरा । कां प्रतीतिपांखीं चिदंबरा । गोसाविया नोहावें ? ॥ ५४ ॥ जेथ उंचावलेनि पवाडें । सुखाचा पैसारू जोडे । आपुलेनि सुरवाडें । उडों ये ऐसा ॥ ५५ ॥ तया उमपा माप कां सुवावें । मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें । सिद्ध असतां कां निमावें । साधनवरी ॥ ५६ ॥ परी हा बोल आघवा । जरी विचारीजतसे पांडवा । तरी विशेषें या जीवां । न चोजवे गा ॥ ५७ ॥

असें ते मोठ्या कौतुकानें वैषयिक सुखलंपट होऊन देवांची कशी भक्ति करितात, पहा ४१. त्या त्या देवता–आराधनेचे जे जे नियम असतील ते ते जाणून तसेच जी जी त्या देवदेवतांना उपचार सामुग्री लागत असेल ती ती सर्व जमवून, जे उपचार, अर्पण करें करावेत तेही समजावून घेऊन त्या त्या विधीप्रमाणे ती ती विहित कर्मे करतात ४२.

**अन्वयार्थ—यः यः भक्तः**–जो जो कामी भक्त–**यां यां तनुं**–ज्या ज्या देवतेच्या तनूची–**श्रद्धया अर्चितु**–श्रद्धेनें पूजा करण्याची–**इच्छति**–इच्छा करतो–**तस्य तस्य**–त्याच्या त्याच्या–**ताम् एव श्रद्धां**–त्याच श्रद्धेला **अहम् अचलां**–मीं अचल स्थिर–**विदधामि**–करतो २१.

परंतु, जो जो ज्या ज्या इतर देवतेची फलाकरितां उपासना करण्याची इच्छा करितो, त्याची ती इच्छा पूर्णतया पुरविणारा मीच आहे ४३. हे पहा देव–देवी मीच आहें; परंतु त्याचा तसाहि निश्चय नसतो; म्हणून त्या त्या देवदेवतांचे ठिकाणीं तो निरनिराळा भाव धरीत असतो ४४.

**अन्वयार्थ—सः**–तो देवतापूजन–**तया श्रद्धया-युक्तः**–त्या श्रद्धेनें युक्त होऊन–**तस्याः**–त्या देवतेचें–**राधनम् ईहते**–आराधन करतो–**च**–आणि–**ततः**–त्या देवतेपासून–**मया एव हि**–मीच–**विहितान्**–निर्मिलेल्या–**तान् कामान्**–त्या कामांस–**लभते**–प्राप्त होतो २२.

मग त्यांना, ज्या ज्या देवतेचे जे योग्य आराधन असेल, त्या त्या देवतेचें श्रद्धापूर्वक आपली कार्यसिद्धि होईपर्यंत, ते यथाविधि पूजन करितात ४५. याप्रमाणें ज्यानें जे फल इच्छावें तें फळ त्याला प्राप्त होतें परंतु तेहि सर्व माझ्यापासूनच मिळतें. [ कारण सर्वान्तर्यामी मीच आहे ] ४६.

**अन्वयार्थ— तु**–पण–**तेषाम् अल्पमेधसां**–त्या मतिमंदांचें–**तत् फलं**–तें फल–**अन्तवत्**–विनाशी–**भवति**–असतें–**देवयजः**–देवांची पूजा करणारे–**देवान्**–देवांस–**यान्ति**–प्राप्त होतात–**मद्भक्ताः**–माझे भक्त–**माम् अपि** मलाहि–**यान्ति**–प्राप्त होतात २३.

परंतु ते भक्त मला जाणत नाहींत; कारण ते आशापाशांतून मुक्त होऊन बाहेर पडत नाहींत, आणि म्हणूनच, नाशवंत अशीं इच्छित फलें त्यांना प्राप्त होतात ४७. अधिक काय सांगावें ! अशा प्रकारचें जे भजन म्हणजे जन्ममरणरूप संसाराचेंच साधन होय. बाकी त्या भजनानें मिळणारा फलभोग म्हणजे क्षणभर दिसणारे एक स्वप्नच होय ४८. हें बाजूस राहूं द्या. मग त्याचें आवडतें दैवत कोणते कां असेना, पण जो ज्या देवतांचें पूजन करतो तो त्या त्या देवत्वास पावतो ४९. याच न्यायानें दुसरे जे तनमन व प्राण अर्पण करून अखंड माझ्याच भक्तिमार्गाला लागले, ते देहांतीं मत्स्वरूपच होतात १५०.

**अन्वयार्थ—अबुद्धयः**–अविवेकी जन–**मम** माझ्या–**अव्ययम् अनुत्तम परं भावम्**–अक्षय उत्कृष्ट परम स्वरूपास **अजानन्तः**–न जाणणारे–**अव्यक्तं मां**–पूर्वीं अव्यक्त-अप्रकट असलेल्या मला–**व्यक्तिम् आपन्नम्**–आतां व्यक्त–प्रकट झालेला–**मन्यन्ते**–समजतात २४.

पण प्राणी तसें करीत नाहींत, आणि फुकट आपल्या हिताचें नुकसान करून घेतात तें त्याचे करणे म्हणजे तळ्हातांतील पाण्यांत पोहल्याप्रमाणेंच आहे ! ५१. किंवा अमृताच्या समुद्रांत बुडी घ्यावी व मग तोंड घट्ट मिटून कां धरावें ? आणि मनामध्यें तरी डबक्यांतील पाण्याची आठवण कां करावी ? ५२. अमृतांत शिरून देखील [ तोंडांत अमृत जाऊं न देता ] मरावे हें असें तरी कशाला करावें ? तर अमृतांत सुखानें अमृतरूप [ अमर ] होऊन कां राहूं नये ? ५३. त्याचप्रमाणें धनुर्धरा फलाशारूप पिंजरा टाकून देऊन ब्रह्मात्मैक्यानुभूतिरूप पंखांनीं चिदाकाशांत स्वच्छंद संचार करणारा समर्थ धनी कां न व्हावें ? ५४. त्या चिदाकाशांत, आपण ज्या मानानें उंच उडून जावें त्या मानानें त्यांत आपल्या इच्छेप्रमाणे अनायासानें, सुखानें उडण्यास भरपूर अवकाश मिळतो ५५. त्या न मोजतां येणाऱ्याला, असीम स्वरूपाला मापांत कां घालावें ? मज निराकाराला [ इंद्रिय अगोचरास ] साकार [ इंद्रियागोचर ] कां मानावें ? मी स्वतः सिद्ध असतां माझ्या प्राप्तीकरितां साधनें करून कां शिणावें ? ५६. पण अर्जुना ! या सर्व बोलण्याचा खरोखर विचार केला तर या जीवांना बहुतकरून ही गोष्ट कळत नाहीं व आवडतहि नाहीं ५७.

१ कोणत्या. २ पूजासामुग्री. ३ ज्या ज्या. ४ इच्छा. ५ त्या त्या. ६ पूजन. ७ कार्यसिद्धी होईपर्यंत. ८ करूं लागतो. ९ इच्छावें. १० मजपासूनच. ११ इच्छिलेल्या. १२ नाश पावणारे. १३ क्षणभर. १४ एकीकडे. १५ त्यांचें आवडतें दैवत कां असेना. १६ पूजनादि करतो. १७ मार्गाला. १८ शेवटी, देहान्तीं. १९ कल्याणाविषयीं. २० तोटा. २१ घट्ट मिटून धरणें. २२ डबक्यातील पाण्यास. २३ पिंजरा [ शरीर ] २४ अनुभवरूप पंखाने. २५ चिदाकाशाला. २६ मानाने. २७ विस्तार. २८ सुखाने. २९ घालावें. ३० निराकाराला. ३१ मरावे. ३२ विचार करिता. ३३ रूचत नाहीं.

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः । मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥

कां जे योगमायापडळें । हे जाले आहाति आंधळे । म्हणौनि प्रकाशाचेनि देहबळें । न देखती मातें ॥ ५८ ॥ एऱ्हवीं मी नसें ऐसें । काय वस्तुजात असे ? । पाहें पां कवण जळ रसें- । रहित आहे ? ॥ ५९ ॥ पवनु कवणातें न शिवेचि । आकाश कें[3] न समायेचि । हें असो एकु मीचि । विश्वीं आहें ॥ १६० ॥

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन । भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

येथें भूतें जियें अतीतलीं । तियें मीचि होऊनि ठेलीं । आणि वर्तत आहाति जेतुलीं । तींही मीचि ॥ ६१ ॥ कां भविष्यमाणें जियें हीं । तींही मजवेगळीं नाहीं । हा बोलचि एऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ॥ ६२ ॥ दोराचिया सापासी । डोंबा बडियाँ ना गऱ्हाळा ऐसी । संख्या न करवे कोण्हासी । तेवीं भूतांसि मिथ्यत्वें ॥६३॥ मी ऐसा पंडुसुता । अनुस्यूतु सदा असतां । या संसार जो भूतां । तो आनें बोलें ॥ ६४ ॥ तरी तेचि आतां थोडीसी । गोठी[10] सांगिजेल परियेसीं । जैं अहंकारा[11] तनूंसीं । वालेंभ[12] पडिलें ॥ ६५ ॥

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत । सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥

तेथ इच्छा हे कुमारी[13] जाली । मग ते कामाचिया तारुण्या आली । तेथ द्वेषेंसीं मांडिली । वऱ्हाडिक[14] ॥ ६६ ॥ तया दोघांस्तव[15] जन्मला । ऐसा द्वंद्वमोहो जाला । मग तो आजेयानें[16] वाढविला । अहंकारें ॥ ६७ ॥ जो धृतीसी[17] सदा प्रतिकूळु[18] । नियमाही नागवे[20] सळु[21] । आशारसें दोंदिलु । जाला सांतों[22] ॥ ६८ ॥ असंतुष्टीचिया मदिरा । मत्त होऊनि धनुर्धरा । विषयांचे वोवरां[23] । विकृतीशीं ॥ ६९ ॥ तेणें भावशुद्धीचिये[24] वाटे । विखुरले[25] विकल्पाचे[26] कांटे । मग चिरिले[27] आडवाटे[28] । अप्रवृत्तीचे[29] ॥ १७० ॥ तेणें भूतें भांबावलीं[30] । म्हणौनि संसाराचिया आडवामाजीं[31] पडिलीं । मग महादुःखाच्या घेतलीं[32] । दांडें[33] वरी ॥ ७१ ॥

येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् । ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

ऐसे विकल्पाचे वांयाणे[34] । कांटे देखोनि सणाणे[35] । जे मतिभ्रमाचे पासवणें[36] । घेतीचिना ॥ ७२ ॥ उजू[37] एकनिष्ठेच्या पाउलीं । रगडूनि विकल्पाचिया भालीं[38] । महापातकाची सांडिली । अटवीं[39] जिहीं ॥ ७३ ॥ मग पुण्याचे धांवा घेतले । आणि माझी जवळीक[40] पातले । किंबहुना चुकले । वाटवधेयां[41] ॥ ७४ ॥

**अन्वयार्थ—योगमायासमावृतः अहं**—योगमायेनें आच्छादित झालेला मी—**सर्वस्य**—सर्व लोकांना—**प्रकाशः न**—प्रगट होत नाहीं—सर्व लोकांना प्रत्यक्ष दिसत नाहीं—**अयं मूढः लोकः**—मूढ झालेला लोक—**अजम् अव्ययं मां**—अज व अव्यय अशा मला—**न अभिजानाति**—सर्व प्रकारें जाणत नाहीं २५.

कारण कीं, ते योगमायेच्या पडद्यानें आंधळे झालेले असतात, म्हणून देहबुद्धीच्या बळानें, प्रकाशरूप जो मी, त्या मला पाहात नाहींत ५८. सहज विचार करून पाहिले तर ज्यांत मी नाहीं अशी एकतरी वस्तु आहे काय? हे पहा कीं, कोणतेंहि जळ रसावांचून आहे काय? ५९. वारा कोणाला स्पर्श करीत नाहीं? आकाश कोठें व्यापीत नाहीं? हें असो; मीच एक अवघ्या विश्वांत ओतप्रोत भरलेला आहें १६०.

**अन्वयार्थ—अर्जुन**—हे अर्जुना !—**अहं**—मी—**समतीतानि**—भूतकालांतील—**च वर्तमानानि**—व वर्तमानकालांतील—**च भविष्याणि** – व भविष्यकालांतील—**भूतानि** – भूतांना—**वद**—जाणतों.—**तु**—पण—**मां** – मला – **कश्चन**—कोणी—**न वेद**—जाणत नाहीं २६.

अरे ! ह्या जगांत आतापर्यंत जितके प्राणी होऊन गेले, ते मीच होऊन राहिले आणि हल्लीं जितके प्राणी वावरत आहेत तेहीं मीच आहें ६१. किंवा यापुढें जे प्राणी होणार आहेत तेहि मजपासून भिन्न नाहींत. असें हे सर्व फक्त बोलावे मात्र; वस्तुतः कांहीं होत नाहीं आणि कांहीं जातहि नाहीं ६२. ज्याप्रमाणें दोरीवर भासणाऱ्या सापाविषयीं तो काळा, कवड्या, गव्हासारख्या ठिपक्यांचा वगैरेपैकी अमुक एका जातीचा आहे असा कोणासहि निश्चय करतां येत नाहीं, त्याप्रमाणें प्राणिमात्र मिथ्या असल्यामुळें तत्संबंधीं कोणताच निश्चय करितां येत नाहीं ६३. हे पंडुसुता अशा प्रकारें मी सदा अखंड—व्याप्त असतांना या प्राणिमात्रांच्या मागे जन्ममरणरूप जो संसार लागला आहे, त्याचें कारण थोडेसे निराळें आहे ६४. म्हणून त्याविषयीं आतां थोडीशी गोष्ट सांगतों ती ऐक. जेव्हां अहंकार व तनु [ शरीर ] या दोहोंची परस्परावर प्रीति जडली ६५.

**अन्वयार्थ—परंतप, भारत**—हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना !—**सर्वभूतानि**—सर्व प्राणी—**सर्गे**—उत्पत्तीच्या वेळीं—**इच्छाद्वेषसमुत्थेन**—राग व द्वेष यांपासून उत्पन्न झालेल्या—**द्वंद्वमोहेन**—शीतोष्ण सुखदुःखादि द्वंद्वमोहानें—**संमोहम्**—अविवेकास—**यान्ति**—प्राप्त होतात २७.

तेव्हां त्या दोघांच्या प्रीतीपासून "इच्छारूप" ही एक मुलगी उत्पन्न झाली व ती आपल्या कामरूपी पूर्ण तारुण्यांत आली त्यावेळीं तिचें द्वेषाशीं लग्न लावलें ६६. त्या दोघांपासून [ सुखदुःखरूप ] द्वंद्वमोह हा पुत्र जन्मास आला. नंतर त्याचा आजोबा जो अहंकार त्यानें त्याला वाढविलें ६७. जो द्वंद्वमोह नेहमीं सात्त्विक धैर्याला प्रतिकूल असतो व इंद्रियदमनालाहि द्वेषामुळें छळणारा असून आकलन होत नाहीं; कारण तो आशारूपी दुग्धानें पुष्ट झालेला असतो ६८. हे धनुर्धरा, पुनः असंतोषरूपी मद्यानें उन्मत्त होऊन पंच विषयरूपी खोलीमध्यें 'विकृतीरूप' स्त्रीसह राहतो ६९. त्यानें अंतःकरण शुद्धीच्या वाटेवर विकल्परूपी कांटे पसरले व कुमार्गाच्या आडवाटा काढिल्या आहेत १७०. त्या योगानें प्राणिमात्र भांबाऊन गेले व संसाररूपी अरण्यांत पडले व मग त्यांना महादुःखाच्या दांडक्याच्या सपाट्याने बडवले गेले ७१.

**अन्वयार्थ—तु**—पण—**येषां पुण्यकर्मणां जनानां**—ज्या पुण्यकर्म करणाऱ्या जनांचे—**पापं**—पाप—**अन्तगतं**—क्षीण झालेलें असतें—**ते**—ते पुण्यवान् लोक—**द्वंद्वमोहनिर्मुक्ताः**—द्वंद्वमोहापासून सर्वथा मुक्त व—**दृढव्रताः**—दृढव्रत होत्साते—**मां**—मला—**भजन्ते**—भजतात २८.

याप्रमाणें विकल्पाचे पोकळ व अणकुचीदार कांटे पाहून मतिभ्रंशाची माघार घेतच नाहींत. बुद्धीला भ्रमपाशांत पडूं देत नाहींत; ७२. ज्यांनी भक्तीच्या एकनिष्ठेच्या पावलांनीं नीट सरळ मार्गानें जातांना विकल्परूपी भाल्यासारखे कांटे चिरडून टाकून महापातकांचें अरण्यहि मागे टाकलेले आहे ७३. नंतर ज्यांनी पुण्यरूपी धांव घेतली व माझे सान्निध्य प्राप्त करून घेतले आणि फार काय सांगावे !! असे ते भक्त वाटमाऱ्यांच्या [ कामक्रोध द्वंद्वमोहादिकांच्या ] हातून सुटले ! ७

१ आदिमायेच्या पडद्यानें. २ दिवसाच्या बळानें. ३ कोठें. ४ होऊन गेलेली. ५ पुढें होणारी. ६ काळा. ७ कवडा. ८ खोटेपणानें. ९ अखंड, १० गोष्ट. ११ अभिमान व शरीर यांस. १२ प्रीति, सख्य. १३ मुलगी. १४ वऱ्हाड, लग्नसोहळा. १५ दोघांपासून. १६ आज्यानें. १७ धैर्यास. १८ विरुद्ध. १९ इंद्रियदमनासहि. २० सांपडत नाहीं. २१ दांडगा. २२ आशारूपी दुधानें पुष्ट होऊन. २३ खोलीमध्यें. २४ शुद्ध भावनेच्या. २५ पसरले. २६ संशयात्मक बुद्धीचे. २७ काढले. २८ आडमार्ग. २९ कुमार्गाचें. ३० भ्रमलीं. ३१ अरण्यांत ३२ स्वाधीन झाली. ३३ दडपणाखाली. ३४ निष्फळ. ३५ तीक्ष्ण. ३६ सन्निध. ३७. नीट ३८ टोकें. ३९ अरण्य. ४० सान्निध्य. ४१ वाटमाऱ्यांना.

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये । ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥

एऱ्हवीं तरी पार्था । जन्ममरणाची निमे कथा । ऐसिया प्रयत्नातें आस्था । विये जयांची ॥ ७५ ॥ तयां तो प्रयत्नुचि एके वेळे । मग समग्र परब्रह्में फळे । जया पिकलेया रसु गळे । पूर्णतेचा ॥ ७६ ॥ ते वेळीं कृतकृत्यंता जग भरे । तेथ अध्यात्माचें नवलपण पुरे । कर्माचें काम सरे । विरमे मन ॥ ७७ ॥ ऐसा अध्यात्मलाभु तया । होय गा धनंजया । भांडवल जया । उद्यमीं मी ॥ ७८ ॥ तयातें साम्याचिये वाढी । ऐक्याची सोंदे कुळवाडी । तेथ भेदाचिया दुबळवाडी । नेणिजे तया ॥ ७९ ॥

साधिभूताधिदेवं मां साधियज्ञं च ये विदुः । प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥

जिहीं साधिभूता मातें । प्रतीतीचेनि हातें । धरूनि अधिदैवातें । शिवतले गा ॥ १८० ॥ जया जाणिवेचेनि वेगें । मी अधियज्ञुंही दृष्टी रिगें । ते तनूचेनि वियोगें । विऱ्हये नव्हती ॥ ८१ ॥ एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां । भूतांची उमटे खडाडता । काय न मरतयाचियाहि चित्ता । युगांतु नोहे ? ॥ ८२ ॥ परी नेणों कैसे पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा । ते प्रयाणींचिया लगबगा । न सांडितीच मातें ॥ ८३ ॥ एऱ्हवी तरीं जाण । ऐसे जे निपुण । तेचि अंतःकरण- । युक्त योगी ॥ ८४ ॥ तंव इये शब्दकुपिकेतळीं । नोडवेचि अवधानाची अंजुळी । जे नावेक अर्जुन तये वेळीं । मागांचि होता ॥ ८५ ॥ जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें । जिये नानार्थरसें रसाळें । बहकतांती परिमळें । भावाचेनि ॥८६॥ सहज कृपामंदानिळें । कृष्णद्रुमाची वचनफळें । अर्जुन श्रवणाचिये खोळे । अवचित पडिलीं ॥ ८७ ॥ तियें प्रमेयांची हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं । मग तैसीचि कां घोळिलीं । परमानंदें ॥ ८८ ॥ तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषांचे डोहळे । घेताति गळेंाळे । विस्मयामृताचे ॥ ८९ ॥ तिया सुखसंपत्ती जोडलिया । मग स्वर्गा वेंती वांकुलियों । हृदयाच्या जीवीं गुंतकुलिया । होत आहाती ॥ १९० ॥ ऐसें वेंरचिलीचि बरवा । सुखें जावों लागलें फावों । तंव रसस्वादाचिया हांवों । लौंहो केला ॥ ९१ ॥ झडकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्य फळें । प्रतीतिमुखीं एके वेळे । घालूं पाहे ॥ ९२ ॥ तंव विचाराचिया

**अन्वयार्थ—ये**-जे-**जरामरणमोक्षाय**-वृद्धपणा व मरण यांपासून मुक्त होण्यासाठीं-**मां**-माझाच-**आश्रित्य**-आश्रय करून-**यतन्ति**-यत्न करितात-**ते**-ते भक्त-**तत् ब्रह्म**-त्या परब्रह्माला-**विदुः**-जाणतात-**कृत्स्नं**-समग्र-**अध्यात्मं**-प्रत्यगात्म वस्तु-**च अखिलं कर्म**-व सर्व कर्मे-[ यांस ] -**विदुः**-जाणतात २९.

अर्जुना ! सहज विचार करून पाहिले तर ज्या साधनानुष्ठानानें जन्ममरणाच्या फेऱ्याची कथा सदाचीच संपते अशा साधनास ज्यांची इच्छा उत्पन्न करते ७५. मग त्यांना तो प्रयत्नच केव्हांतरी संपूर्ण परब्रह्मरूप फळानें फलद्रूप होतो व ते फळ फिकले असतां त्यांतून पूर्णतारूपी रस गळतो ७६. त्यावेळीं, आम्हीं धन्य आहों, असें त्यांना वाटून सर्व जग कृतकृत्यतेच्या आनंदाने भरून जाते. नंतर आत्मज्ञानाची तीव्रतर इच्छारूपी हौस पुरी होऊन व कर्माचे सर्व प्रयोजन संपते व त्यांचें मन नाहींसे होतें ७७. हे धनंजया ! अशा रीतीनें त्यांना आत्मज्ञानाचा लाभ होतो. कारण, त्यांच्या या परमार्थरूप व्यापारांत मूळ भांडवल मीच असतो ७८. त्यांना साम्याच्या वाढीमुळें ऐक्याचा व्यापार साधतो त्या ऐक्यरूप संपत्तीची समृद्धि झाल्यामुळें त्यांना भेदरूप दैन्याची ओळखहि राहात नाहीं ७९.

**अन्वयार्थ—ये**-जे-**साधिभूताधिदैवम्**-अधिभूत व अधिदैव यांसह-**च साधियज्ञम्**-आणि अधियज्ञासह-**मां**-मला-**विदुः**-जाणतात-**ते**-**युक्तचेतसः**-ते समाहितचित्त झालेले शांतचित्त भक्त-**प्रयाणकाले अपि च**-मरणाच्या वेळींहि-**मां**-मला-**विदुः**-जाणतात ३०.

अरे ! ज्यांनी अनुभवानें अधिभूतासह [ शरीरासह ] मला-परमात्म्याला अनुभूतिद्वारां-यथार्थ जाणून त्यांनी अधिदैवासहि [ जीवासहि ] जाणलें आहे १८०. ज्यांना उपर्युक्त ज्ञानाच्या बलानें अधियज्ञ जो मी [ परमात्मा ] तो यथार्थ दृष्टीनें आत्मत्वाने अनुभवास येतो ते पुरुष शरीराच्या वियोगानें [ मरणसमयीं ] दुःखी होत नाहींत ८१. सहज विचार करून पाहिले तर आयुष्याची दोरी सुटावयाच्या बेतांत आली असता मरणाच्या प्राण्याची जी खळबळ उडून जाते ती पाहून न मरणारांच्याहि चित्ताला युगान्त [ प्रलयकाळ ] ओढावला की काय असें वाटत नाहीं कां ? ८२. परंतु ते [ ज्ञानीभक्त ] माझ्या स्वरूपाशी कसे व किती एकरूप होऊन गेलेले असतात हें न कळे ! हें वर्णन करणें अशक्य आहे. कारण, ते मरणाच्या कठीण प्रसंगींहि, मला विसरतच नाहींत ८३. सहज विचार करून पाहिले तर असें जे निपुण पूर्ण ज्ञानी आहेत, तेच [ माझ्या ठिकाणीं स्थिर ] अंतःकरण युक्तयोगी आहेत असें समज ८४. हें तत्त्व सांगतेवेळीं श्रीकृष्णाच्या मुखांतील शब्दरूप कुपीच्या खाली अर्जुनाची अवधानरूप ओंजळ प्राप्त झाली नव्हती. कारण, त्यावेळी क्षणभर अर्जुन मागेच होता. [ त्याचे चित्त मागील एकोणतिसाव्या श्लोकार्थाच्या चिंतनांत गुंतलें होतें ] ८५. त्या ठिकाणीं तीं ब्रह्मप्रतिपादक वाक्यें हींच कोणी फळें अनेक प्रकारच्या अर्थरूपी रसानें भरलेलीं होतीं, व अभिप्रायात्मक सुवास चोहींकडे दरवळला होता ८६. सहजच कृष्णकृपारूपी मंद वाऱ्याच्या योगानें श्रीकृष्णरूप वृक्षाची वचनरूप फळें अर्जुनाच्या कानरूप ओटींत अकस्मात् येऊन पडलीं ! ८७. तीं वाक्यरूपी फळें वेदांतसिद्धांतांचींच जणुं बनविलेलीं असून ब्रह्मरसाच्या सागरांत बुचकळलेली, व मग तशींच परमानंदाने [ साखरेंत ] घोळलेलीं होतीं ८८. त्या फळाच्या विशुद्ध निर्मळपणाने अर्जुनास ज्ञानाचें डोहाळे लागले, म्हणजे अर्जुनास ज्ञानप्राप्तीची तीव्र इच्छा उत्पन्न झाली म्हणून तो विस्मयरूप अमृताचे घोट घेऊं लागला ८९. अशा रीतीनें त्या सुखसंपत्तीच्या लाभामुळें तो स्वर्गसुख भोगणारासही वेडावून दाखवूं लागला, म्हणजे तुच्छ मानूं लागला अर्जुनाच्या अंतःकरणांत आनंदाच्या गुदगुल्या होऊं लागल्या १९०. याप्रमाणें त्या फलांचें बाहेरील स्वरूपसौन्दर्य पाहून त्याचा आनंद वाढूं लागला, तों इतक्यांत त्या फलांची चव घेण्याच्या उत्कट इच्छेनें अति त्वरा केली ९१. म्हणून लवकर अनुमानरूप तळहातांत ती श्रीकृष्णवाक्यरूप फळें घेऊन, तीं तो अनुभवरूप मुखांत एकदम घालावयास पाहूं लागला ९२. त्या वेळीं विचाररूप जिभेनें तीं घेतां येईनात व हेतुरूप दातांनीं ती फळें फुटे-

१ सफलतेनें. २ आत्मज्ञानाचें. ३ कौतुक. ४ शांत होतें. ५ व्याज. ६ वाढते, भरते. ७ व्यवहार. ८ दैन्य. ९ साकाराला. १० परमात्मा. ११ दुःखी. १२ प्रलय. १३ शब्दरूप शिशीच्या खालीं. १४ पुढे करवत नाहीं.

१५ पसरलेली. १६ इच्छेच्या. १७ ओटींत, झोळींत. १८ सिद्धांताची. १९ ज्ञानाचे. २० घोंट. २१ दाखवितो. २२ वेडावणें. २३ गुदगुल्या. २४ बाह्य सौंदर्यानें. २५ आनंद वाढू लागला. २६ इच्छा. २७ प्रारंभ.

रसना न दाटती । परी हेतूच्या दशनीं न फुटती । ऐसें जाणौनि सुभद्रापती । चुंबिचिनां ॥ ९३ ॥ मग चमत्कारला म्हणे । इयें जळींचीं माँ तारांगणें । कैसा झकविलों असलेगपणें । अक्षरांचेनि ॥ ९४ ॥ इयें पदें नव्हती फुडिंयां । गगनाचिया घडिया । येथ आमुची मति बुडालिया । थांवो न निघे ॥ ९५ ॥ वांचूनि जाणावयाची कें गोठी । ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी । तिया पुनरपि केली दृष्टी । यादवेंद्रा ॥ ९६ ॥ मग विनविलें सुभटें । हां हो जी ये एकवाटे । सातंही पदें अनुच्छिष्टें । नवलें आहाती ॥९७॥ एऱ्हवीं अवधानाचेनि वहिलेपणें । नाना प्रमेयांचें उगाणें । काय श्रवणाचेनि आंगवणें । बोलों लाहाती ? ॥ ९८ ॥ परी तैसें हें नोहेचि देवा । देखिला अक्षरांचा मेळावा । आणि विस्मयाचिया जीवा । विस्मयो जाला ॥ ९९ ॥ कानाचेनि गवांक्षद्वारें । बोलाचे रश्मी अभ्यंतरें । पाहेना तंव चमत्कारें । अवधान ठकलें ॥२००॥ तेवींचि अर्थाची चाड मज आहे । तें सांगतांही वेळु न साहे । म्हणौनि निरूपण लवलाहें । कीजो देवा ॥ १ ॥ ऐसा मागील पडताळा घेउनी । पुढां अभिप्राय दृष्टी सूनी । तेवींचि माजीं शिरउनी । आर्ती आपुली ॥ २ ॥ कैसी पुसती पाहें पां जाणिव । भिडेचि तरी लंघों नेदीं शिंवें । एऱ्हवीं श्रीकृष्ण हृदयासि खेंवें । देवों सरला ॥ ३ ॥ अहो श्रीगुरुतें जैं पुसावें । तैं येणें मानें सावध होआवें । हें एकाचि जाणें आघवें । सव्यसाची ॥ ४ ॥ आतां तयाचें तें प्रश्न करणें । वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें । संजयो आवडलेपणें । सांगेल कैसें ॥ ५ ॥ तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाटी । जैसी कानाचे आधीं दिठी । उपेगा जाये ॥ ६ ॥ बुद्धीचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा । अक्षरांचिया भांबा । इंद्रियें जिती ॥ ७ ॥ पहा पां मालतीचे कळे । घ्राणासि कीर वाटले परिमळें । परि वरचिलां बरवा काइ डोळे । सुखिये नव्हती ? ॥ ८ ॥ तैसें देशियेचियां हवांवा । इंद्रियें करिती राणिवा । मग प्रमेयांचिया गांवा । लेसां जाइजे ॥ ९ ॥ ऐसेनि नागरपणें । बोलुं निमे तें बोलणें । ऐका ज्ञानदेवो म्हणे । निवृत्तीचा ॥ २१० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ श्लोक ३०, ओव्या २१०.



नात, असे जाणून, अर्जुन ती वाक्यरूपी फळें तोंडास लावीना ९३. मग चमत्कार वाटून असें म्हणतो कीं, अहो, हीं वाक्य फळें म्हणजे पाण्यांत पडलेलें नक्षत्राचे प्रतिबिंबच होय. मी या अक्षरांच्या सुलभपणानें [ केवळ अक्षरांना फल समजून ] कसा फसलों ९४. हीं खरोखर अक्षरांचीं पर्दे नसून केवळ आकाशाच्या घड्याच आहेत, व ह्यांत आमच्या बुद्धीनें कितीहि जरी बुड्या मारल्या, तरी तिला कांहीं थांग लागावयाचा नाहीं " ९५. तेव्हां मग तीं वाक्यें जाणावयाची गोष्ट कशाला ? असा अर्जुनानें मनांत विचार करून पुनः यादवेंद्र श्रीकृष्णाकडे दृष्टि केली ९६. मग अर्जुनानें देवाला विनंति केली कीं, " अहो ! ही जीं एकवटलेलीं सात पर्दे, तीं कधींहि कोणी न ऐकलेलीं अशी नवलपूर्ण आहेत ९७. सहज विचार करून पाहिले तर वेगानें अवधान देऊन श्रवण केले असतां [ उपर्युक्त सात पदांतील ] निरनिराळ्या सिद्धांतांचा उलगडा केवळ त्या श्रवणाच्या बळानें बोलून दाखवितां येईल काय ? ९८. आणि त्यांतूनहि देवा ! आपलें हें बोलणें तसें कांहीं साधारण नव्हे. कारण हा अक्षरांचा नुसता समुदाय पाहिला तरी विस्मयाच्या जीवाला देखील मोठे आश्चर्य वाटले ९९. कानांच्या झरोक्यांतून बोलरूपी किरण आंत प्रवेश करतात न करतात तोंच चमत्कार वाटून माझें लक्ष खुंटलें [ मति चालेना ] २००. त्या शब्दांचा अर्थ समजण्याची मला फार इच्छा आहे, असें सांगताना जो वेळ लागेल तितका वेळहि मला विलंब सहन होत नाहीं. म्हणून देवा ! आपण त्याचे निरूपण लवकर करावें १. याप्रमाणें मागें काय सांगितले त्याचा विचार करून व पुढें देव काय सांगतील त्या अभिप्रायावर दृष्टि ठेवून व मध्येंच आपली ऐकण्याची इच्छाहि दर्शवून, अर्जुनानें विचारिलें २. अर्जुनाची प्रश्न करण्याची ही अपूर्व शैली कशी आहे, पहा. तो भिडेची मर्यादा तर उल्लंघन करीत नाहीं, एऱ्हवीं तर श्रीकृष्णाच्या अंतःकरणाला प्रेमालिंगन देण्यास तो प्रवृत्त झाला ! ३. अहो ! श्रीगुरूंना ज्या वेळेस पुसावयाचे असेल त्या वेळेस अशीच दक्षता ठेवावी लागते. त्यांची मर्यादा कायम ठेवून कसें पुसावें, हें फक्त एक सव्यसाची अर्जुनच जाणतो ४. आतां त्या अर्जुनाचे तें प्रश्न करणें आणि त्यावर सर्वज्ञ श्रीहरीनें उत्तर देणें, हे संजयास आवडल्यामुळें तो संवाद कशा प्रेमानें सांगेल, ते पहा ५. ते सरळ मराठी भाषेंत सांगितले जाईल, त्या सांगण्याकडे नीट लक्ष द्यावें. ते असें कीं, ज्या योगानें कानाच्या अगोदर [ अर्थ ज्ञानांत ] दृष्टीचा उपयोग होईल ६. बुद्धिरूप जिभेनें त्या शब्दांचा रस न चाखतां, केवळ अक्षरांच्या शोभेनेंच इंद्रियें समाधान पावून जगतील ७. पहा कीं, मालती पुष्पाच्या कळ्या सुगंधामुळें नाकाला खरोखर चांगल्या वाटल्या; तरीपण त्यांच्या बाहेरील सुरेखपणानें डोळ्यांना सुख होणार नाहीं काय ? ८. त्याचप्रमाणें मराठी भाषेच्या शोभेनें इंद्रियें सुखाचें राज्य करतील, व मग त्यास सिद्धान्ताच्या गांवाला त्वरित व चांगल्या तयारीनें जातां येईल ९. जेथे शब्द मर्यादा संपते, ते बोलणे उपर्युक्त रसालंकारात्मक सुंदर रीतीनें मी सांगेन ते तुम्ही ऐका, असे श्रीनिवृत्तीनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात २१०.

१ दडपत नाहीं. २ दातांनीं. ३ ओंठास लावीना. ४ कीं. ५ फसलों. ६ सुगमपणानें. ७ खऱ्या. ८ अंत, थांग. ९ एकत्र. १० ब्रह्म अध्यात्म इत्यादि सात शब्द. ११ स्वाद न घेतलेली. १२ वेगानें. १३ अनुभव, हिशेब. १४ बळानें. १५ बोलतां येणार नाहींत. १६ जमाव. १७ झरोक्यांतून. १८ किरण. १९ प्रकाशले नाहीं तोपर्यंत. २० लवकर. २१ प्रत्यंतर. २२ शिरकवून, घालून. २३ इच्छा. २४ ज्ञान. २५ सीमा, मर्यादा. २६ आलिंगन. २७ प्रेमानें, आवडीनें. २८ सार. २९ शोभेनें. ३० मोगरीचे. ३१ नाकाला. ३२ बाहेरच्या. ३३ मराठी भाषेच्या. ३४ शोभेनें. ३५ राज्य. ३६ सिद्धांताच्या. ३७ त्वरित. ३८ चांगुलपणानें. ३९ जेथें शब्द मावळतो.



# अध्याय संगति व सातव्या अध्यायाचें तात्पर्य

**तुज ज्ञान सांगेन तैसे । विज्ञानेसी ।। अ. ७-२**

**तयावरी सप्तमीं । प्रकृति परिहार उपक्रमीं ।**

**करूनि भजती जे पुरुषोत्तमीं । ते बोलिले चाऱ्ही ।। अ. १०-२८**

सहाव्या अध्यायापर्यन्त कर्मकांड संपलें. आतां या अध्यायापासून बाराव्या अध्यायापर्यंत भगवान् 'उपासना-कांड' सांगणार आहेत. त्यांत निरुपाधिक शुद्ध ब्रह्माचे वर्णन करून तेंच शुद्ध ब्रह्म-मायाविशिष्ट मानलें म्हणजे सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, भक्तावर अनुग्रह करणारे असें ईश्वरतत्त्व बनतें. शुद्ध ब्रह्माच्या प्राप्तीचा मुख्य हेतु ठेवून ईश्वराची उपासनाच संसार समुद्रांतून तरून जाण्यास साधन आहे, असें या अध्यायापासून सांगतात. प्रथम योगाभ्यासानें ज्याचें चित्त स्थिर झालें आहे त्यास आपलें यथार्थ ज्ञान ज्यायोगें होईल असा 'ज्ञान-विज्ञानादि विचार' सांगण्यास देव आरंभ करतात.

अर्जुना ! जेथे जाणिवेचा शिरकाव नाहीं, जेथें तर्कहि चालत नाहीं व विचार तर मागच्याच पाऊलीं माघारी फिरतो; तें 'ज्ञान' होय. 'प्रपंचा'स 'विज्ञान' म्हणतात व 'प्रपंचास सत्य समजणें' हेंच 'अज्ञान' होय. तत्त्वज्ञानोदयानें प्रपंचसत्यत्व बुद्धिरूप अज्ञान समूळ पूर्णतया नष्ट होते, विज्ञानरूप प्रपंच निःशेष भाजून-बाधित होऊन 'दग्धपट न्यायानें' प्रतीति मात्र शिल्लक राहील व मन-बुद्धि-इत्यादिकांस अगोचर जें स्वरूपभूत ज्ञान तें अंगानें होऊन उर्वरित राहतें. ज्या बोलण्याने सांगणारा व ऐकणारा या उभयांच्या इच्छा निवृत्त होऊन निरतिशयानंदाची प्राप्ति होईल, असेच बोलणें मी बोलेन, असें भगवंत म्हणतात.

मिथ्यारूप प्रपंचास सत्य समजून नामरूपात्मक कार्यबुद्धींतच सर्व लोक वावरतात. त्यांत या जगाचें अंतिम तत्त्व काय आहे ? याचा शोध घेण्याची किंवा मी कोण आहे ? हे समजून घेण्याची अर्थात् ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारासाठीं खटपट करणारा हजारात कुठे एखादाच व त्यांतूनहि म्हणजे प्रयत्नशील साधकांमधूनहि साक्षात्कारात्मक ज्ञान, पूर्ण ब्रह्मस्वरूपाचे ज्ञान होणाराही अगदींच विरळा ! ! इतका हा ब्रह्मात्मैक्य बोध अवघड आहे. किंबहुना ! ! साक्षात्कारात्मक अद्वैत बोधास जगत्-विज्ञान-प्रपंच-सत्यत्व बुद्धीचाच सर्वांत मोठा प्रतिबंध आहे. विज्ञानाचें मिथ्यात्व कळल्याविना व प्रपंच सत्यत्व बुद्धीचा निरास झाल्याविना खरें अद्वय ब्रह्माचें पारमार्थिक स्वरूप कळणेंच शक्य नाहीं. अर्थात् अद्वयबोधासाठीं विज्ञानाचें मिथ्यात्व कळणें व तसा दृढ मिथ्यात्व निश्चय होणें आवश्यक आहे. म्हणून अर्जुना तुला अगोदर ते विज्ञान, अर्थात् विज्ञानाचे स्वरूप सांगतो [ १ ते १४ ]. पुरोदृश्यमान जगाची ज्या मायेपासून उत्पत्ति होते. ती माया म्हणजे प्रकृतिच या चराचरात्मक सर्व सृष्टीला, प्रपंचाला उपादानभूत कारण आहे. ती देखील चराचरात्मकच आहे. त्या प्रकृतीचे 'परा' आणि 'अपरा' असे दोन प्रकार आहेत. भूम्यादि शब्दावरून उपलक्षणानें तन्मात्रा घ्याव्यात. अर्थात् ( १ ) गंध तन्मात्रा ( २ ) रस तन्मात्रा ( ३ ) रूप तन्मात्रा ( ४ ) स्पर्श तन्मात्रा ( ५ ) शब्द तन्मात्रा ( ६ ) संकल्प-विकल्पास हेतभूत असणारा अहंकार ( ७ ) समष्टि अहंकाराचे कारण महत्तत्त्व आणि ( ८ ) त्या महत्तत्त्वाचे कारण अव्यक्त, अशी हीं प्रकृति आठ प्रकारचीं आहे. हीं 'अपरा' प्रकृति होय. कारण, ही निकृष्ट म्हणजे जड प्रकृति आहे. कारणांतील गुण कार्यांत येतात. या नियमानुसार या जड अष्टधा प्रकृतिपासून उत्पन्न झालेले सर्व भूत-भौतिक पदार्थही 'जड' असेंच निर्माण झालें. ही प्रकृति त्रिगुणात्मक, असत्-जड-दुःखरूप असून जीवाला बंधाला कारणीभूत होण्यास्तव हिला 'अपरा' प्रकृति म्हणतात. अद्वय परमात्मज्ञानाकरितां अर्थात् एकमेवाद्वितीय परमात्म्याव्यतिरिक्त दुसरे सत्य असे यत्किंचितहि नाहीं; हा श्रुतिसिद्धान्त पटण्यासाठी नामरूपात्मक, प्रपंचात्मक, विज्ञान, आभासमात्र आहे; हे समजले पाहिजे. देह तादात्म्यामुळे अज्ञानी जीवास नामरूपात्मक प्रपंच दिसणें स्वाभाविक आहे; पण नामरूपात्मक आभास अशुची, अनात्मा, मिथ्या असताना त्यास जीव शुचि, आत्मा व सत्य समजतो. उपर्युक्त अष्टधा प्रकृतीस अर्थात् 'अपरा' प्रकृतीस उपजीव्यभूत असणारी, सत्ता स्फूर्ति देणारी, जीवरूप-चिन्मय प्रकृति, तीं उच्च उत्कृष्ट होण्यास्तव तिला 'परा प्रकृति' म्हणतात. जीवभूत असणाऱ्या प्रकृतीस 'परा' म्हणण्याचे

कारण म्हणजे नामरूपात्मक जड सृष्टीच्या सर्व व्यवहारास व व्यवहार–व्यवस्थितीस जीवचैतन्यच कारणीभूत आहे, हे होय. स्थूल–सूक्ष्म–देहेंद्रियादि व्यष्टि व जगदादि समष्टि प्रपंचाचे अंतर्यामीरूपानें धारण व पोषण जीव चैतन्याकडूनच होत असतें. देहेंद्रियाचे ठिकाणीं 'मी' व तत् संबंधीचें ठिकाणी 'माझे' असा अभिमान ठेवून होणारा व्यवहारहि जीव चैतन्याकडूनच घडतो. घट–पटादिकांचे ज्ञान वृत्तिद्वारां जीवासच होते. पंचविषय माझें भोग्य आहेत व मी त्यांचा भोक्ता आहे; या 'भोग्य–भोक्तृत्व' कल्पनेस व त्या पंचविषयात्मक भोग्यांचा ज्या साधनद्वारां उपभोग घेतां येईल त्या साधनांचा उपयोग करण्यास जीव चैतन्यच कारण आहे. सारांश, उपरिनिर्दिष्ट रीतीच्या कल्पनांच्याद्वारां नामरूपात्मक प्रपंचाच्या सत्यत्व कल्पनेस कारण जीवच आहे हा जीव म्हणजेच देवाची 'परा प्रकृति' होय.

या भोग्य–भोक्तृत्वाच्या सत्यत्व कल्पनेच्या प्रतिबंधामुळे या नामरूप प्रपंचाहून पलीकडे कांहीं एक पारमार्थिक सत्य–त्रिकलाबाधित सत्य परमात्मा आहे. याची कल्पनाच लुप्त झाली आहे. त्या जीवास सारासार विचार उपदेश-पूर्वक नामरूपात्मक विश्वाचा बाध–निरास करून अद्वय परमात्मबोध होण्याकरितां सर्व प्रपंच–विज्ञान "मायामय" आहे. असे भगवन्त प्रथमतः सागतात.

ही परा प्रकृति जेव्हां अपरा प्रकृतीच्याद्वारां परिणामास पावते त्यावेळी जारज, स्वेदज, अंडज आणि उद्भिज असे वेगवेगळ्या आकारांचे; पण सारख्याच योग्यतेचे अगणित प्राणी निर्माण होतात. त्यानंतर त्या त्या प्रण्याकडून कर्माकर्म व्यवहार व त्या व्यवहाराची व्यवस्थितिरूप धारणा, स्थितीकाळीं घडत असल्याचे प्रकृतीच दाखविते. शेवटीं तीच प्रकृति लयकालीं, या सर्व प्रपंचाकाराचीं आटणीहि करते. कोणताहि जड पदार्थ कार्यप्रवण झाल्याचे अगर त्याचें ठिकाणी कांहीं क्रिया झाल्याची दिसते ते चेतनाधिष्ठानांवाचून कधींच संभवत नाहीं. म्हणून मी–ईश्वरच सर्वान्तर्यामी रूपाने सर्वांचे धारण व नियमन करतो. अहंकारामुळें देहतादात्म्य व सत्यत्व कल्पना बुद्धीचे जाणणे–वृत्तिज्ञान हें चैतन्य संबंधामुळेच संभवनीय आहे. एऱ्हवीं बुद्धि व अहंकार ही जडच आहेत. हे संपूर्ण चराचरात्मक जगत् माझ्यापासूनच उत्पत्ति-स्थिति-लयास प्राप्त होते. जगत् हे माझे ठिकाणीं तत्त्वतः नसून मध्येच दृश्यरूपाने मृगजळा-प्रमाणे भासते. जगांत सामान्य सत्य अधिष्ठानरूपाने माझीच व्याप्ति आहे [ १९–३२ ]. मंद बुद्धीला उपासनेस उपयोगी म्हणून भगवन्त विभूति सागतात. सृष्टींतील पदार्थांत भासणारे मुख्य, विशेष गुण ते मींच आहे. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश यांचे अनुक्रमें गंध, रस, रूप, स्पर्श, आणि शब्द हे प्रसिद्ध गुण, चंद्र सूर्यांतील तेज, बलवानांतील काम राग विहीन बल, प्राणिगणांतील धर्म–अविरुद्ध काम, वेदांतील ओंकार, हे किंवा असे प्रत्येकांतील सारभूत गुण हे सर्व मीच आहे.

त्रिगुणाच्या कारणात्मक साम्यावस्थेसच 'माया – प्रकृति' म्हणतात. ही त्रिगुणाची साम्यावस्था नाहींशी होऊन त्या तीन गुणांमध्यें वैषम्य निर्माण होणें म्हणजेच 'प्रपंचोत्पत्ति' होय; अर्थात् मायाच त्रिगुणात्मक असल्यामुळें तिचे कार्य जे जगत् तेहि त्रिगुणात्मकच आहे. उपादान कारणाचे गुण कार्यांत येतात. या नियमानुसार संपूर्ण जगत् – त्रिगुणात्मक, मायाकार्य असल्यामुळे जगतात असा एकहि पदार्थ मिळणार नाहीं कीं, ज्यांत–त्रिगुण नाहींत. त्या जगाचे अधिष्ठानरूपाने निमित्तकारण मी आहे. माझ्या आश्रयावरच हे सारेच्या सारे विश्व विवर्तरूपाने अध्यस्त निर्माण झाले असले तरी त्या विश्वाच्या आधारावर त्याचे ठिकाणीं माझी स्थिति नाहीं. माझ्या आश्रयावर छाया रूपानें असणारी–त्रिगुणात्मक माया ही "स्वाश्रया व स्वविषया" या प्रक्रियेनुसार माझ्या विशेष स्वरूपास आवरण शक्तीने झांकून टाकल्यामुळें आणि विक्षेपरूपी शक्तीनें नसलेले जगत् दाखविते. ज्याप्रमाणे डोळ्यांतील पाणी गोठून त्याचा डोळ्यावर पडदा येतो व तो डोळ्याच्याच दृष्टीस मंदत्व आणतो. त्याप्रमाणें प्राणिमात्र हे मद्रूपच असूनही मायेच्या योगाने मला न जाणून 'जीवदशेस' आले. प्राणी माझेच असून मद्रूप होत नाहीत. मला आत्मत्वानें ओळखीत नाहींत. 'मी' व 'माझे'–पण या भ्रांतीने विषयांध झाले [३३ ते ६७ ].

त्रिगुणात्मक व वैचित्र्यपूर्ण अशी सृष्टि ज्या अद्भुत मायेपासून झाली त्या माया नदीचे उल्लंघन आजवर ब्रह्मादिकांसहि अवघड झाले आहे. ती माया नदी पार तरून जाणे अशक्यप्राय आहे. ती माझी माया कशी तरून जाता येईल असें तुला वाटत असेल तर सांगतो ऐक – ही माझी माया म्हणजे पार तरून जाण्यास अवघड, कठीण अशी जणुं एक नदीच होय. हिचा उगम ब्रह्मरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यांतून झाला असून मूळ आदि संकल्परूपी उसळीने ती निघाल्याबरोबर तिच्यांत प्रथम पंचमहाभूतांचा लहान बुडबुडा निर्माण झाला. पुढे ही सृष्टि विस्ताराच्या

रूपाने इतकी वाढते कीं, प्रवृत्ति मार्ग–निवृत्ति मार्गरूपी दोन्ही उंच कांठांस ओसंडून वाहते. सत्वादि त्रिगुणरूपी मेघाचा जोरदार वर्षाव झाल्यामुळे ही माया नदी मोहरूपीं महापुरानें भरून आपल्या प्रवाहांत यम–नियमरूपी गांवें वाहून नेते. हिच्यांत द्वेषाचे भोंवरे आहेत. अनवधानरूपी, धनादि मोठमोठाले मासे आहेत. हिला प्रपंचाची बरीच वळणें आहेत व अहंकारात्मक ओघ असून मदाच्या उसळ्या व विषयोर्मींचे तरंग आहेत. हिच्या लाटा सत्य लोकांच्या बुरुजावर जाऊन आदळतात. हिचा पूर आद्यापवेरी ओसरला नाहीं; असा हा दुर्लंघ्य मायापूर कोण बरें तरून जाईल ! स्वयंबुद्धीच्या बाहुबलाने, वेदाभ्यासानें, यज्ञयागादिकांनीं, तपानें अर्थात् या साधनांच्याद्वारां केवळ स्वसामर्थ्यैंकरून ही मायानदीं तरून जाण्याचा जे प्रयत्न करतात त्यांना त्या नदींत असणाऱ्या, विषयमगरी, मदमीन, अभिमान, स्वर्ग-सुखाच्या कपारी इत्यादि संकटांनी घेरल्यामुळे त्यांच्याकडूनहि ही मायानदी तरून जाणें शक्य नाही. मायानदी तरण्याचा एकमेव उपाय म्हणजे सर्व भावाने मला शरण येणे हा होय. या उपायाचा अवलम्ब करणारेच ही मायानदी सहज – लीलया तरून गेले. किंबहुना ! ! त्यांना अलीकडच्या तीरावरच मायानदीचे पाणी संपले. अर्थात् हरिकृपेने ज्यांना सद्गुरुरूपी तारू लाभले त्यांना जीव-परमात्मैक्यरूपीं उतारयुक्त पाण्यांत ज्ञानरूपी सोपी पायवाट सापडून वैराग्य व अभ्यास यांच्या सहाय्याने कोणत्याहि संकटांत न सांपडतां निवृत्तिरूपी काठांवर बाहेर आले; असें समज; तेच मायानदी तरून गेले समजावे; पण असें भक्त फार नाहींत तर फार थोडे आहेत ! बाकीचे अज्ञानी लोक मात्र देहाहं-काररूपी भूताने पछाडले गेले असल्याकारणें आत्मस्वरूपास विसरून जातात व इंद्रियग्रामात्मक राजमार्गावर 'मी' व 'माझे' असें बडबडतात नाना विकारांची मांदी गोळा करून मायेमुळे मूढ झाल्याकारणें, त्या अज्ञानमय जीवना-मुळे होणाऱ्या जन्ममरण दुःख शोकाची त्यास कांही खंती वाटत नाहीं; त्याची आठवणहि राहत नाहीं. इतके ते अंगवळणी पडते [ ९८ ते १०७ ].

उपर्युक्त अज्ञानी–विषयांधांहून वेगळे असें जे कांहीं थोडे भक्त म्हणून आहेत त्यांतहि पुनः चार प्रकार आहेत. त्यांत कांहीं व्याधि आदि उपद्रवग्रस्त असून दुःखपीडा निवारणार्थ–ईश्वरभक्तीकडे वळलेले, तर कांहीं ब्रह्मात्मैक्य-ज्ञानार्थ ईश्वरास शरण गेलेलें, तर कांहीं ऐहिक वा पारत्रिक भोगैश्वर्येच्छु असून त्या कामपूर्तीसाठीं ईश्वरभक्तीचा अवलंब करणारे आणि चवथे भगवत्तत्त्व साक्षात्कारी, असें ज्ञानी भक्त होत. हे सर्व माझेच भक्त आहेत खरे; पण ज्ञानी भक्ताखेरीज इतर तीन भक्त आपापल्या कामपूर्तीसाठीं,–हेतुपूर्तीसाठीं ईश्वराची भक्ति करण्यांत प्रवृत्त झालेले असतात. म्हणून ते कनिष्ठ आहेत. त्यांना 'उदार' म्हणण्याचें मुख्य कारण म्हणजे–आर्त व अर्थार्थी हेतुपूर्तीसाठीं सात्त्विक आदरयुक्त, प्रेमयुक्त भक्ति करतां करतां त्याच भक्तींची निष्काम भक्तींत परिणति होईल व त्याचे पर्यव-सान सरतेशेवटीं ज्ञानद्वारां मोक्षफल प्राप्तिमध्येंच होईल व जिज्ञासुभक्ताची उत्कट, तीव्रतम इच्छा असेल तर त्यास सत्वर हरि–गुरुकृपेनें ब्रह्मात्मैक्यबोध होईल, हें होय.

खरा श्रेष्ठ भक्त म्हणजे ज्ञानी भक्त होय. तो मला इतका प्रिय आहे कीं, "तो माझा आत्माच होय." अर्थात् तो मद्रूपच होय. परमार्थतः ज्ञानी भक्तांत व माझ्यांत भेद मुळींच राहिला नाहीं; तरी तो पूर्वसंस्कारानुरूप माझी कर्तव्यबुद्धिरहित भक्ति करतो व जीवन्मुक्तीच्या विलक्षण सुखाचा त्यास लाभ होतो [ १०८–१२६ ].

साधकानें अनंत जन्मांत केलेल्या साधनानुष्ठानानें त्याच्या अंतःकरणांत क्रमाक्रमानें कसा बदल होत जातो हें सांगून सरतेशेवटीं अंतःकरणवृत्तींत जीव–ब्रह्मैक्य ज्ञानाचा उदय होऊन त्याची परिणति सर्वत्र ओतप्रोत ब्रह्मच व्यापक रूपानें भरलेले आहे, अशा अपार बोधसागरांत होते असें सांगितलें आहे. येथें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञानी भक्ताचे वर्णन सांगतांना थोडक्यांत; पण सर्व "परमार्थ–मार्ग–क्रम" उत्कृष्ट रीतीनें प्रतिपादिला आहे. तो असा कीं, "अनंत जन्मांपासून विषयांची असलेली दाट झाडी, व कामक्रोधादि संकटें चुकवून "सद्वासनारूपी" पर्वतावर आला. मग 'साधुसंगें', 'अप्रवृत्तिरूप'–आडमार्गास डावलून शेकडों जन्म 'सत्कर्म'रूप सरळ वाटेनें आस्थापूर्वक 'फलाशा'-रूपीं वाहणा–अंतःकरणरूपी पायांत न घालतां चालला, देह तादात्म्यरूपी रात्रींत "सर्वसंगपरित्याग" रूपी तयारीनें धांवत असतां 'कर्मक्षय'रूपी पहांट झाली; त्याचबरोबर 'गुरुकृपारूपी' उषःकाल झाला. ज्ञानप्रकाशाचें कोंवळे ऊन पडले. अर्थात् "मी ब्रह्म आहें" असा–ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार होऊन 'सर्वत्र साम्याचे' ऐश्वर्य लाभले. संपूर्ण विश्वांत एकमेव–श्रीवासुदेवच ओतप्रोत भरलेला आहे, अशी-परमार्थांतील अंतिम साध्यरूप सर्व प्रमाणांचे फलरूप, व्यापकानुभूतिरूप 'अन्वय भूमिका' लाभते; असा महात्मा अति दुर्लभ आहे.–सारांश ( १ )विषयवासनांचा

त्याग ( २ ) सद्वासना ( ३ ) सत्संगति ( ४ ) सत्कर्म ( ५ ) निष्काम कर्मयोग ( ६ ) नित्यानित्य वस्तुविवेकपूर्वक वैराग्य ( ७ ) कर्मक्षय ( ८ ) गुरुकृपा ( ९ ) ब्रह्मात्मैक्य साक्षात्काररूपज्ञानाचा अंतःकरणवृत्तींत उदय आणि ( १० ) त्याचीच सर्वत्र–सम–ब्रह्म दर्शनात्मक बोधांत परिणति होते; असा हा सर्वसामान्यतः असणारा परमार्थाचा चिंतनीय ' क्रममार्ग ' श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सांगितला आहे [ १२७ ते १३७ ].

इतर लोकांकडे पाहिले तर ते विषयवासना पूर्तीच्याच मागे लागलेले दिसतात व त्या वेगवेगळ्या विषयवासना पूर्ण करण्यासाठीं इतर क्षुद्र देवदेवतांची आराधना करण्यांत ते मग्न होतात. त्या देवदेवतांत तरी मीच असून त्यांची इच्छाहि माझ्यामुळेंच पुरी होत असते; पण ते अविवेकी असल्यानें त्यांना हे कळत नाहीं. त्यांत वाईट एवढेंच कीं, इतर देवदेवतांच्या भक्तीनें मिळणारी फळें नाशिवन्त असतात. नित्य शाश्वतरूप जो मी त्या माझ्या प्राप्तीसाठीं नरदेहांत आल्यासारखा प्रयत्न न करतां त्यास अंतरतात व नाशिवन्त फलप्राप्तीसाठीं तो प्रयत्न निष्कारण फुकट घालवितात. वस्तुतः असा एकहि पदार्थ नाहीं कीं, ज्यांत मी नाहीं; पण मूढांना माझें ज्ञान होत नाहीं, असा आंधळेपणा येण्याचे कारण म्हणजे योगमाया पडळानें देहतादात्म्य निर्माण केले, हे होय. प्रथम अहंकार आणि तनु यांचे एकमेकावर प्रेम जडलें. अज्ञानामुळें देहतादात्म्य निर्माण झालें. त्यानंतर विषयेच्छा निर्माण होऊन इच्छेचें कामांत रूपान्तर होते. पुढें द्वेष, द्वंद्वमोह निर्माण होतो. तो असा कीं, जो सात्त्विक धैर्यास प्रतिकूल, नियमन करण्यास अशक्य, छळणारा, वासना रसानें उन्मत्त, वासनासक्तच असल्याकारणे व सदाच असंतुष्ट, अतएव पंचविषय सेवनांत अखंड गर्क असणारा, विकृतीशीं रत असल्यामुळें विकल्प निर्माण करून आडमार्गानें चालतो या सर्व विकारांच्या मांदीमुळें–विषयवासनांमुळें जीवास जन्ममरणरूपी दुःखाचे घाव सहन करावे लागतात [ १३८ ते १७१ ].

कांहीं थोडे पुण्यवान् लोक या जन्ममरणाच्या तडाख्यांतून सुटतात. ते आपल्या बुद्धीला भ्रंश पडूं देत नाहींत सत्कर्मद्वारां विषयवासनांचा त्याग करून सरळ जाऊन परब्रह्मरूपी मुक्कामास पोंचतात. कृतकृत्य होऊन कर्माचे प्रयोजन संपते. मन नाहींसें होतें. त्या ऐक्यबोधांत भेदाचें दारिद्र्य तो मुळींच जाणत नाहीं. तें ब्रह्माशीं तद्रूप झालेलें असल्यामुळें, अधिभूत, अधिदैव, अध्यात्म, अधियज्ञ इत्यादिकांचे त्यास यथार्थज्ञान झाल्यामुळें त्यांना शरीराच्या वियोगाच्या प्रसंगीं इतर जीवांना मरणसमयीं होणारे दुःख; कष्ट त्यास मुळींच होत नाहींत. तेच स्थिर अंतःकरणयुक्त योगी होत ( १७२ ते १८४ ].

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, त्यावेळीं भगवंतांनीं सांगितलेल्या शब्दरूपीं कुपिकेच्या खालीं अर्जुनाची अवधानरूपी ओंजळ--नव्हतीच. कारण, त्यावेळीं क्षणभर अर्जुनाचे लक्ष मागेच होते. ती भगवंताची वाक्यरूपीं फळें तत्त्वज्ञानाच्या सिद्धांताचीच जणुं बनविलेली असून ब्रह्मरसांत बुडवून परमानंदानें घोळलेली होती. त्या फळामुळें लाभलेल्या सुखसंपत्तीपुढें स्वर्गसुखहि त्यास कमी वाटूं लागले व जे आपण ऐकले ते अर्धवट ऐकले ते पुरे ऐकावे, अशी अर्जुनास तीव्र इच्छा–निर्माण झाल्यामुळें त्यांस निवांत राहवेना. अमृत–मधुर शब्द श्रवणाच्या इच्छेनें अर्जुनानें भगवंतास विनंती केली देवा ! ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ, आणि प्रयाणकाळीं योग्यांना होणारे तुझें स्मरण या सातहि गोष्टी कधींहि न ऐकलेल्या आश्चर्यकारक आहेत. तेव्हां या सात गोष्टींचा खुलासा–व्हावा ! या अर्जुनाच्या विनंतींतच आठव्या अध्यायाच्या आरंभाचे बीज आहे. श्रीगुरूंना अध्यात्म प्रश्न पुसण्याची अर्जुनाची हातोटी–म्हणजे नम्रतापूर्ण देवाच्या अभिप्रायावर नजर ठेवून आणि चतुराई वा सावधानता, हे एक अर्जुनच जाणतो. श्रीगुरूंना प्रश्न पुसतांना सर्वांनीं हा अर्जुनाचा आदर्श आपल्या डोळ्यासमोर ठेवावा. मी तो श्रीकृष्णार्जुन संवाद सरळ, रसाळ मराठी भाषेंत सांगणार आहे. माझ्या भाषेच्या सौन्दर्यानें इंद्रियें सुखसमाधानात्मकतेचें राज्य करतीलच; पण जेथें शब्दमर्यादाच संपते अशा–ब्रह्मात्मैक्य सिद्धान्ताच्या गांवासहि नेण्याचे सामर्थ्य माझ्या शब्दांत आहे. श्रोत्यांनीं–शास्त्रीय शुद्ध अंतःकरणपूर्वक श्रवण करून तो ऐक्यबोध आत्मत्वानें संपादन करावा, असें श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात.

[ या संपूर्ण सातव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक ९ पहावा ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय आठवा

अर्जुन उवाच :—

किं तद् ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम । अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ।। १ ।।

मग अर्जुनें म्हणितलें । हां हो जी अवधारिलें । जें म्यां पुसिलें । तें निरूपिजो ।। १ ।। सांगा कवण तें ब्रह्म । कायसया नाम कर्म । अथवा अध्यात्म । काय म्हणिपे ।। २ ।। अधिभूत तें कैसें । एथ अधिदैव तें कवण असे । हें उघड मी परियेसें । ऐसें बोला ।। ३ ।।

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन । प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ।। २ ।।

देवा अधियज्ञ तो काई । कवण पां इये देहीं । हें अनुमानासि कांहीं । दिठी न भरे ।। ४ ।। आणि नियंता अंतःकरणीं । तूं जाणिजसी देहप्रयाणीं । तें कैसेनि हे शार्ङ्गपाणी । परिसवा मातें ।। ५ ।। देखा धवळारीं चिंतामणीचा । जरी पहुडला होय दैवाचा । तरी वोसणतांही बोलु तयाचा । सोपु न वचे ।। ६ ।। तैसें अर्जुनाचिया बोलासवें । आलें तेंचि म्हणितलें देवें । तें परियेसें गा बरवें । जे पुसिलें तुवां ।। ७ ।। किरीटी कामधेनुचा पांडा । वरी कल्पतरूचा आहे मांदोडां । म्हणौनि मनोरथसिद्धीचिया चाडा । तो नवल नोहे ।। ८ ।। श्रीकृष्ण कोपोंनि ज्यासी मारी । तो पावे परब्रह्मसाक्षात्कारीं । मां कृपेनें उपदेशु करी । तो कैसापरी न पवेल ? ।। ९ ।। जैं कृष्णचि होइजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण । मग संकल्पाचें आंगण । वोळँगती सिद्धी ।। १० ।। परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि आथि निस्सीम । म्हणौनि तयाचें कामें । सदां सफळ ।। ११ ।। या कारणें श्रीअनंतें । तें मनोगत तयाचें पुसतें । होईल जाणोनि आइतें । वोगरूनि ठेविलें ।। १२ ।। जें अपत्य थानीहुनि निगे । तयाची भूक ते मायेसीचि लागे । एऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य दे येरी ? ।। १३ ।। म्हणौनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं । परि तें असो आइका काई । जें देव बोलते जाहले ।। १४ ।।

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय आठवा

**अन्वयार्थ--हे पुरुषोत्तम**-हे पुरुषोत्तमा, कृष्णा! **तत् ब्रह्म किं**-तें ब्रह्म काय आहे! सोपाधिक आहे कीं, निरुपाधिक?-**अध्यात्मं किं**-या शरीरांत राहाणारें अध्यात्म काय आहे?-**कर्म किं**-कर्म काय आहे?-**च** आणि-**अधिभूतम्**-अधिभूत म्ह० भूतांतील तत्त्व-**किं प्रोक्तं**-काय सांगितलें आहे? **अधिदैवं किम् उच्यते**-अधिदैव कशाला म्हणतात? १.

मग अर्जुन म्हणतो! "अहो देवा! ऐकलें का? मीं जें आतां विचारीत आहे तें मला स्पष्ट करून सांगावें १. तें ब्रह्म कोणतें? कर्म कशाचें नांव आहे? अथवा अध्यात्म कशाला म्हणतात? ते सांगा २. अधिभूत ते कसें आहे? आणि यांत अधिदैव ते कोण आहे? हें मला नीट समजेल, असें सांगा ३.

**अन्वयार्थ--मधुसूदन**-हे मधुसूदना!-**अत्र**-यांतील **अधियज्ञः**--अधियज्ञ--**कः**--कोणता?--**कथं**--त्याचें चिंतन कसें करावें?-**अस्मिन् देहे**-तो या देहांत आहे कीं, कोठें?-**च**-आणि-**प्रयाणकाले**-मरणाच्या वेळीं-**नियतात्मभिः**-शांतचित्त पुरुषांकडून-**कथं ज्ञेयः असि**-तूं कसा जाणण्यास योग्य आहेस? २.

"देवा अधियज्ञ तो काय! व तो या देहांत कोण आहे हें अनुमानानेंहि नीट असें कांहींच लक्षांत येत नाहीं ४. हे शार्ङ्गपाणे; ज्यांनीं आपलें अंतःकरण स्वाधीन करून घेतलें आहे, त्यांच्याकडून अंतःकालीं तूं कसा जाणला जातोस! हें मला चांगल्या रीतीनें ऐकव" ५. [श्रीज्ञानदेव म्हणतात.] "पहा कीं-चिंतामणीच्या मंदिरांत एकादा दैववान् मनुष्य जर निजला असेल तर तो जरी झोपेंत बरळला तरी त्याचें बरळण्यांतील शब्दहि व्यर्थ जात नाहींत ६. त्याचप्रमाणें, मला हें सांगा" असें अर्जुन म्हणाल्या-बरोबरच देव म्हणाले, "अरे तूं जें कांहीं पुसलेस तें नीट ऐक" ७. किरीटी, हें जणुं कामधेनूचें वासरूं असून त्याच्यावर कल्पतरूचा मांडव आहे, म्हणून त्याच्या मनांतील सर्व मनोरथ-हेतु सिद्धीस जावेत अशी इच्छा केली तर यांत नवल तें काय? कांहींच नाहीं ८. श्रीकृष्ण ज्याला रागावून मारतात, तो देखील ब्रह्मसाक्षात्कारास पावतो; मग ज्याला कृपादृष्टीनें उपदेश करतील, तो काय ब्रह्मसाक्षात्कारास प्राप्त होणार नाहीं? ९. ज्या वेळेस आपण कृष्णरूपच आहों असा आपला निश्चय होतो, त्यावेळीं आपलें अंतःकरणहि कृष्णरूपच बनतें; मग आपल्या संकल्परूप आंगणांत [आपल्या मनांत जे जे संकल्प येतील, ते ते पूर्ण करण्याकरितां] अष्टमहासिद्धि राबतील १०. परंतु आज अशा प्रकारचें जें निस्सीम प्रेम, तें एका अर्जुनाच्या ठिकाणींच आहे, म्हणून त्याच्या इच्छा नेहमीं सफल होतात ११. म्हणूनच अर्जुन ही आतां आपल्या मनांतील गोष्ट विचारील, असें जाणून अगोदरच श्रीकृष्णांनीं आयतेंच उत्तराचें ताट वाढून ठेवलें १२. कारण स्तनपान करून दूर खेळत असलेली मुलाची भूक त्याच्या मातेलाच लागत असते. म्हणजे कळत असते एरव्हीं 'मला दूध पाज' असें त्यानें सांगितल्यावर मग कां ती त्याला दूध पाजते? १३. म्हणून तसेंच कृपाळू अशा सद्गुरूचे ठिकाणीं [आपल्या शिष्यासंबंधीं] असलेलें हें प्रेम असणें म्हणजे कांहींच नवल नव्हे. पण हें असो, अगोदर देव जें कांहीं बोललें, तें ऐका १४.

---

१ कशाला. २ डोळ्यांत भरत नाहीं. ३ स्वाधीन. ४ समजला जाईल. ५ अंतकालीं. ६ इच्छिलेलें देणाऱ्या मण्याच्या मंदिरांत. ७ निजला. ८ झोपेंत बरळतो. ९ व्यर्थ.

१० खोंड, गोऱ्हा. ११ मंडप. १२ मन. १३ राबतात. १४ इच्छा. १५ वाढून. १६ जे बालक स्तनपान करीत असतें. १७ दूध. १८ ती आई.

श्रीभगवानुवाच :—

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते । भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

मग म्हणितलें सर्वेश्वरें । जें आकारीं इयें खोकरें । कोंदलें असत नं खिरे । कवणे काळीं ॥ १५ ॥ एऱ्हवीं सपूरपण तयाचें पहावें । तरी शून्यचि नव्हे स्वभावें । वरि गगनाचेनि पालवें । गाळूनि घेतलें ॥ १६ ॥ जें ऐसेंही परि विरुळें । इये विज्ञानांचिये खोळे । हालवलेंहि न गळे । तें परब्रह्म ॥ १७॥ आणि आकाराचेनि जालेपणें । जन्मधर्मातें नेणें । आकारलोपीं निमणें । नाहीं कहीं ॥ १८ ॥ ऐशिया आपुलियाची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती । तया नाम सुभद्रापती । अध्यात्म गा ॥ १९ ॥ मग गगनीं जेविं निर्मळें । नेणों कैचीं एके वेळे । उठती घनपटळें । नानावर्णें ॥ २० ॥ तैसें अमूर्ती तिये विशुद्धें । महदादि भूतभेदें । ब्रह्मांडाचे बांधे । होंचि लागती ॥ २१ ॥ पैं निर्विकल्पाचिये बेरडीं । फुटे आदिसंकल्पाची विरूढी । आणि "तें सवेंचि मोडोनि" "ये ढोंढी" । ब्रह्मगोळकांच्या ॥२२॥ तया एकैकाचे भीतरीं पाहिजे । तंव बीजाचाची भरिला देखिजे । माजीं होतिया जातिया नेणिजे । लेखं जीवा ॥ २३ ॥ मग तया ब्रह्मगोळकांचें अंशांश । प्रसवती आदिसंकल्प असमसहास । हें असो ऐसी बहुवस । सृष्टी वाढे ॥ २४ ॥ परि दुजेनविण एकला । परब्रह्मींचि संचला । अनेकत्वाचा आला । पूर जैसा ॥ २५ ॥ तैसें समविषमत्व नेणों कैचें । वायांचि चराचर रचे । पाहतां प्रसवातिया योनीचे । लक्ष दिसती ॥ २६ ॥ येरी जीवभावाचिये पालविये । कांहीं मर्यादा करूं नये । पाहिजे कवण हें आघवें विये । तंव मूळ तें शून्य ॥२७॥ म्हणौनि कर्ता मुदल न दिसे । आणि सेखीं कारणही कांहीं नसे । माजीं कार्यचि आपैसें । वाढों लागे ॥२८॥ ऐसा करितेनविण गोचरु । अव्यक्तीं हा आकारु । निपजे जो व्यापारु । तया नाम कर्म ॥ २९ ॥

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् । अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

आतां अधिभूत जें म्हणिपे । तेंहि सांगों संक्षेपें । तरी होय आणि हारपे । अभ्र जैसें ॥३०॥ तैसें असतेपण आहाच । नाहीं होइजे हें साच । जयातें रूपा आणिती पांचपांच । मिळोनियां ॥ ३१ ॥ भूतांतें अधिकरूनि असे । आणि भूतसंयोगें तरी दिसे । जें वियोगावेळे भ्रंशें । नामरूपादिक ॥३२॥ तयातें अधिभूत म्हणिजे ।

**अन्वयार्थ-परमम् अक्षरं**- जें निरतिशय अविनाशी तत्त्व तेंच-**ब्रह्म**-ब्रह्म आहे-**स्वभावः**-त्या परम अक्षर ब्रह्माचाच प्रत्येक देहांतील प्रत्यगात्मभाव हेंच-**अध्यात्मम् उच्यते**-अध्यात्म तत्त्व आहे, असें म्हटलें जातें.-**भूतभावोद्भवकरः**-भूतांचा सद्भाव उत्पन्न करणारा-**विसर्गः**-दैवतांना उद्देशून चरुपुरोडाशादि द्रव्यांचा जो त्याग-**कर्मसंज्ञितः**-त्यालाच कर्म ही संज्ञा आहे ६.

✓ मग सर्वेश्वर श्रीकृष्ण म्हणालेः-जें या सर्व फुटक्या आकारांत [ आकार मात्रांत ] ओतप्रोत भरलेलें असूनहि कोणत्याहि वेळीं गळत नाहीं [ नाश पावत नाहीं; ] १५. बरें, त्याचा सूक्ष्मपणा पहावा, तर शून्यच आहे असें वाटेल; परंतु तसें नव्हे [ कारण, स्वभावाने ते निर्विशेष सामान्य सत् आहे. ] तें किती सूक्ष्म आहे म्हणाल, तर सूक्ष्मातिसूक्ष्म अशा आकाशाच्या पदरांतूनहि गाळून घेतलें आहे १६. अशा प्रकारचें जें अतिसूक्ष्म आहे, तरीपण जे प्रपंचरूपी [ ज्ञानाच्या ] वस्त्राच्या गाळणींतून हालवलें असतांहि गळत नाहीं, ते 'परब्रह्म' होय १७. आणि आकार म्हणजे शरीर हें जन्मास आल्यानें परब्रह्म, जन्मरूपी विकारात्मक धर्मास जाणत नाहीं, [ परब्रह्म जन्मत नाहीं ] व तें आकारात्मक शरीर नाश पावल्यावरहि जें कधींहि नाश पावत नाहीं १८. हे सुभद्रापते! अशा रीतीनें ज्या ब्रह्माची आपल्या सहजस्थितिनें नित्यता असते, त्यालाच "अध्यात्म" असें म्हणतात १९. मग निर्मळ आकाशांत नानारंगांचे ढग एकदम कसे उत्पन्न होतात हें ज्याप्रमाणें कळत नाहीं २०. त्याचप्रमाणें त्या निराकार व विशुद्ध ब्रह्मांत प्रकृति, महत्तत्त्व, अहंकारादि भेदांनीं ब्रह्मांडाचे आकार होऊंच लागतात २१. परंतु कल्पनातीत विशुद्ध परब्रह्मरूपी माळ जमिनीवर [ एकोऽहं बहुस्याम् ] अर्थात् मी बहुत प्रकारचा होईन अशा संकल्पाचा अंकुर उत्पन्न होतो. व त्याला लागलींच ब्रह्मांडाचे पुष्कळ धोंडे [ आकार ] दाट उत्पन्न होतात २२. प्रत्येक आकारांत पाहूं लागलें म्हणजे तो मूळ बीजानें म्हणजें ब्रह्मानेंच भरला आहे असें दिसतें; आणि त्या प्रत्येक [ ब्रह्मांडांत ] किती जीव होतात व जातात याचीं गणनाहि करितां येत नाहीं २३. मग त्या ब्रह्मांडाच्या गोलांतील अंशरूप प्रत्येक अंगापासून [ जीवापासून ] असंख्यात आदिसंकल्प निर्माण होऊं लागले. हे असो, अशा रीतीनें सृष्टीचा फार विस्तार होऊं लागतो २४. परंतु दुसऱ्या कोणाशिवाय एकटेंच परब्रह्म सर्वत्र भरलेलें असून मायेच्या उपाधीने अनेक रूपानें नटून जणुं त्याचे ठिकाणीं अनेकत्वाचा पूर आल्याप्रमाणें भासतें २५. त्याचप्रमाणें [ब्रह्माचे ठिकाणी] स्थावरजंगमात्मक विश्वाची रचना कारण नसतां उगीच होते. त्यांत समविषमत्व कोठून आलें, हें समजत नाहीं, परंतु ते पाहूं गेलें असतां प्रसवणाऱ्या योनीचे लक्षावधि प्रकार उत्पन्न झालेले दिसतात २६. या व्यतिरिक्त नानाप्रकारच्या जीवभावरूपी पालवीच्या विस्ताराची गणनाच करतां येत नाहीं. हे सर्व कोण प्रसवते ? हें पाहूं गेलें तर त्याचें मूळ शून्य म्ह. मायाच आहे २७. म्हणून मूळांत याचा कर्ता कोणी दिसत नसून आणि शेवटीं कांहीं कारणहि दिसत नाहीं व मध्येंच कार्यच आपोआप वाढावयास लागते [ याचेच नांव मायिक देखावा ] २८. अशा प्रकारें अव्यक्ताच्या ठिकाणीं कर्त्यावांचून हा प्रत्यक्ष दिसणारा आकार उत्पन्न होतो असा उत्पत्तीचा जो व्यापार, त्याला 'कर्म' असें नांव आहे २९.

**अन्वयार्थ-क्षरः भावः**-विनाशी भाव-हेंच-**अधिभूतं**-सर्व भूतांतील-तत्त्व आहे-**च** - आणि-**पुरुषः**-सर्वांच्या शरीरांत राहणारा पुरुष हेंच-**अधिदैवतम्**-अधिदैवत-देवांतील तत्त्व आहे-**हे देहभृतां वर**- हे देहधारण करणारांतील श्रेष्ठ अर्जुना! -**अत्र देहे**- या देहांत - **अधियज्ञः**- अधियज्ञ-यज्ञाभिमानी देवता-**अहम् एव**-मीच आहें ४.

आतां 'अधिभूत' ज्याला म्हणतात तेंहि संक्षेपानें सांगतों. ज्याप्रमाणें ढग उत्पन्न होतात आणि लय पावतात ३०. त्याचप्रमाणें, ज्यांचें अस्तित्व लटकें वरवर असते व वस्तुतः 'न होणे' हेच ज्याचे खरे स्वरूप आहे व ज्याला पंचमहाभूतें एकत्र होऊन फक्त इंद्रिय गोचर रूपाला आणतात ३१. जें पंचमहाभूतांच्या आश्रयानें असतें त्यांच्याच संयोगानें [ पंचिकरणानें ] च दृष्टीस पडतें व पंचमहाभूतांच्या वियोग कालीं लय पावतें, असें जें नांवरूपादिक ३२.

१ मोडकें-भोंकाचें शरीर. २ दाट भरलेलें. ३ गळत नाहीं. ४ बारीकपण. ५ पदरानें. ६ विरळ, सूक्ष्म. ७ प्रपंचाचें. ८ झोळींत. ९ जन्मलेपणें. १० आकाराच्या नाशानंतर. ११ नाश पावणें, मरणें. १२ निरंतर. १३ असणारी. १४ अर्जुना. १५ देहांतर्गत ब्रह्म. [ कूटस्थ किंवा प्रत्यगात्मा. ] १६ गडद ढगांचा पडदा. १७ निराकार शुद्ध ब्रह्मांत. १८ प्रकृति अहंकारादिकांच्या. १९ आकार. २० कल्पनातीत शुद्ध ब्रह्माच्या. २१ माळजमिनीत. २२ मी बहुत प्रकारचा होईन या संकल्पाच्या. २३ अंकुर, वाढ. २४ ओंकार. २५ भरून लावतात. २६ धोंडे [ आकार ) २७ ब्रह्मांड. २८ आंत पहावें तों. २९ भरलेला. ३० गणना. ३१ असंख्यात. ३२ स्थावरजंगम विश्व.

मग अधिदैव पुरुष जाणिजे । जेणें प्रकृतीचें भोगिजे । उपार्जिलें ॥ ३३ ॥ जो चेतनेचा चक्षु । जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु । जो देहास्तमानीं वृक्षु । संकल्प विहंगमांचा ॥ ३४ ॥ जो परमात्माचि परी दुसरा । जो अहंकारनिद्रा निदसुरा । म्हणौनि स्वप्नीचिया वोरबारा । संतोषें शिणे ॥ ३५ ॥ जीव येणें नांवें । जयातें आंळविजे स्वभावें । तें अधिदैवत जाणावें । पंचायतनींचें ॥ ३६ ॥ आतां इयेचि शरीरग्रामीं । जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञु एथ गा मी । पंडुकुमरा ॥ ३७ ॥ येर अधिदैवाधिभूत । तेहि मीचि कीर समस्त । परि पंधरें किडाळा मिळत । तें काय सांके नोहे ? ॥ ३८ ॥ तरि तें पंधरेपण न मैळे । आणि किडाळाचियाही अंशा न मिळे । परि जंव असे तयाचेनि मेळें । तंव सांकेंचि म्हणिजे ॥ ३९ ॥ तैसें अधिभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पांलवें । झांकलें तंव मानावें । वेगळें ऐसें ॥ ४० ॥ तेचि अविद्येची जवनिका फिटे । आणि भेदभावाची अवधी तुटे । मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी काय दोनी होती ? ॥४१॥ पैं केशांचा गुंडाळा । वरि ठेविली स्फटिकशिळा । ते वरि पाहिजे डोळां । तंव भेदली गमती ॥ ४२ ॥ पाठीं केश परौते नेले । आणि भेदलेपण काय नेणों जाहालें । तरी डांक देऊनि सांदिलें । शिळेतें काई ? ॥ ४३ ॥ ना ते अखंडचि आंयती । परि संगें भिन्न गमली होती । ते सारिलिया मागौती । जैसी कां तैसी ॥ ४४ ॥ तेवींचि अहंभावो जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे । हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु मी ॥४५॥ पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मजं । सांगितलें कां जें काज । मनीं धरूनि ॥ ४६ ॥ तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्य सुखाचा ठेवा । परि उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥ ४७ ॥ पहिलिया वैराग्यइंधन[२२] परिपूर्तीं । इंद्रियानळीं[२३] प्रदीप्तीं । विषयद्रव्यांचिया[२४] आहुती । देऊनियां ॥ ४८ ॥ मग वज्रासन[२५] तेचि उर्वी । शोधूनि आधारमुद्रा बरवी । वेदिका रचे मांडवीं । शरीराच्या ॥ ४९ ॥ तेथ संयमाग्नीचीं कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पवाडें । यजिजती उदंडें । युक्तिघोषें ॥ ५० ॥ मग मनप्राणसंयमु । हाचि हवनसंपदेचा संभ्रमु । येणें संतोषविजे निर्धूमु । ज्ञानानळु ॥ ५१ ॥ ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे । मग ज्ञान तें ज्ञेयीं[३७] हारपे ।

[ नामरूपात्मक शरीर व जगत् ] त्याला "अधिभूत" असें म्हणतात. आतां अधिदैवत म्हणजे [ पुरुष ] जीव असें समजावें. तो कसा तर जो प्रकृतीनें उत्पन्न केलेल्या व मिळविलेल्या भोगांचा उपभोग घेतो ३३. जो बुद्धीचा प्रकाशक, इंद्रियरूप देशाचा अधिपति व शरीराच्या अंतकालीं संकल्परूप पक्ष्यांचा राहण्याचा किंवा विसांवा घेण्याचा वृक्ष ३४. जो तत्त्वतः प्रत्यक्ष परमात्माच आहे, परंतु दुसरा म्ह. स्वतःस भिन्न समजूं लागला, कारण अहंकाररूप निद्रेंत निजल्यामुळें ज्याला द्वैत प्रतीतीरूप स्वप्नांतील खटपटीनें संतोष व शीणहि होतो; ३५. आणि ज्याला सहजच 'जीव' या नांवानें हांक मारावी व जो पंचभूतात्मक शरीररूपीं घरांतील मुख्य देवता आहे म्हणून त्यास "अधिदैवत" समजावें ३६. आतां पंडुकुमरा! याच शरीररूप गांवांत जो शरीरभावाला [ देहतादात्म्याला ] नष्ट-लय करितो, तो या शरीरांतील "अधियज्ञ" मी होय ३७. इतर अधिदैव व अधिभूत तेहि सर्व खरोखर मीच आहें; परंतु उत्तम कसाचें सोनें हिणकसाला मिळविल्यावर तें डाकलग-कमी प्रतीचे होत नाहीं कां? ३८. तरीपण त्या सोन्याचा उत्तमपणा मळून कमी होत नाहीं, तें किडाळाच्या भागास मिळून हिणकसहि होत नाहीं; परंतु जोंपर्यंत हिणकसाच्या एकत्र संबंधाने असतें तोंपर्यंत त्याला 'डाकलगच' म्हटले जाते ३९. त्याचप्रमाणें अधिभूतादि हें सर्व अज्ञानाच्या पदरानें जोंपर्यंत झांकलेले आहेत तोंपर्यंत वेगळे आहेत असें मानले पाहिजेत ४०. तोच अज्ञानाचा पडदा गेल्यामुळें भेदभावाची मर्यादाच नष्ट होते मग ते [ जीव व परमात्मा ] एक होऊन मिळतात [ परस्परैक्य होते ] असें जर म्हणावें तर ती मूळची काय दोन होतीं? ४१. असें पहा कीं, केसांचा झुबका असून त्यांजवर स्फटिकाची शिळा ठेवली तर ती शिळा वरच्या दृष्टीनें पाहू गेलें असतां जशी भेगळलेली दिसतें; ४२. पाठीमागून ते केस त्या स्फटिक शिळेपासून एके बाजूस केल्यावर तिच्या चिरा, भंगलेपण कोणीकडे गेले हें समजत नाहीं; तर मग त्या शिळेला डांक लावून जोडले आहे काय? ४३. तर नाहीं; ती मूळची अखंडित होती, तशीच आहे परंतु केसांच्या संगतीनें भंगलेली भासत होती. नंतर ते केस दूर-एके बाजूस केल्यावर पुनः ती शिळा मूळची जशी होती तशींच [ अखंड ] दिसते ४४. त्याप्रमाणें अहंकार नाहींसा झाला म्हणजे ऐक्य हें मूळचेंच आहे व हें ऐक्य खरोखर जेथें प्रत्ययास येतें, तो 'अधियज्ञ' मीच आहे ४५. अरे! हें पहा, आम्ही जो हेतु मनांत धरून, 'सर्व यज्ञ कर्मापासून झालेले आहेत' असें पूर्वीं [ चौथ्या अध्यायांत ] तुला सांगितलें, तोच हा अधियज्ञ होय ४६. तो 'अधियज्ञ' जीवांचा विसावा आहे व नैष्कर्म्य [ब्रह्म] सुखाचा ठेवा आहे; पण अर्जुना! तुला तो मी स्पष्ट करून सांगत आहे ४७. प्रथम वैराग्यरूप इंधनाच्या पूर्णतेनें [ सहाय्यानें ] चांगला पेट घेतलेल्या इंद्रियरूप अग्निमध्यें शब्दादि विषयरूपी द्रव्याच्या आहुति देऊन ४८. मग वज्रासन हीच कोणी भूमिका तीच शुद्ध करून शरीररूपी मांडवामध्यें मूळबंधमुद्रेचा चांगला ओटा तयार करितात ४९. त्या ठिकाणीं इंद्रियनिग्रहरूप अग्नीच्या कुंडांत इंद्रियरूप विपुल होमद्रव्यें घालून योगमंत्रानें यजन करितात ५०. मग मन, प्राण व यांचा निग्रह हीच कोणीएक होमाच्या द्रव्याची तयारी, हिनें धुररहित असा जो निर्दोष ज्ञानाग्नि त्याला संतोषित करितात ५१. याप्रमाणें हें वर सांगितलेले सर्व साहित्य ज्ञानरूपी

१ जीव. २ उत्पन्न केलेले. ३ बुद्धीचा द्रष्टा. ४ शरिराच्या अंतीं. ५ मनोरथरूप पक्षाच्या. ६ परंतु. ७ कारण. ८ निजलेला. ९ खटपटींत. १० हांक मारावी, म्हणावें. ११ या पंचमहाभूतात्मक स्थानांतील [ शरीरांतील ]. १२ लयातें पाववी. १३ कमी प्रतीचें. १४ पदरानें, १५ पडदा. १६ अंतर, मर्यादा. १७ फुटलीशी दिसते. १८ एके बाजूस. १९ स्वाभाविक, मूळची. २० कर्मापासून झालेलें. २१ ब्रह्मसुखाचा. २२ वैराग्यरूपी जळणाच्या पुरवठ्यानें. २३ पेटलेल्या इंद्रियरूपीं अग्नींत. २४ शब्दस्पर्शादिकांच्या. २५ आधार, बंध. २६ पृथ्वी. २७ मूळबंधमुद्रा. २८ यज्ञकुंडावरील ओटा. २९ इंद्रियनिग्रहरूप अग्नीची. ३० विस्तारानें, महत्वानें. ३१ योगमंत्रानें. ३२ मन व प्राण यांचा निग्रह. ३३ समारंभ. ३४ धुराविरहित. ३५ ज्ञानाग्नि. ३६ अर्पण होतें. ३७ जाणावयाचें जें ब्रह्म त्यामध्यें.

पाठीं ज्ञेयाचि स्वरूपें । निखिल उरे ॥ ५२ ॥ तया नांव गा अधियंज्ञु । ऐसें बोलिला जंव सर्वज्ञु । तंव अर्जुन अतिप्राज्ञु । तया पातलें तें ॥ ५३ ॥ हें जाणोनि म्हणितलें देवें । पार्था परिसतु आहासि बरवें । या कृष्णाचिया बोलासवें । येरु सुखाचा जाहला ॥ ५४ ॥ देखा बालकाचिया धणि धाइजे । कां शिष्याचेनि जैहलेपणें होइजे । हें सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रेसवातिया ॥ ५५ ॥ म्हणौनि सात्त्विक भावांची मांदी । कृष्णाआंगीं अर्जुनाआधीं । न समातसे परी बुद्धी । सांवरूनि देवें ॥ ५६ ॥ मग पिकलिया सुखाचा परिमळु । कीं निवालिया अमृताचा कल्लोळु । तैसा कोंवळा आणि सरळु । बोलु बोलिला ॥ ५७ ॥ म्हणे परिसणेयांचिया रायां । आइकें बापा धनंजया । ऐसी जळों सरलिया माया । तेथ जैंळितें तेंही जळे ॥ ५८ ॥

अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् । यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें । जे आदींचि तया मातें । जाणोनि अंतीं ॥ ५९ ॥ ते देह झोलें ऐसें मानुनी । ठेले आपणपें आपण होउनी । जैसा मठं गगना भरुनी । गगनींचि असे ॥ ६० ॥ ये प्रतीतीचिया माजघरीं । तया निश्चयाची वोवरी । आली म्हणौनि बाहेरी । नव्हेचि से ॥ ६१ ॥ ऐसें सबाह्य ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरि भूतांचीं पांचही खवंलें । नेणतांचि पडिलीं ॥ ६२ ॥ आतां उंभेयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गेंहन कवण तयाचें । म्हणौनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ॥ ६३ ॥ ते ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी समरससमुद्रीं धुतली । रुळेचिना ॥ ६४ ॥ पैं अथोवीं घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें भरला । पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ? ॥ ६५ ॥ नातरी सर्पे कवेंच सांडिलें । कां उबारेनें वस्त्र फेडिलें । तरी सांग पां काय मोडलें । अवेवांमाजीं ? ॥ ६६ ॥ तैसा आकारु हा आहाचे भ्रंशे । वांचूनी वस्तु ते सांचलीचि असे । तेचि बुद्धि जैंलिया विसंकुसे । कैसेनि आतां ॥ ६७ ॥ म्हणौनि यापरी मातें । अंतकाळीं जाणंतसाते । जे मोकलिती देहातें । ते मीचि होती ॥ ६८ ॥ एऱ्हवीं तरी साधारण । उरीं आदळलिया मरण । जो आठवु धरी अंतःकरण । तेंचि होइजे ॥ ६९ ॥

अग्नींत समर्पण करून मग तें ज्ञान ज्ञेयांत–ब्रह्मांत लय पावतें; नंतर निव्वळ ज्ञेय असें जें ब्रह्म, तेंच स्वरूपानें एकटें उरतें ५२. त्यालाच 'अधियज्ञ' असें नांव आहे. असें ज्या वेळेस सर्वज्ञ श्रीकृष्ण बोलतात न बोलतात तोंच महाबुद्धिमान् असा जो अर्जुन त्याच्या ते ध्यानांत आलें ५३. हे अर्जुनाला [ब्रह्म] समजलें असें देवांनीं जाणून ते म्हणाले–'तूं फार उत्तम प्रकारें ऐकतो आहेस.' असें श्रीकृष्ण बोलताच अर्जुनहि संतोषित झाला ५४. पहा कीं, तान्ह्या मुलाच्या तृप्तीनें आपण तृप्त व्हावें किंवा शिष्याच्या पूर्ण कृतार्थ होण्यानें आपण कृतार्थ व्हावें, हें एक जन्मदात्री आई किंवा सद्गुरूच जाणतात ५५. म्हणून अर्जुनाच्या पूर्वींच अर्जुनाच्या बोधाकडे पाहिल्याबरोबर श्रीकृष्णाच्या अंगीं अष्ट सात्त्विक भावांचा समुदाय उत्पन्न होऊन तो मावेनासा झाला, परंतु देवांनीं तो आपल्या बुद्धीनें सांवरून ५६. मग पूर्णतेस पावलेल्या सुखाच्या [सुखरूपी फळाच्या] सुगंधाप्रमाणें किंवा शांत झालेल्या अमृताच्या लाटांप्रमाणें कोमल आणि सरळ असे बोल, ते बोलूं लागले ५७. मग श्रीकृष्ण म्हणतात:–श्रवण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा अर्जुना ऐक. बाबारे! माया जळण्याची संपून गेली म्हणजे मग तिला जाळणारें ज्ञानहि तेथें [निवर्त्य असें कांहीं नसल्यामुळें] जळून जातें ५८.

**अन्वयार्थ**—**च**–आणि–**अन्तकाले**-मरणसमयीं–**माम् एव स्मरन्**–माझेंच स्मरण करणारा असा होत्साता-**कलेवरं मुक्त्वा**–शरीराचा त्याग करून-**यः**-जो–**प्रयाति**-जातो-**सः** तो–**मद्भावं**–मद्भावास-वैष्णवतत्त्वास–**याति**–प्राप्त होतो–**अत्र**–यांत–**संशयः**--संशय–**न अस्ति**–नाहीं. ५

अरे! आतांच ज्याला अधियज्ञ म्हणतात–म्हणून जे मी आपलें स्वरूप सांगितलें होतें, त्या मला जे जीवंतपणीं जाणल्यामुळें प्राणान्त समयींहि मला जाणतात ५९. कारण, देहादि अनात्म पदार्थ मिथ्या मानून स्वतःचे ठिकाणीं स्वतःच आत्मरूप-ब्रह्मरूप होऊन असतात. एखादें घर आकाशानें भरून आकाशांतच जसें असतें ६०. त्याप्रमाणें यावरील अनुभूतिरूपी माजघरांतील त्याची निश्चयरूप खोली असतें, तींत त्यास [झोंप] आली म्हणून त्याला ब्रह्माशिवाय बाह्य विषयांचे वा देहादिकांचें स्मरणच होत नसतें ६१. अशा प्रकारें अंतर्बाह्य ऐक्य भरलेले असून जो मद्रूपच होऊन राहिला आहे, तो बाहेरील पंचमहाभूतांच्या खपल्या [भौतिक पंचकोशयुक्त शरीर] हीं त्यास न कळतांच पडून जातात ६२. जें शरीर जिवंत असतांहि त्याच्या उभेपणाची जो जाणीव किंवा पर्वा बाळगीत नाहीं, त्यास तें शरीर पडल्यावर त्याचें संकट वा दुःख काय होणार? म्हणून केव्हांहि अनुभूतीच्या पोटांतलें [निश्चयरूपी] पाणी हालत नाहीं. [अंतकालीं त्याचा ब्रह्मात्मैक्यतेविषयींचा निश्चय ढळत नाहीं] ६३. ती प्रतीति जणुं ऐक्य रसाचीच ओतलेली आहे किंवा अविनाशीपणाच्या हृदयांत घातलेली आहे की काय, किंवा ती प्रतीति ऐक्याच्या पूर्णानंद समुद्रांत जणुं धुतली आहे. म्हणून [कामादिक मळांनी] ती मळत नाहीं ६४. हें पहा खोल पाण्यांत घट बुडाला असतां तो आंत व बाहेर पाण्यानेच भरलेला असतो; पण दैवगत्या जर तो मागाहून पाण्यांतच फुटला तर त्यांतील उदक फुटते काय? ६५. किंवा सर्पानें कात टाकली, अथवा एखाद्याने उष्णतेमुळें वस्त्र फेडून टाकलें, तर त्यामुळें अवयवांत कांहीं [मोडतोड] बिघाड होतो कां? सांग बरें? ६६. त्याप्रमाणें वरवर दिसणारा हा मिथ्या शरीररूपी आकार जरी नाश पावला तरी त्याशिवाय अधिष्ठान ब्रह्मवस्तु, कीं जी मूळचीच सर्वत्र भरलेली आहे, आणि ती ब्रह्मवस्तूच जर बुद्धि झाली, तर मग आतां [देहपाताचे वेळीं] ती बुद्धि कशी बरे डगमगेल? ६७. म्हणून अशा रीतीनें अंतकाळीं मला जाणत असतां [माझें स्मरण ठेवून] जे देह सोडतात, ते मद्रूपच होतात ६८. एऱ्हवीं साधारण नियम असा आहे कीं, मरण येऊन ठेपले असतां अंतःकरणांत

१ ब्रह्म. २ महान् बुद्धिमान्. ३ समजलें, पटलें. ४ तृप्तीनें तृप्त रहावें. ५ कृतार्थपणानें. ६ मातेनें. ७ समुदाय. ८ मावत नाहीं. ९ लाट. १० श्रोत्यांमध्यें श्रेष्ठ. ११ जाळणारें [ज्ञान]. १२ मिथ्या. १३ देऊळ, घर. १४ कोठडी, खोली. १५ आंतबाहेर. १६ भरलें. १७ कवचें. १८ उमे असलेल्यास १९ संकट, कठीण. २० पूर्णानंद, समुद्रांत. २१ मळेना. २२ खोल पाण्यांत. २३ कात. २४ उष्णतेमुळें. २५ अवयवांमध्यें. २६ वरवरचा, मिथ्या. २७ ब्रह्म. २८ बुद्धीनें जाणिलें असतां. २९ तत्पर. ३० जाणत असतां. ३१ सोडितात.

॥ ६९ ॥ जैसा कवणु एकु काकुळती । पळतां पवनगती । दुपाउलीं अवचितीं । कुहांमाजीं पडियेला ॥ ७० ॥ आतां तया पडणयाआरौतें । पडण चुकवावया परौतें । नाहीं म्हणौनि तेथें । पडावेंचि पडे ॥ ७१ ॥ तेविं मृत्यूचेनि अवसरें एकें । जें येऊनि जीवासमोर ठाके । तें होणें मग न चुके । भलतयांपरी ॥७२॥ आणि जागता जंव असिजे । तंव जेणें ध्यानें भावना भाविजे । डोळां लागतखेंवो देखिजे । तेंचि स्वप्नीं ॥ ७३ ॥

यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

तेविं जितेनि[१०] अवसरें । जें आवडोनि जीवीं[११] उरे । तेंचि मरणाचिये[१२] मेरे । फार हों लागे ॥ ७४ ॥ आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे ।

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च । मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥

म्हणौनि सदा स्मरावें । मातेंचि तुवां ॥ ७५ ॥ डोळां जें देखावें । कां कानीं हन ऐकावें । मनीं जें भावावें । बोलावें वाचें ॥ ७६ ॥ तें आंत बाहेरी आघवें । मीचि करूनि घालावें । मग सर्वीं काळीं स्वभावें । मीचि आहें ॥ ७७ ॥ अर्जुना ऐसें जाहालिया । मग न मरिजे देह गेलिया । मा संग्रामु केलिया । भय काय तुज ? ॥ ७८ ॥ तूं मन बुद्धि सांचेंसीं । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी । तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥ ७९ ॥ हेंचि कायिसया वरी होये । ऐसा जरी संदेहो वर्ततु आहे । तरी अभ्यासूनि आदीं पाहें । मग नव्हे तरी कोपें ॥ ८० ॥

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना । परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥

येणेंचि अभ्यासेंसी योगु । चित्तासि करीं पां चांगु । अगा उपायबळें पंगु । पहाड ठाकी ॥ ८१ ॥ तेविं सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर । लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ॥ ८२ ॥ जें नानागतीतें पाववितें । तें चित्त वेंरील आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ? ॥ ८३ ॥ पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनलें घोंघें । तें काय वर्तत आहे मागें । म्हणौनि पाहों येती ? ॥ ८४ ॥ ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेविं चित्ताचें चैतन्यें जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥ ८५ ॥

कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

ज्यांचें स्मरण असतें. त्या गतिप्रत तो पावतो ६९. ज्याप्रमाणें कोणी एखादा भयभीत मनुष्य वाऱ्यासारखा पळत असतां मार्गांत दोन्ही पाय निसटून अवचित आडांत पडला ७०. आतां त्या स्थितींत त्याला पडण्याच्या अगोदर अन्य उपाय नसल्यामुळें पळण्याचा वेग आवरून धरून, पडणें चुकविण्यासाठी अवसरच नाहीं; म्हणून पडावेंच लागते ७१. त्याप्रमाणें मृत्युसमयीं जीवासमोर जीं कांहीं एक वस्तु उभी राहते, तद्रूपच [ मरणानंतर ] त्यास व्हावें लागतें. ती वस्तु होणे मग कोणत्याहि उपायानें चुकत नाहीं ७२. आणि मनुष्य जागा असतो त्यावेळीं त्याच्या मनानें ज्याचा ध्यास घेतलेला असतो तेंच त्याला बहुधा डोळा लागल्याबरोबर स्वप्नांत दिसूं लागते ७३.

**अन्वयार्थ**—**वा कौन्तेय**–अथवा हे अर्जुना !–**यं यं अपि भावं**–ज्या ज्या पदार्थाचें–**स्मरन्**–स्मरण करीत––**अन्ते**–अंतसमयीं–**कलेवरं**–शरिराला–**त्यजति**–सोडतो–**तं तं एव**–त्या त्या पदार्थालाच--**सदा**–सर्वदा–**तद्भावभावितः**–त्या पदार्थाच्या वासनेचा अभ्यास केलेला पुरुष–**एति**–प्राप्त होतो ६.

त्याप्रमाणे, जिवंत असतांना अंतःकरणात जीं गोष्ट आवडीनें रहात असतें, त्याविषयींचीच आवड अंतकालचे समयीं वृद्धिंगत होतें; ७४. आणि मरणाच्या समयीं ज्यास ज्या गोष्टीची आठवण होत असते, त्याच गतींला तो [ मरणानंतर ] पावतो.

**अन्वयार्थ**—**तस्मात्**–त्या अर्थी–**सर्वेषु कालेषु**–सर्व कालीं–अहोरात्र–**मां**–मला–**अनुस्मर**-आठव–माझे स्मरण कर–**च**–आणि–**युध्य**–युद्ध कर–**मयि अर्पितमनोबुद्धिः**-माझ्या ठिकाणी ज्यानें आपलें मन व बुद्धि अर्पिली आहेत असा तूं–**माम् एव**–मलाच–**एष्यसि**–प्राप्त होशील–**असंशयः**–यांत संशय नाहीं ७.

असें आहे म्हणून तूं नेहमीं माझेंच स्मरण करीत जा ७५. डोळ्यांनीं जें पहावें किंवा कानांनीं जें ऐकावें किंवा मनानें जें चिंतावें अथवा वाचेनें जें बोलावें ७६. या रीतीनें सर्व व्यवहार आंत व बाहेर मीच [ मद्विषयकच ] करून घाल. असें केलें असतां मग सर्वत्र, सर्वकाळीं मीच परमात्मा आहे असें सहज तुला दिसेल ७७. अर्जुना ! याप्रमाणें सर्व गोष्टी मद्रूप आहेत, असें झालें म्हणजें मग देह गेला तरी तूं मरणार नाहींस, तर मग युद्ध केलें असता तुला भय कसलें आहे ? ७८. तूं मन आणि बुद्धि हीं खरोखर माझ्या स्वरूपांत अर्पण करशील तर मग मद्रूपच होशील, हें प्रतिज्ञापूर्वक तुला मी सांगतों ७९. हेंच कशानें होईल, असा जर तुझ्या मनांत संशय येत असेल तर अगोदर याचा अभ्यास करून पहा आणि जर मी म्हणतों तशी स्थिति प्राप्त झाली नाहीं तर मग माझ्यावर रागाव ८०.

**अन्वयार्थ**–**हे पार्थ**–हे अर्जुना !–**अभ्यासयोगयुक्तेन**–चित्ताला माझ्या ठिकाणीं स्थिर करण्याचा वारंवार प्रयत्न करणें, याच अभ्यासरूप योगानें–उपायानें युक्त असलेल्या व–**नान्यगामिना**–मला सोडून दुसऱ्या कोणत्याहि विषयाकडे न जाणाऱ्या अशा–**चेतसा**–चित्तानें–**अनुचिन्तयन्**–पुरुषाचें ध्यान करणारा भक्त–**परमं दिव्यं पुरुषं**–निरतिशय सूर्यमंडळांत व्यक्त होणाऱ्या पुरुषाला–**याति**–प्राप्त होतो ८.

याकरितां याच अभ्यासाबरोबर चित्ताची चांगल्या रीतीनें सांगड-गांठ घाल. [ मनःपूर्वक अभ्यास कर ] अरे ! ज्याप्रमाणें पांगळाहि प्रयत्नबलानें पर्वतहि चढूं शकतो ८१. त्याप्रमाणें नेहमीं ब्रह्माभ्यासानें आपल्या चित्ताला परमात्म्याचा छंद लाव, मग शरीर राहो अथवा जावो ८२. अनेक गतींला पावविणारें असें जें चित्त ते जर आत्म्याला वरील तर मग देह गेला कीं आहे याची आठवण कोण करील ? ८३. हें पहा नदीच्या ओघानें घो घो करीत समुद्रास जाऊन मिळालेले जे पाणी ते मागें काय चाललें आहे म्हणून पाहण्याकरितां परततें काय ? ८४. नाहीं, तें समुद्रांत मिळाल्यावर समुद्रच होऊन रहातें. त्याप्रमाणें चित्त हें चैतन्यस्वरूप झालें म्हणजे जन्ममरणांच्या यातायाती सहजच सदाच्याच चुकतात. कारण, तें चैतन्य नित्य निरतिशयानंदघन असें आहे ८५.

**अन्वयार्थ**–**यः**–जो कोणी–**कविं**-सर्वज्ञ–**पुराणं**–नित्य **अनुशासितारं**–सर्व जगाचा शास्ता–**अणोः अणीयांसं**–सूक्ष्माहून अतिसूक्ष्म–**सर्वस्य धातारं**–सर्व प्राण्यांना कर्माचें फल देणारा–**अचिंत्यरूपं**–ज्यांचें रूप अचिंत्य आहे–**आदित्यवर्णं**–सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें ज्याचा नित्य चैतन्यप्रकाश आहे व जो–**तमसः परस्तात्**–अज्ञानलक्षण मोहांधकाराच्या पलीकडे आहे, अशा माझें–ईश्वराचे मरणसमयीं–**अनुस्मरेत्**–ध्यान करितो तो त्यालाच प्राप्त होतो ९.

१ दीनतेनें. २ दोन पावलांत. ३ विहिरींत. ४ पडण्याच्या अगोदर. ५ दुसरे. ६ लागे. ७ कोणत्याहि तऱ्हेनें. ८ कल्पना. ९ लागतांच. १० जिवंत असते समयीं. ११ हृदयांत. १२ वेळीं. १३ वृद्धिंगत. १४ चिंतावें. १५ खरेपणानें. १६ प्रतिज्ञापूर्वक, वचन. १७ कशानें. १८ लंगडा. १९ वळण, छंद, मार्ग. २० अंगिकारील. २१ घो घो करीत.

जयाचें आकारावीण असणें । जया जन्म ना निमणें । जें आघवेंचि आघवेंपणें । देखत असे ॥ ८६ ॥ जें गगनाहूनि जुनें । परमाणुहूनि सानें । जयाचेनि सन्निधानें । विश्व चळे ॥ ८७ ॥ जें सर्वांते यया विये । विश्व सर्व जेणें जिये । हेतु जया बिहे । अचिंत्य जें ॥ ८८ ॥ देखे वोळंबा इंगळु न चरे । तेजीं तिमिर न शिरे । जे दिहाचे अंधारें । चर्मचक्षूसीं ॥ ८९ सुसडा सूर्यकणांच्या राशी । जो नित्य उदो ज्ञानियांसी । अस्तमानाचे जयासी । आडनांव नाहीं ॥ ९० ॥

प्रयाणकाले मनसाऽचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

तया अव्यंगवाणेया ब्रह्मातें । प्रयाणकाले प्राप्ते । जो स्थिरावलेनि चित्तें । जाणोनि स्मरे ॥ ९१ ॥ बाहेरी पद्मासन रचुनी । उत्तराभिमुख बैसोनि । जीवीं सुख सूनि । क्रमयोगाचे ॥ ९२ ॥ आंतु मीनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें । आपेआप संभ्रमें । मिळावया ॥ ९३ ॥ आकळ्लेनि योगें । मध्यमा मध्य मार्गे । अग्निस्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ॥ ९४ ॥ तेथ अचेत चित्ताचा सांगातु । आहाचवाणा दिसे मांडतु । जेथ प्राणु गगनाआंतु । संचरे कां ॥ ९५ ॥ परी मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला । योगबळें आवरला । सज्ज होऊनि ॥ ९६ ॥ तो जडाजडातें विरावितु । भ्रूलतामाजीं संचरतु । जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसीच होय ॥ ९७ ॥ कां झांकलिया घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां । या रीतीं जो पांडवा । देह ठेवी ॥ ९८ ॥ तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम । तें माझें निजधाम । होऊनि ठाके ॥ ९९ ॥

यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

सकळां जाणणेयां जे लाणी । तिये जाणिवेची जे खाणी । तयां ज्ञानियांचिये आयणी । जयातें अक्षरु म्हणिपे ॥ १०० ॥ चंडवातेंही न मोडे । तें गगनचि कीं फुडें । वांचूनि जरी होईल मेहुडें । तरी उरेल कैंचें ? ॥ १ ॥ तेविं जाणणेया जें आकळिलें । तें जाणिवलेपणेंचि उमाणलें । मग नेणवेचि तया म्हणितलें । अक्षर सहजें ॥ २ ॥ म्हणौनि वेदविद् नर । म्हणती जयातें अक्षर । जें प्रकृतीसी पर । परमात्मरूप ॥ ३ ॥ आणि विषयांचें विष उलंडूनि । जे सर्वेन्द्रियां

तो परमानंद कसा आहे म्हणशील तर ज्याला [ मूर्तामूर्त असा ] कोणताच आकार नाही; पण अस्तित्व आहे ज्यास जन्म नाही व तत्सापेक्ष मरणहि नाही, कारण सर्वव्यापक सर्वरूप असल्यामुळें सर्वपणानें [ चिन्मय ] पाहतें ८६. जें आकाशाहून पुरातन [ अनादि ] आहे; जे परमाणूपेक्षांहि लहान, निरवयव, सूक्ष्मातिसूक्ष्म आहे; ज्याच्या सान्निध्यानें विश्वाची हालचाल होते. [ कारण विश्वप्रपंच स्वरूपत: जड असल्यामुळें त्याला कार्यप्रवण होण्यासाठीं चेतनाधिष्ठानाच्या सत्ता–स्फूर्तीची नितान्त गरज आहे ] ८७. जे या सर्वांस प्रसवते [ कारण मायाविशिष्ट ईश्वरच या सर्व विश्वाच्या उत्पत्तीचें अभिन्न निमित्तोपादन कारण आहे ] ज्याच्या योगानें विश्व जगते [ कारण, विश्व स्वत: सत्तास्फूर्तिरहित असल्यामुळें तें अधिष्ठान चैतन्याच्या सत्तेनें सत्तावान् आहे व चैतन्याच्याच प्रकाशानें प्रकाशित होते. त्यांतहि सत्ता–स्फूर्तींचा विश्वाचें ठिकाणीं संसर्गाध्यास होतो अर्थात्–आध्यासिक संबंध संभवतो. हे लक्षांत असावें ] व तर्क ज्यास भितो—[ निर्विशेष चैतन्याचें ठिकाणीं व्याप्ति लिंगादिकांचा अभाव असल्याकारणें तो अनुमानरूप तर्कास 'अविषय' आहे ] कारण, ते अचिंत्य म्ह० मनासहि अविषय आहे ८८. पहा ! वाळवी विस्तवास जशीं लागत नाहीं, प्रकाशांत जसा अंधार शिरत नाहीं. तसा स्वरूप प्रकाशांत अज्ञानांधकाराचा लाग नाहीं जो स्वभावतः ज्ञानप्रकाशाचा दिवस असूनहि तेथें चर्मचक्षूंस अंधारच असतो [ चर्मचक्षूंस तो अविषय, अग्राह्य आहे, अज्ञान्यांच्या देहात्मदृष्टीस ज्ञानप्रकाशाचा दिवस असूनहि अंधारच असतो ] ८९. [ जो ज्ञान दिवस अज्ञान्यास अंधाराप्रमाणें असतो; पण तोच अद्वैत दिवस ज्ञान्यास कसा असतो ते सांगतात:-- ] जे निर्मळ अशा सूर्यरूपी कणांची 'राशी' असून, ब्रह्मज्ञान्यास नित्य उदित–नित्य अपरोक्षरूप–आहे व ज्या अद्वय चैतन्यरूप दिवसाला अस्तमानाचें आडनांव सुद्धां नाहीं ९०.

**अन्वयार्थ**—**प्रयाणकाले**—मरणसमयीं– **भक्त्या**—भक्तिनें **च**–व–**योगबलेन एव**–चित्ताचें समाधान, याच बलानें–**युक्त:**-युक्त होऊन **भ्रुवो: मध्ये**-भुवयांच्या मध्यें **प्राणं**-प्राणाला-**सम्यक्**-सावधानपणें-**आवेश्य**–स्थापून [**य:** जो ]–**अचलेन मनसा**–अचलमनानें–[ **अनुस्मरेत्**–अनुचिंतन करतो ]–**स:**–तो–**तं परं दिव्यं पुरुषं**–त्या श्रेष्ठ दिव्य पुरुषाला–**उपैति**–प्राप्त होतो १०.

**असा** त्या अव्यंग म्ह० कोणतेच व्यंग नसलेल्या **ब्रह्माला** जाणून; मरणकाल समीप आला असतां जो एकाग्र, स्थिर चित्तानें त्याचें स्मरण करितों; ९१. बाहेर शरीराच्या ठिकाणीं पद्मासन घालून, उत्तरेस तोंड करून बसून आणि योगाभ्यासाच्या क्रमांत प्राप्त झालेलें सुख अंत:-करणांत सांठवून ९२. अंतर्यामीं एकाग्र चित्तानें व स्वरूपप्राप्तीच्या प्रेमानें आपल्या ठिकाणीं आपण उत्साहपूर्वक त्वरित मिळण्याकरितां ९३. संपादिलेल्या योगाच्या द्वारें, सुषुम्ना नाडीच्या मध्यमार्गानें, अग्निस्थानापासून ब्रह्मरंध्रास जाण्याकरितां तो निघतो; ९४. तेथ प्राण व चित्त यांची संगति आहे असें उगीच वरवर बाह्यात्कारी दिसतें; आणि प्राणवायु मूर्ध्नी आकाशांत प्रवेश करतो ९५. परंतु मनाच्या स्थिरतेनें धरलेला व अंत:करणांत भक्तिभावानें भरलेला व जो योगाचे बळानें आवरलेला असा तयार होऊन ९६. तो प्राणवायु चेतनाचेतनास नाहींसे करून भ्रुकुटीमध्यें संचार करतो ज्याप्रमाणें घंटेचा नाद घंटेतच लय पावतो त्याप्रमाणें तेथे लय पावतो ९७. किंवा मडक्याखालील झांकलेला दिवा केव्हां काय झाला [ विझला ] हें ज्याप्रमाणें समजत नाहीं; त्याप्रमाणें अर्जुना ! जो आपला देह ठेवतो ९८. तो पुरुष जो केवळ परब्रह्म ज्याला परमपुरुष असें नांव आहे असे जे माझे निजस्वरूप आहे ते होऊन राहतो ९९.

**अन्वयार्थ**—**वेदविद:**–वेदार्थ जाणणारे–**यत्**–ज्याला **अक्षरम्**—अविनाशि—**वदन्ति**—म्हणतात—**वीतरागा:** **यतय:**–ज्यांचा राग–आसक्ति नाहींशी झाली आहे, असें विरक्त यति–**यत् विशन्ति:**–ज्यांत प्रवेश करितात–**यत् इच्छन्त:**–ज्याला जाणण्याची इच्छा करणारे–**ब्रह्मचर्यं**–ब्रह्मचर्यव्रत [ गुरुपाशीं राहून ]–**चरन्ति**–पाळतात–**तत् पदं**–तें अक्षर–संज्ञक पद–**ते**–तुला–**संग्रहेण**–संक्षेपानें–**प्रवक्ष्ये**–मी सांगेन ११.

जें ज्ञान म्हणजे सर्व ज्ञानांचा शेवट आहे व त्या सगळ्या ज्ञानाची केवळ खाणच, आहेत अशा बुद्धिमान् ज्ञानी पुरुषांनींहि ज्याला [ ब्रह्मस्वरूपास ] 'अक्षर' [ अविनाशी ] असें म्हटलें आहे १००. प्रचंड वाऱ्यानेंही जे नाहींसे होत नाहीं तें एक खरोखर गगनच आहे; नाहींतर त्या प्रचंड वाऱ्यापुढें जर ढग आले असते तर ते कसे टिकते ? १. त्याप्रमाणें, ज्ञान्याला जें विषय झाले [ समजण्यात, मोजण्यांत आले ] तें क्षर [ नाशवंत ] होय; मग, जे वृत्तिज्ञानास जाणण्यास अशक्य, म्ह० अविषय त्याला सहजच अक्षर [ अविनाशि अशी संज्ञा आली ] २. म्हणून वेदपारंगत, वेदज्ञ पुरुष ज्याला अक्षर [ ब्रह्म ] असें म्हणतात व जें मायेच्या पलीकडील असून सच्चिदानंदरूप आहे ३. आणि ज्यांनीं विषयांचें विष लवंडून

प्रायश्चित्त देऊनि । आंहाति देहाचिया बैसोनि । झाडातळीं ॥ ४ ॥ ते यापरी विरक्त । जयाची निरंतर वाट पाहात । निष्कामासि अभिप्रेत । सर्वदा जें ॥ ५॥ जयाचिया आवडी । न गणिती ब्रह्मचर्याचीं सांकडीं । निष्ठुर होऊनि बापुडीं । इंद्रियें करिती ॥ ६ ॥ ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध । जयाचिये थडिये वेद । चुबुकळिले ठेले ॥ ७ ॥ तें ते पुरुष होती । जे यापरी लया जाती । तरी पार्था हेचि स्थिति । एक वेळ सांगों ॥ ८ ॥ तेथ अर्जुनें म्हणितलें स्वामी । हेंचि म्हणावया होतों पां मी । तंव सहजें कृपा केली तुम्ही । तरी बोलिजो कां ॥ ९ ॥ परि बोलावें तें अति सोहोपें । तेथें म्हणितलें त्रिभुवनदीपें । तुज काय नेणों संक्षेपें । सांगेन ऐक ॥ ११० ॥ तरी मना या बाहेरिलीकडे । यावयाची सावियां सवे मोडे । हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ॥ ११ ॥

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च । मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥

परी हे तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडें । कळासती ॥१२॥ तरी सहजें मन कोंडलें । हृदयींचि असेल उगलें । जैसें करचरणीं मोडलें । परिवरु न संडीं ॥ १३ ॥ तैसें चित्त राहिलिया पांडवा । प्राणांचा प्रणवुचि करावा । मग अनुवृत्तिपंथें आणावा । मूर्ध्निवरी ॥ १४ ॥ तेथ आकाशीं मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळें । जंव मात्रात्रय मावळे । अर्धबिंबीं ॥ १५ ॥ तंववरी तो समीरु । निरोळीं कीजे स्थिरु । मग लग्नीं जेविं ॐकारु । बिंबींच विलसे ॥ १६ ॥

ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् । यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

तैसें ॐ हें स्मरों सरे । आणि तेथेंचि प्राणु पुरे । मग प्रणवांतीं उरे । पूर्णघन जें ॥ १७ ॥ म्हणौनि प्रणवैकनाम । हें एकाक्षर ब्रह्म । जो माझें स्वरूप परम । स्मरतसांता ॥ १८ ॥ यापरी त्यजी देहातें । तो त्रिशुद्धी पावे मातें । जया पावणयां परौतें । आणिक पावेणें नाहीं ॥१९॥ तेथ अर्जुना जरी विपायें । तुझ्या जीवीं हन ऐसें जाये । नों हें स्मरण मग होये । कायसयावरी अंतीं ॥ १२० ॥ इंद्रियां अनुघडे पडलिया । जीविताचें सुख बुडालिया । आंतुबाहेरी उघडलिया । मृत्युचिन्हें ॥ २१ ॥ ते वेळीं बैसावेंचि कवणें । मग कवण निरोधी करणें । तेथ काह्यांचेनि अंतःकरणें । प्रणव स्मरावा ॥२२॥ तरि गा ऐशिया हो ध्वनी ।

[ इच्छा टाकून ] व सर्व इंद्रियांना प्रायश्चितानें शुद्ध करून देहरूपी झाडाच्या तळीं [ उदासीन वृत्तीनें ] बसलेलें आहेत ४. याप्रमाणें जें विरक्त पुरुष आहेत तेहि ज्याची नेहमीं वाट पहात असतात व जें नेहमीं निरिच्छ लोकांना अतीव प्रिय आहे ५. ज्याच्या आवडीकरितां योगीजन ब्रह्मचर्यादि संकटें जुमानीत नाहींत व निष्ठुरपणानें निग्रहानें इंद्रियास दीन करितात ६. असें जें दुर्लभ [ ब्रह्म ] पद–ज्याचा अंत नाहीं व ज्याच्या अलीकडील तीरावरच वेद गटांगळ्या खात राहिले म्ह. जें वेदालाहि विषयत्वानें जाणतां आले नाहीं ७. त्याला जाणून मी सांगितल्याप्रमाणें जे देह ठेवितात, ते त्या पदाला प्राप्त होतात. म्हणून पार्था ! त्याच स्थितिबद्दल आणखी एकवार तुला सांगतों. ८. त्या वेळेस अर्जुन म्हणतो, "हे श्रीगुरो, मी आपल्यास आतां हेंच विचारणार होतों, तो इतक्यांत आपण मजवर सहजच कृपा केली, तर महाराज आतां सांगण्यास सुरुवात करावी; ९. परंतु जे सांगाल तें अगदीं सोप्या रीतीनें मात्र सांगा" त्यावेळीं त्रिभुवनदीप जे श्रीकृष्ण ते म्हणाले तुझा अधिकार आम्ही ओळखीत नाहीं का; तुला समजेल असेंच संक्षेपानें सांगतों ऐक. ११०. तर अगोदर या मनाची बाह्य विषयाकडे हिंडण्याची जी स्वाभाविक संवय आहे ती सहज मोडून, तें मन आत्मचिंतन करणाऱ्या हृदयडोहांत निमग्न होऊन राहील, असें कर ११."

**अन्वयार्थ—सर्वद्वाराणि**–ज्ञानाच्या सर्व द्वारांचा–**संयम्य**–संयमन करून–**च**–आणि–**मनः**–मनाला–**हृदि**–हृदयकमलांत–**निरुध्य**–अडकवून, त्याला हृदयांत अडवून धरून–**आत्मनः प्राणम्**–आपल्या प्राणवायूलाहि सुषुम्नानाडीच्या द्वारा–**मूर्ध्नि**–मस्तकांत–**आधाय**–स्थापून–**योगधारणां**–योगधारणा धरण्यास – **आस्थितः**–प्रवृत्त झालेला [जो पुरुष] तशीच धारणा धरीत असतांना १२.

परंतु सर्व इंद्रियांच्या द्वारांतील निग्रहरूपी कवाडें बंद केलीस तरच ही गोष्ट घडेल हो १२. असें झालें म्हणजे मग मन सहजच कोंडलें जाऊन, हृदयांतच स्वस्थ राहील ज्याप्रमाणें हातपाय मोडलेला मनुष्य आपलें घर सोडीत नाहीं १३. त्याप्रमाणें अर्जुना ! चित्त स्थिर झाले असतां मग प्राणवायूचा प्रणवच करावा, प्राणायामपूर्वक ॐकाराचें ध्यान करावें, म्ह. प्राण प्रणवरूप होतो मग प्राणवायु क्रमाक्रमानें सुषुम्नानाडीने मुर्ध्नि आकाशापर्यंत आणावा १४. तेथे [ मूर्ध्नी ] आकाशांत प्राणवायु मिळतो न मिळतो अशा स्थितींत–तोपर्यंतच धारणाशक्तीच्या बलानें धरावा कीं जोपर्यंत 'अ'कार, 'उ'कार व 'म'कार या तीन मात्रा अर्धमात्रेंत [ ओंकार बिंदूंत ] लय पावल्या नाहींत १५. तोपर्यंत तो वायु मस्तकाकाशांत स्थिर करावा. नंतर अर्धबिंबांत मात्रात्रयांचें ऐक्य झाले असतां जसा ओंकार शोभतो तसा तो प्राण मूर्ध्न्याकाशांत लय पावून शोभतो १६.

**अन्वयार्थ—ओं इति एकाक्षरं ब्रह्म**–'ओं' असें हें एक अक्षररूप ब्रह्म–परब्रह्माचें नांव–**व्याहरन्**–उच्चारणारा व–**मां**–त्या नांवाचा अर्थ, अशा मला–**अनुस्मरन्**–अनुचिंतणारा–माझे ध्यान करणारा–**यः देहं त्यजन्**–जो देहाचा त्याग करून–**प्रयाति**–मरून जातो–**सः**–तो–**परमां गतिं**–परम गतीला–**याति**–पोचतो १३.

त्याबरोबर ॐकाराचें स्मरण बंद पडतें आणि तेव्हांच प्राणवायूचा शेवट होतो; मग ॐकाराचे स्मरणान्तीं जें पूर्ण ब्रह्मानंदस्वरूप तेंच एक उर्वरित राहतें १७. म्हणून जे एकाक्षर ब्रह्म आहे, प्रणव हे एक ज्याचें नाम आहे व ते माझें मुख्य परमस्वरूप असून त्याचें स्मरण करीत असतां, १८. जो अशा स्थितींतच देहत्याग करितो, तो निश्चयानें मजप्रत पावतो. कारण, त्याला माझ्या प्राप्तीशिवाय दुसरी कोणतीच गोष्ट साध्य करण्याची नाहीं १९. अर्जुना ! कदाचित् तुझ्या मनांत जर अशी शंका येईल कीं, काय हो, मरणसमयीं हे स्मरण करावे हे खरें; पण अंतकालीं हे स्मरण कशानें होणार ? १२०. कारण, जीविताचें सुख नाहींसें होऊन व इंद्रियें शिथिल होऊन संकटांत पडल्यावर आंत व बाहेर मृत्युचिन्हें उघड दिसूं लागल्यावर, २१. त्या वेळेस उठून बसावें कोणी ? इंद्रियांचें संयमन करावें कोणी ? आणि कोणत्या अंतःकरणानें ॐकाराचें स्मरण करावे ? २२. तर बाबारे ! असल्या संशयास तूं आपल्या अंतःकरणांत कदाचित् थारा देशील हो ! पण तसे करूं नकोस. कारण माझी

१ आहेत २ इष्ट. ३ संकटें. ४ दीन. ५ तीरीं. ६ लीन होऊन. ७ दुर्लभ पद. ८ सोपें. ९ श्रीकृष्णानें. १० सहज. ११ संवय. १२ इंद्रियनिग्रहाची. १३ बंद होतात. १४ स्थिर, गप्प. १५ घर. १६ क्रमाक्रमानें. १७ ब्रह्मरंध्रापर्यंत. १८ अकार, उकार व मकार. १९ अर्धमात्रेंत.

२० वायु. २१ आकाशीं. २२ ऐक्यावस्थेंत. २३ संपतो. २४ ओंकाराहून पर. २५ ब्रह्मानंदस्वरूप. २६ स्मरत असतां. २७ निश्चयानें. २८ प्राप्तीपलीकडे. २९ गति. ३० कदाचित्. ३१ काय हो. ३२ अवघड, संकट. ३३ जिवंतपणाचें. ३४ इंद्रियें. ३५ कोणाच्या. ३६ संशयाला.

म्हणें थारा देशी हो मनीं । पैं नित्य सेविला मी निदानीं । सेवकु होय ॥ २३ ॥

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः । तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥

मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् । नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥

जे विषयांसि तिळांजळी देउनी । प्रवृत्तीवरी निगडु वाऊनि । मातें हृदयीं सूनि । भोगिताती ॥ २४ ॥ परि भोगितया आंराणुका । भेटणें नाहीं क्षुधादिकां । तेथ चक्षुरादि रंकां । कवण पाडु ॥ २५ ॥ ऐसें निरंतर एकवटले । जे अंतःकरणीं मजशीं लिगटले । मीचि होऊनि आंटले । उपासिती ॥ २६ ॥ तयां देहावसान जैं पावे । तैं तिहीं मातें स्मरावें । मग म्यां जरी पावावें । तरि उपास्ति ते कायसी? ॥ २७ ॥ पैं रंकु एक आडलेपणें । काकुळती धांव गा धांव म्हणे । तरि तयाचिये ग्लानि धांवणें । काय न घडे मज? ॥ २८ ॥ आणि भक्तांही तेचि दशा । तरी भक्तीचा सोसु कायसा । म्हणौनि हा ध्वनि ऐसा । न वाखाणावा ॥ २९ ॥ तिहीं जे वेळीं मी स्मरावा । ते वेळीं स्मरिला कीं पावावा । तो आभारुही जीवां । साहवेचि ना ॥ १३० ॥ तें ॠणवैपण देखोनि आंगीं । मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं । भक्तांचिया तनुत्यागीं । परिचर्या करीं ॥ ३१ ॥ देहवैकल्याचा वारा । झणें लागेल या सुकुमारा । म्हणौनि आत्मबोधाचिया पांजिरां । सूयें तयातें ॥ ३२ ॥ वरी आपुलिया स्मरणाची उवाइली । हींव ऐसी करीं साउली । ऐसेनि नित्य बुद्धि संचली । मी आणीं तयातें ॥ ३३ ॥ म्हणौनि देहांतींचें सांकडें । माझियां कहींचि न पडे । मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥ ३४ ॥ वरचील देहाची गंवसणी फेडुनी । आहाच अहंकाराचे रज झाडुनी । शुद्ध वासना निवडुनी । आपणपां मेळवीं ॥ ३५ ॥ आणि भक्तां तरी देहीं । विशेष ऐकवंकीचा ठावो नाहीं । म्हणौनि अव्हेरू करितां कांहीं । वियोगु ऐसा न वाटे ॥ ३६ ॥ नातरी देहांतींचि मियां यावें । मग आपणपें यातें न्यावें । हेंही नाहीं स्वभावें । जे आधींचि मज मीनले ॥ ३७ ॥ येरी शरीराचिया सलिलीं । असतेपण हे सांउली । वांचूनि चंद्रिका ते ठेली । चंद्रींच आहे ॥ ३८ ॥ ऐसे जे नित्ययुक्त । तयांसि सुलभ मी सतत । म्हणौनि देहांतीं निश्चित । मीचि होती ॥ ३९ ॥ मग क्लेशतरूची वाडी । जे तापत्रयाग्नीची सगडी । जे मृत्युकाकासीं कुरोंडी । सांडिली आहे ॥ १४० ॥ जें दैन्याचें दुभतें । जें महाभयातें वाढवितें । जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥ ४१ ॥

जो नित्य सेवा करितो, त्याच्या मरणासमयीं मी त्याचा दासच बनून राहतों २३.

**अन्वयार्थ**— [ **हे** ] **पार्थ**-हे अर्जुना !-**यः**-जो-**अनन्यचेताः**-ईश्वरावांचून दुसऱ्या कोणत्याहि विषयांत चित्त न ठेवणारा साधक-**नित्यशः**-रोजरोज-प्रतिदिवशीं-**सततं**-निरंतर-**मां**-मला -**स्मरति** -स्मरतो-माझे चिंतन करतो-**तस्य नित्ययुक्तस्य योगिनः**-त्या सदा शांतचित्त योग्याला- **अहं सुलभः**-मी सुलभ आहें-**परमां संसिद्धिं गताः**-मोक्ष या नांवाच्या श्रेष्ठ सिद्धिला प्राप्त झालेले - **महात्मानः**- महात्मे- **मां**- मला-**उपेत्य** -प्राप्त होऊन-**अशाश्वतम्** - अनित्य व- **दुःखालयं**-दुःखाचे आगर अशा- **पुनर्जन्म**-पुनर्जन्मांस-**न आप्नुवन्ति** - प्राप्त होत नाहींत १४--१५.

जे विषयाला तिळांजळी देऊन, विषयांविषयीं होणाऱ्या इच्छा, प्रवृत्तींना खोडा-बेडी घाळून [ आंवरून ] व मला हृदयांत सांठवून त्या माझ्या स्वरूपाचा अनुभव घेतात २४. त्यांना त्या [ स्वरूपभूत रम्य ] समाधानांत क्षुधा, तृषा वगैरेची आठवणहि राहात नाहीं. मग गरीब बिचाऱ्या नेत्रादिकांची तेथें काय किंमत आहे ? २५. अशा रीतीनें निरंतर माझ्या ऐक्यरूपास पावलेले, आपल्या अंतःकरणांत माझ्याशीं तल्लीन झालेले, व मद्रूप होऊन जे माझीच सेवा भक्ति करणारे आहेत, २६. त्यांचा देह पडण्याचा काळ समीप यावा, त्यावेळीं त्यांनीं माझें स्मरण कर आणि नंतर जर मी त्यांस पावावें; तर मग त्यांनीं पूर्वीं जी माझी उपासना केली तिचा काय उपयोग ? २७. हें पहा ! संकटाच्या वेळीं अडल्यामुळें एखाद्या गरीब दीन मनुष्यानेहि मोठ्या काकुळतीनें "देवा धांव रे धांव" असा माझा धांवा केला तर त्याचें दुःख निवारण करण्याकरितां मला धांवत जावें लागत नाहीं काय ? २८. आणि माझे जे भक्त आहेत, त्यांचीहि जर तीच अवस्था होत असेल तर मग त्यांनीं माझ्या भक्तीचा एवढा हव्यास कां करावा ? म्हणून अशा संशयात्मक अभिप्रायाचें नांव देखील काढूं नकोस २९. ते ज्यावेळीं स्मरण करतात त्यावेळीं त्यानीं माझें स्मरण केल्यावर मग मी प्राप्त व्हावे, एवढेहि [ ते माझी भक्ति करतात ह्या त्यांच्या उपकाराचे ] ओझें माझ्या मनाला सहन करवत नाहीं ? १३०. अशा प्रकारें आपण ऋणाईत झालो आहों हें पाहून, त्यांतून आपणच उतराई होण्याकरितां मीं आपल्या भक्तांच्या देहाच्या अंतकालीं त्यांची सेवा चाकरी करतों ३१. देहांतीं प्राप्त होणाऱ्या विकलतेचा, ग्लानीचा संबंध माझ्या त्या आवडत्या सुकुमार भक्ताला कदाचित् लागेल पण लागूं नये म्हणून मी त्याला आत्मबोधरूपी पिंजऱ्यांतच ठेवतों; ३२. शिवाय त्या पिंजऱ्यावर मी माझ्या स्मरणाची आल्हादकारक, व थंडगार अशीं सावली करितों आणि अशा प्रकारें, ज्यांची बुद्धि नेहमीं माझ्या ठिकाणींच स्थिर असते, त्यांना मी आपल्या स्वरूपीं आणितों ३३. म्हणून, देहाच्या अंतःकालचें दुःख, संकट माझ्या भक्तास कधींहि पडत नाहीं; व माझा जो भक्त आहे त्याला मी सुखानें आपल्याकडे आणतों ३४. आत्म्यावरील देहरूपीं गवसणीं काढून टाकून व वरवर असणारी मिथ्या अहंकाररूपी धूळ झाडून, केवळ भगवत्प्राप्तीची शुद्ध वासना वेगळी काढून घेऊन मी माझ्या भक्ताचें आपल्याशीं ऐक्य करतो ३५. आणि भक्तालाहि देहांत असतांनाच विशेषतः देहतादात्म्यतेचा पत्ता नसतो म्हणून देहत्याग करतांना त्या शरीराची व आपली ताटातूट होते याबद्दल त्यास खेद असा मुळींच वाटत नाही ३६. कारण, देहाच्या अन्तसमयीं मी [ भगवंतांनीं ] पावावे आणि आपले स्वरूपाप्रत न्यावे असेहि [ त्याच्या मनांत येत ] नाहीं. कारण, त्यांच्या देहपाताच्या पूर्वींच ते सहज मद्रूप झालेले असतात. व त्यांचा तसा निश्चयहि असतो ३७. याशिवाय, त्यांच्या त्या शरीररूप पाण्यांत आत्मा आहे असें वरवर दिसतें खरें; परंतु तो प्रतिबिंबाप्रमाणें मिथ्या आहे. ज्याप्रमाणें चंद्राचे चांदणें जरी पाण्यांत पडलेले दिसलें, तरी खरोखर पाहूं गेलें असता चंद्राचेंच ठिकाणीं तें असतें ३८. अशा बोधानें माझ्याशीं जे मरणाचे पूर्वींच मत्स्वरूपप्राप्तीनें युक्त झालेले आहेत, त्यांना मी नेहमीं जवळच सहज नित्य प्राप्त आहे, म्हणून ते मरणानंतर निश्चयानें मद्रूपच होतात ३९. शरीराची काय दशा आहे पहा ! जें [ शरीर ] क्लेशरूपी झाडांचें बन, व अध्यात्मादि तापत्रयरूपी अग्नीची शेगडी, जें मृत्युरूप कावळ्यास उतरुन टाकलेला बळी आहे ? १४० जें दरिद्रतेस प्रसवणारें आहे जे मृत्यूचे भयास वाढविणारे आहे, जे सर्व दुःखाचें पुरेसे भांडवलच आहे ४१. जें

१ शेवटीं. २ पाणी सोडून. ३ बेडी, खोडा. ४ घालून. ५ सांठवून ठेवून. ६ असमाधान. ७ दाद. ८ युक्त झालें. ९ व्यापलें. १० उपासना, भक्ति. ११ दुःखी. १२ हांव. १३ उतराई होण्यासाठीं. १४ सेवा. १५ विकलतेचा. १६ संबंध. १७ पिंजऱ्यांत. १८ व लतो. १९ शांत, सुखकर. २० गार. सौम्य. २१ स्थिर. २२ माझ्या भक्तांना २३ मिथ्या. २४ धुरळा. २५ भगवत्प्राप्तीची वासना. २६ देहाशीं तादात्म्याचा. २७ तिरस्कार. २८ उदकांत.

जें दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ । जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ॥४२॥ जें संसाराचें बैसणें । जें विकारांचें उद्यानें । जें सकळ रोगांचें भाणें । वाढिलें आहे ॥४३॥ जें काळाचा खिंचु उशिटा । जें आशेचा आंगवठा । जन्ममरणाचा वोलिंवटा । स्वभावें जें ॥ ४४ ॥ जें भुलीचें भरिव । विकल्पाचें वोतिंव । किंबहुना पेंव विंचुवांचें ॥४५॥ जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पेण्यांगनेचें मैत्र । जें विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ॥ ४६ ॥ जें लावेचा कळंवळा । निवालिया विषोदकाचा गळाळा । जें विश्वासु आंगवळा । संवचोराचा ॥ ४७ ॥ जें कोढियाचें खेंव । जें काळसर्पाचें मार्दव । गोरियेचें स्वभाव । गायन जें ॥ ४८ ॥ जें वैरियाचा पाहुणेरु । जें दुर्जनाचा आदरु । हें असो जें सागरु । अनर्थांचा ॥ ४९ ॥ जें स्वप्नीं देखिलें स्वप्न । जें मृगजळें सासिन्नलें वन । जें धूम्ररजांचें गगन । ओतलें आहे ॥ १५० ॥ ऐसें जें हें शरीर । तें ते न पवतीचि पुढती नर । जे होऊनि ठेले अपार । स्वरूप माझें ॥५१॥

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन । मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

एऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे । परि निवटलियाचे जैसें । पोट न दुखे ॥ ५२ ॥ नातरी चेइलियानंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापुरें । तेवीं मातें पावले ते संसारें । लिंपतीचि ना ॥५३॥ एऱ्हवीं जगदाकाराचें सिरें । जें चिरस्थायीयांचे धुरे । ब्रह्मभुवन गा चवरें । लोकाचळाचें ॥ ५४ ॥ जिये गांवींचा पहारु दिवोवरी । एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी । विळोनि पांतीं उठी एकसरी । चवदाजणांची ॥ ५५ ॥

सहस्रयुगपर्यन्तमहर्यद् ब्रह्मणो विदुः । रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

जैं चौकडिया सहस्र जाये । तैं ठाये ठावो विळुचि होये । आणि तैसेचि सहस्रवरिये पाहे । रात्री जेथ ॥ ५६ ॥ येवढें अहोरात्र जेथिंचें । तेणे न लोटती जे भाग्याचे । देखती ते स्वर्गींचे । चिरंजीव ॥ ५७ ॥ येरां सुरगणांची नवाई । विशेष सांगावी येथ काई । मुद्दल इंद्राचीचि दशा पाहीं । जे दिहाचे चौदा ॥ ५८ ॥ परि ब्रह्मयाचियाहि आठां पाहारांतें । आपुलिया डोळां देखते । जे आहाति गा तयांतें । अहोरात्रविद म्हाणिपे ॥ ५९ ॥

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे । रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥
भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते । रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

तये ब्रह्मभुवनीं दिवसें पाहे । ते वेळीं गणना केहीं न समाये । ऐसें अव्यक्ताचें

वाईट बुद्धीचें उत्पत्तिस्थान व जें [ पूर्वजन्मींच्या ] वाईट कर्माचें फळ, जें भ्रांतीचें केवळ मूर्तिमंत स्वरूपच; ४२. जें संसाराची बसण्याची बैसका आहे; जें अहंकारादि विकाररूपी झाडाचा बगीचा आहे, जें सर्वव्याधींचें वाढलेलें ताटच होय; ४३. जें काळाचा [ चघळून टाकलेला ] उष्टा खिचडा आहे, जें आशेचा मूर्त आंगलोट आहे. जें स्वभावतः जन्ममरणाची वाहती वाटच आहे ४४. जें भ्रांतीचें भरलेलें, जें संशयाचें ओतलेलें किंबहुना! जें जणुं त्रिचत्राचें पेंवच आहे ४५. जें व्याघाचें वसतीस्थानच आहे, जें वेश्यांचे मित्रत्व म्हणजे मनाला वेश्यांप्रमाणें वरपंग मोह घालणारें, जें विषयाचे ज्ञान करून देणारें असें उत्तम यंत्रच होय; ४६. जें जखिणींचा दिखाऊ कळवळा आहे व जें निवळलेल्या विषाचा घोट आहे, जें वरून स्नेहभावाचे सोंग घेऊन वागणाऱ्या चोराचा मिळविलेला विश्वासच होय ४७. जें कोडानें ग्रस्त झालेल्या मनुष्याचें आलिंगन आहे, जें महाविषारी सर्पाच्या अंगाप्रमाणेंच मऊपणा असून, जें पारध्याच्या साहजिक गायनाप्रमाणेंच मधुर आहे ४८. जें वैऱ्याच्या पाहुणचाराची मेजवानी आहे, जें दुर्जनांनी केलेलें आगतस्वागत आहे हे असो, जें अनर्थांचा समुद्रच आहे ४९. जें स्वप्नांत पाहिलेलें स्वप्न आहे, जें मृगजळाचे पाण्याने भरास आलेलें वन आहे व जें धुराच्या रजांनी बनविलेलें आकाश आहे १५०. असें जें हें शरीर, ते भक्त पुरुषांना पुनः प्राप्तच होत नाही. कारण, माझें जे अपरिच्छिन्न स्वरूप, तत्स्वरूपच तें भक्त होऊन राहिले आहेत ५१.

**अन्वयार्थ**—[हे] **अर्जुन**-हे अर्जुना !-**आब्रह्मभुवनात् लोकाः**-ब्रह्मलोकापर्यंत-ब्रह्मलोकासह सर्वलोक-**पुनरावर्तिनः**-पुनः आवर्तन पावणारे-पुनरावृत्ति-पुनर्जन्म घेणारे-पुनः उत्पन्न होणारे आहेत-**तु**-परंतु-**कौन्तेय**-हे कुंतिपुत्रा !-**मां**-मला-**उपेत्य**-प्राप्त होऊन **पुनर्जन्म**-पुनः जन्म-**न विद्यते**-नाहीं १६.

सहज विचार करून पाहिले तर ब्रह्मपणाचा थोरपणा लाभला तरीहि [ ब्रह्मदेवालासुद्धां ] वारंवार येणारे पुनर्जन्माचे फेरे चुकतच नाहींत. परंतु, मेलेल्या मनुष्याचें जसें पोट दुखत नाहीं; ५२. किंवा जागृत झाल्यावर जसें स्वप्नांतल्या महापुरांत कोणी बुडत नाहीं, त्याप्रमाणें जे मद्रूप म्ह. परमात्मरूप झाले ते पुनः संसारानें लिप्त होत नाहींत ५३. सहज विचार करून पाहिले तर चौदा भुवनांचा जो शिरोभाग जें [ सप्त ] चिरंजीवामध्यें अग्रभागीं असणारें व त्रैलोक्यरूप पर्वताचें शिखर जें ब्रह्मभुवन, ५४. ज्या ब्रह्मलोकच्या एक दिवसांतील एक प्रहारपर्यंतसुद्धा एका इंद्राचे आयुष्य टिकत नाहीं. कारण, त्या ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्राची पंगत उठते [ चौदा इंद्र होऊन जातात. ] ५५.

**अन्वयार्थ**—**ते अहोरात्रविदः जनाः**-दिवस व रात्र यांना जाणणारे ते प्रसिद्ध जन-**यत् ब्रह्मणः अहः**-जो ब्रह्मदेवाचा दिवस-**तत् सहस्त्रयुगपर्यन्तं** - तो एका सहस्त्रयुगांनी संपणारा-**च**- व -**रात्रिं**-रात्र-**युगसहस्त्रान्तां**-सहस्त्रयुगांनी संपणारी आहे असे-**विदुः**-जाणतात १७.

ब्रह्मदेवाच्या एका दिवसाचे प्रमाण असे, जेव्हां चार युगें हजार वेळां जातील, तेव्हां ब्रह्मदेवाचा खरोखर पुरा एक दिवसच होतो आणि पहा तशीच हजार चौकड्यांची एक रात्र होते ५६. एवढा मोठा दिवस व रात्र जेथें आहे, तेथें जें भाग्यवान् पुरुष आहेत, तें त्या कालांत मरत नाहींत व त्या दिवसरात्रीस जें पहातात, ते स्वर्गलोकांतील चिरंजीव होत ५७. एव्हवीं जेथें मूळ देवाचा राजा असणाऱ्या इंद्राचीच दशा अशी आहे कीं, ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र होतात, तेथें इतर देवांची काय कथा ! विशेष नवलाव काय सांगावा ५८. परंतु ब्रह्मदेवाच्याहि आठ प्रहरांना जें आपल्या डोळ्यांनी पाहातात त्यांना अहोरात्रवित् म्ह. ब्रह्मदेवाच्या एका दिवसाला व एका रात्रीला जाणणारें असें म्हणतात ५९.

**अन्वयार्थ**-**अहरागमे**-ब्रह्मदेवाचा दिवस उगवला असतां-**अव्यक्तात्**-ब्रह्मदेवाच्या स्वापावस्थेपासून-**सर्वाः व्यक्तयः**-स्थावर जंगमरूप सर्व प्रजा-**प्रभवन्ति**-अभिव्यक्त होतात-**रात्र्यागमे**-ब्रह्मदेवाची रात्र झाली असता **तत्र एव अव्यक्त संज्ञके**-त्याचा अव्यक्त नांवाच्या स्वापावस्थेत-**प्रलीयन्ते** - प्रलीन होतात-**हे पार्थ** - हे अर्जुना !-**सः एव अयं भूतग्रामः**-तोच हा भूतसमुदाय-प्राण्यांचा समूह-**भूत्वा भूत्वा**-पुनः पुनः उत्पन्न होऊन **रात्र्यागमे**-ब्रह्मदेवाची रात्र झाली असतां-**अवशः**-परतंत्र होऊन-**प्रलीयते**-प्रलीन होतो व ब्रह्मदेवाचा-**अहरागमे** दिवस उगवला असतां-प्रजापति जागा झाला असतां, कर्माधीन होऊनच तो प्राणिसमूह-**प्रभवति**-उत्पन्न होतो १८-१९.

ज्या वेळेस, त्या ब्रह्मलोकीं दिवस उगवतो त्यावेळेस

१ जेवणाचे ताट. २ उष्टी खिचडी. ३ शरीरबांधा. ४ वहाती वाट. ५ शेत. ६ बाजारबसव्या वेश्यांचे. ७ विषय जाणण्याचें यंत्र. ८ उत्तम. ९ जखिणींचा. १० दयेचे ठिकाण. ११ घोट. १२ भरंवशाचा. १३ सहवास.

होये । व्यक्त विश्व ॥ १६० ॥ पुढती दिहांची चौपाहारी फिटे । आणि हा आँकारसमुद्र आटे । पाठीं तैसाचि मग पाहांटे । भरों लागे ॥ ६१ ॥ शारदीयेचिये प्रवेशीं । अभ्रें जिरती आकाशीं । मग ग्रीष्मांतीं जैशीं । निगती पुढती ॥ ६२ ॥ तैशी ब्रह्मदिनाचिये आदी । हे भूतसृष्टीची मांदी । मिळे जंव सहस्रावधी । निमित्त पुरे ॥ ६३ ॥ पाठीं रात्रींचा अवसरु होये । आणि विश्व अव्यक्तीं लया जाये । तोही युगसहस्र मोटका पाहे । आणि तैसेंचि रचे ॥ ६४ ॥ हें सांगावया काय उपपत्ती । जे जगाचा प्रळयो आणि संभूती । इये ब्रह्मभुवनींचिया होती । अहोरात्रामाजीं ॥ ६५ ॥ कैसें थोरिवेचें मान पाहें पां । जो सृष्टिबीजाचा साटोपा । परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहाला ॥ ६६ ॥ एऱ्हवीं त्रैलोक्य हें धनुर्धरा । तिये गांवींचा गा पसारा । तो हा दिनोदयीं एकसरां । मांडतु असे ॥ ६७ ॥ पाठीं रात्रींचा समो पावे । आणि अपैसाचि सांठवे । म्हणिये जेथिंचे तेथ स्वभावें । साम्यासी ये ॥ ६८ ॥ जैसें वृक्षपण बीजासि आलें । कीं मेघ हें गगन जाहालें । तैसें अनेकत्व जेथ सामावलें । तें साम्य म्हणिपे ॥ ६९ ॥

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः । यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

तेथ समविषम न दिसे कांहीं । म्हणौनि भूतें हे भाष नाहीं । जेवीं दूधचि जाहालिया दहीं । नामरूप जाय ॥ १७० ॥ तेवीं आकारलोपासरिसें । जगाचें जगपण भ्रंशे । परि जेथें जाहालें तें जैसें । तैसेंचि असे ॥ ७१ ॥ तें तया नांव सहज अव्यक्त । आणि आकारावेळीं तेंचि व्यक्त । हें एकास्तव एक सूचित । एऱ्हवीं दोनी नाहीं ॥ ७२ ॥ जैसें आटलिया रुपें । आटलेपण ते खोटी म्हणिपे । पुढती तो घनाकारु हारपे । जे वेळीं अलंकार होती ॥ ७३ ॥ हीं दोहीं जैशीं होणीं । एकीं साक्षिभूत सुवर्णीं । तैसी व्यक्ताव्यक्तांची कडसणी । वस्तूच्यां ठायीं ॥ ७४ ॥ तें तरी व्यक्त ना अव्यक्त । नित्य ना नाशवंत । या दोहीं भावांअतीत । अनादिसिद्ध ॥ ७५ ॥ जें हें विश्वचि होऊनि असे । परि विश्वपण नासिलेनि न नासे । अक्षरें पुसिल्या न पुसे । अर्थु जैसा ॥ ७६ ॥ पाहें पां तरंग तरी होत जात । परि तेथ उदक तें अखंड असत । तेवीं भूतांभावीं न नाशत । अविनाश जें ॥ ७७ ॥ नातरी आटतिये अळंकारीं । नाटतें कनकें असे जयापरी । तेवीं मरतिये जीवाकारीं । अमर जें आहे ॥ ७८ ॥

अव्यक्त मायेंत लीन असलेलें विश्व आकारास येते. ते अशा रीतीनें उत्पन्न होतें कीं, त्याची मोजदाद कोठेहि करवत नाहीं १६०. पुढें त्या दिवसाचे चार प्रहर संपल्यावर हा विश्वरूप आकार समुद्र नाहींसा होतो आणि पुनः पहाट झाली म्हणजे पहिल्याप्रमाणें हा आकार-समुद्र भरूं लागतो ६१. शरदऋतूच्या आरंभीं अभ्रे आकाशांत नाहींतशीं होतात; आणि नंतर तींच ग्रीष्म-ऋतूचे शेवटीं जशी पुनः उत्पन्न होतात; ६२. त्याप्रमाणें ब्रह्म-देवाच्या दिवसाच्या आरंभीं हे भूतसृष्टीचे समुदाय चार युगें हजार वेळाचें, काळाचे निमित्त कारण असेतोपर्यंत उत्पन्न होत असतात ६३. मागाहून ब्रह्मदेवाच्या रात्रीची वेळ आली असतां हे विश्व पुनः अव्यक्त [ मायेंत ] लय पावते तीहि पूर्वोक्त हजार चौकड्यांचा रात्र काल गेल्यावर उदयकालीं पुनः जगत् पूर्ववत् उत्पन्न होऊं लागते ६४. अशा रीतीनें विश्वाची रचना होते. हें सांगण्याचा काय उद्देश म्हणशील, तर या ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत आणि रात्रींत जगाची उत्पत्ती आणि प्रलय होतो ६५. त्याच्या थोरपणाची योग्यता कशी आहे म्हणून पाहूं गेलें तर, तो ब्रह्मदेव सृष्टीच्या बीजाचें भांडार आहे; तरीपण तोहि जन्ममरणांच्या मापाचा शीग–कळस झाला आहे ६६. धनुर्धरा! सहज विचार करून पाहिले तर ही त्रैलोक्यसृष्टी म्हणजे त्या सत्यलोकाचा पसारा असून, ब्रह्मदेवाचा दिवस उगवल्याबरोबर हा एकसारखा मांडला जातो ६७. मागाहून रात्रीचा समय प्राप्त झाला असतां तो आपोआपच अव्यक्तांत लय पावतो; व हें पंच-भूतादिक ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें सहज जेथल्या [ जेथून उत्पन्न झाला ] तेथें [कारणांत] लय पावून साम्यास येतात ६८. ज्याप्रमाणें 'वृक्षपण' हें बीजरूपांत सामावतें किंवा मेघ हे आकाशांत लीन होतात त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं, प्रकृतीच्या ठिकाणीं सर्व वस्तूंच्या अनेकत्वाचा समावेश होतो, त्यासच 'साम्य' असें म्हणतात ६९.

**अन्वयार्थ**—**तु**—परंतु—**तस्मात् अव्यक्तात्**—त्या अव्यक्ताहून—**परः**—निराळा—**अन्यः**—अगदीं विलक्षण **अव्यक्तः**—इंद्रियाचा विषय न होणारा व—**सनातनः**—नित्य असा—**यः भावः**—जो भाव आहे—**सः**—तो—**सर्वेषु भूतेषु नश्यत्सु**—सर्व भूतें नाश पावत असतांहि—**न विनश्यति**—स्वतः नाश पावत नाहीं २०.

त्या साम्यांत न्यूनाधिक असें कांहीं दिसत नाहीं म्हणून त्यास 'भूतें' हें नांव देता येत नाहीं. त्यावेळीं जरायुजादि भाषा नाहीं. ज्याप्रमाणें दुधाचें दहीं झाल्या-वर त्याचें 'दुध' हें नांव व पातळपणाचें 'रूप' हीं नाहींशीं होतात, १७०. त्याप्रमाणें आकाराचा नाश झाल्याबरोबर जगाचें जगपण नाहींसें होतें; परंतु ज्यापासून हें झालें आहे, तें माया विशिष्ट ब्रह्मचेतन तसेंच्या तसेंच असतें ७१. तेव्हांच त्याला व्यक्त सापेक्षतेनें सहजच 'अव्यक्त' असें म्हणतात, आणि प्रत्यक्षगोचर साकार होतें; त्या वेळीं त्यालाच व्यक्त म्हणतात; व्यक्त व अव्यक्त हीं दोन्ही नांवें एकाच्यामुळें एक दाखविणारी अशी 'सापेक्ष' स्वरूपाची आहेत, परंतु खरें पाहूं गेलें असतां–शुद्ध निरपेक्ष अव्यक्त चैतन्य दृष्ट्या दोन्ही भाव नाहींत ७२. ज्याप्रमाणें अलंकार आटल्यावर त्या आटलेल्या आकाराला लगड म्हणतात पुढें त्याचे अलंकार बनविल्यावर तो घनाकार व लगड हे नांव नाहीसे होते ७३. लगड व अलंकार ही दोन्ही रूपान्तरे जशी एका साक्षीभूत, आधारभूत सोन्यावर होतात त्याप्रमाणें 'व्यक्त' [ प्रत्यक्ष गोचर विश्वाकार ] व 'अव्यक्त' [ उत्पत्ति स्थिति–लयास कारण प्रकृति विशिष्ट चेतन ] हे दोन्ही विचार निरपेक्ष अव्यक्त ब्रह्माच्याच आश्रयावर होतात ७४. तें ब्रह्म तर 'व्यक्त' नाहीं आणि तत् सापेक्ष अव्यक्तहि नाहीं; नित्य नाहीं आणि अनित्यही नाहीं ते ब्रह्म ह्या परस्पर सापेक्ष दोन्ही स्थितींच्या पलीकडलें असून अनादिसिद्ध असें आहे ७५. तें ब्रह्म विश्वाकार होऊन राहतें; [ अधिष्ठान रूपानें विश्वांत व्याप्त आहे ] परंतु विश्वपण लयाला गेलें तरी तें स्वरूपतः लय पावत नाहीं. ज्याप्रमाणें पाटीवरील अक्षरें पुसून टाकलीं तरी त्यांचा अर्थ म्ह० त्यापासून होणारा शाब्दबोध पुसला जात नाहीं ७६. पहा कीं; उदकावर तरंग उत्पन्न होतात व जातात, परंतु तेथें आधारभूत असें उदक हें सदाचेंच असतें. त्याप्रमाणें भूतें नाहींशीं झालीं असतां त्यास अधिष्ठानभूत असणारे अविनाशी परब्रह्म नाश पावत नाहीं ७७. किंवा आटल्या जाणाऱ्या अलंकारांत जसें न आटणारें सोनें असतें त्याचप्रमाणें मृत्यु पावणाऱ्या जीव शरीरांत जें ब्रह्म अमर आहे ७८.

१ स्पष्ट, साकार. २ दिवसांची. ३ चार प्रहर. ४ दृश्यमान जग. ५ शरत्कालाचें. ६ समुदाय. ७ समय. ८ निराकारी. ९ ल्हान. १० उद्देश. ११ उत्पत्ती. १२ योग्यता. १३ कोठार, सांठवण. १४ रचला जातो. १५ समय. १६ न्यूनाधिक १७ बोली. १८ आकृती नाशाबरोबर. १९ नाहीसें होतें. २० लगड. २१ गोळा, लगड. २२ रूपांत [ सु–चांगला वर्ण ज्याचा ] २३ साकारनिराकाराची. २४ विचार. २५ ब्रह्माच्या ठिकाणी. २६ स्थितीच्या पलीकडचें.

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् । यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥
पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया । यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

जयातें अव्यक्त म्हणों ये कोडें । म्हणतां स्तुति हे ऐसें नावेंडे । जें मनाबुद्धी न सांपडे । म्हणौनियां ॥ ७९ ॥ आणि आकारा आलिया जयाचें । निराकारपण न वचे । आकार लोपें न विसंचे । नित्यता गा ॥ १८० ॥ म्हणौनि अक्षर जें म्हणिजे । तेवींचि म्हणतां बोधुहि उपजे । जयापरौता पैसु न देखिजे । या नाम परमगती ॥ ८१ ॥ परि आघवा इहीं देहपुरीं । आहे निजेलियाचे परी । जे व्यापारु करवी ना करी । म्हणौनियां ॥ ८२ ॥ ऐऱ्हवीं जे शारीरचेष्टा । त्यांमाजीं एकही न ठके गा सुभटा । दाहीं इंद्रियांचिया वाटा । वाहताचि आहाती ॥ ८३ ॥ उकलूनि विषयांचा पेटीं । होत मनाचा चोहटीं । तो सुखदुःखाचा राजवांटा । भीतराहि पावे ॥ ८४ ॥ परि रावो पहुडलिया सुखें । जैसा देशींचा व्यापारु न ठके । प्रजा आपुलालेनि अभिलाखें । करितचि असती ॥ ८५ ॥ तैसें बुद्धीचें हन जाणणें । कां मनाचे घेणें देणें । इंद्रियांचें करणें । स्फुरणें वायूंचें ॥ ८६ ॥ हे देहक्रिया आघवी । न करवितां होय बरवी । जैसा न चेलवितेनि रवी । लोकु चाले ॥ ८७ ॥ अर्जुना तयापरी । सुतला ऐसा आहे शरीरीं । म्हणौनि पुरुषु गा अवधारीं । म्हणिपे जयातें ॥ ८८ ॥ आणि प्रकृति पतिव्रते । पडिला एकपत्नीव्रतें । येणेंहि कारणें जयातें । पुरुषु म्हणों ये ॥ ८९ ॥ पैं वेदाचें बहुवसपण । देखेचिना जयाचें आंगण । हें गगनाचें पांघरूण । होय देखा ॥ १९० ॥ ऐसें जाणूनि योगीश्वर । जयातें म्हणती परात्पर । जें अनन्यगतीचें घर । गिंवसीत ये ॥ ९१ ॥ जे तनू वाचा चित्तें ॥ नाइकती दुजिये गोष्टीतें । तयां एकनिष्ठेचें पिकतें । सुक्षेत्र जें ॥ ९२ ॥ हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु । ऐसा साच जयाचा मनोधर्मु । तया आस्तिकाचा आश्रमु । पांडवा गा ॥ ९३ ॥ जें निगर्वाचें गौरव । जें निर्गुणाची जाणिव । जें सुखाची राणिव । निराशांसी ॥ ९४ ॥ जें संतोषियां वाढिलें ताट । जें अचिंतां अनाथांचें मायपोट । भक्तीसी उजू वाट । जया गांवा ॥ ९५ ॥ हें एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया । पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होईजे ॥ ९६ ॥ हिंवांचिया झुळुका । जैसें हिंवचि पडे उष्णोदका । कां समोर जालिया अर्का । तमचि प्रकाशु होय ॥ ९७ ॥ तैसा संसारु जया गांवा । गेला सांता पांडवा ।

**अन्वयार्थ**–[ **यः** ] **अव्यक्तः अक्षरः इति**: **उक्तः**–जो हा अव्यक्त व अक्षर म्हणून म्हटलेला भाव–**तं**–त्यालाच **परमां गतिं**-परमा गति–**आहुः**–म्हणतात–**यं**–ज्या भावाला–**प्राप्य**–प्राप्त होऊन–**न निवर्तन्ते**–पुनः संसार-मार्गांत परत येत नाहींत–**तत् मम परमं धाम**–तें माझें परम स्थान–परम–पद आहे–[ **हे** ] **पार्थ**–हे अर्जुना !–**यस्य अन्तःस्थानि भूतानि**–ज्याच्या आंत हीं सर्व भूतें आहेत व–**येन इदं सर्वं ततं**–ज्यानें हें सर्व व्यापलें आहे-**सः परः पुरुषः**–तो परम पुरुष–**अनन्यया भक्त्या तु**–अनन्य भक्तीनेंच-**लभ्यः**–प्राप्त होण्याजोगा आहे २१-२२.

ज्याला कौतुकानें अव्यक्त म्हटलें तर त्याची स्तुति केली असें वाटत नाहीं, कारण, जें मन व बुद्धि यांना विषय होत नाहीं; म्हणून ७९. अरे ! जें आकाराला आलें असतांहि, ज्याचें निराकारपण जात नाहीं, व आकाराचा नाश झाला असतां ज्याची नित्यता बिघडत नाहीं, १८०. म्हणून ज्याला 'अक्षर' म्हणजे नाश न पावणारें असें म्हणतात, त्या अर्थाचा 'अक्षर' म्हणण्यानेंच बोधहि उत्पन्न होतो. त्याच्या पलीकडे कशाचाहि विस्तार दिसत नाहीं म्हणून याचेंच नांव 'परमगति' होय ८१. परंतु ते या संपूर्ण शरीररूपीं नगरांत व्यापून राहिलेलें असून, निजल्याप्रमाणें [ उदासीन ] आहे. कारण कीं तें कोणताहि व्यापार करवीत नाहीं. व करीतहि नाहीं. [ ज्यास अनुक्रमें प्रयोजक कर्तृत्व नाहीं व साक्षात् कर्तृत्वहि नाहीं] म्हणून ८२. अर्जुना ! एऱ्हवीं शरीराचे जेवढे म्हणून व्यापार आहेत त्या व्यापारांत एकहि व्यापार थांबत नाहीं, तर दहाहि इंद्रियांचे व्यापार सुरूच आहेत ८३. विषयरूपी बाजार उघडून, मनाच्या चव्हाट्यावर व्यापार सुरू झाल्यावर, त्यापासून होणाऱ्या सुखदुःखरूपी प्राप्तीतील राजहक्काचा मुख्य हिस्सा अंतर्यामीं अंतःकरण विशिष्ट जीवालाहि प्राप्त होतो ८४. परंतु राजा सुखानें निजला असतां ज्याप्रमाणें त्याच्या राज्यांतील व्यापार थांबून राहात नाहींत, तर त्याची प्रजा आपापल्या इच्छेनें व्यापार करीतच असते, ८५. त्याप्रमाणें बुद्धीची जाणण्याची क्रिया किंवा मनाची संकल्प विकल्पात्मक घेण्यादेण्याची क्रिया, इंद्रियाचें व्यवहार करणे, व प्राणवायूचें चलन वलन पावणे ८६. हें सर्व देहव्यापार त्यानें न करवितां आपोआपच व्यवस्थित होत असतात ज्याप्रमाणें स्वतः सूर्यानें प्रेरणा न करतां त्याच्या प्रकाशानेंच लोकत्रयांत चांगले व्यापार चालतात ८७. त्याप्रमाणें अर्जुना ! तो शरीरांत निजल्यासारखा स्वस्थ आहे, म्हणून त्याला 'पुरुष' म्हणतात, असें समज; ८८. आणि मायारूप पतिव्रतेच्या एकपत्नीव्रतांत पडला, याही एका कारणास्तव 'ज्यास' 'पुरुष' हें नांव प्राप्त झालें आहे ८९. परंतु सर्वज्ञ तुल्य वेदानें पुष्कळ तऱ्हेनें विचार केला तरी ज्याचें आंगणाहि दृष्टीस पडत नाहीं [ शब्दास अविषय आहे ] व जे चैतन्य आकाशाचेहि पांघरूण आहे [ निरपेक्ष व्यापक आहे ] १९०. असें त्या पुरुषाचे स्वरूप असल्याचे जाणूनच श्रेष्ठ योगीजन त्याला जीव व प्रकृति यांच्या पलीकडचा म्हणतात तो एकनिष्ठ भक्तांचा शोध करीत त्यांचे घरीं येतो ९१. जो एकनिष्ठ भक्त कायावाचामनेंकरून परमात्म्याविना दुसरी गोष्टच ऐकत नाहीं, त्याच्या एकनिष्ठेचें पीक देणारें जणुं उत्तम शेत होय ९२. हे पांडवा ! हें त्रैलोक्य अधिष्ठान भगवद्रूप आहे असा खरोखर ज्यांचा मनोभाव दृढबोध आहे, त्या आस्तिक भक्तांचा हा सदा राहण्याचा जणुं आश्रमच होय ९३. जे निरभिमान्यांचें वैभव आहे, जें गुणातीतांचें ज्ञान आहे व जें निःस्पृहाचें सुखोपभोग घेण्याचें स्थान [ राज्य ] आहे ९४. जें संतोषी पुरुषास वाढलेलें ताटच आहे, जें संसाराची चिंता न करणाऱ्या शरणागताचें मायपोट आहे व जें भक्तीनें चालणाराला मोक्षरूपी गांवाची सरळ वाट; ९५. धनंजया अशा ज्ञात्या पुरुषाचे किती म्हणून वर्णन करूं ? परंतु ज्या ठिकाणीं गेलें असतां मनुष्य तें ठिकाणच होतो तद्रूपतेला पावतो; अशी त्याची स्थिति आहे ९६. उदाहरण, थंडीच्या झुळुकांनीं जसें ऊन पाणीच थंड होतें, किंवा सूर्य उगवल्यावर अंधारच प्रकाशरूप होतो; ९७. त्याप्रमाणें पांडवा, अज्ञान व त्याचें कार्य जग आदि सर्व संसार ज्या परमात्मरूपी गांवाला त्या

१ कौतुकानें. २ न वाटे. ३ जात नाहीं. ४ बिघडे. ५ नाश न पावणारे. ६ विस्तार, ठिकाण. ७ ब्रह्मप्राप्ति ८ देहव्यापार. ९ चालतच. १० उघडून. ११ बाजार, पेटारा. १२ चव्हाटा. १३ राजहिस्सा. १४ निजला असतां १५ इच्छेनें. १६ चलन. १७ प्राणवायूचें. १८ देहव्यापार. १९ चालवितां. २० निजला. २१ माया. २२ व्यापकबुद्धि. २३ व्यापक. २४ जीव प्रकृति यांचें पलीकडला. २५ एकनिष्ठतेचे. २६ शोधीत. २७ उतम शेत. २८ भगवद्रूप. २९ महत्व. ३० ज्ञान. ३१ राज्य. ३२ निस्पृहाला. ३३ चिंतारहित. ३४ शरणांगताचें. ३५ ठिकाणच. ३६ थंडीच्या. ३७ सूर्य. ३८ अंधार. ३९ अज्ञान व त्याचें कार्य जग. ४० गेला असतां.

होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाची ॥ १८ ॥ तरी अग्नीमाजीं आलें । जैसें इंधनेंचि अग्नि जहालें । पाठीं नै निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ॥ १९ ॥ नातरी साखरेचा माँघौता । बुद्धीमंतपणेंही करितां । परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ॥ २०० ॥ लोहाचें कनक जाहलें । हें एकें परिसेंचि केलें । आतां आणिक कैचें तें गेलें । लोहत्व आणी ॥ १ ॥ म्हणौनि तूप होऊनि माघौतें । जेवीं दूधपणा न येचि निरुतें । तेवीं पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ २ ॥ तें माझें परम । सांचोकारें निजधाम । हें आंतुर्वट तुज वर्म । दाविजत असे ॥ ३ ॥

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः । प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

तेवींचि आणिकेंही एके प्रकारें । हें जाणतां आहे सोपारें । तरि देह सांडितेनि अवसरें । जेथ मिळती योगी ॥ ४ ॥ अथवा अवचटें ऐसें घडे । जे अवसरें देह सांडे । तरि माघौतें येणें घडे । देहासीचि ॥ ५ ॥ म्हणौनि काळशुद्धी जरी देह ठेविती । तरी ठेवितखेंवीं ब्रह्मचि होती । एऱ्हवीं अकाळीं तरी येती । संसारा पुढती ॥ ६ ॥ तैसें सायुज्यें आणि पुनरावृत्ती । या दोन्ही अवसराआधीन आहाती । तोचि अवसरु तुजप्रती । प्रसंगें सांगों ॥ ७ ॥ तरि ऐकें गा सुभटा । पातलिया मरणाचा माजिवेंटा । पांचै आपुलालिया वाटा । निघती अंतीं ॥ ८ ॥ ऐसा वरिपडिला प्रयाणकाळीं । बुद्धीतें भ्रमु नें गिळी । स्मृति नव्हे आंधळी । न मरे मन ॥९॥ हा चेतनां वर्गु आघवा । मरणीं दिसे टवटवा । परि अनुभविलिया ब्रह्मभावा । गंवसणी होऊनि ॥ २१० ॥ ऐसा सावध हा समवावो । आणि निर्वाणवेऱ्हीं निर्वाहो । हें तरीच घडे जरी सौवावो । अग्नीचा आथी ॥११॥ पाहां पां वारेनें कां उदकें । जे दिवियाचें दिवेपण झांके । तैं असतांच काय देखे । दिठी आपुली ? ॥१२॥ तैसें देहांतींचेनि विषमवातें । देह आंत बाहेरी श्लेष्मांआंते । तैं विझोनि जाय उंजितें । अग्नीचें तें ॥ १३ ॥ ते वेळीं प्राणासि प्राणु नाहीं । तेथ बुद्धि असोनि करील काई । म्हणौनि अग्नीविण देहीं । चेतना न थारे ॥ १४ ॥ अगा देहींचा अग्नि जरी गेला । तरी देह नव्हे चिखलु वोला । वायां आयुष्यवेळु आपला । आंधारें गिंवसी ॥१५॥ आणि मागील स्मरण आघवें । तें तेणें अवसरें सांभाळावें । मग देह त्यजूनि मिळावें । स्वरूपीं कीं ॥१६॥ तंव तया श्लेष्माचे चिखलीं । चेतनाचि बुडोनि गेली । तेथ मागिली पुढिली हे ठेली । आठवण सहजें ॥ १७ ॥ म्हणौनि

गेलें असतां तो संसार सर्वतोपरी मोक्षच [ सुखरूपच ] होऊन राहतो ९८. जसें लांकूड विस्तवांत घातलें असतां विस्तवच होऊन राहते, व तें अग्निरूप झाल्यानंतर लांकूडपणानें निराळे काढूं म्हटले तर ते जसे कांहीं केल्या निराळे निघतच नाहीं ९९. किंवा ज्याप्रमाणें ऊंस¹ची साखर झाल्यावर मोठ्या चतुर पुरुषासहि त्या साखरेचा मूळचा ऊंस करतां येणें शक्य नाहीं २००. लोखंडाचे एक वेळ परिसानें सोने केल्यावर असा कोणता दुसरा पदार्थ आहे कीं, जो त्याचे गेलेलें लोखंडपण पुनः परत आणील ? १. म्हणून दूधाचे तूप झाल्यावर ज्याप्रमाणें पुनः त्या तुपास दूधपणा खात्रीनें येतच नाहीं त्याप्रमाणें ज्याब्रह्मप्रत गेलें असतां पुनः ज्ञानी भक्ताला जन्म नाहीं २. असें जें स्वरूप तेंच माझे खरोखर उत्तम ठिकाण म्ह. मुख्यस्वरूप होय. हे गुह्य अंतरंगांतील वर्म तुला स्पष्ट करून सांगितलें जात आहे ३. ✓

**अन्वयार्थ**—**तु भरतर्षभ**—पण हे अर्जुना !—**योगिनः**—योगी व कर्मी—**यत्र काले**—ज्या वेळीं—**प्रयाताः**—मरून गेलें असतां—**अनावृत्ति**—मोक्षाला—**च एव**—आणि—**आवृत्ति**—पुनर्जन्माला—**यान्ति**—प्राप्त होतात—**तं कालं**—तो काल मी तुला—**वक्ष्यामि**—सांगेन २३.

त्याचप्रमाणें आणखी एका प्रकारानें हे [ वर्मपूर्ण निजधाम ] जाणणें सोपें आहे, तरी योगीजन योग्यकालीं देहत्याग करून ज्या स्वरूपास मिळतात [ ते वर्म म्हणजे अर्चिरादि मार्गांत सांगितलेल्या कालादि देवतांचीं साह्यता घेऊन देह ठेवणें हे होय ] ४. अथवा आकस्मात् असें घडतें कीं जर योग्याचा अकालीं देह पडला तर त्यांना पुनः देहच धारण करावा लागतो ५. म्हणून योग्यानें शास्त्रोक्त शुद्धकालीं जर देह ठेवला तर देह ठेवतांचक्षणीं ते योगी ब्रह्म होतात. एऱ्हवीं अकालीं देह ठेवला गेला तर तें पुनः जन्मास येतात ६. त्याचप्रमाणें मोक्ष व पुनर्जन्म हीं दोन्ही कालाच्या स्वाधीन आहेत. असा जो काल तोच प्रसंगानुसार तुला सांगतों ७. तर हे अर्जुना ! ऐक. मरणकालाची गुंगी प्राप्त झाली असतां शेवटीं पंचमहाभूतें आपापल्या रस्त्यानें निघतात ८. असा मरणकाल प्राप्त झाला असतांना बुद्धीला भ्रांति गिळत नाहीं, स्मरणशक्ति आंधळी होत नाहीं व मनहि मरत नाहीं ९. असा हा सर्व ज्ञानसाधनांचा समुदाय मरणसमयीं टवटवीत असतो; पण तो अनुभविलेल्या ब्रह्मभावालाच गवसणी होऊन ब्रह्मानुभूति अभिव्यक्त झाल्यामुळें प्रसन्न असतो २१०. अशा रीतीनें हा मन-बुद्ध्यादिकांचा समुदाय सावध असणें, व तो सावधानपणा शेवटपर्यंत टिकून राहणें, हे जर अग्निची साह्यता [ जठराग्नि-प्रदीप्त ] असली तरच घडेल ११. असें पहा कीं वाऱ्यानें किंवा पाण्यानें ज्या वेळेस दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो, त्या वेळेस आपले डोळे व दृष्टि चांगली असतांहि जवळ असलेली वस्तु पाहूं शकते काय ? १२. त्याचप्रमाणें देहावसानाच्या वेळेचा वायु प्रकोप वा त्रिदोषामुळें शरीर आंतबाहेर कफानें व्यापलें गेलें म्हणजे जठराग्नीचें तेज विझून जातें १३. त्या वेळेस प्राणासच क्रियाशक्ति नसतें. मग तेथें बुद्धि असून तरी काय करणार? म्हणून अग्नि शिवाय देहांत चेतना [ज्ञानशक्तिहि] टिकून राहात नाहीं १४. हें पहा अरे ! शरीरांतील जठराग्नि जर नाहींसा झाला तर तो देह नसून, ओला चिखलच होय. असें झालें असतां साधक आपल्या आयुष्याचो वेळ अंधेरांत चांचपडल्यासारखी वाया घालवीत असतो १५. वास्तविक अशा स्थितींत मागील केलेल्या अभ्यासाचें सर्व स्मरण तसेंच सांभाळून ठेवून मग देह टाकून स्वस्वरूपाच्या ठिकाणीं मिळावयाचें असतें. पण हें घडावें कसें १६. कारण, त्या वेळेस तर त्या देहांतील कफाच्या चिखलांत चेतनाच बुडून गेलेली असतें. त्यामुळें तेथें मागील व पुढील गोष्टींचे स्मरण रहात नाहीं १७. म्हणून मरणापूर्वींच जो योगाभ्यास केला, तो मरण येण्याच्या आधींच

१ जळण. २ निवडतां येत नाहीं. ३ पुनः ४ कोणता, दुसरा. ५ निश्चयेंकरून. ६ पुनः संसार, जन्म. ७ खरोखर. ८ अंतरंगांतील. ९ सोपें. १० अकस्मात्. ११ अकालीं. १२ शास्त्रोक्त, शुद्धकालीं. १३ ठेवल्याबरोबर. १४ ब्रह्माशीं ऐक्य. १५ ममय. १६ माजूम. कैफ. १७ पंचमहाभूतें. १८ प्राप्त झालेल्या. १९ ग्राशी. २० प्राणसमुदाय. २१ टवटवीत. २२ ब्रह्मभावास संरक्षण. २३ ऐक्यभाव. २४ मरेपर्यंत. २५ मदत. २६ साहाय्य. २७ जठराग्नीचा. २८ विद्यामान. २९ वायु प्रकोपानें. ३० कफव्याप्त. ३१ तेज. ३२ जीवकळा. ३३ गतायुष्यांतील.

आधीं अभ्यासु जो केला । तो मरण न येतांचि निमोनि गेला । जैसें ठेवणें न दिसतां मालवला । दीपु हातींचा ॥ १८ ॥ आतां असो हें सकळ । जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ । तया अग्नीचें प्रयाणीं बळ । संपूर्ण आथी ॥ १९ ॥

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

आंत अग्नीज्योतीचा प्रकाशु । बाहेरी शुक्लपक्षु आणि दिवसु । आणि साभासांमाजीं मासु । उत्तरायण ॥ २२० ॥ ऐशिया समयोगाची निरुती । लाहोनि जे देह ठेविती । ते ब्रह्मचि होती । ब्रह्मविदें ॥ २१ ॥ अवधारीं गा धनुर्धरा । येथवरी सामर्थ्य यया अवसरा । तेवींचि हा उजू मार्ग स्वपुरा । यावयां पैं ॥ २२ ॥ एथ अग्नी हें पहिलें पायतरें । ज्योतिर्मयं हें दुसरें । दिवस जाणें तिसरें । चौथें शुक्लपक्ष ॥ २३ ॥ आणि सामास उत्तरायण । ते वरंचील गा सोपान । येणें सायुज्यसिद्धिसदन । पावती योगी ॥ २४ ॥ हा उत्तम काळु जाणिजे । यातें अर्चिरा मार्गु म्हणिजे । आतां अकाळु तोही सहजें । सांगेन आईक ॥ २५ ॥

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

तरी प्रयाणाचिया अवसरें । वातश्लेष्मां सुंभरें । तेणें अंतःकरणीं आंधारें । कोंदलें ठाके ॥ २६ ॥ सर्वेंद्रियां लांकुडें पडे । स्मृति भ्रमामाजीं बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण ॥ २७ ॥ अग्नीचें अग्निपण जाये । मग तो धूमचि अवघा होये । तेणें चेतना गिंवसिली[२१] ठाये । शरीरींची ॥ २८ ॥ जैसें चंद्राआड आभाळ । सैंदट[२२] दाटे सजळ[२३] । मग गडद[२४] ना उजाळ[२५] । ऐसें झोंवळें होय ॥ २९ ॥ कां मरे ना सावध । ऐसें जीवितासि पडे स्तब्ध । आयुष्य मरणाची मर्याद । वेळु ठाकी ॥ २३० ॥ ऐसी मनबुद्धिकरणीं[२७] । सभोंवतीं धूमाकुळाची[२८] कोंडणी । तेथ जन्में जोडलिये वाहणी । युगचि बुडे ॥ ३१ ॥ हां गा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें आहे । म्हणौनि प्रयाणीं तंव होये । येतुली दशा ॥ ३२ ॥ ऐशी देहाआंतु स्थिती । बाहेरि कृष्णपक्षु वरि राती । आणि सामासही वोडंवती । दक्षिणायन ॥ ३३ ॥ इये पुनरावृत्तीचीं घराणीं । आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धीची काहाणी । केसेंनि आइके ? ॥ ३४ ॥ ऐसा जयाचा देह पडे । तया योगी म्हणौनि चंद्रवरी जाणें घडे । मग तेथूनि मागुता बहुडे । संसारा ये ॥ ३५ ॥ आम्हीं अकाळु जो पांडवा । म्हणितला तो हा

नाहींसा होतो जसा आपण अंधारांत ठेवलेली वस्तु सांपडण्यापूर्वींच हातांत घेतलेला दिवा मालवून जावा, त्याचप्रमाणें स्थिति होतें १८. आतां या सर्व गोष्टी राहूं दे, ज्ञानाला जठराग्नि हा मूळ कारण आहे आणि त्या जठराग्नीच्या बळाची मरणसमयीं ज्याला पूर्ण साह्यता असावी १९.

**अन्वयार्थ—अग्निः**—'अग्नि' या नांवाची कालाभिमानिनी देवता—**ज्योतिः**—'ज्योति' या नांवाची कालाभिमानिनी देवता—**अहः**—दिवसाची अभिमानिनी देवता—**शुक्लः**—शुक्लपक्षाभिमानी देवता—**षट् मासाः उत्तरायणम्**—उत्तरायणाच्या सहा महिन्यांची देवता, या देवता ज्यांत आहेत—**तत्र**—त्या मार्गांत—**प्रयाताः**-शरीर सोडलेले-मेलेले — **ब्रह्मविदः जनाः** ब्रह्मोपासक—ब्रह्माचें ध्यान करणारे जन क्रमानें—**ब्रह्म**—ब्रह्माला—**गच्छन्ति**—प्राप्त होतात २४.

शरीराच्या आंत जठराग्नीच्या ज्योतीचा प्रकाश असावा आणि बाहेर उत्तरायणांपैकीं कोणताहि एक महिना आणि त्यांतहि शुद्ध पक्षाचा दिवस असावा [ रात्र नव्हे ] २२०. अशा प्रकारें सर्व चांगले योग जुळून आले असतां जे ब्रह्माभ्यासी पुरुष आपला देह ठेवितात, ते ब्रह्मवेत्ते परब्रह्मच होतात २१. धनुर्धरा ! ऐक. या कालाच्या योगाचें [ तत्कालाभिमानी देवतांचें ] असें इतकें विलक्षण सामर्थ्य आहे. म्हणून मोक्षप्राप्तीकरितां स्वस्वरूपीं येण्यास हा सरळ मार्ग आहे २२. या मार्गांत जठराग्नि ही पहिली पायरी आहे; अग्नीचें सतेजपण, ज्योतिस्वरूप ही दुसरी पायरी आहे. दिवस ही तिसरी पायरी आहे. आणि शुक्लपक्ष ही चौथी पायरी आहे असें समज २३. आणि उत्तरायणांतील सहा महिन्यांपैकीं एक महिना ही जिन्याची वरची अगदीं शेवटची पायरी आहे. अशा क्रमानें गेल्यावर योगी मोक्षसिद्धिरूप घराला पावतात २४. हा उत्तम काळ आहे असें समज, आणि यालाच 'अर्चिरा मार्ग' असेंहि शास्त्रांत म्हणतात. आतां मरण्यास योगीसाधकांना अयोग्य काल कोणता, तो ओघानेच, प्रसंगानुसार तुला सांगतों, ऐक २५.

**अन्वयार्थ—धूमः**—धूमाभिमानिनी देवता—**रात्रिः**—रात्रीची देवता—**तथा**—त्याचप्रमाणें—**कृष्णः**—कृष्णपक्षाची देवता—**षट् मासाः दक्षिणायनं**—दक्षिणायनाच्या सहा महिन्यांची देवता—**तत्र**—या देवता ज्या मार्गातील चिन्हें आहेत त्या मार्गांत—[ **प्रयातः** ]—**योगी**—मरून गेलेला कर्मठ—**चांद्रमसं ज्योतिः**-चंद्रांतील ज्योतीला-कर्मफलाला-**प्राप्य**—प्राप्त होऊन त्याचा भोगानें क्षय होतांच—**निवर्तते**—तेथून परत येतो २५.

तरी मरणसमयीं कफवातादि दोषांच्या अति भरानें, अंतःकरणांत अंधार [ अविवेक ] गच्च भरून राहतो २६. सर्व इंद्रियें लांकडाप्रमाणें जड व कुंठित होतात. स्मरणशक्ति भ्रमांत बुडते. मन वेडे होतें व प्राण घोटाळतो २७. जठराग्निचा अग्निपणा जातो, व मग त्याचा धूरच चोहींकडे होतो; त्यामुळें शरीरांतील ज्ञानशक्ति शरीरांत कोंडून आच्छादित होतें २८. ज्याप्रमाणें चंद्राच्या आड दाट व पाण्यानें भरलेले ढग यावेत मग त्यावेळीं धड गडद अंधार ना स्वच्छ प्रकाश असें झांवळें, अस्पष्ट, झुंजुमुंजु उजेड असतो २९. त्याप्रमाणें तो मरतहि नाहीं व पुरता सावधहि नसतो. अशी जीवितास स्तब्ध स्थिति प्राप्त झालेली असते, व आयुष्य हें मरणाच्या वेळेची वाट पाहात असतें २३०. अशा प्रकारें मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या सभोंवतीं धूर अतिशय कोंडून राहतो त्या वेळेस जन्मभर संपादन केलेला अभ्यासाचा मार्ग संपूर्ण बुडून जातो ३१. अरे ! हे पहा, ज्या वेळेला हातांत असलेलें [ अभ्यास द्वारां संपादिलेले ] जातें त्या वेळीं दुसरीकडून आणखी लाभ होईल, ह्याची गोष्टच कशाला ? म्हणून मरणसमयीं अशी अवस्था प्राप्त होते ३२. अशीं ही देहाच्या आंतील स्थिति असून बाहेर कृष्णपक्षाचा पंधरवडा असतो, व त्यांतहि रात्र, आणि दक्षिणायनांतील सहा महिन्यांपैकीं एक महिना हीं प्राप्त होतात ३३. हे जन्ममरणाच्या फेऱ्यांत वारंवार पाडणारे सर्व योग ज्यांच्या मरणसमयीं एके ठिकाणीं जुळून येतात, त्यांच्या कानीं स्वरूप सिद्धिरूप मोक्षप्राप्तीची गोष्ट कोठून पडणार ? ३४. अशा वेळेवर ज्याचें देहावसान होतें; त्याला, तो योगी असल्यामुळें चंद्रलोकापर्यंत जाणे घडते. मग तेथून तो माघारा फिरून जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो ३५.

१ नाश पावला. २ उत्तरायणांतील सहा महिन्यांपैकी कोणता तरी एक महिना. ३ सर्व गोष्टींची. ४ सिद्धी, सिद्धता. ५ प्राप्त करून घेऊन. ६ ब्रह्मवेत्ते, ज्ञानी. ७ समयाला. ८ मोक्षास. ९ पायरी. १० तेजःपुंज. ११ सर्वोच्या वरचा जिना. १२ सायुज्यमुक्ति, चौथी मुक्ति, मोक्ष. १३ सूर्यकिरणद्वारां जाण्याचा जो उर्ध्वगतिक मार्ग तो. १४ अयोग्य काळ. १५ मरणकाळीं. १६ कफवातादि दोषांच्या. १७ भरानें. १८ भरून. १९ लांकडासारखी दशा येते, काष्ठवत् पडतात. २० ज्ञान, जीवकला. २१ प्रगट होण्याची, भासण्याची बंद होते. २२ भरगच्च. २३ पाण्यानें युक्त. अंधार. २५ प्रकाश, उजेड. २६ झुंजुक. २७ मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या सभोंवतीं. २८ अति धुराची. २९ प्राप्त होतात.

जाणावा । आणि हाचि धूम्रमार्गु गांवा । पुनरावृत्तीचियां ॥ ३६ ॥ येर तो अर्चिरा मार्गु । तो वैसता आणि अैसलगु । सावियां स्वस्त चांगु । निवृत्तीवेरी ॥ ३७ ॥

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते । एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥

ऐशिया अनादि या दोन्ही वाटा । एकी उजूं एकी अव्हांटा । म्हणौनि बुद्धिपूर्वक सुभटा । दाविलिया तुज ॥ ३८ ॥ कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें वोळखावें । हिताहित जाणावें । हिताचिलागीं ॥ ३९ ॥ पाहें पां नाव देखतां बरवी । कोणी अांड घाली काय अथावीं । कां सुपंथ जाणौनियां अैडवीं । रिगवत असे ॥ २४० ॥ जो विष अमृत वोळखे । तो अमृत काय सांडूं शके ? । तेवीं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा न वचे ॥ ४१ ॥ म्हणौनि फुडें । पाैरखावें खरें कुडें । पारखिलें तरी न पडे । अनवसरें कहीं ॥ ४२ ॥ एऱ्हवीं देहांतीं थोर विषम । या मार्गाचें आहे संभ्रम । जन्में अभ्यासिलियाचें हन काम । जाईल वायां ॥ ४३ ॥ जरी अर्चिरा मार्गु चुकलिया । अवचटें धूम्रपंथें पडलिया । तरी संसारपांथीं जुंतलिया । भंवंताचि असावें ॥ ४४ ॥ हे सायास देखोनि मोठे । आतां कैसेनि पां एकवेळ फिटे । म्हणौनि योगमार्गु गोमटे । शोधिले दोन्ही ॥ ४५ ॥ तंव एकें ब्रह्मत्वा जाइजे । आणि एकें पुनरावृत्ति येइजे । परि दैवगत्या जो लाहिजे । देहांतीं जेणें ॥ ४६ ॥

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन । तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

ते वेळीं म्हणितलें हें नव्हे । वांया अैवचटें काय पावे । देह त्यजूनि वस्तु होआवें । मार्गेंचि कीं ? ॥ ४७ ॥ तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों । कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ॥ ४८ ॥ मज तरंगपण असे कीं नसे । ऐसें हें उदकासी कहीं प्रतिभासे ? । तें भलतेव्हां जैसे तैसें । उदकचि कीं ॥ ४९ ॥ तरंगाकारें न जन्मेचि । ना तरंगलोपें न निमेचि । तेवीं देहीं जे देहेंचि । वस्तु जाहले ॥ २५० ॥ आतां शरीराचें तयाचिया ठाईं । आडनांवही उरलें नाहीं । तरी कोणें काळें काइ । निमे तें पाहें पां ॥ ५१ ॥ मग मार्गातें कासया शोधावें ? । कोणें कोठूनि कें जावें ? । जरी देशकालादि आघवें । आपणाचि असे ॥ ५२ ॥ आणि हां गा घटु जे वेळीं फुटे । ते वेळीं तेथिंचें आकाश लागे नीट वाटे । वाटा लागे तरी गगना भेटे । एऱ्हवीं चुके ? ॥ ५३ ॥ पाहें पां ऐसें हन आहे । कीं तो आकारुचि जाये । येर गगन तें

हे अर्जुना ! आम्ही मरणास 'अकाळ' म्ह. अयोग्य काळ म्हणून जो म्हटला, तो हाच असें समज. तसेच जन्म-मरणरूपी गांवास नेणारा 'धूम्रमार्ग' तोहि हाच आहे ३६. याच्याशिवाय दुसरा जो 'आर्चिरा मार्ग' तो भरवस्तीचा, वाहता, सहज, सोपा, अति उत्तम व अगदीं सुलभ असून मोक्षापर्यन्त गेलेला, चरमफल पर्यवसायी आहे ३७.

**अन्वयार्थ—जगतः**–ज्ञान–कर्माधिकृत जनांच्या–**हि एते**–या दोन–**शुक्लकृष्णे**–प्रकाश–अप्रकाशरूप–**गती**–गती–मार्ग–**शाश्वते मते**–नित्य मानलेल्या आहेत–**एकया**–यांतील एका गतीनें योगी–ध्यानी–**अनावृत्ति**–क्रममुक्तीला–**याति**–प्राप्त होतो व–**अन्यया**–दुसऱ्या गतीनें कर्मी–**पुनः आवर्तते**–पुनः परत येतो २६.

हे अर्जुना ! असे हे दोन मार्ग अनादि कालापासून चालत आलेले आहेत. त्यापैकी एक सरळ आणि दुसरा वांकडा आहे. म्हणून ते तुला मुद्दाम-बुद्धिपुरस्सर दाखविले आहेत ३८. कारण कीं, त्या मार्गापैकी चांगला कोणता व वाईट कोणता हें तुला दिसावें आणि खरेंखोटें ओळखावें, आपलें हिताकरितांच [ त्वां ] हित कशांत आहे व अहित कशांत आहे यांचाहि विचार करावयास हवा ३९. हें पहा ! उत्तम अशी नाव डोळ्यासमोर दिसत असतांहि [तींत न बसता] खोल डोहांत कोणी उडी घालील काय ? किंवा ज्ञात असलेला राजमार्ग टाकून कोणाच्यानें आडमार्गांत शिरवेल काय ! २४०. जो विष आणि अमृत हीं दोनहि ओळखतो त्याच्याने अमृत टाकवेल काय ? त्याप्रमाणें जो सरळमार्ग पाहतो तो आडमार्गाला जाणार नाहीं ४१. म्हणून प्रथम खऱ्याखोट्यांची चांगली पारख करावी. अशी पारख झाली म्हणजे मग तो केव्हाहि संकटांत पडत नाहीं [ अकालीं देह पडणार नाहीं ] ४२. असा विचार केला नाहीं तर संकटात्मक मरणसमयीं ह्या मार्गाचा घोटाळा होण्याची मोठी भीतीच आहे. कारण, हा काल जर प्राप्त झाला नाहीं तर ज्या हेतूनें जन्मभर अभ्यास केला तो हेतू व्यर्थ जाईल ४३. जर 'आर्चिरा मार्ग' चुकला आणि तो योगी अकस्मात् 'धूम्रमार्गांत' पडला तर जन्ममरणाच्या अनर्थ परंपरेस जुंपला जाऊन त्यास फिरतच रहावें लागते ! ४४. अशीं हीं मोठालीं संकटें पाहून, ती एकदां कशानें दूर होतील [ याचें ज्ञान व्हावें ] म्हणून दोन्ही योगमार्गांचें चांगलें स्पष्टीकरण करून तुला सांगितलें ४५. तर एका मार्गानें योगी ब्रह्मस्थितिरूप मोक्षाला जातो, आणि दुसऱ्या एका मार्गानें पुनः जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो; परंतु देहावसानाच्या वेळेस, दैववशात् ज्याला जो मार्ग प्राप्त होईल, तो खरा ४६.

**अन्वयार्थ**—[**हि**] **पार्थ**–हें अर्जुना !–**एते सृती**–हे दोन मार्ग–**जानन्**–जाणणारा–**कश्चन योगी**–कोणीहि योगी–**न मुह्यति**–मोहीत होत नाहीं–**तस्मात्**–म्हणून [हि] **अर्जुन**–हे पार्था !–**सर्वेषु कालेषु**–सर्व कालीं–**योगयुक्तः**–तूं समाहितचित्त–**भव**–हो २७.

[ मरणकालीं "अर्चिरामार्ग" भागास येतो कां 'धूम्रमार्ग' येतो, हे अनिश्चित आहे, असें पाहून अर्जुन खिन्न झाला ]. त्यावेळीं देव म्हणाले देहपातानंतर [अर्चिरा मार्गानें] ब्रह्मस्थिति प्राप्त होईलच असें म्हणणें व्यर्थ आहे. कारण, अकस्मात् प्रारब्धवशात् कोणत्या वेळेस काय प्राप्त होईल कोणास ठाऊक ? [ तें न कळे ] म्हणून ही गोष्टच राहूं दे ४७. तर आतां देह राहो अथवा जावो आम्ही केवळ ब्रह्मच आहोत. [ असा ज्ञान्यांचा दृढबोध असतो ] कारण, दोरीवरील भासलेल्या सर्पाचा सर्पपणा अधिष्ठान दोरीच्या दृष्टीनें मिथ्याच आहे [ तसे ब्रह्मदृष्टीनें देह असणें व देह नसणें मिथ्याच आहे] ४८. आपल्यावर लाटा येतात किंवा नाहींशा होतात, तेव्हां मला तरंगपणा आहे किंवा नाहीं याचा पाण्याला कधीं भास होतो काय ? तर नाही. कारण, ते केव्हांहि पाहिलें तरी जसेच्या तसे पाणीच कायम असतें; ४९. तें पाणी लाटा उत्पन्न झाल्यामुळें जन्म पावत नाही किंवा लाटा नाहींशा झाल्यावर तें मरण पावत नाहीं त्याप्रमाणें जें देही देहांत राहूनहि ब्रह्मरूप झालें २५०. आतां त्या ब्रह्मवेत्याच्या ठिकाणीं देहाचें आडनांव सुद्धां उर्वरित राहात नाहीं. मग असें विचार करून पहा कीं, कोणच्या वेळेस, कशाचा नाश होतो ? ५१. जर देश-काल इत्यादि सर्व गोष्टी आपणच होऊन राहिला आहे तर मग ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाचा शोध कां करावा ? व कोणी, कोठें आणि कसें जावें ? ५२. अरे ! ज्या वेळेस घट फुटतो त्या वेळेस त्यांतील आकाश नीट मार्गाला लागतें नीट मार्गाला लागले तरच महाकाशाला भेटतें, नाहीं तर चुकतें कीं काय ? ५३. वस्तुस्थिति अशी आहे, पहा कीं, त्या

१ जन्ममरणाच्या. २ सूर्यकिरणद्वारां जाण्याचा जो ऊर्ध्वगतिक मार्ग तो. ३ वस्ती असलेला. ४ सोपा. ५ सर्वथा. ६ मोक्षापर्यंत. ७ सरळ. ८ वांकडी. ९ मुद्दाम. १० उडी. ११ तळ न लागणाऱ्या खोल पाण्यांत. १२ आडमार्गांत, अरण्यांत. १३ ओळखावें. १४ खोटें. १५ अवेळीं. १६ संकट. १७ भ्रांति. १८ संसाराच्या पंक्तीला, जोडीला जुंपलेल्यांनीं. १९ जन्ममरणाच्या राहाटींत फिरत असावें. २० स्पष्टीकरण केलें. २१ एकाएकीं, सहज. २२ ब्रह्मरूप.

गगनींचि आहे। घटत्वाहि आधीं ॥ ५४ ॥ ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचे सांकडें । तया सोऽहंसिद्धां न पडे । योगियांसी ॥ ५५ ॥ याकारणें पंडुसुता । तुवां होआवें योगयुक्ता । येतुलेनि सर्वकाळीं साम्यता । आपैसया होईल ॥ ५६ ॥ मग भलतेथ भलतेंव्हां । देह असो अथवा जावा । परि अबंधो नित्य ब्रह्मभावा । विघडु नाहीं ॥५७॥ तो कल्पादि जन्मा नागवे । कल्पांतीं मरणें नाप्लवें । माजीं स्वर्गसंसाराचेनि लाघवें । झंकवेना ॥ ५८ ॥ येणें बोधें जो योगी होये । तयासीचि या बोधाचें नीटपणें आहे । कां जे भोगातें पेलूनि पायें । निजरूपा ये ॥५९॥ पै गा इंद्रादिका देवां । जयां सर्वस्वें गांजती राणिवा । तें सांडणें मानूनि पांडवा । डावली जो ॥ २६० ॥

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

जरी वेदाध्ययनाचें जालें । अथवा यज्ञाचें शेताचि पिकलें । कीं तपोदानांचे जोडलें । सर्वस्व हन जें ॥६१॥ तया आघवयाचि पुण्याचा मळा । भारु आंतौनि जया ये फळा । तें परब्रह्मीं निर्मळा । सांटि न सरे ॥६२॥ जें नित्यानंदाचेनि माने । उपमेचा कांटोळा न दिसे सांनें । पाहा पां वेदयज्ञादि साधनें । जया सुखा ॥६३॥ जें विटे ना सरे । भोगी तयाचेनि पवाडें पुरे । पुढती महासुखाचें सोयरें । भावंडचि ॥ ६४ ॥ ऐसे दृष्टीचेनि सुखपणें । जयासी अदृष्टाचें बैसणें । जें शतमखांही आंगवणें । नोहेचि एका ॥ ६५ ॥ तयातें योगीश्वर अलौकिकें । दिठीचेनि हाततुकें । अनुमानती कौतुकें । तंव हलुवट आवडे ॥ ६६ ॥ मग तया सुखाची किरीटी । करूनियां गा पाउटी । परब्रह्माचिये पाठीं । आरूढती ॥ ६७ ॥ ऐसे चराचरैक भाग्य । जें ब्रह्मेशां आराधना योग्य । योगियांचें भोग्य । भोगधन जें ॥ ६८ ॥ जो सकळ कळांची कळा । जो परमानंदाचा पुतळा । जो जिवाचा जिव्हाळा । विश्वाचिया ॥ ६९ ॥ जो सर्वज्ञतेचा वोलावा । जो यादवकुळींचा कुळदिवा । तो श्रीकृष्णजी पांडवा- । प्रती बोलिला ॥ २७० ॥ ऐसा कुरुक्षेत्रींचा वृत्तांतु । संजयो रायासी असे सांगतु । तेचि परियेसा पुढारी मातु । ज्ञानदेव म्हणे ॥ २७१ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥ श्लोक २८, ओव्या २७१



घटाचा आकार तेव्हढा नाहींसा होतो; परन्ही हें घटकाश उत्पन्न होण्याचें पूर्वींपासून उत्पन्न झाल्यावर व नाशानंतर रूप मूळचे महाकाश आहेच ५४. तसें ज्ञानाच्या परिपूर्णतेनें ' मी ब्रह्मच आहें ' असा आत्मत्वानें अनुभव आलेल्या योग्यास मार्गामार्गाचें संकट पडत नाहीं ५५. यास्तव हे पंडुसुता, तूं योगयुक्त, योगसंपन्न हो. एवढ्यानें तुला आपोआप नित्यप्राप्त असलेली ब्रह्मस्वरूपताच प्राप्त होईल ५६. मग वाटेल त्या ठिकाणीं व वाटेल तेव्हां देह असो वा जावो, परंतु निष्प्रतिबंध व नित्य बंधरहित अशा अखंडैकरस परब्रह्मस्थितींत मुळींच बिघाड होणार नाहीं ५७. अरे ! तो योगी सृष्टीच्या आरंभीं ' जन्म ' विकारांत सांपडत नाहीं, सृष्टीच्या अंतीं 'मरण' विकारांत बुडत नाहीं सृष्टीच्या स्थितीकालीं स्वर्ग व संसारसुख यांच्या मोहानें कधीं फसला जात नाहीं ५८. या बोधानेंच जो योगी [ सावध ] असतो, त्यालाच या बोधाची फलप्राप्ति होते. कारण, तो विषयोपभोगाला ओलांडून ब्रह्मरूपाला मिळतो ५९. अर्जुना ! त्या योग्याच्या सुखाचे ऐश्वर्य केवढे आहे पहा कीं, इंद्रादिक देवांना स्वर्गांत नेहमीं त्यांचे सर्वस्व म्हणून सुखोपभोगानें समृद्ध राज्याची कीर्ति चहूंकडे गाजली आहे ते सुखैश्वर्य ओवाळून टाकलेल्या पदार्थाप्रमाणें तुच्छ मानून तो दूर लोटतो २६०.

**अन्वयार्थ—योगी**–ध्यान–उपासना करणारा पुरुष–**इदं विदित्वा**–या अध्यायांत सात प्रश्नांचा निर्णय करून जे कांहीं सांगितलें आहे तें जाणून–**वेदेषु**–वेदाध्ययनांत **यज्ञेषु**–यज्ञानुष्ठानांत–**तपसु**ः–तपश्चर्येत–**च एव**–आणि **दानेषु**–दानांत–**यत् पुण्यफलं प्रदिष्टं**–जे पुण्यफल सांगितलें आहे–**तत् सर्वं**–तें सर्व–**अत्येति**–उल्लंघन करून जातो–**च**–आणि–**आद्यं परं स्थानम्**–अगदीं मूळ कारणरूप ब्रह्मपदाला–**उपैति**–प्राप्त होतो २८.

आतां हे योग्याचे सुख कसें मिळावें असें विचारशील तर कोणास जरी वेदांचे अध्ययनानें मिळणारे पुण्य लाभले अथवा यज्ञ करून त्यानें–पुण्याचें शेत पिकविलें किंवा तप आणि दान करून सर्वस्व पुण्य मिळाले ६१. अशा प्रकारचा सर्व पुण्याचा मळा जरी फळांच्या भारानें फुलून आला तरी त्या निर्मळ शुद्ध ब्रह्माच्या आनंदाची बरोबरी यापैकीं कोणाच्यानेहि करवत नाहीं ६२. जे नित्यानंदाच्या मानानें उपमेच्या ताजव्यांत घातलें असतां कमी असूनसुद्धां त्याच्या प्राप्तीकरितां वेदयज्ञादि साधनाची खटपट फार करावी लागते; ६३. स्वर्ग सुखाचें वर्णन शास्त्रांत केलें आहे ते असे—जें स्वर्गसुख विटत नाहीं व संपतहि नाहीं; भोगणाराच्या सर्व इच्छा पूर्ण करितें व जें महासुखाचें [ ब्रह्मसुखाचें ] धाकटें भावंडच होय ६४. अशाप्रमाणें वरकांति दिसणारें तें सुख व ज्यास अदृष्टाची बैसका आहे म्ह० जें मरणानंतरच प्राप्त होतें आणि जें शंभर यज्ञ करूनंहि कित्येकांना साध्य होत नाहीं ६५. असें जें स्वर्गसुख त्यास योगीश्वर आपल्या दिव्यदृष्टीच्या अटकळीनें व कौतुकानें अनुमान करून पाहूं लागले असतां त्यांना ब्रह्मसुखाच्या पुढें ते स्वर्गसुख वजनाला हलकेंच वाटतें ६६. मग अर्जुना ! त्या स्वर्गादि सुखाची पायरी करून म्हणजे त्या सुखाची पायमल्ली करून ते योगी ब्रह्मपदावर आरूढ होतात ६७. येथून पुढें श्रीज्ञानेश्वरमहाराज भगवंताचे वर्णन करतात–तें असें–जो भगवान् श्रीकृष्ण स्थावरजंगमाचें एक परमभाग्य जो ब्रह्मदेव, शंकर यांनांहि आराधना करण्यास योग्य व जो योग्याचे उपभोग घेण्यास योग्य ऐश्वर्य आहे ६८. जो सर्व कलांची कला म्ह० कलास्वदाता आहे. जो परमानंदाची केवळ मूर्ति आहे जो सर्व विश्वांतील प्राणिमात्रांचें जीवन, आहे ६९. महाराज ! जो सर्वज्ञतेचा जिव्हाळा व यादवकुळांचा कुळदीपक, असा जो श्रीकृष्ण, तो अर्जुनाला असें बोलला २७०. असा कुरुक्षेत्रांतील सर्व वृत्तांत संजयानें धृतराष्ट्राला सांगितला तीच कथा पुढें ऐका असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ७१.

---

१ सोयीनें, सुखानें. २ संकट. ३ आपण ब्रह्मच आहों असा अनुभव झालेल्यास. ४ स्वरूपता. ५ आपोआप. ६ बंधरहिताला. ७ न सांपडे. ८ न बुडे. ९ मोहें. १० फसत नाहीं. ११ फलप्राप्ति. १२ तोलून. १३ राजसत्तेनें गाजलें जातें. १४ त्याज्य. १५ दूर लोटी. १६ व्यापून. १७ निर्मळ ब्रह्माचें प्राप्तीपुढें कांहींच नाहीं. १८ बरोबरी. १९ ताजव्यांत उपमेच्या बरोबरीनें. २० लहान. २१ इच्छेनें. २२ नुसत्या दृष्टीच्या सुखानें. २३ मरणानंतर. २४ इंद्रालाहि. २५ साध्य. २६ दिव्य. २७ अटकळीनें. २८ हलक्या प्रतीचें वाटतें. २९ पायरी. ३० स्थावर जंगमाचें मुख्य भाग्य. ३१ ब्रह्मदेव शंकर यांना. ३२ मूर्ति. ३३ जीवन. ३४ जिव्हाळा. ३५ गोष्ट.

★

# अध्याय संगति व आठव्या अध्यायाचें तात्पर्य

**पाठीं सप्त प्रश्न विधि । बोलोनि प्रयाण समयसिद्धि ।**
**एवं सकळ वाक्यावधि । अष्टमाध्यायीं ।। अ. १०–१९**

मागील अध्यायांत मायेचे नदीच्या रूपकानें सविस्तर वर्णन करून ती तरून जाण्यास माझ्या 'भक्ति' शिवाय दुसरा कोणताहि उपाय नाहीं. कारण, त्या भक्तीनेंच माझे आत्मत्वानें साक्षात्कारात्मक ज्ञान होतें, असें सांगून जीव स्वतः स्वरूपानें ब्रह्मरूप असतांना ते मला आत्मत्वानें ओळखत नाहींत; परंतु एकनिष्ठेनें भक्ति करणारे भक्त मात्र ज्या परमात्म्याच्या अभेद, साक्षात्कारात्मक ज्ञानानें जन्ममरणादि धर्मापासून मुक्त होऊन ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ यांस यथार्थ जाणून ते योगयुक्त भक्त प्रयाणकालींहि मला जाणतात व मोक्षाला प्राप्त होतात, या महत्त्वपूर्ण विचारांसह भक्ताच्या प्रयाणकाळची स्थिति सांगतेवेळीं अर्जुन पूर्वीच्या भगवत् भक्तांच्या वर्णनांतच निमग्न होता. म्हणून ब्रह्म, अध्यात्म, इत्यादि पदांचे श्रवण करूनहि पदार्थांचे यथार्थ ज्ञान अर्जुनास झालें नाहीं. त्यांचें विस्तारपूर्वक, तर्कशुद्ध, संप्रदाययुक्त ज्ञान संपादन करण्याची अर्जुनास उत्कट इच्छा निर्माण झाली. कारण, कोणत्याहि विषयाचे शाब्दिक, बौद्धिक असें परोक्षज्ञान बिनचूक स्वरूपाचे झालें म्हणजे त्या साध्याच्या उपायास जाणून त्या साध्याची इच्छा असणाऱ्या साधकांस ती साधना करणें शक्य होत असतें. अतएव ब्रह्म, अध्यात्मादि समजून घेण्याकरितां या अध्यायांत प्रथम अर्जुनाचें प्रश्न आहेत. त्याचें समाधान सांगून उपासकांच्या गमनाचे अर्चिरादि मार्ग सांगितले. ब्रह्म व अध्यात्मादिकांस जाणून भक्त मद्रूपतसे पावून प्रयाणकालींचें दुःखें त्यास होत नाहीं, या विषयीं अर्जुनानें सात प्रश्न विचारले. अर्जुनानें प्रश्न विचारण्याबरोबर अर्जुनावर नितान्त प्रेम असल्यामुळें कृपाळु श्रीगुरुदेव त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास आरंभ करतात [ १ ते १४ ].

**ब्रह्म**—[ अत्यंत निर्विशेष; अविनाशी, दिक्कालातीत, सर्वव्यापक स्वयंप्रकाशवस्तु ] फुटक्या नाशवन्त सर्व आकारांत ओतप्रोत भरलेलें असून जें अतिसूक्ष्म, अविनाशी तत्त्व आहे; त्यास '**ब्रह्म**' म्हणतात [ १५ ते १७ ].

**अध्यात्मः**—सृष्ट्यादि आकाराच्या उत्पत्तिबरोबर जें उत्पन्न होत नाहीं व सृष्टीच्या लयाबरोबर जें नाश पावत नाहीं. अशी जी ब्रह्माची अखंड सहजस्थिति' त्यास "**अध्यात्म**" म्हणतात [ आत्मा, कूटस्थ चैतन्य ] [ १८–१९ ].

**कर्मः**—विशुद्ध, निराकार ब्रह्माच्या ठिकाणीं महत्तत्त्वादिभूत भेदयुक्त, चराचरात्मक, वैचित्र्यपूर्ण सृष्टि, विश्वरचना होते. असा मूळ मुद्दलरूप कर्त्याविना अव्यक्ताच्या ठिकाणीं अनिर्वचनीय उत्पत्तीचा जो "व्यापार" होतो त्यास '**कर्म**' म्हणतात [ २० ते २९ ].

**अधिभूतः**—ज्याचे अस्तित्व उगीच वरवर भासते, 'न होणे' हेंच ज्याचे खरें स्वरूप असून जे पंचमहाभूतांचा संयोग झाला असतां त्याच्या आश्रयानें निर्माण होऊन राहणारे असें नामरूपात्मक, भौतिक, जड, व्यष्टि 'शरीर' व समष्टि जगत् कीं, जें पंचमहाभूतांच्या वियोगाबरोबर नाहींसें होतें, त्यास '**अधिभूत**' म्हणतात [ ३० ते ३२ ].

**अधिदैव**:—जो तत्त्वतः परमात्मा–ब्रह्मच आहे; पण अज्ञानामुळें दुसरा–परमात्मभिन्न झाल्यासारखा होऊन त्यास आवरणशक्तीनें देह–अहंकारात्मक झोंप येऊन द्वैत प्रतिभासात्मक विक्षेपरूप स्वप्न व्यवहारानें संतोष व शीण याची प्राप्ति होते त्यास 'जीव' असेहि म्हणतात तो या पंचभूतकार्य शरीररूपी घरांतील देव होय त्यास '**अधिदैव**' म्हणतात [ जीवचैतन्य ] [ ३३ ते ३६ ].

**अधियज्ञ**:—अधिदैवानें अविद्येमुळें धारण केलेल्या देहाहंकाराचा बाध करून जो शरीरग्रामींच राहतो त्यास '**अधियज्ञ**' म्हणतात. तोहि मीच आहे. किंबहुना ! ! अधिदैव, अधिभूत ही सुद्धां तत्त्वतः मीच–ब्रह्म आहेत; पण अविद्या व तत्कार्य आवरण, देहाहंकार यामुळें ते तत्त्वहीन दशेस आल्यासारखे भासते, अधिदैवाधिभूत हीं ब्रह्माहून वेगळी भासतात; पण तो अविद्या, आवरण देहाहंकारात्मक हीणकसपणा गेला कीं, त्यांचे ब्रह्माशीं ऐक्य होते, असें आपण समजतो; पण ऐक्य हें मूळचेंच आहे. ती मुळांत वेगळी नव्हतीच, तर मग त्यांचे ऐक्य झालें म्हणण्यांत विशेष अर्थ तो काय ? मूळ ब्रह्मस्वरूपांत मुळींच फरक होत नाहीं, हा आकार जेथें घडतो त्यास "**अधियज्ञ**" म्हणतात. याप्रकारें अधियज्ञाचे वर्णन करून त्याच्या प्राप्तीचा अर्थात् अविद्यादि हीणकसतेच्या निवृत्तीचा "साधनमार्ग" म्हणजे "वैराग्यद्वारां सर्व विषयवासनांचा त्याग करून, अष्टांग योगानुष्ठानानें मनप्राण

संयम यांचा धूररहित ज्ञानाग्नींत होम करून ज्ञानाग्नीस संतुष्ट करणें हा होय. शेवटीं निखळ ज्ञेयच उर्वरित राहते. त्यास 'अधियज्ञ' म्हणावे. [ जीवास अविद्या व तत्कार्य निवृत्तिपूर्वक, होणाऱ्या स्वरूप साक्षात्कारानंतर जें [ जीव-ब्रह्माचें ] ऐक्य प्रतीतीस येते त्या ब्रह्मात्मैक्यास अर्थात् द्वैतनिरपेक्ष, अद्वय स्वयंप्रकाश ब्रह्मस्थितीसच 'अधियज्ञ' म्हणतात. अशा देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितीतच 'जीवन्मुक्ति' असेंही म्हणतात. सारांश, अविद्या व तत्कार्य द्वैत बाधानंतर उर्वरित राहणारे ब्रह्मस्वरूप तेंच "अधियज्ञ" जाणावें.

चवथ्या अध्यायांत "**यज्ञफल**" म्हणजे ब्रह्मात्मैक्य ज्ञानानें अज्ञानाचा बाध होऊन जे केवळ ज्ञानच-ब्रह्मच उर्वरित राहते त्या ब्रह्मतत्त्वास ऐक्यतेनें पावणें, हे होय; येथें 'अधियज्ञ' शब्दाचा अभेद साक्षात्कारांत ऐक्यतेनें पावणारें ब्रह्म किंवा अपरोक्षानुभवी; जीवन्मुक्त असा केलेला अर्थ फारच चिंतनीय व बरोबरआहे ] [ ३७ ते ९२ ].

त्या पुरुषांनीं मरणापूर्वी अभ्यास करून मद्रूपता संपादन करून घेतल्याकारणें पंचभूतांचें शरीर खपल्या-प्रमाणें केव्हां पडले हेहि त्यांना समजत नाहीं. जीवंतपणी जर शरीराच्या उभेपणाची त्यांना जाणीव नाहीं, तर मग शरीर पडण्याचें संकट ते काय असणार ? शरीर वियोग समयींहि ब्रह्मात्मैक्यानुभावाच्या पोटांतील निश्चयात्मक पाणी हालतहि नाहीं. जीवन्मुक्त पुरुष ब्रह्मरूप झाल्यामुळें त्याचा व देहाचा जीवंतपणीच संबंध तुटलेला असतो. म्हणून देह पडला तरी ब्रह्मात्मैक्यवस्तु सभराभरित जशीच्या तशीच राहते [ ९३ ते ६८ ].

"ज्याचे जन्मभर, सतत उत्कटतेनें स्मरण, चिंतन केलेले असते. त्याचेच मरणसमयीं स्मरण होतें व मरणसमयीं ज्याचें स्मरण होते, तदनुरूप अशाच गतींला-जन्माला तो मनुष्य जातो" या नियमानुसार तूं सदा माझेंच स्मरण ठेव, माझीच अखण्ड भक्ति कर, माझेंच चिन्तन व भजन कर, मग युद्ध केलें तरीहि चित्त माझ्या स्वरूपाकार झाल्याकारणें मृत्युसमयीं तुला माझेंच स्मरण राहील व तूं मद्रूपतेसच पावशील.

[ यावर एखादा विषयासक्त मनुष्य असें म्हणेल कीं, कांहीं ना कांहीं तरी, युक्ति-प्रयुक्ति करून अन्तकालीं भगवत् स्मरण करावें म्हणजे झालें; पण ते कधींच शक्य नाहीं. म्हणून तर भगवान् अर्जुनास 'सदा, अखंड आमरण माझें स्मरण ठेव," चिंतनाच्या सतत आवर्तनाची जरूर आहे, असे सांगतात. तसेंच दिवसांतून एकदां अगर जन्मांतून एकवेळां केव्हांतरी देवाचे चिंतन, स्मरण करावे व बाकीचा आयुष्यांतील सारा काळ स्वैर बुद्धीनें वागण्यात संसारांत अगर निषिद्धाचरणात घालविला तरी चालेल, असें मात्र नाहीं, हें "सदा माझें स्मरण कर" या अखंड स्मरणाचे विधानावरून सूचित होतें. एकदां केलेले स्मरण कांही अंशीं पुण्यजनक असलें तरीहि ते स्मरण चित्तांतील संसाराच्या अनन्त जन्मींच्या संस्कार निवृत्तीस व सुसंस्कार निर्मितीस पर्याप्त वा समर्थ नाहीं. ज्या सत् संस्कारानें मृत्युसमयीं सहजतेनें भगवत् स्मरण राहील त्या प्रकारच्या संस्कार निर्मितीस अखंड स्मरणाची, सतत आवर्तनाची जरूरी आहे, असे आमरण आवर्तन हवे. सतत अभ्यास केला पाहिजे. केवळ योगायोगाने, किंवा जन्मांत एकदां केव्हां तरी स्मरण चिन्तन, नामोच्चारण करून किंवा कांहींतरी उपाय, युक्ति करून अन्तकालीं ईश्वर स्मरण होईल, असे करावें असा विचार जर कोणीं विषयासक्त मनुष्य करील तर तो निव्वळ कल्पनेचा अवडंबर असून, तो अयशस्वी प्रयत्न करून शेवटीं व्यर्थलच पदरीं पडेल, फसवणूक होईल, हे खास.

शिवाय, दोषसाहचर्यरहित होऊन अखंड भगवत् भक्ति, भगवत् स्मरण, नामोच्चारणरूप मोक्षसाधनांचा अव-लंब-स्वीकार न करणें हा दृष्ट दोष अर्थात् पुरुषापराध आहे. तो पुरुषापराध आपल्याकडून न व्हावा म्हणून व अदृष्ट असा तीव्रतम प्रतिबंध असल्याची जाणीव व्हावी म्हणूनहि दृष्ट उपाय करणें उचित होय. दृष्ट साधनानुष्ठान सोडणें कधींच उचित होणार नाहीं म्हणून भगवंताच्या आज्ञेनुसार अखंड स्मरण करणें मनुष्याचे कर्तव्य होय. संसारांत प्रारब्ध कर्मानुसार सुख-दुःखें प्राप्त होतात. म्हणून कोणी सुख प्राप्त्यर्थ वा दुःख निवृत्यर्थ लौकिक उपाय करण्याचे सोडून देऊन बसतो कां ? तद्वतच अखंड भगवत् स्मरणरूपी दृष्ट साधनानुष्ठान न सोडतां प्रयत्नपूर्वक ईश्वर स्मरण, व त्याची आवृत्ति करावी म्हणजे त्या अखंड चिंतनानें चित्तांतील रज-तमाचा नाश होऊन सत्वगुणाचा व शुभ-संस्कारांचा प्रकर्ष होऊन अद्वयबोध होईल, जन्ममरणाची येरझार सदाचीच संपेल, असे सूचित होते ] [ ६९ ते ७९ ].

याचा अनुभव घ्यावा असें वाटत असेल तर मी सांगतो त्याप्रमाणें सतत ब्रह्माभ्यासाची चित्ताला मोहर लावण्याचा प्रदीर्घाभ्यास कर म्हणजे मग चित्त चैतन्यरूप होईल, की ज्या घनानंद चैतन्याचें ठिकाणीं जन्ममरणाचा शीणच नाहीं; नव्हे तसा शीण असणें शक्य नाहीं; किंबहुना ! ! जन्म-मरणरूप शीण कसा असूं शकेल ? ] [ ८० ते ८९ ].

योगयुक्त पुरुष प्रणायकालीं स्थिरचित्तानें अव्यंग ब्रह्माचें स्मरण करतो व त्या पुरुषाप्रत पावतो. याप्रसंगीं भगवंतांनीं ब्रह्मस्वरूपाचें व अष्टांगयोग साधनेचें वर्णन केले आहे. तो पुरुष केवळ परब्रह्मरूपतेस पावलेला असून घागरीखाली झांकलेला दिवा केव्हां विझला हे ज्याप्रमाणें कळत नाहीं त्याप्रमाणें तो योगी ब्रह्मरूप केव्हां झाला अर्थात् देहरहित ब्रह्मस्थितीस केव्हां प्राप्त झाला हे इतरांस न कळतां त्याचे देहावसान होतें [ ८६ ते ९९ ].

त्या अक्षर ब्रह्मप्राप्तीसाठीं वैराग्यशाली, निष्काम, तपस्वी पुरुष रात्रंदिवस हा प्रयत्न करितात; पण त्यांनाहि ते प्राप्त होण्यास कठीण आहे. साक्षात् वेदासहि तें अगम्य–अविषय आहे. तरीहि योगयुक्तास त्याची प्राप्ति कशी होते तो साधनमार्ग पुनः एकवेळ थोडक्यांत सांगतात. तो असा कीं मनाची बाह्य प्रवृत्तीची सवय मोडून तें मन स्थिर, अंतर्मुख होणे नितान्त जरूरीचे आहे. ती मनाची बाह्य प्रवृत्तीची सवय पूर्णतया जाण्यासाठी सर्वतोपरि संयमपूर्ण, वैराग्ययुक्त अभ्यासांतच जीवनाचा काल घालविणे आवश्यक आहे. अभ्यासानें व वैराग्यानें मनःस्थैर्य लाभल्यावर प्राणाबरोबर ओंकाराचें ध्यान करावें, असें ध्यान करतां करतां प्रदीर्घ–अभ्यासानें एखादेवेळीं ओंकाराचें स्मरणहि नाहींसें होऊन, अद्वयपूर्ण ब्रह्मात्मैक्याचा साक्षात्कार होतो, हीच 'परमगति' होय.

अंतःकालीं स्मरण–ध्यान करावें असें भगवंतांनीं सांगितलें; पण अन्तकालीं; आसन्नमरण झाल्यावर हें " भगवत् स्मरण " होणें अत्यंत अवघड आहे. याचें उत्तरांतील भावार्थ जो श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं श्रीभगवंताच्या तोंडून व्यक्त केला आहे तो अत्यंत हृदयस्पर्शी, आल्हाददायक आणि रसपूर्ण भाषेंत सांगितला आहे. तो असा कीं, ' सर्व विषयवासनांचा ' त्याग करून जन्मभर अखंड माझेच चिंतन करणाऱ्या भक्तांच्या सेवेचे माझ्यावर ऋण झालें. असल्याकारणें, ते फेडण्यासाठीं मी त्यांची अन्तकालीं सेवा करतो अर्थात् मीच त्यांना स्वरूपावबोध, माझे स्मरण देऊन अनायासानें माझ्या स्वरूपाप्रत–आणतो; वस्तुतः विचार केला तर " त्यांना मृत्युसमयीं, मी माझे स्मरण करून द्यावे व आपल्या स्वरूपप्रत न्यावे, याचीहि मुळीं आवश्यकताच उरत नाहीं, कारण ते भक्त मरणाच्या पूर्वींच मद्रूपतेस-ब्रह्मरूपतेस प्राप्त झालेलें असतात, जर अन्तकालीं केलेल्या–भगवत् स्मरणानेंच विदेह कैवल्याचा लाभ होत असेल तर जीवन्मुक्तीस निरर्थकत्व आहे. मग जीवन्मुक्ति संभवते कां नाहीं ? संभवत असल्यास जीवन्मुक्तिविना विदेह-मुक्ति संभवनीय आहे कां ? इत्यादि जीवन्मुक्तीविषयीं विरोधी अर्थाची भासणारी अडचण वा जीवन्मुक्तींविषयक संशय उपर्युक्त म्हणजे ' देह–असतांनाच ते भक्त देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितीस, मद्रूपतेस पावल्यामुळें म्हणजेच ते जीवन्मुक्त असल्याकारणें त्यांना मृत्युसमयीं मी येऊन स्मरण देण्याची जरूरीच मुळांत भासत नाहीं. " या समाधानांतील मार्मिक, महान् सत्य सिद्धान्त सांगण्यानें आपोआप निवृत्त होतो. तो जीवन्मुक्त सहजच देहान्तीं विदेह-मुक्तीस–देहरहित ब्रह्मस्थितीस पावतो यांत संशय नाहीं ] त्यास प्राप्त जन्माचीच भ्रान्ति नसते तर मग तो देहान्तीं जन्ममरणांस पावत नाहीं, हें काय निराळें सांगावयास हवे ? तर नाहीं [ १०० ते १९१ ].

भगवद्भक्तीचें मुख्य फल म्हणजे ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार हा होय. या साक्षात्कारानें अविद्या व तत्कार्य जन्ममरण चक्राविषयीं नाहींचा निश्चय होतो. त्या ब्रह्मवेत्याशिवाय इतर जीव जन्ममरणरूप अनर्थ परंपरेंतून, दुःख–संकटांतून सुटत नाहींत मग ते ब्रह्मलोकाला पोहचलेलें असले तरीहि पुनः जन्म घ्यावा लागतो तो लागतोच. कारण चार युगें हजार वेळा व्यतीत झालीं कीं, ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो तितक्याच काळाची त्याची एक रात्र होय. त्याचा दिवस उगवण्याबरोबर अव्यक्तरूप प्रकृतीपासून संपूर्ण सृष्टीची उत्पत्ति होते व त्याचा दिवस मावळेपर्यंत जन्म-मरणाच्या फेऱ्यांत फिरत राहतात व ब्रह्मदेवाची रात्र होतांच संपूर्ण सृष्टि पसारा संस्कारात्मक बीजरूपानें प्रकृतींत लीन होतो. असें सृष्टीचें चक्र सतत चालू आहे [ १९२ ते १६८ ].

[ यांत ब्रह्मलोकांत प्रदीर्घकाल जगतां येते; पण तेवढ्यानें जीवन्मुक्ति–ब्रह्मस्थिति लाभते, असें मुळींच नाहीं. ब्रह्म हें जर उत्पन्न होणारें असतें तर कालांतरानें त्याचीं उत्पत्ति व प्राप्ति संभवली असती; पण ब्रह्म हें नित्यसिद्ध, अनुत्पन्न स्वरूपाचें आहे. त्या विषयीं अज्ञान व तत्कार्य आवरण निवृत्त झाले म्हणजे ब्रह्मप्राप्ति होते, किंबहुना ! ! स्वस्वरूपाचा विसर म्हणजे अज्ञान व त्याचे स्मरण होणे म्हणजेच ब्रह्मप्राप्ति. आत्मस्वरूपाच्या अज्ञानानें, देहात्मत्व भ्रांति, देश–कालाची भ्रांति व कार्यकारणाची भ्रांति होते. त्यांतील देशकाल हाहि एक भ्रमच आहे व तो ब्रह्मात्मैक्यबोधांतील एक प्रतिबंध आहे. त्याकारणें लोकान्तर प्राप्तीनें प्रदीर्घकाल वाढविला तर त्याचे स्वरूप पालटणार नांहीं, तो प्रतिबंध, प्रतिबंध या स्वरूपांतच राहिल्यामुळें ब्रह्मप्राप्तीस लागणारीं प्रतिबंधकाभावसहित सामग्री

होणार नाहीं. मग प्रतिबंधकरूपी काल कितीहि वाढविला तरीहि ब्रह्मस्थिति कशी लाभणार ? प्रदीर्घ काल संपल्यानें ब्रह्मरूपता लाभत नाहीं; तर उलट ब्रह्मरूपता लाभल्यावर देशकालादिकांचा अद्वयब्रह्माचे ठिकाणीं त्रैकालिकात्यंताभाव आहे, असाच दृढतर निश्चय होतो. अध्यासवादाचें हें वर्म ध्यानांत आले तर ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारास प्रदीर्घ काल लागतो असें नाहीं; तर स्मरणयोग्य अन्तःकरणाची शुद्धावस्था होण्यास–प्रदीर्घ वेळ लागतो. तदनंतर स्मरण होण्यास–अधिकारपरत्वें दीर्घकाल अगर अल्पकालहि लागेल. कारण, स्वस्वरूपाचा 'विसर' हेंच अविद्येचे, बंधाचें स्वरूप होय. त्या स्वस्वरूपाचें स्मरण होण्यास कदाचित् बहुतकाल लागेल तर कदाचित् एका क्षणांतहि ते स्मरण होईल. सारांश, गुरुशास्त्रोपदिष्ट श्रवण, मनन, अनन्य भक्ति करणाऱ्यास अधिकारानुसार बहुतकालानें अगर अत्यल्पकालानें यथार्थ स्वस्वरूपस्मृति होईल; तीच ब्रह्मरूपता व तीच मोक्ष होय. ]

'व्यक्त' म्हणजे प्रत्यक्ष प्रमाणास विषय होणारे विश्व व ते व्यक्त विश्व ज्याच्यापासून उत्पत्ति–स्थिति लयास प्राप्त होते त्या मायेस किंवा मायाविशिष्ट–चैतन्यास "अव्यक्त" म्हणतात. त्यास अव्यक्त म्हणणे व्यक्त विश्वाच्या सापेक्ष आहे; पण त्या उभयांस अधिष्ठानभूत जें चैतन्य ते मात्र कार्यकारणातीत, व्यक्त–अव्यक्त या उभयभावांहून अतीत अनादिनित्य, 'निरपेक्ष–अव्यक्त' आहे त्या व्यक्ताच्या उत्पत्ति, स्थिति, लयाचा निरपेक्ष–अव्यक्त, अद्वय, अनादि–अनंत ब्रह्मावर यत्किंचितहि परिणाम वा स्पर्शहि होत नाहीं.

त्या चैतन्यप्राप्तीचा, आत्मत्वानें साक्षात्कार होण्याचा एकमेव निश्चित–फलदायि, सरळ, निरुपद्रवी उपाय म्हणजे 'अनन्य भक्ति' हा होय. काया–वाचा–मनें करून एका परमात्म्याचीच सेवा करणें, हीच 'एकनिष्ठ भक्ति' होय. अशा एकनिष्ठ भक्ताचें घर शोधीत तो परमात्मा येतो. अर्थात् ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारानें ब्रह्मरूपता लाभते. म्हणजेच 'मुक्ति' व तीच 'अनावृत्ति' होय [ १७० ते २०३ ].

जन्ममरण चक्रांत सांपडणे अगर त्या चक्रांतून सुटणे या दोन्ही गोष्टी कांहीं अंशी विशिष्टकालीं येणाऱ्या मरणावर व अंतकाळच्या स्थितीवर अवलंबून आहेत. अंतकाळीं जर देहांत अग्निबल–असेल व बाहेर उत्तरायण, शुक्लपक्ष, आणि दिवस असा उचित काल असेल तर त्या योग्यास सायुज्य सिद्धि लाभते. हाच **"अर्चिरामार्ग"** होय. याच्या उलट जर अंतकाळीं देहांत कफवातादिकांचें बळ असेल व बाहेर दक्षिणायन, वद्यपक्ष व रात्र असा काळ असेल तर जन्मभराचा अभ्यास हातचा जावून त्या साधकास पुनः जन्म घ्यावा लागतो. हाच **'धूम्रमार्ग'** होय [ २०४ ते २३६ ].

असें अनादिकालापासून चालत आलेल्या अर्थात् सनातन मानलेल्या मार्गांचे वर्णन करून यापैकीं मृत्यु कोणत्यासमयीं येईल व कोणता मार्ग लाभेल हें कांहीं निश्चितपणें आपल्या हातीं नाहीं; ते केवळ प्रारब्धाधीन आहे, मग मुक्तिहि प्रारब्धाधीनच आहे कीं काय ? असा अर्जुनाचा प्रश्न कल्पून भगवन्त उत्तर देतात ते साधकाच्या पक्षीं आश्वासक व उद्‌बोधक आहे ते असें:—

अरे ! त्या कालावर अवलंबून न राहतां जे साधक आपण मरण येण्यापूर्वीच वस्तुस्वरूप होऊन राहतात, म्हणजे देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितिरूप जीवन्मुक्ततेस पावतात. ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारामुळें देहतादात्म्य संबंधच उरत नाहीं; मग देह राहो अगर जावो ! त्याच्याशीं जीवन्मुक्त पुरुषाचा मुळींहि संबंध नाहीं. देश–कालातीत असणाऱ्या अद्वयानंद ब्रह्मात्मैक्य बोधानें तो ब्रह्मभावास पावतो. मग त्याच्या अन्तसमयीं त्यास कोणता का मार्ग मिळेना ! त्याच्या दृष्टीनें, धूम्रार्चिरादि त्या मार्गें जाणे, येणे व देशकाल ही सर्व अध्यस्तरूप असल्यामुळें किंबहुना ! ! याविषयीं त्रैकालिकात्यंताभावाचा निश्चय झाल्यामुळें त्याच्या अखंडार्थरूप ब्रह्मभावांत मुळींहि बिघाड होत नाहीं.

इतर सकाम पुण्यानें इंद्रपदादि ऐश्वर्याचा लाभ होतो; पण तें दीर्घायुष्य ऐहिक–पारत्रिक ऐश्वर्य भोग ब्रह्मप्राप्तीच्या दृष्टीनें तुच्छ आहेत, असे निश्चितपणें जाणून भक्तिद्वारां, अद्वयबोधानें परब्रह्मरूप होतात व त्याची परिणति सर्वत्र ब्रह्मभाव लाभण्यांत होते [ २३७ ते २६७ ].

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात ही योगीश्वरांची कथा, योग्यांचे निजध्येय, असें परब्रह्मरूप, यादवकुलदीपक भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितली. तिचाच संजयानें अनुवाद करून धृतराष्ट्रास सांगितला व तीच कथा मीहि श्रीगुरू निवृत्तिनाथांच्या कृपेनें आपणास सांगत आहे [ २६८ ते २७१ ].

[ या संपूर्ण आठव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १० पहावा ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय नववा

तरी अवधान एकलें दीजे । मग सर्व सुखासि पात्र होईजे । हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ॥ १ ॥ परी प्रौढी न बोलों हो जी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं । देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २ ॥ कां जे लळेयांचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती । जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हां ऐसीं ॥ ३ ॥ तुमचे या दिठिवेयाचिये वोलें । सासिन्नलें प्रसन्नतेचे मळे । ते साउली देखोनि लोळें । श्रांतु जी मी ॥४॥ प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणौनि आम्हीं आपुलिया स्वेच्छा वोलावो लाहों । येथही जरी सलगी करूं बिहों । तरी निवों कें पां ? ॥५॥ नातरी बालक बोबडां बोलीं । कां वांकुडा विचुंका पाउलीं । तें चोजें करूनि माउली । रिझे जेवीं ॥ ६ ॥ तेवीं तुम्हां संतांचा पढियावो । कैसेनि तरी आम्हांवरी हो । या बहुवा ओळुकिया जी आहों । सलगी करीत ॥ ७ ॥ वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवादृशें श्रोते । काय धड्यावरी सारस्वतें । पढों सिकिंजे ॥ ८ ॥ अवधारा आवडे तेसणें धुंधुरु । परि महातेजीं न मिरवे काय करूं । अमृताचिया ताटीं वोगेरूं । ऐसी रससोय कैंची ? ॥ ९ ॥ हां हो हिमकरौंसी विंजणें । कीं नादापुढें आइकवणें । लेणियासी लेणें । हें कैहीं आथी ? ॥ १० ॥ सांगा परिमळें काय तुरंबावें ? । सागरें कवणें ठायीं नाहावें ? । हें गगनचि आंडे आघवें । ऐसा पवाडु कैंचा ? ॥ १२ ॥ तैसें तुमचें अवधान धाये । आणि तुम्ही म्हणा हें होये । ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें रिझा तुम्ही ? ॥ १२ ॥ तरी विश्वप्रगटितिया गभस्ती । काय हातिवेन न कीजे आरती ? । कां चुळोदकें आपांपती । अर्घ्यु नेदिजे ? ॥ १३ ॥ प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा अर्चितुसें भक्ती । म्हणौनि बोल जऱ्ही गंगावती । तऱ्ही स्वीकाराल कीं ॥१४॥ बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापातेंचि जेवऊं लागे । कीं तो

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय नववा

श्रीज्ञानदेव म्हणतात, श्रोतेहो मी जें आतां वास्तविक गुह्यतत्त्वाचें निरूपण करणार आहे ते अवधानपूर्वक ऐका. मी प्रतिज्ञापूर्वक हें उघड सांगतों कीं, तुम्ही ‘एक लक्ष’ या श्रवणाकडे दिलें तर तुम्ही सर्व सुखाला म्ह. ब्रह्म-सुखाला पात्र व्हाल १. पण तुम्हां सर्वज्ञांच्या सभेपुढें मी हें आढ्यतेनें बोलतो असें नाहीं हो ! वस्तुस्थितीच अशी आहे. ‘तुम्ही लक्ष द्यावें’ ही माझी तुम्हाला लडिवाळ-पणाची विनंती आहे २. कारण, तुम्हांसारखी ज्ञानसंपन्न माहेरघरें, समर्थ मातापितरें असल्यावर, लळा म्हणून जी एक वृत्ति आहे तिचे देखील लाड पूर्ण होतात आणि मनोरथांची देखील इच्छा तृप्त होते ! ३. तुमच्या कृपा-दृष्टीच्या ओलाव्यानें टवटवीत झालेल्या प्रसन्नतारूपी मळ्याची थंडगार, सुशीतल सावली पाहून महाराज[संसा-रानें] श्रमलेला असा जो मी तो त्या ठिकाणीं विश्रांतिसाठीं लोळत आहे ४. महाराज ! तुम्ही सुखरूपी अमृताचें डोहच आहात, म्हणून आम्ही आपल्या इच्छेप्रमाणें त्यांत बागडून थंडावा प्राप्त करून घेत आहो. येथेंहि जर लडि-वाळपणानें तुमच्याशीं सलगी करण्यास भिऊं लागलों, तर आम्ही शांत तरी व्हावें कोठें ? ५. किंवा बालक बोबड्या बोलांनी बोलत असले व वेडेवाकडे पाऊल टाकीत चालत असलें तर त्याचे ज्याप्रमाणें कौतुक मानून आई आनंद पावतें ६. त्याप्रमाणें तुम्हां संतजनांची प्रीति कोणत्या तरी रीतीनें–निमित्तानें मजवर व्हावी याच एका उत्कट, इच्छेनें मी तुमच्याशीं सलगीं [ सलगींची भाषणें ] करीत आहे ७. नाहींतर हे [ माझें मनोगत न मानले तर ] आपणासारख्या सर्वज्ञ श्रोत्यांस माझ्या बोलण्यापासून नवीन कांहीं समजून घ्यावयाचें आहे काय ? अहो सर-स्वतीपुत्राला कोठें धडे पाठ करून विद्या शिकावी लागते काय ? ८. पहा कीं, पाहिजे तेवढा मोठा जरी काजवा असला, तरी सूर्यप्रकाशापुढें त्याचें तेज पडत नाहीं त्याला काय करावें ? तसेंच अमृतरूप ताटांत वाढण्या-जोगी पाकनिष्पत्ति कोठून आणणार आहे ? ९. अहो थंड किरण असलेल्या चंद्राला पंख्याने वारा घालणें किंवा साक्षात् नादब्रह्मापुढे गायन करून त्यास ते ऐकविणें, तसेंच दागिन्याला अलंकार घालणें असें कोठें झालें काय ? १०. परिमळानें कशाचा वास घ्यावा ? समुद्रानें कोणत्या ठिकाणीं नाहावें ? आणि हें सर्व आकाशच जींत मावेल. अशी मोठी वस्तु कोणती आहे, सांगा बरें ? ११. त्याच-प्रमाणें तुमचें अवधान तृप्त होईल आणि तुम्ही असें म्हणाल कीं, ‘वा ! याला म्हणावें व्याख्यान !’ असें तुम्हाला प्रसन्न करण्याजोगें वक्तृत्व जगांत कोणाचे आहे? १२. वस्तुतः नाहीं [ तथापि, असा न्याय आहे, कीं भक्तीनें अशा गोष्टी घडतात, असें दृष्टांतपूर्वक महाराज सांगतात]. तरी सर्व जग प्रकाशमय करणाऱ्या सूर्याला काडवातीनें आरती करूं नये कीं काय ? किंवा वरुणाला चुळकाभर पाण्यानें अर्घ्य देऊं नये कां ? १३. महाराज ! तुम्ही केवळ शंकराची मूर्ति आहांत आणि मी गरीब मनुष्य तुमची भक्तीनें पूजा करीत आहे, म्हणून बेलाच्या ऐवजी मी माझ्या बोलरूपी निर्गुडी वाहात आहे. त्या निर्गुडींच्या पानाचाहि तुम्हीं स्वीकार कराल ! १४. अहो! लहान मूल बापाच्या ताटांत जेवायला बसते व आपली योग्यता नस-तांनाहि प्रेमानें बापाला घांस देऊं लागतें, तेव्हां तो संतोषाच्या भरानें आपलें तोंडच घांस घेण्याकरितां त्याच्या पुढें करतो १५

---

१ अनुसंधान, लक्ष्य. २ योग्य. ३ आढ्यतेनें. ४ द्यावें. ५ लडिवाळपणाची. ६ आवड म्हणून जी वृत्ति आहे तिचे. ७ कृपादृष्टीच्या ओलाव्यानें. ८ भरास आलें. ९ श्रमलेला. १० भीति पावूं. ११ कोठें शांतता होईल. १२ अव्यवस्थित. वांकडातिकडा. १३ कौतुक. १४ आनंद पावतो. १५ प्राप्ति. १६ इच्छेने, भुकेनें, आवडीनें. १७ आपणासारखें. १८ धडे पाठ करून. १९ सरस्वतीपुत्रानें. २० तेवढा. २१ काजवा. २२ वाढूं. २३ पाकनिष्पत्ति. २४ हिम–गार आहेत कर–किरण ज्याचे असा जो तो चंद्र त्याला. २५ पंख्यानें वारा घालणें. २६ कोठें आहे २७ हुंगावें. २८ सांठवेल.

संतोषिलेनि वेगें । मुखचि वोढवी ॥ १५ ॥ तैसा मीं जरी तुम्हांप्रती । चावटी करीतसें बाळमती । तरी तुम्ही संतोषिजे ऐसी जाती । प्रेमाची असे ॥ १६ ॥ आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्हीं संत घेतले असा बहुवे । म्हणौनि केलिये सलगीचा नोहे । आभारु तुम्हां ॥ १७ ॥ अहो तान्हयांचें लागतां झटें । तेणें अधिकचि पान्हा फुटे । रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयांचेनि ॥ १८ ॥ म्हणौनि मज लेंकुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण निदैलें । तें चेइलें ऐसें जी जाणवलें । यालागीं बोलिलों मी ॥ १९ ॥ एऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चेपणीं ? । कीं वारया घापतें आहे वाहणीं ? । हां हो गगनासि गंवसणी । घालिजे केवीं ? ॥२०॥ आइका पाणी वोथिजावें न लगे । नवनीतीं माथुलों न रिगे । तेवीं लाजिलें व्याख्यान निगे । देखोनि जयातें ॥ २१ ॥ हें असो शब्दब्रह्म जिये बैजे । शब्द मावळलेया निवांतु निजे । तो गीतार्थु मऱ्हाठिया बोलिजे । हा पाडु काई ? ॥ २२ ॥ परि ऐसियाही मज धिंवसा । तो पुढति याचि येकी आशा । जे धिटींवा करूनि भवादृशां । पढियंतया होआवें ॥ २३ ॥ तरि आतां चंद्रापासोनि निववितें । जें अमृताहूनि जीवंवितें । तेणें अवधानें कीजो वाढतें । मनोरथां माझिया ॥ २४ ॥ कां जैं दिठिवां तुमचा वरुषे । तैं सकळार्थ सिद्धि मती पिके । एऱ्हवीं कोंभेलों उन्मेषु सुके । जरी उदास तुम्ही ॥ २५ ॥ सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा । तरी दोंदें पेलंती अक्षरां । प्रमेयांचीं ॥ २६ ॥ अर्थ बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रावोचि अभिप्रायातें विये । भावाचा फुलौरा होत जाये । मतिवरी ॥२७॥ म्हणौनि संवादाचा सुवावो ढळे । तऱ्ही हृदयाकाश सारस्वतें वोळे । आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे । मांडला रसु ॥२८॥ अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये । परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे । म्हणौनि वक्ता तो वक्ता नोहे । श्रोतेविण ॥२९॥ परि आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें ? । साइखडियानें काइ प्रार्थावें । सूत्रधारातें ? ॥३०॥ तो काय बाहुलियांचिया काजा नाचवी ? । कीं आपुलिये जाणिवेची कळा वाढवी । म्हणौनि आम्हां या ठेवाठेवी । काय काज ॥ ३१ ॥ तंव श्रीगुरु म्हणती काइ जाहलें । हें समस्तही आम्हां

त्याचप्रमाणें, मी जरी तुमच्याशीं बालकाप्रमाणें विनोदानें बडबड करीत आहे, तरी तुम्हांला त्या माझ्या विनोदापासून आनंदच झाला पाहिजे असा प्रेमाचा जातीस्वभावच आहे १६. आणि त्या आपलेपणाच्या प्रेमाभिमानानें तुम्ही संतजनांनीं बहुत प्रकारांनीं मला 'आपला' असें म्हणून अंगीकारले आहे. म्हणून माझ्या या सलगीचा आपणांस विषाद [ ओझें ] वाटणार नाहीं १७. अहो ! गाईच्या वासरानें सडाला ढुसण्या दिल्या तर त्यामुळें गाईला ज्याप्रमाणें अधिकच पान्हा फुटतो, त्याप्रमाणें अत्यंत प्रिय जो मनुष्य असतो, त्याच्या रागावण्यानें प्रेम दुप्पट होत असतें १८. म्हणून मज लेंकराच्या बोबड्या बोलांनीं तुमचें निजलेले कृपाळूपण जागें होईल, असें जाणूनच मी प्रतिज्ञा केल्यासारखें बोललों १९. वास्तविक पाहतां चंद्राचें चांदणें कोणी आढींत घालून पिकवितात काय ? किंवा वाऱ्याला वाहाण्याकरितां कोणी गति दिली आहे काय ! तसेंच आकाशाला गवसणी कशी घालावी ? २०. असें पहा कीं, पाणी स्वभावतःच पातळ असते. त्याला ओतण्यासारखें पातळ करावें लागत नाहीं, तसेंच लोणी तयार झाल्यावर तें रवीनें कोणी घुसळीत नाहीं. त्याप्रमाणें, ज्या गीतार्थाला म्ह. परमात्मस्वरूपाला पाहून कोणाचेहि व्याख्यान लाजून माघारी येईलच २१. फार काय सांगावें ! ज्यापुढें वेदांचेहि शब्द कुंठित होऊन तेहि ज्या परमात्म्याच्या शय्येवर निवांत निद्रा घेतात, [ब्रह्मांतच लीन होतात ] असा ब्रह्मरूपी गीतार्थ मी मराठी भाषेत वर्णन करावा अशी माझी योग्यता आहे कां ? २२. परंतु अशी स्थिति असतांहि मला पुढच्या याच एका आशेवर ब्रह्म प्रतिपादन करण्याची इच्छा उत्पन्न झाली. ती ही कीं, कसें तरी धिटाईनें बोलून आपल्या सारख्यांची कृपा संपादन करावी व आवडता व्हावें. म्हणजे त्या आपल्या कृपेनेच गीतार्थ प्रतिपादन करीन २३. तर आतां चंद्रापेक्षांहि शांत करणाऱ्या व अमृताहूनहि जीवन देणाऱ्या अशा आपल्या अवधानानें माझ्या मनोरथाला वाढते करून पुष्टी द्यावी २४. कारण, जेव्हां तुमची कृपादृष्टिरूप वृष्टि मजवर पूर्ण होईल, तेव्हां माझ्या बुद्धिरूप भूमींत सकालार्थरूप धान्य पिकेल. मला त्याचे संपूर्णतया स्फुरण होईल. एऱ्हवी जर तुम्ही उदास रहाल तर अंकुरदशेंत आलेलें माझें ज्ञानहि सुकून जाईल २५. तरी ऐका. सहजच वक्त्याच्या वक्तृत्वरूप पांखराला आपल्यासारख्या श्रोत्यांचा अवधानरूप चारा मिळाल्यावर, त्याच्या प्रत्येक अक्षररूपी अवयवाला सिद्धान्तार्थरूपी पुष्टि येईल २६. अर्थ हा वक्त्यांच्या मुखांतून शब्द बाहेर पडण्याची वाटच पाहील; शब्द बाहेर पडल्यावर त्यांतून एका अर्थापासून दुसरा अर्थ असें अनेक अर्थ निघतील आणि बुद्धीला भावात्मक फुलांचा बहर येऊन नानाप्रकारचे अभिप्राय सुचूं लागतील २७. म्हणून तत्त्वबोधद्वारां हितकर असा संवादरूपी अनुकूल वारा सुटला तर वक्त्याच्या हृदयाकाशात शास्त्रसिद्धांतरूपी मेघ भरून येतील आणि श्रोता दुश्चित म्ह. जर ऐकणारांचें दुर्लक्ष असलें, तर वक्तृत्वाला आलेला रंगहि वितळून जाईल [ असा अनुभव आहे ] २८. अहो, चंद्रकांत मण्याला पाझर फुटतो, ही गोष्ट तर खरीच; पण त्यास पाझरावयास लावण्याची ही शक्ति चंद्रकांताची नाहीं चंद्राचीच आहे. त्याप्रमाणें वक्त्यांच्या व्याख्यानांत रसालंकारोत्पादनाची शक्ति वक्त्याची नाहीं, श्रोत्याचीच आहे; म्हणून अवधानपूर्वक ऐकणाऱ्या श्रोत्याशिवाय वक्त्याला वक्तेपणाच नाहीं २९. पण मला आपल्यापुढें अशी प्रार्थना करण्याची आवश्यकताच नाहीं. कारण, माझें वक्तृत्व चांगले व्हावें असें आपणास करणें भागच आहे. पहा कीं—"आतां आम्हांला गोड करून घ्या", अशी तांदुळांना जेवणारांची विनंती करावी लागते काय ? तसेंच कळसूत्री बाहुल्यांनीं 'आम्हांला चांगलें नाचवा' म्हणून सूत्रधाराची विनंती करावी लागते काय ? ३०. तो सूत्रधार काय बाहुल्यांच्या कामाकरितां त्यांना नाचवितो ? तर नाहीं. मग तो आपल्या ज्ञानाची कुशलता दाखवून चातुर्य वाढविण्यासाठीं त्यांना नाचवितो. त्याप्रमाणें मी बाहुलें आहे, आपण जसें बोलवाल तसें मी बोलणार ! म्हणून मला असें बोलवा तसें बोलवा "अवधान द्या" वगैरे श्रोत्यांची प्रार्थना करण्याच्या उठाठेवीचे आम्हांला काय काम आहे ? ३१. त्या वेळीं श्रीगुरु निवृत्तिराज म्हणतात, अरे ! झाले तरी काय ? इतकें व्याख्यान

१ भरानें. २ पुढे करी. ३ विनोद. ४ अभिमानानें. ५ बहुत, फार प्रकारानीं. ६ लडिवाळपणाचा. ७ उपकार, भार, जड. ८ वासराचें. ९ स्तनामुखाची भेट. १० रागावण्यानें. ११ दुणावतें. १२ अत्यंत प्रियाचें. १३ निजलेलें. १४ जागृत जाहलें. १५ आढींत. १६ दिली आहे. १७ गति, मार्ग. १८ पातळ करावें. १९ रवी. २० माघारी येतें. २१ वेद. २२ बाजेवर, पलंगावर. २३ इच्छा. २४ धीटपणा २५ आपणासारख्याला. २६ आवडतें, प्रीतिपात्र. २७ वांचविणारें. २८ कृपादृष्टी. २९ कोंभ फुटून वाढीस लागलेलें ज्ञान. ३० पुढें येतील. ३१ सिद्धांतांची.

पावलें । आतां सांगैं जें निरोपिलें । नारायणें ॥३२॥ येथ संतोषोनि निवृत्तिदासें । जी जी म्हणौनि उल्हासें । अवधारा श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाहले ॥ ३३ ॥

श्रीभगवानुवाच :—

इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे । ज्ञानंविज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

नातरि अर्जुना हें बींज । पुढती सांगिजेल तुज । जें हें अंतःकरणींचें गुज । जिवाचिये ॥ ३४ ॥ येणें मानें जीवाचें हियें फोडावें । मग गुज कां पां मज सांगावें ? । ऐसें कांहीं स्वभावें । कल्पिशी जरी ॥ ३५ ॥ तरी परियेसी गा प्राज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा । बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥ ३६ ॥ म्हणौनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलणेंही बोलावें घडो । परि आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं ॥३७॥ अगा थानीं कीर दूध गूढ । परि थानासीचि नव्हे कीं गोड । म्हणौनि सेरो कां सेवितयाची चाड । जरी अनन्यु मिळे ॥३८॥ मुडांहूनि बीज काढिलें । मग निर्वाळलिये भूमीं पेरिलें । तरि तें सांडीविखुरीं गेलें । म्हणों ये कायी ? ॥ ३९ ॥ यालागीं सुमनु आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती । पैं गा गौप्यही परी तयाप्रती । चावळिजे सुखें ॥ ४० ॥ तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं । तूं वांचून आणिक नाहीं । म्हणौनि गुज तरी तुझ्या ठायीं । लपऊं नये ॥ ४१ ॥ आतां किती नावांनावा गुज । म्हणतां कानडें वाटेल तुज । तरी ज्ञान सांगेन सहज । विज्ञानेंसीं ॥ ४२ ॥ परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें कुडें । मग काढिजे फांडोवाडें । पारखूनियां ॥ ४३ ॥ कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय पाणी राजहंसें । तुज ज्ञान विज्ञान तैसें । वांटूनि देऊं ॥ ४४ ॥ मग वारयाचिया धारसां । पडिन्नला कोंडा कां नुरेचि जैसा । आणि कणांचा आपैसा । रासिवा जोडे ॥ ४५ ॥ तैसें जें जाणितलेयासाठीं । संसार संसाराचिये गांठीं । लाऊनि बैसवी पाटीं । मोक्षश्रियेच्या ॥ ४६ ॥

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् । प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

जे जाणणेया आघवेयांच्या गांवीं । गुरुत्वाची आचार्य पदवी । जें सकळ गुह्यांचा गोसांवी । पवित्रां रावो ॥ ४७ ॥ आणि धर्माचें निजधाम । तेवींची उत्तमाचें उत्तम । पैं जेया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥ ४८ ॥ मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपे-

कशाला करायला पाहिजे ? तुझा सर्व अभिप्राय आम्हांला कळला. तर आतां श्रीकृष्णांनीं जें अर्जुनास सांगितलें तें श्रोत्यांना सांग ३२. तेव्हां श्रीनिवृत्तिदास, श्रीज्ञानदेव संतोष पावून मोठ्या उल्हासानें म्हणाले, होय महाराज, ऐका. श्रीकृष्ण असें बोलले ३३.

**अन्वयार्थ**—**तु**–आतां–**इदं गुह्यतमं विज्ञानसहितं ज्ञानं**–हें अतिशय गुह्य अनुभावासह आत्मज्ञान–**अनसूयवे**–माझ्या गुणामध्यें दोषदृष्टी न ठेवणाऱ्या–**ते**–तुला–**प्रवक्ष्यामि**–सांगेन–**यत्**–जें ज्ञान–**ज्ञात्वा**–जाणून–झालें असतां–**अशुभात्**–अशुभ संसारापासून–**मोक्ष्यसे**–तूं मुक्त होशील १.

अथवा अर्जुना माझ्या अंतःकरणांतील जीवाचे अति गुह्य असें जें [ ज्ञानाचें आदिकारण, जे परमात्म तत्त्व ] ते तुला पुनः सांगतो ३४.आतां या मानानें हे जीवाचें आंतरिक गुह्य फोडून तें तुला मी कां सांगतो, अशी जर कदाचित् तुझ्या मनांत सहज शंका येईल ३५. तर बाबारे, ऐक. तूं समजदार असून केवळ आस्थेची, श्रद्धेची मूर्ति आहेस आणि आम्ही जें तुला सांगतों त्याची अनादरानें तूं हेळसांड करीत नाहींस ३६. म्हणून आमची गुह्य गोष्ट बाहेर पडून त्याचे गुप्तपणे मोडलें,तर मोडो शिवाय न बोलावयाची गोष्ट, तीहि बोलावी लागली तरी लागो, पण आमच्या हृदयांतील गुह्य गोष्ट म्ह. तत्त्वज्ञान तुझ्या हृदयांत पडो, उदय पावो ३७. अरे खरोखर स्तनांत गुप्तपणें दूध सांठविलेले असतें तरी त्याची गोडी स्तनाला नसतें, जर अनन्यभावानें सेवन करणारा मिळाला तर त्याची स्तनपान करून इच्छा तृप्त होण्यासाठीं तें आपल्या स्तनांतील दूध सरलें तरी हरकत नाहीं ३८. मुढ्यांतून बी काढलें तें निर्मळ तयार केलेल्या जमिनींत पेरलें, तर तें सांडीलवंडीवारी गेलें असें म्हणतां येईल काय ? ३९ याकरितां प्रशस्त सरळ अंतःकरणाचा, शुद्ध बुद्धीचा, निंदा न करणारा व एकनिष्ठ असा [तुझ्यासारखा] जर भक्त श्रोता असेल, तर त्याला आपली मनांतील गुप्त गोष्टहि आनंदानें सांगावी; ४०. तर ह्या गुणांनी संपन्न असा सांप्रत तुजवांचून इतर दुसरा कोणी नाहीं, म्हणून गुप्त अशी ही गोष्ट खरी तरीहि ती तुझ्यापासून चोरून ठेवणें मला योग्य वाटत नाहीं ४१. आतां वारंवार "गुप्त गुप्त" म्हणून वाखाणणी करणें तुला चमत्कारिक, कंटाळवाणें वाटेल तर आतां तें गुह्य म्हणजे विज्ञानरूप प्रापंचिक ज्ञानासह ब्रह्मज्ञान सांगतों ४२. परंतु खरें किंवा खोटें नाणें एकत्र मिसळल्यावर ज्याप्रमाणें फाडी-परीक्षा करून लावून निराळें करितात, त्याप्रमाणें ज्ञान व विज्ञान निराळें करून दाखवितों ४३. किंवा, राजहंसानें आपल्या चोंचीची सांडस करून एकत्र मिसळलेले दूध व पाणी निरनिराळे करावें त्याप्रमाणें हें ज्ञान आणि हे विज्ञान असा तुला स्पष्ट विभाग करून सांगतों ४४. म्हणजे मग मळणी करून एकत्र मिसळलेले कोंडा व धान्य उपणण्याकरितां वाऱ्यावर धरलें असतां कोंडा उडून जाऊन धान्याची खाली सहज रासच उर्वरित राहते ४५. त्याप्रमाणें जें जाणल्याबरोबर शरीराची आणि जन्ममरणरूपी संसाराची परभारे गांठ वाळून देऊन मुमुक्षूस आत्मस्वरूपमोक्षैश्वर्याच्या पट्टावर नेऊन बसवितें ४६.

**अन्वयार्थ**—**राजविद्या**–[ हे ज्ञान ]–विद्यांचा राजा–**राजगुह्यं**–गुह्यांचा राजा–**पवित्रम्**–अत्यंत पावन–**इदम् उत्तमम्**–असें हें उत्तम ज्ञान आहे–**प्रत्यक्षावगमं** यांचें ज्ञान–अनुभव प्रत्यक्ष येतो–**धर्म्यं**–हें धर्माला धरून आहे–**कर्तुं सुसुखं**–हें संपादन करण्यास सुलभ व–**अव्ययम्**–अव्यय आहे, कर्मांच्या फलाप्रमाणें याचें फल क्षीण होत नाहीं २.

ज्याला या ब्रह्मात्मैक्य ज्ञानाला सर्व ज्ञानाच्या गांवात मुख्य श्रेष्ठत्वाच्या आचार्य पदवीचें स्थान मिळतें, जें [ ब्रह्मात्मैक्य ज्ञान ] सर्व गुह्यांचा स्वामी, असून पवित्र वस्तूंत राजाच आहे ४७. आणि जें ज्ञान धर्मांचें अधिष्ठान असून सर्व उदयांत उत्तम आहे व ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असतां पुनः दुसरा जन्म घेण्याचे कारणच राहात नाहीं ४८. जें ब्रह्मज्ञान श्रीगुरूंच्या मुखानें तत्त्वमस्यादि महावाक्यद्वारां अमळसें उदय पावल्यासारखें दिसतें;

१ ज्ञानाचें आदिकरण. २ गुह्य ३ मूर्ति. ४ गुप्त. ५ पूर्ण होवो. ६ अन्य आश्रय न करणारा, एकनिष्ठ. ७ मुढ्यांतून. ८ तयार केलेल्या, साफ केलेल्या. ९ सांडी—लवंडीवारी गेलें. १० प्रसन्न अंतःकरणाचा. ११ सांगावें. १२ वारंवार. १३ कंटाळवाणें. १४ ब्रह्मज्ञान. १५ प्रापंचिक ज्ञानासह. १६ मिसळलें. १७ खोटें. १८ स्पष्ट करून, फाडी लावून. १९ चोंचीचें. २० निरनिराळें करावें. २१ प्रवाहांत. २२ ढीग, रास. २३ जाणल्याबरोबर. २४ जन्ममरण. २५ संसार तेलाच्या हवाली करून. २६ सिंहासनावर. २७ ज्या ज्ञानाला. २८ महत्त्वाची. २९ स्वामी. ३० ज्या ज्ञानाला. ३१ कारण. ३२ थोडें. ३३ उदयास येतें. ३४ प्राप्त होतें.

सयाचि ॥ ४९ ॥ तेवींचि गा सुखाच्या पाउटीं । चढतां येइजे जयाच्या भेटी । मग भेटल्या कीरं मिठी[३] । भोगणेंयाही पडे ॥ ५० ॥ परि भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे[४] । चित्त उभें ठेलें सुखा भरे । ऐसें सुलभे आणि सोपारें । वरि परब्रह्म ॥ ५१ ॥ पैं गा आणिकही एक याचें । जें हातां आलिया तरी न वचे । आणि अनुभवितां कांहीं न वेचे । वरि विटेहि ना ॥ ५२ ॥ येथ जरी तूं तार्किका । ऐसी हंन घेसी शंका । ना येवढी वस्तु हे लोकां । उरली केविं पां ? ॥ ५३ ॥ जे एकोत्तरेयाचिया वाढी । जळतिये आगीं घालिती उडी । ते अनायासें स्वगोडी । सांडिती केवीं ? ॥ ५४ ॥ तरी पवित्र आणि रम्य । तेवींचि सुखोपाय गम्य । आणि स्वसुख परम धर्म्य वरि आपणपां जोडे ॥ ५५ ॥ ऐसा अवघाचि हा सुरवाडु आहे । तरी जना हातीं केविं उरों लाहे । हा शंकेचा ठावो कीर होये । परि न धरावी तुवां ॥ ५६ ॥

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप । अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पासी त्वचेचिया पदराआड । परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्ध काय न सेविती ? ॥ ५७ ॥ कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं । परि परागु सेविजे भ्रमरीं । येरां चिखलुचि उरे ॥ ५८ ॥ नातरी निदैवाच्या परिवरीं । लोह्या रुतलिया आहाति सहस्रवरी । परि तेथ बैसोनि उपवासु करी । कां दरिद्रें जिये ॥ ५९ ॥ तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु । कीं भ्रांतासी कामु । विषयावरी ॥ ६० ॥ बहु मृगजळ देखोनि डोळां । थुंकिजे अमृताचा गिळितां गळाळा । तोडिला परिसु बांधिला गळां । शुक्तिकालाभें ॥ ६१ ॥ तैसी अहंममतेचिये लवडसवडी । मातें न पवतीची बापुडीं । म्हणौनि जन्ममरणाची दुथडीं । डहुळितें ठेलीं ॥ ६२ ॥ एऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु कां जैसा । कहीं दिसे न दिसे ऐसा । वाणीचा नोहे ॥ ६३ ॥

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥

माझेया विस्तारलेपणा नांवें । हें जगाचि नोहे आघवें ? । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ ६४ ॥ कां बीजचि जाहलें तरु । अथवा भांगारचि अळंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ ६५ ॥ हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें । तैसें अमूर्तमूर्ति मियां विस्तारलें ।

पण ते शिष्याच्या ह्रदयांत नित्य स्वतः सिद्धच असते. तसे तें [ ब्रह्म ] स्वयंप्रकाश असल्यामुळें त्यास सहजच प्रत्यक्ष अनुभवास येऊं लागतें ४९. त्याचप्रमाणें, सुखाच्या पायरीनें चढत गेलें असतां ज्याची भेट होते; आणि मग जे भेटले असतां निश्चय करून भोक्ता-योग्य-भोगणे ही त्रिपुटीच संपते ५०. परंतु ज्या भोगप्राप्तीच्या सुखाच्या अलीकडील काठांवर उभे राहिले असतांहि चित्त आनंदानें भरून जाते, असें ते सुलभ आणि सोपें असून शिवाय तेच परब्रह्म होय ५१. खरोखर या ज्ञानांत आणखीहि एक गुण आहे; तो हा कीं, हें ज्ञान प्राप्त झालें असतां तें कधींहि नाहीसें होत नाहींत; हे अनुभविले असता मुळीहि कमी होत नाही. शिवाय विटतहि नाही ५२. हें तर्ककुशल अर्जुना, आतां तूं जर अशी शंका घेशील कीं, एवढी [ ज्ञानासारखी ] अप्रतिम वस्तु असतां, लोकांच्या हातून, नजरेंतून कशी बाजूला राहिली ? म्हणजे इतक्या उत्तम वस्तूच्या प्राप्तीकरितां लोक कां प्रयत्न करीत नाहींत ? ५३. कारण जे लोक एकोत्रा [ म्ह० शंभरास एक रुपाया ] व्याजाकरितां ठगास पैसे देण्याच्या आगींतहि उडी घालण्यास मागेंपुढें पाहात नाहींत; ते लोक सहज आपल्या ठिकाणींच असलेली स्वस्वरूपात्मक ब्रह्मानन्दाची गोडी कशी टाकतील ? ५४. तरी पवित्र आणि रमणीय, तसेंच सुखोपायानेंच प्राप्त होणारे, जाणण्यास सुलभ, अति सुखकारक, धर्माला पूर्ण अनुकूल, शिवाय आपले ठिकाणींच आपणांस प्राप्त होणारें; ५५. याप्रमाणें सर्व गोष्टी अनुकूल, सुखकर असतांहि, लोकांच्या हातीं लागल्याशिवाय हें कसें राहिलें ? ही शंका घेण्यास जागा आहे खरी; परंतु तूं अशी शंका धरूं नकोस ५६.

**अन्वयार्थ—परंतप**-हे अर्जुना !-**अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः**- या आत्मज्ञानरूप धर्मावर श्रद्धा न ठेवणारे-**पुरुषाः**-पुरुष-**मां**-मला-**अप्राप्य**-प्राप्त न होऊन-**मृत्यु संसारवर्त्मनि**-मृत्युयुक्त संसारमार्गांत-**निवर्तन्ते** निवृत्त होतात-संसारमार्गांत परत येतात ३.

हे पहा ! गाईचें दूध हें पवित्र असून गोड आहे; तसेंच अगदीं जवळ कासेच्या त्वचेच्या पडद्याच्या आंतच आहे; परंतु त्याचा त्याग करून गोचीड अशुद्ध म्ह० रक्ताचे सेवन करीत नाहीं काय ? ५७. किंवा कमळाचा कांदा व बेडूक हें एकेच ठिकाणीं वास्तव्य करितात, परंतु कमळांतील मकरंदाचें सेवन भ्रमर [ दुरून येऊन ] करितात व जवळ असणाऱ्या बेडकांच्या वांट्याला केवळ चिखलच उर्वरित राहातो ! ५८. अथवा दुर्दैव्याच्या घरीं हजारो मोहरांनीं भरलेल्या कढया पुरलेल्या असूनहि [त्याला त्याचे ज्ञान नसल्यामुळें] तो तेथे बसून उपास काढून व दरिद्रावस्था भोगून जीवित कंठितो ५९. त्याप्रमाणें प्राणिमात्राच्या सर्व सुखांचें विश्रांतिस्थान, सर्व सुखाचा जणुं उपवनच असा मी "राम" प्राण्यांच्या ह्रदयांत असतांना [ त्याचेवर अज्ञानाचे आवरण असल्यामुळें ] भ्रांत अज्ञानी जीवाची विषयांवर वासना असते ६०. किंवा पुष्कळसे मृगजळ डोळ्यांनीं पाहून जसा मुर्खानी तोंडांत गिळत असलेला अमृताचा घोट थुंकून टाकावा किंवा शिंप मिळाली असतां [ तिच्या चकचकीतपणास भुलून ] गळ्यांत बांधलेला परीस तोडून टाकावा ६१. त्याचप्रमाणें ज्यांच्या मनावर [ अविवेकामुळें शरीर व शरीरसंबंधी पुत्रादिकांविषयीं ] अहं ममतेचा पगडा बसलेला आहे ते बिचारे 'मी माझे' या लगबगींत मला प्राप्त होत नाहींत, म्हणूनच ते जन्म व मरण यांच्या दोन थड्या असलेल्या भवनदींत बुचकळ्या, गटंगळ्या, धक्के खात बसतात ! ६२. सहज विचार करून मी कसा आहे हे पाहिले असतां सूर्य ज्याप्रमाणें वाटेल तिकडून पाहणाराला आपल्या तोंडासमोर दिसतो; तसा मीं सर्वांस सदा समोर म्ह० सामान्यरूपानें प्रत्यक्ष आहे तथापि केव्हां म्ह० दिवसा दिसणें व केव्हां म्ह० रात्रीं न दिसणें ही वा अशी जी उणीव त्या सूर्यांत आहे ती माझ्या ठिकाणीं नाहीं ६३.

**अन्वयार्थ—मया अव्यक्तमूर्तिना**-ज्याचें स्वरूप व्यक्त नाहीं अशा मी-**इदं सर्वं जगत्**-हें सर्व जगत्-**ततं**-व्यापलें आहे-**सर्वभूतानि**-सर्व भूतें-**मत्स्थानि**-माझ्यामध्यें स्थित आहेत-**च**-पण-**अहं**-मी-**तेषु**-त्या भूतांमध्यें-**न अवस्थितः**-अवस्थित नाहीं-मी त्या भूतांत राहिलेलो नाहीं ४.

अरे ! माझा [ निर्गुण स्वरूपाचा ] विस्तार म्हणजेच हें सर्व जग नव्हे काय ? ज्याप्रमाणें, दूध विरजले असतां तेंच स्वभावतः दहीं होते ६४. किंवा बीजच वृक्ष झालें अथवा सुवर्णच अलंकार होते त्याचप्रमाणें निर्गुण असा जो एकटा मी, त्या माझ्या [ त्या माझ्यापासून मायाद्वारां ] जो विस्तार, अरे तेंच हें जग आहे ६५. माझें स्वरूप जगदुत्पत्तिपूर्वी अव्यक्त असतें, तेव्हां निराकार असतें; तेच मग मायेच्या संबंधानें सृष्टीच्या रूपानें विस्तार पावून

१ पायरीनें. २ खचित. ३ ज्याची भेट झाली असतां भोगणाराही उरत नाहीं. ४ सीमेवर. ५ सुखानें भरलेलें.

६ सोपे, सुगम. ७ अनायासें मिळण्याजोगें. ८ आणखी. ९ कल्पना चालविणाऱ्या. १० कदाचित्, जर. ११ सोप्या उपायानें.

त्रैलोक्य जाणें ॥ ६६ ॥ महदादि देहांतें । इयें अशेषेंही भूतें । परी माझ्या ठायीं बिंबतें । जैसें जळीं फेण ॥ ६७ ॥ परि तया फेणांआंतु पाहातां । जेवीं जळ न दिसे पंडुसुता । नातरी स्वप्नींची अनेकता । चेइलिया नोहिजे ॥ ६८ ॥ तैसीं भूतें इयें माझ्या ठायीं । बिंबती तयांमाजीं मी नाहीं । इया उपपत्ती तुज पाहीं । सांगितलिया मागां ॥ ६९ ॥ म्हणौनि बोलिलिया बोलाचा अतिसो ! । न कीजे यालागीं हें असो । परी मज आंत पैसो । दिठी तुझी ॥ ७० ॥

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् । भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

आमुचा प्रकृतीपैलीकडील भांवो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों । तरी मजमाजीं भूतें हेंही वावो । जें मी सर्व म्हणौनी ॥ ७१ ॥ एऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळे । नांवेक तिमिरेजेंती बुद्धिचे डोळे । म्हणौनि अखंडितचि परि झांवळे । भूतभिन्न ऐसें देखे ॥ ७२ ॥ तेचि संकल्पाची सांज जैं लोपे । तैं अखंडिताचि आहे स्वरूपें । जैसें शंका जातखेंवो लोपे । सापपण माळेचें ॥ ७३ ॥ एऱ्हवीं तरी भूमीआंतूनि स्वयंभ । काय घडेयांगाडगेयाचे निघती कोंभ ? । परि ते कुलालमतीचे गर्भ । उमटले कीं ॥७४॥ नातरी सागरींच्या पाणी । काय तरंगाचिया आहाती खाणी ? । ते अवांतर करणी । वारयाची नव्हे ? ॥ ७५ ॥ पाहें पां कापसाच्या पोटीं । काय कापडाची होती पेटी ? । तो वेढितयाचिया दिठी । कापड जाहला ॥ ७६ ॥ जरी सोनें लेणें होउनी घडे । तरी तयाचें सोनेंपण न मोडे । येर अळंकार हे वेरचिलीकडे । लेतयाचेनि भावें ॥७७॥ सांगें पडिसादाचीं प्रत्युत्तरें । कां आरिसां जें आविष्करें । तें आपलें कीं साचोकारें । तेथेंचि होतें ? ॥ ७८ ॥ तैसी इये निर्मळे माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी । तयासी तयाच्या संकल्पीं । भूताभासु असे ॥ ७९ ॥ तेचि कल्पिती प्रकृती पुरे । तरि भूताभासु आधींचि सरे । मग स्वरूप उरे एकसरें । निखळ माझें ॥ ८० ॥ हें असो आंगीं भरलिया भवंडी । जैशा भोंवत दिसती अरडीदरडी । तैशी आपुलिया कल्पना अखंडीं । गमती भूतें ॥ ८१ ॥ तेचि कल्पना सांडूनि पाहीं । तरि मी भूतीं भूतें माझिया ठायीं । हें स्वप्नींही परि नाहीं । कल्पावयाजोगें ॥ ८२ ॥ आतां मीच एक भूतांतें धर्ता । अथवा भूतांमाजीं मी असता । या

आकाराला येते. म्हणजे मी तत्त्वत: निर्गुण असून मायोपाधीमुळें साकार होतो. मी अधिष्ठानरूपानें हें त्रैलोक्य व्यापलें असें जाण ६६. महत्तत्त्वापासून तो देहापर्यंत हीं सर्व भूतें खरोखर माझ्याच सत्तेवर मिथ्या भासतात, ज्याप्रमाणें पाण्याच्या ठिकाणीं फेंस भासतो ६७. परंतु त्या फेसाच्या आंत पाहिलें असतां पाणी दिसत नाहीं. किंवा अर्जुना! स्वप्नांत जिवाचें अनेकपण, अनेक दृश्य इत्यादि ज्याप्रमाणें जागे झाल्यावर पार नाहींसें होतात ६८. त्याचप्रमाणें हीं सर्व भूतें जरी माझ्या ठिकाणीं भासलीं तरी मी नाहीं हा युक्तिपूर्णविचार तुला मागे [ अ. ७ श्लोक १२ ] सांगितलाच आहे ६९. म्हणून पुन: पुन: तीच तीच गोष्ट काय सांगावी? ते विस्ताराचे बोलणें राहूं दे. माझी इच्छा एवढीच आहे कीं, तुझी दृष्टि माझ्या यथार्थ स्वरूपाला आत्मत्वाने ज्ञान संपादनार्थ पोहचो म्हणजे माझ्या स्वरूपाचें यथार्थ ऐक्यज्ञान तुला होवो म्हणजे झाले ७०.

**अन्वयार्थ—भूतानि**–सर्व प्राणी–**मत्स्थानि**–वस्तुतः माझ्यामध्यें–**न च**– नाहींत– **मे**– माझें–**ऐश्वरम्**–ईश्वरासंबंधीं–**योगं**–स्वरूप– **पश्य** –पहा **भूतभृत्** –मी सर्व भूतांचें धारण–पोषण करणारा **आहे**–**च**–पण–**भूतस्थः न**–भूतांत राहिलेलों नाहीं–**मम आत्मा**–माझें स्वरूप–**भूतभावनः**–सर्व भूतांना उत्पन्न करणारें आहे ९.

माझ्या स्वरूपाच्या आड येणारी माया आणि तुला भ्रमांत पाडणारीं कल्पना, त्या माया आणि कल्पना दोन्ही टाकून देऊन तत्पदलक्ष्यभूत व त्वंपदलक्ष्यभूत अखंडैकरस निरुपाधिक असें माझें यथार्थरूप पाहूं लागलास तर तुला असें दिसून येईल कीं, माझें आश्रयावर सर्व भूते आहेत असें आतांच तुला सांगितलें. ते सर्व मिथ्या आहे, वस्तुतः भूतेबीते कांहीं नाहीं. सर्व कांहीं मीच आहे असा तुझा निश्चय होईल ७१. अशी वस्तुस्थिति असूनहि संकल्परूप संध्याकाळचे वेळेस जीवाचे ज्ञानरूप डोळे [ अज्ञानरूप अंधकारानें ] कांहीं वेळ झांकले जातात, बुद्धिदृष्टि मंद होते म्हणून मी अखंडैकरस असतां ते अस्पष्ट होते व भूतें मजहून निराळीं असल्यासारखी दृष्टीस पडतात ७२. ज्याप्रमाणें माळेवरील [ किंवा रज्जूवरील ] सापाची भ्रांति गेल्याबरोबर माळ [ मूळ स्वरूपानें ] शिल्लक राहतें; त्याप्रमाणें त्याच संकल्परूपी संध्याकाळची वेळ नाहींशी झाल्याबरोबर, माझें अखंडित एकरस स्वरूपच अवशेष राहातें ७३. सहज विचार करून पाहिले तर भूतभेदाच्या प्रतीतीला पाहाणाराचा अज्ञानजन्य संकल्पच कारण आहे, हे पक्कें समज. ह्यांस दृष्टांत–घागरी, मडकीं वगैरेंचे जमिनींतून आपोआप काय आकारात्मक कोंभ निघतात? तर नाहीं! परंतु कुंभाराच्या बुद्धीच्या कल्पनेचेच ते सर्व आकार उमटले आहेत ७४. किंवा समुद्राच्या पाण्यांत लाटांच्या खाणी आहेत काय? तर तें रूपांतरात्मक लाटाचे कृत्य वाऱ्याचें नाहीं काय? ७५. हें पहा! कापसाच्या पोटांत कापडाचे गठ्ठे आहेत काय? नेसणाराच्या समजुतीनें तो कापूस कापड बनला आहे! ७६. जरी सोन्याचे दागिने बनविले तरी त्याचे सोनेंपण नाहींसें होत नाहीं; बाकी स्थूलदृष्टीनें वरपंग सोन्यापेक्षां वेगळे अलंकार भासतात ते वापरणाराच्या कल्पनेनेंच ७७. आपल्या शब्दांची जी प्रतिध्वनिरूप प्रत्युत्तरें ऐकूं येतात किंवा आरशांत जें आपलें प्रतिबिंबित स्वरूप आपण पाहतों तो खरोखर आपल्या बोलण्याचा किंवा पाहाण्याचा परिणाम आहे किंवा आपल्या पूर्वीच तें तेथें खरेपणानें होतें? सांग बरें? ७८. त्याप्रमाणें, ह्या माझ्या निरुपाधिक विशुद्ध स्वरूपावर जो भूतांच्या कल्पनेचा आरोप करितो, त्याला त्याच्याच कल्पनेमुळें [ माझ्या ठिकाणीं ] भूतांचा भास होतो ७९. तीच कल्पना करणारी प्रकृति संपली म्हणजे माझ्या ठिकाणचा भूतांचा भास वस्तुतः अगोदरचाच संपलेला असतो; मग माझें निरुपाधिक असें जें शुद्ध स्वरूप, तेंच निखालस एकसारखें उरतें ८०. हें असो, आपण आपल्याभोंवतीं गरगर फिरले असतां अंगांत भोंवंड आल्यामुळें ज्याप्रमाणें भोंवतालची गिरीकंदरें वगैरे फिरतात असें दिसतात, त्याप्रमाणें आपल्याच कल्पनेमुळें अखंड ब्रह्मस्वरूपांत भूतांचा भास होतो ८१. तीच कल्पना सोडून जर पाहिलें, तर मी भूतांच्या ठिकाणीं व भूतें माझ्या ठिकाणीं आहेत, अशीहि स्वप्नांत देखील कल्पना करण्यासारखी गोष्ट नाहीं. [ सारा काल्पनिक द्वैतभाव नाहींसा होतो ] ८२. आतां, 'मीच एक भूतांचा धारण करणारा अथवा भूतांत असणारा' वा सर्व गोष्टीची बोलणी संकल्परूप

१ महत्तत्त्वापासून देहापर्यंत. २ सर्व. ३ प्रतिबिंबित झालेली. ४ जागें झाल्यावर. ५ उपपादन. ६ पाल्हाळ. ७ स्वरूप, सत्ता. ८ मिथ्या. ९ संध्याकाळीं. १० कांहीं वेळ. ११ अंधुक होतात. १२ झांजडींत, काळोखांत. १३ वेगवेगळीं भूतें. १४ जातांक्षणीं. १५ घडीव घागर–मडक्यांचें. १६ कुंभाराच्या बुद्धीचें. १७ ती वाऱ्याचीच स्वतंत्र कृति नव्हे काय? १८ गठ्ठा. १९ कोष्टयाच्या, वापरणाराच्या. २० वरवर पहाता. २१ लेणाराच्या, घालणाऱ्याच्या. २२ प्रतिध्वनीच्या. २३ आरशांत. २४ प्रगट होतें. २५ खरेंपणानें. २६ भूतांची कल्पना. २७ स्थायन करितो.

संकल्पसंन्निपाता- । आंतुलिया बोलिया ॥ ८३ ॥ म्हणौनि परियेसी गा प्रियोत्तमा । यापरी मी विश्वेंसीं विश्वात्मा । जो इया लटाकिया भूतग्रामां । भाव्यु सदा ॥ ८४॥ रश्मीचेनि आधारें जैसें । नव्हे तेंचि मृगजळ आभासे । माझ्या ठायीं भूतजात तैसें । आणि मातेंहीं भांवी ॥ ८५ ॥ मी ये परीचा भूतभावनु । परि सर्व भूतांसि अभिन्नु । जैसी प्रभा आणि भानु । एकचि ते ॥ ८६ ॥ हा आमुचा ऐश्वर्ययोगु । तुवां देखिला कीं चांगु ? । आतां सांगें कांहीं एथ लागु । भूतभेदाचा असे ? ॥ ८७ ॥ यालागीं मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें निरुतें । आणि भूतांवेगळिया मातें । कहींच न मनीं हो ! ॥ ८८ ॥

यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् । तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

पैं गगन जेवढें जैसें । पवनुहि गगनीं तेवढाचि असे । सहजें हालविलिया वेगळा दिसे । एऱ्हवीं गगन तेंचि तो ॥ ८९ ॥ तैसें भूतजात माझ्या ठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं । निर्विकल्पीं तरी नाहीं । तेथ मीचि मी आघवें ॥ ९० ॥ म्हणौनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचेनि सौरसें । जें कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ॥ ९१ ॥ तेंचि कल्पितें मुद्दल जाये । तैं असे नाहीं हें कें आहे ? । म्हणौनि पुढती तूं पाहे । हा ऐश्वर्ययोगु ॥ ९२ ॥ ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणेयातें कल्लोळु एक करीं । मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूंचि आहासी ॥ ९३ ॥ या जाणणेयाचा चेवो । तुज आला ना ? म्हणती देवो । तरी आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ? ॥ ९४ ॥ तरी पुढती जरी विपायें । बुद्धीसी कल्पनेची झोंप ये । तरी अभेदबोधु जाये । जैं स्वप्नीं पडिजे ॥ ९५ ॥ म्हणौनि ये निद्रेची वाट मोडे । निखिळ उद्बोधाचेंचि आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ॥ ९६ ॥ तरी धनुर्धरा धैर्या[२६] । निकें अवधान देईं बा धनंजया । पैं सर्व भूतांतें माया । करी[२७] हरी गा ॥ ९७ ॥

सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् । कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

जिये नांव गा प्रकृती । जे द्विविधा सांगितली तुजप्रती । एकी अष्टधा भेदव्यक्ती । दुजी जीवरूपा ॥ ९८ ॥ हा प्रकृतीविखो आघवा । तुवां मागां परिसिलासी पांडवा । म्हणौनि असो काइ सांगावा । पुढतपुढती ॥ ९९ ॥ तरी

सन्निपात वायूच्या लहरींतील बडबडी आहेत ८३. म्हणून हे प्रियोत्तमा ! ऐक ! अशाप्रकारें मी सृष्टीचा विश्वात्मा किंवा या मिथ्या भूतसमुदायास सदा आधार आहे ८४. ज्याप्रमाणें वास्तविक सूर्याच्या किरणाच्या आधारावर नसून मिथ्या मृगजळ केवळ भासते एवढेंच. त्याप्रमाणें माझ्या निर्गुण स्वरूपाच्या ठिकाणीं सर्व भूतें मिथ्या आहेत असें समज. इतकेंच नव्हे तर मीहि एक त्यांच्यामध्यें अधिष्ठानरूपानें व्याप्त असून त्रिकालाबाधित सत्य आहे असें समज ८५. ह्या प्रकारें करून मी भूतांची उत्पत्ति कर्ता आहे असें म्हणतात. परंतु वास्तविक भूतें आणि मी एकच. ज्याप्रमाणें सूर्य व सूर्याची प्रभा हीं दोनहि एकच असतात ८६. हेंच आमच्या निर्गुण स्वरूपाचें ऐश्वर्य आहे. हा आमचा 'ऐश्वर्ययोग' तुला चांगला समजला ना ? तर आतां सांग बरें कीं, मी व महत्तत्त्वापासून देहापर्यंतची तत्त्वें, भूतें यांच्यांत कांहीं तरी भेदाचा संबंध आहे काय ? ८७. यांकरितां माझ्याहून सर्व प्राणिमात्र खरोखर वेगळे नाहींत आणि मलाहि त्या प्राण्यापासून वेगळे असें कधींच समजूं नकोस हो ! ८८.

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणें—**सर्वत्रगः**—सर्व जागीं जाणारा—**महान्**—मोठा—**वायुः**—वायु—**नित्यं**—नेहमी—हमेशा—**आकाशस्थितः**—आकाशांत स्थित असतो—**तथा**—त्याप्रमाणें—**सर्वाणि भूतानि**—सर्व भूते—**मत्स्थानि**—माझ्यामध्यें स्थित आहेत—**इति**—असा—**उपधारय**—निश्चय कर ६.

आकाश जसें व जेवढें विस्तृत आहे तसाच व तेवढाच वायु आकाशांत भरून राहिलेला आहे. परंतु तो सहज पंखा इत्यादि हालवले तर आकाशापासून निराळा भासतो, नाहीं तर आकाश तेंच तो आहे ८९. त्याप्रमाणें प्राणीमात्राचा माझ्या ठिकाणीं [ पारमार्थिक सत्तेनें अत्यंताभाव असूनहि ] कांहीं कल्पिले तर कल्पनेने माझ्या ठिकाणीं भूतें आहेत असें भासते, तेच कल्पनेच्या अभावीं निर्विकल्प स्वरूपाचें ठिकाणीं पाहूं गेले असतां [ भूतांचा अत्यंताभाव असून ] सर्वत्र मी एकच आहे ९०. म्हणून भूतांचें [आभासिक] नसणें आणि असणें हें कल्पनेच्या नसण्यावर व असण्यावर अवलंबून आहे; कारण कल्पना नाहींशी झाल्यावर भासत नाहीं आणि कल्पनेबरोबर भासते ९१. आतां तेंच कल्पना उत्पन्न करणारे अज्ञान समूळ नाहींसें होते, तेव्हां भूतांचे असणें व भूतांचे नसणें हा व्यवहार कोठून भासणार ? म्हणून यापुढें या ऐश्वर्ययोगाविषयीं पुनः विचार करून पहा ९२. अशा या अनुभवरूपी समुद्रांत तूं स्वतः एक लाट होऊन राहा रे ! मग तूं या चराचराकडे पाहूं लागलास, म्हणजे सर्वत्र तूंच भरला आहेस, असें तुझ्या दृष्टीस पडेल ! ९३. देव म्हणाले—अर्जुना ! हें जें मी तुला ज्ञान सांगितलें त्या ज्ञानजागृतीचा तुझ्या मनांत कांहीं प्रकाश पडला का रे ! आतां तरी तुला जे, मी व विश्व हीं दोन आहेत, असें स्वप्न पडलें होतें, तें मिथ्या ठरलें कीं नाहीं ? ९४. ते मिथ्या ठरले, ज्ञानजागृती आली असें तुला जरी आज वाटत असले तरीपण तुझ्या बुद्धीवर कदाचित् पुनः कल्पनेची झोंप येणे संभवनीय आहे आणि जर कां पुनः तुझ्या बुद्धीस कल्पनेची झोप आली तर त्यामुळें भेदरूपीं स्वप्नांत पडशील आणि आतां हा उत्पन्न झालेला अभेद बोध नष्ट होऊन जाईल ९५. म्हणून या कल्पनारूप निद्रेचीच वाट मोडून जाईल व शुद्ध बोधरूप आपणच आहोत असें निश्चित ज्ञान उत्पन्न होईल असें जे एक वर्म आहे ते तुला आतां सांगतो. [ ते नीट लक्ष देऊन ऐक ] ९६. तर हे धैर्यवान् धनुर्धरा ! बाबा तूं नीट लक्ष दे. अरे ! सर्व प्राणिमात्रांची एक मायाच उत्पत्ति, स्थिति करते व तीच त्यांचा नाशहि करते ९७.

**अन्वयार्थ—कौन्तेय—हे** कुंतिपुत्रा अर्जुना !—**कल्पक्षये**—कल्पाचा क्षय झाला असतां—**सर्वभूतानि**—सर्व भूतें—**मामिकां प्रकृतिं**—माझ्या अपरा प्रकृतीला—**यान्ति**—प्राप्त होतात—**पुनः**—पण पुनः—**कल्पादौ**—कल्पाच्या आरंभीं—**अहं**—मी—**तानि**—त्याच भूतांना—**विसृजामि**—उत्पन्न करितो ७.

ज्या मायेला प्रकृति असें नांव आहे, व जी दोन प्रकारचीं आहे; म्हणून तुला पूर्वी सांगितलेंच आहे. पैकीं, एक आठ प्रकारच्या रूपानें भिन्न आहे व दुसरी जीवरूप म्हणून सांगितली ९८. हे अर्जुना ! हा प्रकृतीचा सर्व विषय तूं पूर्वी [ मागे अध्याय ७ श्लोक ४।५ ] ऐकलाच आहेस, तो राहूं दे. त्यांजबद्दल पुनः पुनः कशास सांगावयास पाहिजे? ९९. तरी महाकल्पाच्या शेवटी हीं सर्व

१ संकल्परूप सन्निपाताच्या वायूच्या लहरींत. २ गोष्टी. ३ सृष्टीला. ४ भावना करण्याजोगा. ५ सूर्यकिरणांच्या. ६ प्राणिमात्र. ७ कल्पी. ८ भूतांना उत्पन्न करणारा. ९ एकरूप, निराळा नव्हे. १० अद्भुत शक्ति. ११ संबंध. १२ वेगळीं. १३ खरें. १४ भासतें. १५ कल्पनेच्या अभावीं. १६ संबंधानें. १७ कल्पिणारें. १८ अनुभवानें. १९ तरंग. २० ज्ञानाचा प्रकाश. २१ व्यर्थ. २२ कदाचित्. २३ शुद्ध. २४ ब्रह्मज्ञानाचें. २५ खरें. २६ धैर्याच्या पुतळ्या. २७ उत्पत्ति व संहार करितें. २८ आठ प्रकारच्या रूपानें. २९ मायेचा विषय.

ये माझिये प्रकृती । महाकल्पाच्या अंतीं । सर्व भूतें अव्यक्तीं । ऐक्यासि येती ॥ १०० ॥ ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसीं । मागुती भूमीसी । सुलीनें होतीं ॥ १ ॥ कां वार्षिये ढेंढें फिटे । जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे । तेव्हां घनजातें आटे । गगनींचे गगनीं ॥ २ ॥ नातरी आकाशाचे खोंपे । वायु निवांतुचि लोपे । कां तरंगता हारपे । जळीं जेवीं ॥ ३ ॥ अथवा जागिनलिये वेळे । स्वप्न मनींचें मनीं मावळे । तैसें प्राकृत प्रकृतीं मिळे । कल्पक्षयीं ॥ ४ ॥ मग कल्पादीं पुढती । मीचि सृजीं ऐसी वदंती । तरी इयेविषयीं निरुती । उपपत्ती आइक ॥ ५ ॥

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः । भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥

तरी हेचि प्रकृती किरीटी । मी स्वकीया सहजें अधिष्ठीं । तेथ तंतूसमवाय पटीं । जेंवि विणावणी दिसे ॥ ६ ॥ मग तिये विणावणीचेनि आधारें । लहाना चौकडिया पटत्व भरे । तैसीं पंचात्मकें आकारें । प्रकृतीचि होय ॥ ७ ॥ जैसें विरजणियाचेनि संगें । दूधाचि आटें जों लागे । तैशी प्रकृति आंगा रिगे । सृष्टीपणाचिया ॥ ८ ॥ बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेचि शाखोपशाखीं होये । तैसें मज करणें आहे । भूतांचें हें ॥ ९ ॥ अगा नगर हें रायें केलें । या म्हणणया साचपण कीर आलें । परि निरुतें पाहतां काय सिणले । रायाचे हात ? ॥ ११० ॥ आणि मी प्रकृती अधिष्ठीं तें कैसें । जैसा स्वप्नीं जो असे । मग तोचि प्रवेशे । जागृतावस्थे ॥ ११ ॥ तरी स्वप्नौनि जागृती येतां । काय पाय दुखती पंडुसुता ? । कीं स्वप्नामाजीं असतां । प्रवासु होय ? ॥ १२ ॥ या आघवियाचा अभिप्रावो कायी । जे हें भूतसृष्टीचें कांहीं । मज एकही करणें नाहीं । ऐसाचि अर्थु ॥ १३ ॥ जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारें आपुलालिया काजा । तैसा प्रकृती संगु हा माझा । येर करणें तें इयेचें ॥ १४ ॥ पाहे पां पूर्ण चंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ? ॥ १५ ॥ जड परि जवळिका । लोह चळे तरी चळो कां । तरि कवणु शीणु भ्रामका । सन्निधानाचा ? ॥ १६ ॥ किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगिकारीं । आणि भूतसृष्टी एकसरी । प्रसवोंचि लागे ॥ १७ ॥ जो हा भूतग्रामु आघवा । असे प्रकृतीआधीन पांडवा । जैसी बीजाचिया वेलपालवा । समर्थ भूमी ॥ १८ ॥ नातरी बाळादिकां वयसा । गोसावी देहसंगु जैसा । अथवा घनावळी आकाशा । वार्षिये जेवीं ॥ १९ ॥ कां स्वप्नासि कारण निद्रा । तैसी प्रकृती हे नरेंद्रा । या

माझ्या प्रकृतिरूप अव्यक्त स्वरूपांत लय पावतात १००. ग्रीष्मऋतूच्या शेवटीं प्रखर उन्हाळ्यात ज्याप्रमाणें गवत बीजासह पुनः जमिनींत चांगलीच लीन होतात १. किंवा वर्षाऋतूंतील मेघांचें अवडंबर नाहीसें होते. व जेव्हां शरदऋतूचा गुप्तपणा नाहींसा होतो म्ह० शरदऋतूचा अंकुर फुटतो; तेव्हां सर्व आकाशातील ढगांचें समूह आकाशांतच लय पावतात २. अथवा आकाशाच्या पोकळींत ज्याप्रमाणें वायु सहजच नाहींसा होतो, किंवा पाण्यात उत्पन्न झालेल्या लाटा पाण्यातच नाहींतशा होतात ३. किंवा जागृतीकालात मनांतलें स्वप्न मनांतच मावळते; त्याप्रमाणें महाकल्पाच्या शेवटीं प्रकृतीपासून उत्पन्न झालेली सर्व भूतें, प्रकृतींतच लय पावून मिळतात ४. मग सृष्टींच्या आरंभी पुनः तीं मींच निर्माण करतो, अशी जी [लोकात व शास्त्रांत] वदंता आहे खरी पण ती विषयींची खरी वस्तुस्थिति काय आहे ती सोपपत्तिक तुला सांगतों, ती ऐक ९.

**अन्वयार्थ--स्वां प्रकृतिम्**--आपल्या प्रकृतीला-**अवष्टभ्य**-स्वाधीन करून-**प्रकृतेः वशात् अवशं**-स्वभाववशात् परतंत्र झालेल्या-**इमं कृत्स्नं भूतग्रामं**-या सर्व भूतसमूहास-**पुनः पुनः**-पुनः पुनः-**विसृजामि**-मी उत्पन्न करतों ८.

तरी अर्जुना, ह्याच माझ्या प्रकृतीचा मी जेव्हां सहज अंगीकार करितों, तेव्हां भूतांचा समवाय संबंध असलेल्या वस्त्रामध्यें जशी विणकर म्हणून वेगळी दिसते ६. मग त्या विणकरीच्या आधारानें जसें लहानलहान चौकड्यांनी वस्त्र तयार होते त्याप्रमाणें पंचमहाभूतात्मक जगाच्या आकारानें प्रकृतीच हे सर्व बनते ७. ज्याप्रमाणें विरजणाच्या संगतीनें [संबंधानें] पातळ दूधच आटूं लागतें [दहीरूपानें घट्ट होऊं लागते] त्याप्रमाणें प्रकृति सृष्टींच्या आकारानें परिणाम पावूं लागतें. स्वतः प्रकृतीच सृष्टी बनूं लागतें ८. ज्याप्रमाणें, बीजाला पाण्याचे सान्निध्य मिळाले म्हणजे ते बीजच लहान मोठ्या फांद्या वगैरें फुटून त्याचें झाड होतें, त्याप्रमाणें मला भूताचें करणें आहे म्ह. प्रकृतीचा पसारा माझ्या केवळ सान्निध्यामुळें होतो ९. अरे एखादें शहर राजानें वसविलें ह्या म्हणण्यात जरी खरोखर खरेपणा आला आहे तरी पण वास्तविक दृष्ट्या पाहूं गेलें असतां राजाच्या हाताला शहर रचण्यात कांहीं शीण पडलेला असतो काय ? ११०. आणि मी प्रकृतीचा स्वीकार करितों, तो कसा म्हणशील तर जसा स्वप्नावस्थेंतला मनुष्य जागृतावस्थेंत प्रवेश करतो तसा; ११. अर्जुना ! स्वप्नावस्थेंतून जागृत अवस्थेंत येताना त्या मनुष्याचें पाय दुखतात काय ? किंवा स्वप्नांत असताना त्याला खरोखरच प्रवास होतो काय ? किंवा त्यास श्रम तरी होतात कां ? १२. या सर्वांचा अभिप्राय काय म्हणून विचारशील तर ही भूतसृष्टि निर्माण करण्याचे बाबतीत मला कांहींएक करावें लागत नाहीं, असाच याचा खरा अर्थ आहे १३. ज्याप्रमाणें राजाचे आश्रित असलेली प्रजा आपआपल्या कामाकरितां व्यवहार करितें, त्याप्रमाणें प्रकृतीला माझा सत्ता-स्फूर्ति प्रदानस्वरूप आधार मात्र आहे बाकी सर्व कर्तृत्व [उत्पत्ति, स्थिति व लय हे सर्व व्यापार] हिचेच-प्रकृतीचेच आहेत १४. हे पहा पौर्णिमेच्या पूर्ण चंद्राची भेट होतांच समुद्र अपार भरती आल्यानें भरून येतो. अर्जुना त्या भरती येण्यांत चंद्राला कांहीं श्रम पडतात काय ? १५. लोखंड जड असूनहि लोहचुंबकाच्या जवळपणामुळें हालते तर हालेना कां ? त्यामुळे लोहचुंबकाला केवळ लोखंडाच्या जवळ असण्यांत श्रम का आहेत ? १६. अधिक काय सांगावें ! ! याप्रमाणें मीं स्वकीय प्रकृतीचा अंगीकार करतो व त्यामुळें एकदम एकसारखी प्राणिमात्रांची उत्पत्ति होऊं लागते १७. हे पांडवा हा जो सर्व प्राणिसमुदाय आहे तो प्रकृतीच्या आधीन आहे ज्याप्रमाणें बीजाच्या वेलीस पानें वगैरे उत्पन्न करण्यास भूमि समर्थ आहें; १८. अथवा बालपण, तारुण्य व वृद्धपणा या अवस्थांना ज्याप्रमाणें देहसंग हा मुख्य आधारभूत कारण आहे, किंवा आकाशांत मेघपंक्ति उत्पन्न होण्यास जसा वर्षाऋतु कारण आहे १९. किंवा स्वप्नाला जशी झोप कारण आहे, त्याप्रमाणें अर्जुना या सर्व प्राणि-

१ अस्पष्ट, जीवप्रकृतींत-अव्यक्त जी प्रकृति तींत. २ कडक उन्हांत. ३ बीजासहित. ४ गुप्त होतात. ५ वर्षाकाळींचें. ६ अवडंबर. ७ मावळते. ८ शरदृऋतूचा. ९ अंकुर. १० प्रगटे. ११ मेघसमूह. १२ पोकळींत. १३ जागे झाल्यावर. १४ प्रकृतीपासून झालेलें. १५ महाप्रलयाच्या शेवटीं. १६ सृष्टीच्या आरंभीं. १७ बोलवा, वार्ता. १८ खरी. १९ विचारपद्धति, व्याख्या. २० आश्रय करितों. २१ तंतूंचा समवाय-संबंध. २२ वस्त्रामध्यें. २३ विणकर. २४ पंचमहाभूतात्मक. २५ विरजूं लागतें. २६ लाहे-सान्निध्य. २७ तें बीजच. २८ खरेंपणानें. २९ स्वप्नांतून. ३० आश्रित ठेविलेली. ३१ करिते. ३२ श्रम. ३३ लोहचुंबकाला. ३४ हालवून जवळ आणण्याचा. ३५ एकदम.

अशेषाहि भूतसमुद्रा । गोसाविणी गा ॥ १२० ॥ स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हे असो भूतग्रामा । प्रकृतिचि मूळ ॥ २१ ॥ म्हणौनि भूतें हन सृजावीं । कां सृजिलीं प्रतिपाळावीं । इयें करणीं न येती आघवीं । आमुचिया आंगा ॥ २२ ॥ जळीं चंद्रिकेचिया पसरती वेली । ते वाढी चंद्रें नाहीं वाढविली । तेविं मातें पावोनि ठेली । दूरी कर्में ॥ २३ ॥

न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय । उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

आणि सुटलिया सिंधुजळाचा लोटु । न शके धरूं सैंधवाचा घाटु । तेविं सकळ कर्मा मीचि शेवटु । तीं काय बांधती मातें ? ॥२४॥ धूम्ररजांची पिंजरीं । वाजतिया वायूतें जरी होकारी । कां सूर्यबिंबामाझारीं । आंधारें शिरे ? ॥ २५ ॥ हें असो पर्वताचिये हृदयींचें । जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचें । तेविं कर्मजात प्रकृतीचें । न लगे मज ॥ २६ ॥ एऱ्हवीं इये प्रकृतिविकारीं । एकु मीचि असे अवधारीं । परि उदासीनाचिया परी । करीं ना करवीं ॥२७॥ जैसा दीपु ठेविला परिवरीं । कवणातें नियमी ना निवारी । आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणें ॥ २८ ॥ तो जैसा कां साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु । तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें ॥२९॥ हा एकाचि अभिप्रावो पुढतपुढती । काय सांगों बहुतां उपपत्ती । येथ एकहेळां सुभद्रापती । येतुलें जाण पां ॥१३०॥

मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् । हेतुनाऽनेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

जे लोकचेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता । तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ॥ ३१ ॥ कां जें मियां अधिष्ठिलिया प्रकृती । होती चराचराचिया संभूती । म्हणौनि मी हेतु हे उपपत्ती । घडे यया ॥ ३२ ॥ आतां येणें उजिवडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें । जे माझ्या ठायीं भूतें । परी भूतीं मी नसें ॥३३॥ अथवा भूतें ना माझ्या ठायीं । आणि भूतांमाजीं मी नाहीं । या खुणा तूं कहीं । चुकों नको ॥ ३४ ॥ हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड । आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ॥ ३५ ॥ हा दंशु जंव नये हातां । तंव माझें साचोकारपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेंविं तुषीं कणु ॥ ३६ ॥ एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें । आवडे कीर

समुद्राला एक प्रकृतिच मालकीण म्ह. मुख्य कारण होय १२०. स्थावरजंगमाला, स्थूलसूक्ष्माला, हे असो. या सर्व भूतसमुदायास प्रकृतीच मूळ कारण होय २१. म्हणून भूतें उत्पन्न करावीत किंवा उत्पन्न केलेली भूतें प्रतिपाळावीत या सर्व कृतींचें कर्तृत्व वस्तुतः मजकडे मुळीच येत नाहीं २२. पाण्यांत चंद्र प्रकाशाच्या वेली पसरल्याप्रमाणें दिसतात त्या वेली वाढविण्याचें काम चंद्रानें केलेलें नाहीं. त्याप्रमाणें हीं सर्व कर्में माझ्या आश्रयावर असलेल्या कल्पित मायेपासून उत्पन्न झालेलीं असल्यामुळें मजपासून तीं दूरच असतात म्हणजे त्या कर्मापासून मला कोणत्याहि प्रकारचा बाध लागत नाही २३.

**अन्वयार्थ**—**च**-आणि-**धनंजय**-हे अर्जुना ! **तानि कर्माणि**-तीं **कर्में**-**उदासीनवत् आसीनम्**-उदासीनप्रमाणें असणाऱ्या-**तेषु कर्मसु असक्तं**-त्या कर्मामध्यें असक्त-फलाची इच्छा न ठेवणाऱ्या-**मां**-मला **न निबध्नन्ति**-बद्ध करीत नाहींत ९.

ज्याप्रमाणें समुद्राच्या पाण्याचा लोट वाहूं लागल्यावर त्याला मिठाचा बांध थोपवून धरूं शकत नाहीं; त्याप्रमाणें माझ्यांत लय पावणारीं सर्व कर्में मला कशीं बरें बांधूं शकतील ! २४. धुरांच्या कणांचें छत जर जोरानें वाहाणाऱ्या वायूस प्रतिबंध करून थांबवील. किंवा सूर्यबिंबांत जर अंधार शिरेल २५. हें राहूं दे. पर्वताच्या पोटांतील द्रव्यांना पर्जन्याच्या अतिवृष्टीनेंहि कांहीं बाधा होत नाहीं, त्याप्रमाणें प्रकृतीच्या सर्व कर्मापासून मला कांहींएक बाधा होऊं शकत नाहीं २६. एव्हवीं त्या प्रकृतीच्या कार्याला फक्त अधिष्ठान रूपानें मीच एक कारण आहें असें समज; परंतु वस्तुतः उदासीनाप्रमाणें मी स्वतः कांहीं करीत नाहीं व अन्याकडून करवीतहि नाहीं २७. ज्याप्रमाणें घरांत ठेवलेला दिवा कोणास अमुक एक काम कर असा नियम घालून देत नाहीं किंवा कोणी कांहीं करीत असल्यास ते करूं नको असें कोणाला सांगत नाहीं, आणि कोण काय व्यापार करण्यास प्रवृत्त आहे, हेंहि जाणत नाहीं २८. तो जसा तटस्थ साक्षिभूत असून गृहकृत्यांची प्रवृत्ति होण्यास कारणीभूत असतो-होतो. त्याप्रमाणें मी भूतांच्या कर्मामध्यें उदासीन असाच, सर्व भूतांमध्यें असतों २९. हा एकच अभिप्राय खरा आहे. तोच पुनः पुनः पुष्कळ पर्यायांनीं युक्ति प्रयुक्तींनीं काय सांगूं ? तर सुभद्रापति एकदां एवढें एक मुख्य लक्षांत ठेव म्हणजे झाले १३०.

**अन्वयार्थ**—**मया अध्यक्षेण**--केवळ--ज्ञानस्वरूप अशा मज अध्यक्षामुळें-माझ्या निमित्तानें-**प्रकृतिः**-माझी त्रिगुणात्मिका माया-**सचराचरं**-सचराचर जगाला **सूयते**-उत्पन्न करिते-**कौन्तेय**-हे कुंतीपुत्रा ! -**अनेन हेतुना**-या अध्यक्षत्वाच्या निमित्तानें-**जगत्**-सर्व सृष्टि-**विपरिवर्तते**-प्रवृत्त होते १०.

अर्जुना, सर्व सृष्टींतील लोकांच्या व्यापारास ज्याप्रमाणें सूर्य हा केवळ निमित्तमात्र कारणीभूत आहे. त्याप्रमाणें जगाच्या उत्पत्तीला मी निमित्त कारण आहें असें जाण ३१. कारण कीं, ज्यावेळीं मी मायेचा अंगीकार करतो त्यावेळीं तिच्यापासून चराचराची उत्पत्ती होते म्हणून या चराचरात्मक जगाच्या उत्पत्तीचे कारण मी आहे अशी युक्तिहि येथें जुळते [ यांत ब्रह्म हें आपल्याशी अभिन्न व कल्पित असणाऱ्या मायाद्वारां जगाचे उपादान कारण आहे व स्वरूपानें, चैतन्य प्राधान्यानें जगाचें निमित्तकारण आहे ती माया कल्पित, जड होण्यास्तव तिला कार्यप्रवण होण्यास चेतनाधिष्ठानाची नितांत गरज असल्यामुळें व तिला स्वतंत्र सत्तेचा अभाव असल्यामुळें द्वैतापत्ति न येतां मायाविशिष्ट परमात्माच या जगाचें अभिन्न निमित्तोपादान कारण आहे हें असें उपरिनिर्दिष्ट युक्तीसहि-जुळते असा अभिप्राय आहे ] ३२. आतां या [ विचारात्मक, ज्ञानाच्या ] प्रकाशानें तूं माझ्या 'ऐश्वर्य योगा'ला व [ यथार्थ स्वरूपाला ] चांगलें न्याहाळून पहा [ ते असें कीं ] माझ्या ठिकाणीं सर्व भूतें आहेत पण त्या भूतांमध्यें मात्र मी नाहीं [ माझ्या अधिष्ठानावर, आश्रयावर सर्व भूतें विवर्तरूपानें अध्यस्त आहेत; पण भूतांच्या आधारावर मी नाहीं म्हणजे भूतांच्या आधाररूपें करून त्या भूतांमध्यें ब्रह्माची स्थिति नाहीं ] ३३. अथवा वास्तविक पाहिले तर अजातवादाच्या दृष्टीनें प्राणी माझ्या ठिकाणीं नाहींत. व मी त्या भूतांच्या ठिकाणीं नाहीं, हें मुख्य वर्म तूं कधींहि विसरू नको. ३४. हें माझें मुख्य वर्म सर्वत्र होय परंतु तुला उघड करून दाखविलें आहे. तर तूं आतां मात्र आपल्या इंद्रियांचीं दारें बंद करून म्हणजे विषयभोग व बहिर्मुखवृत्ति बंद करून साऱ्या इंद्रियवृत्तींना अंतर्मुख करून या गूढ ज्ञानाचा त्यांना कळूं न देतां आपल्या अंतःकरणात आत्मत्वाने उपभोग घे ३५. अरे ! पार्था, हे वेदांतसिद्धांताचे मुख्य वर्म जोपर्यंत तुझे हातीं लागलें नाहीं, तोपर्यंत माझें खरें स्वरूप तुला कधींहि आत्मत्वानें निःसंदेह कळणार नाहीं. ज्याप्रमाणें, नुसत्या कोंड्यात दाणा शोधूं लागलें असतां दाण्याचा एक कण सुद्धां सांपडत नाहीं तसें ३६. एव्हवीं अनुमानाच्या, तर्काच्या जोरावर जीवांना

कळलें ऐसें । परि मृगजळाचेनि वोलांशें । काय भूमि तिमे ? ।। ३७ ।। जें जाळ जळीं पांगिलें । तेथ चंद्रबिंब दिसे आंतुडलें । परि थडिये काढूनि झाडिलें । तेव्हां बिंब कें सांगें ? ।। ३८ ।। तैसें बोलवरी वाचाबळें । वायांचि झकविजती प्रतीतीचें डोळे । मग साचोकारें बोधावेळे। आथि ना होइजे ।। ३९ ।।

अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् । परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ।। ११ ।।

किंबहुना भवा बिहाया । आणि साचें चाड आथि जरी मियां। तरि तूं गा उपपत्ती इया । जतन कीजे ।। १४० ।। एऱ्हवीं दिठी वेधली कवळें। तैं चांदणियातें म्हणे पिंवळें । तेंविं माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखती दोष ।। ४१ ।। नातरी ज्वरें विटाळलें मुख। तें दुधातें म्हणे कडू विख। तेविं अमानुषा मानुष। मानिती मातें ।।४२।। म्हणौनि पुढतपुढती धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया । जे इया स्थूलदृष्टी वायां । जाइजेल गा ।। ४३ ।। पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें । जैसें स्वप्नींचेंनि अमृतें । अमरा नोहिजे ।। ४४ ।। एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ। मातें जाणती कीर दृढ। परि तें जाणणेचि जाणणेया आड। रिगोनि ठाके ।।४५।। जैसा नक्षत्राचिया आभासा- । साठीं घातु झाला तया हंसा । माजीं रत्नबुद्धीचिया आशा । रिगोनियां ।। ४६ ।। सांगें गंगा या बुद्धी मृगजळ । ठाकोनि आलियाचें कवण फळ। काय सुरतरु म्हणौनि बाबुळ। सेविली करी ?।। ४७ ।। हार निळ्याचाचि दुसरा । या बुद्धी हातु घातला विखारा । कां रत्नें म्हणौनि गारा । वेंचि जेंवीं ।। ४८ ।। अथवा निधान हें प्रगटलें । म्हणौनि खादिरांगार खोळे भरिले । कां साउली नेणतां घातलें । कुहा सिंहें ।। ४९ ।। तेवीं मी म्हणौनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची । तिहीं चंद्रासाठीं जेवीं जळींची । प्रतिभा धरिली ।। १५० ।। तैसा कृतनिश्चयो वायां गेला। जैसा कोण्ही एकु कांजी प्याला । मग परिणाम पाहों लागला। अमृताचा ।। ५१ ।। तैसें स्थूलाकारी नाशिवंतें। भरंवसा बांधोनि चित्तें । पाहती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसें ? ।। ५२ ।। आगा काई पश्चिमसमुद्राचिया तटा । निघिजत आहे पूर्विलिया वाटा । कां कोंडा कांडतां

यथार्थ परमात्मज्ञान आत्मत्वानें झालें आहे, असे वाटते खरें; परंतु तें कळणें भ्रमात्मक असल्यामुळे व्यर्थ ! कारण मृगजळाच्या ओलाव्यानें जमीन कधीं भिजली आहे कां? तर नाहीं. [ तसे श्रुति निरपेक्ष शुष्क तर्कानें यथार्थ ज्ञान संभवत नाहीं ] ३७. माशाला धरण्याकरिता जें जाळें पाण्यात पसरतात, त्यात चंद्राचें बिंब सापडल्यासारखें दिसतें, परंतु तें जाळें नदीच्या कांठावर पाण्यातून काढून झाडल्यावर चंद्रबिंब कोठें असतें, सांग बरें ? ३८. त्याचप्रमाणें, 'आम्हांला अनुभव आला' असें शाब्दिक अवडंबराच्या साह्यानें व वाक्चातुर्याच्या बळानें अनुभवरूप डोळें किती एक लोक वरकरणीं दाखवितात; पण मग खऱ्या यथार्थ बोधाच्या परीक्षेची वेळ आली म्हणजे तसा यथार्थ बोध असतहि नाही आणि त्यांना असलेले वाचाळ ज्ञान निरुपयोगी असल्यामुळें यथार्थ बोध होतहि नाहीं ३९.

**अन्वयार्थ—मूढाः**–अविवेकी लोक–**भूतमहेश्वरं मम परं भावं**–सर्व भूतांचा महान् ईश्वर अशा माझ्या श्रेष्ठ भावास–**अजानन्तः**–न जणणारे असे होऊन–**मानुषीं तनुम् आश्रितं मां**–मनुष्याची तनु धारण केलेल्या मला –**अवजानन्ति**–तुच्छ लेखितात, माझी अवज्ञा करितात ११.

फार काय सांगावें ! ! जर तूं या संसाराला भीत असशील [ जन्ममरणरूप संसार भयामुळें तुझी चित्तवृत्ति व्याकुळ झाली असेल म्हणजे तूं वैराग्यसंपन्न झाला असशील ] आणि जर तुला माझ्या यथार्थ स्वरूप प्राप्तीची खरी इच्छा असेल. [ ब्रह्मात्मैक्यज्ञान प्राप्तीची तीव्रतम इच्छारूप मुमुक्षुता असेल अर्थात् तूं साधन चतुष्टयसंपत्ति संपन्न मुमुक्षु असशील ]. तर मात्र मी हे वर सांगितलेलें मुख्य गूढ, युक्तियुक्त ज्ञान तूं आपल्या लक्षांत पूर्णतया जतन करून ठेव १४०. नाहींतर काविळीच्या योगानें दृष्टि दूषित झाल्यावर तो मनुष्य चांदण्याला देखिल पिवळें म्हणतों, त्याप्रमाणें निर्दोष असें जें माझें [ अविद्यादि मलरहित] शुद्ध स्वरूप, त्या स्वरूपाच्या ठिकाणीं त्याला जगदुत्पत्यादि दोष दिसतात ४१. किंवा तापानें तोंड कडू झाल्यावर ते ज्याप्रमाणें दूधास 'कडू विष' म्हणते त्याप्रमाणें मी मानव देह धर्मरहित असूनहि मानव देह धर्मवान् आहे असें मला मानतात; ४२. म्हणून हे धनंजया ! तुला वारंवार बजाऊन सांगतों कीं, यावरील अजातवादाच्या मुख्य अभिप्रायाला कदाचित् विसरशील पण विसरूं नकोस हो ! कारण, जर तुसत्या स्थूल दृष्टीनें [ यथार्थ स्वरूप ] पाहूं म्हटलें तर तुझें पाहणें व्यर्थ होईल [ मी उपाधितः सगुण आहे तसा तत्त्वतः निर्गुणहि आहे. त्यामुळें मी केवळ सगुणच आहे असा स्थूल दृष्टीचा निश्चय वाया जातो ] ४३. ज्याप्रमाणें स्वप्नांतील अमृताने कोणी अमर होत नाहीं, त्याप्रमाणें जे मला स्थूलदृष्टीनें म्ह० आकाराच्या दृष्टीनें पाहतात ते खरोखर मला न पाहणेंच आहे असे समज ४४. सहज विचार करून पाहिले तर मूर्ख अज्ञानी लोक मला [ मी मानव देहधारी परिच्छिन्न आहे अशा ] स्थूलदृष्टीनें जें जाणतात, ते आपल्या समजुतीप्रमाणें खरोखर निश्चितरूपानें जाणतात, म्हणजे त्या ज्ञानविषयीं त्यांची प्रमात्वबुद्धि असतें; पण त्यांचें तें जाणणेंच माझ्या यथार्थ स्वरूपाच्या खऱ्या साक्षात्कारात्मक ज्ञानास आड येणारे [ प्रतिबंधक ] ठरतें ४५. ज्याप्रमाणें नक्षत्राचें प्रतिबिंब पाण्यांत पाहून तें रत्न मोतीच आहे असें समजून तें प्राप्त करून घेण्याकरितां हंसपक्षी आकाशांतून उडी टाकून प्राणास मुकतो ४६. गंगा आहे असें समजून मृगजळाजवळ जर कोणीं गेला, तर त्याला त्या ठिकाणीं काय फळ प्राप्त होईल, सांग बरें ? अथवा कल्पवृक्ष समजून बाभूळीचा आश्रय केला तर ती बाभळ त्याला [ इच्छित ] फलप्राप्ति करून देईल काय ? ४७. नीळमण्यांचा दोन सरांचा पदरांचा हार आहे, या बुद्धीनें तो घेण्यासाठी जर कवड्या सर्पाला हाती धरलें, किंवा ही रत्ने आहेत या समजुतीनें जशा गारा वेचून घ्याव्यात ४८. अथवा हा द्रव्याचा ठेवाच जमिनींतून प्रगट झाला आहे, असें समजून जसे खैराचें निखारेंच पदरात भरून घेतले, अथवा आपलींच ही पडछाया पाण्यांत पडली आहे, असें न जाणतां सिंहानें विहिरींतच उडी टाकून ज्याप्रमाणें प्राणास मुकावे जशा या उपरिनिर्दिष्ट सर्वच गोष्टी भ्रमरूप व घातक ठरतात ४९. त्याप्रमाणें प्रपंचात मी साकार दिसतों, तसाच देहधारी परिच्छिन्न आहे, अशी कृतनिश्चयात्मक बुद्धी देऊन जे वागतात ते, चंद्राच्या ऐवजीं त्याचें पाण्यांत पडलेले प्रतिबिंब धरण्याकरितां प्रयत्न करणाऱ्याप्रमाणें फसतात १५०. त्याप्रमाणें परमात्मा केवळ देहधारी परिच्छिन्नच आहे असा जो त्यांचा कृतनिश्चय [ तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें एक भ्रमच ठरतो म्हणून ] तो वाया जातो जसा कोणी एखाद्यानें भाताची पेज पिऊन मग त्यापासून, अमृतापासून होणाऱ्या सुखात्मक परिणामाचा लाभ पाहूं लागला तर [ते व्यर्थ आहे तसा तो निश्चयहि व्यर्थ आहे] ५१. त्याप्रमाणें अंतःकरणपूर्वक भरंवशानें नाशवंत अशा स्थूलाकारालाच माझें यथार्थरूप समजून अविनाशी अशा मला पाहूं लागतील, तर मीं त्यांना कसा दिसेन ? ५२. हें पहा, कोणी पश्चिमसमुद्राच्या तटाला जाण्याच्या हेतूनें पूर्व

सुभटा। कणुं आतुडे ?॥५३॥ तैसें विकोरलें हें स्थूळ। जाणितले या मी जाणवतसें केवळ। काई फेणं पितां जळ। सेविलें होय ?॥५४॥ म्हणौनि मोहिलेंनि मनोधर्में। हेंचि मी मानूनि संभ्रमें। मग येथिंची जियें जन्मकर्में। तियें मजाचि म्हणती ॥५५॥ येतुलेनि अनामां नाम। मज अक्रियासि कर्म। विदेहासि देहधर्म। आरोपिती॥५६॥ मज आकारशून्या आकारु। निरुपाधिका उपचारु। मज विधिवर्जिता व्यवहारु। आचारादिक॥५७॥ मज वर्णहीना वर्णु। गुणातीतासि गुणु। मज अचरणा चरणु। अपाणिया पाणी ॥५८॥ मज अमेया मान। सर्वगतासी स्थान। जैसें सेजेमाजीं वन। निदेला देखे ॥ ५९ ॥ तैसें अश्रवणा श्रोत्र। मज अचक्षूसी नेत्र। अगोत्रा गोत्र। अरूपा रूप ॥ १६० ॥ मज अव्यक्तासी व्यक्ती। अनार्तासी आर्ती। स्वयंतृप्ता तृप्ती। भाविती गा॥ ६१ ॥ मज अनावरणा प्रावरण। भूषणातीतासि भूषण। मज सकळ कारणा कारण। देखती ते॥ ६२ ॥ मज सहजातें करिती। स्वयंभातें प्रतिष्ठिती। निरंतरातें आव्हानिती। विसर्जिती गा॥ ६३ ॥ मी सर्वदा स्वतःसिद्धु। तो कीं बाळ तरुण वृद्धु। मज एकरूपा संबंधु। जाणती ऐसे॥ ६४॥ मज अद्वैतासि दुजें। मज अकर्तयासि काजें। मी अभोक्ता कीं भुंजें। ऐसें म्हणती ॥ ६५॥ मज अकुळाचें कुळ वानिती। मज नित्याचेनि निधनें शिणती। मज सर्वांतरातें कल्पिती। अरि मित्र गा॥ ६६॥ मी स्वानंदाभिरामु। तया मज अनेक सुखांचा कामु। आघवाचि मी असे समु। कीं म्हणती एकदेशी॥ ६७॥ मी आत्मा एक चराचरीं। म्हणती एकाचा कैंपक्ष करीं। आणि कोपोनि एकातें मारीं। हेंचि वाढविती ॥ ६८ ॥ किंबहुना ऐसें समस्त। जे हे मानुषधर्म प्राकृत। तयाचि नांव मी ऐसें विपरीत। ज्ञान तयांचें॥ ६९॥ जंव आकारु एक पुढां देखती। तंव हा देव येणें भावें भजती। मग तोचि विघडलिया टाकिती। नाहीं म्हणौनि॥ १७०॥ मातें येणें येणें प्रकारें। जाणती मनुष्य ऐसेनि आकारें। म्हणौनि ज्ञानाचि तें आंधारें। ज्ञानासि करी ॥ ७१॥

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः। राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः॥ १२॥**

यालागीं जन्मलेचि ते मोघ। जैसें वार्षियेवीण मेघ। कां मृगजळाचे तरंग। दुरूनीचि पाहावे॥७२॥ अथवा कोल्हेरीचे असिवार। नातरी वोडंबरीचे अळंकार

दिशेच्या समुद्राच्या वाटेला जाऊं लागला, तर त्याला पश्चिमतीर समुद्र प्राप्त होईल कां? किंवा हे महावीरा, केवळ कोंडा कांडूं लागलें असतां त्यांत धान्याचे कण प्राप्त होतील काय? ५३. त्याचप्रमाणें हें आकारास पावलेलें जग वा शरीर हेंच मी असें मला जाणल्यानें निर्दोष असें माझें विशुद्ध निरुपाधिक स्वरूप जाणतां येईल काय? फेंस प्याल्यानें पाणी प्याल्याप्रमाणें होतें कां? ५४. म्हणून [ माया ] मोहित मनोवृत्तीनें हेंच [ स्थूल देहच ] मी [ परमात्मा ] आहे असें भ्रांतीनें मानून, तेथील [ शरीराची ] जी जन्ममरणादि धर्म व सर्व कर्में ती मलाच आहे असें म्हणतात ५५. याकारणें नामरहित अशा मला नांव देतात, तत्वतः क्रियारहित अशा माझ्या [ शुद्ध स्वरूपाचें ] ठिकाणीं क्रियांचा आरोप करतात [ मी क्रियाकर्ता कर्मकारी आहे असें म्हणतात ] देहरहित असलेल्या माझ्या शुद्धस्वरूपाचें ठिकाणीं जन्ममरणादि देहधर्म लादतात ५६. मला निराकाराला आकार मानतात, निरुपाधिकाला उपचार अर्पण करतात. विधिनिषेधातीत अशा मला आचारादिक व्यवहार लावतात ५७. मला जातिरहिताला जातिविशिष्ट मानतात, गुणातीताला सगुण समजतात, चरणरहिताला चरण कल्पितात, हस्तरहिताला हस्त कल्पितात ५८. मज परिमाणातीताला [ अपरिच्छिन्नास ] परिमाण, परिच्छिन्न मानतात, सर्वव्यापकाला एखादे ठिकाण कल्पितात; ज्याप्रमाणें आपल्या अंथरुणांत निजलेला मनुष्य बनाची शोभा स्वप्नांत पाहातो ५९. त्याप्रमाणें कर्णरहिताला कान कल्पितात, नेत्ररहिताला नेत्र मानतात, गोत्ररहिताला गोत्र कल्पितात, निराकाराला रूप कल्पितात १६०. अव्यक्त [ इन्द्रियअगोचर ] असा जो मी त्या मला व्यक्ति [ प्रमाण गोचर ] मानतात, निरिच्छास इच्छा आहे असें मानतात, व जो मी स्वयमेव नित्यतृप्त आहे त्यास तृप्ति होते, अशी कल्पना करितात ६१. मी वस्त्र नेसविता येण्याजोगा नसूनहि सर्व जगाला पांघरूण घालणारा त्या मला पांघरूण घालतात, भूषणातीत म्हणजे [ स्थूल सूक्ष्म आकाररहित ] निराकार असा जो मी त्या मला अलंकार घालतात, मी सर्व जगाचा उत्पन्न करणारा [ जगत्कारण ] असून त्या मलाहि दुसऱ्या उत्पन्न करणाऱ्या कारणाची कल्पना करितात ६२. मी सहज अनादि नित्य असून माझ्या मूर्ति करितात, मी सदाच स्वतः सिद्ध असून माझी प्राणप्रतिष्ठा करितात व मी नित्य सर्वत्र [ नित्य उपलब्ध स्वरूप ] असतां माझें 'आवाहन' करतात व त्या माझे विसर्जनहि करितात ६३. मी नेहमीं स्वतःसिद्ध व अखंडैकरस निराकारसिद्ध असून मला बाल्य, तारुण्य व वृद्धत्व अशा प्रकारचा संबंध [ अवस्था ] आहे असें समजतात ६४. मी अद्वैत स्वरूप असून माझ्या ठिकाणीं द्वैत मानतात. मी कांहींएक न करणारा असून कर्में करितों व मी तत्वतः अभोक्ता असून भोक्ता आहे असें म्हणतात ६५. मला वस्तुतः कुळगोत नसून माझ्या कुळाचें वर्णन करितात. मी नित्य असून मी मरतों, असें मानून माझ्या मरणानें शोक करितात. तसाच मी सर्वांच्या अंतर्यामीं राहणारा असलो तरी उगीच अमक्याचा शत्रु आहे व अमक्याचा मित्र आहे, अशी माझ्या ठिकाणीं कल्पना करितात ६६. मी निजानंदांत निमग्न असणारा, त्या मला इतर अनेक सुखांचीं इच्छा करणारा असें मानतात व सर्व ठिकाणीं [ अधिष्ठानरूपानें ] माझी व्याप्ति समान-साधारण असून मला एकदेशी म्हणजे एकाच स्थळीं राहणारा परिच्छिन्न आहे असें म्हणतात ६७. मी सर्व स्थावरजंगमांचा एकच आत्मा असून एकाचा कैवार घेतो व एकावर रागवून त्यास मारतो अशी माझी सर्वत्र प्रसिद्धि करितात ६८. अधिक काय सांगावें!! अशा प्रकारचें सर्व क्षुद्र मनुष्यधर्म, ते सर्व धर्म माझ्या ठिकाणीं आहेत असें त्यांचें विपरित ज्ञान असतें ६९. ज्या वेळेस ते आपल्या दृष्टीसमोर एखादी मूर्ति पाहतात, त्या वेळेस ही मूर्तिच ती देव आहे या भावनेनेंच तिला भजतात, मग तीच भंगली तर तिच्यांतील 'देवपण' नाहींसें झालें मानून तिचा व मूर्तिपूजेचा त्याग करतात १७०. या व अशा अनेक प्रकारांनी मी मनुष्यच आहे असें समजतात, म्हणून त्यांचें ते [ विपरीत ] ज्ञानच माझ्या सत्सामान्य स्वरूपाच्या खऱ्या ज्ञानाच्या आड येतें ७१.

**अन्वयार्थ—मोघाशा**—त्यांच्या सर्व आशा व्यर्थ होतात—**मोघकर्माणः**—त्यांचीं सर्व कर्मेंहि व्यर्थ होतात—**मोघज्ञानाः**—त्यांचें ज्ञानहि निष्फल असतें—**विचेतसः**—ते विवेकशून्य होतात—**च एव**—आणि ते—**राक्षसीं**—राक्षसांच्या व—**आसुरीम्**—आसुरांच्या—**मोहिनीं**—मोह पाडणाऱ्या—**प्रकृतिं**—प्रकृतीचा—**श्रिताः**—आश्रय केलेले असतात १२.

याकरितां [ ज्यांचीं मजविषयीं अशा प्रकारची समजूत असते ] त्यांचे जन्मास येणे व्यर्थच होय. ज्याप्रमाणें पर्जन्यकाळावांचून आलेले ढग व्यर्थ आहेत, किंवा मृगजळाच्या लाटा जशा दुरूनच पाहण्यास बऱ्या असतात ७२.

१ धान्य. २ विस्तारलेलें. ३ जग. ४ निर्दोष. ५ फेंस. ६ भ्रांतीनें. ७ नामशून्याला. ८ क्रियारहिताला. ९ देहरहिताला. १० सुखसाधनें, सुखसाहित्य. ११ हस्तरहिताला. १२ परिमाणातीताला. १३ परिमाण. १४ सर्वव्यापकाला.

कीं गंधर्वनगरीचे आवारें । अभासती कां ॥ ७३ ॥ साबरी वाढिन्नल्या सरळा । वरी फळ ना आंतु पोकळा । कां स्तन जाले गळां । शेळिये जैसें ॥ ७४ ॥ तैसें मूर्खांचें तया जियालें । आणि धिग् कर्म तयांचें निपजलें । जैसें साबरी फळ आलें । घेपे ना दीजे ॥ ७५ ॥ मग जें कांहीं ते पढिन्नले । तें मर्कटें नारळ तोडिले । कां आंधळ्या हातीं पडिलें । मोतीं जैसें ॥ ७६ ॥ किंबहुना तयांचीं शास्त्रें । जैशीं कुमारीं हातीं दिधलीं शस्त्रें । कां अशौच्या मंत्रें । बीजें कथिलीं ॥ ७७ ॥ तैसें ज्ञानजात तयां । आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया । तें आघवेंचि गेलें वायां । ज चित्तहीन ॥ ७८ ॥ पैं तमोगुणाची राक्षसी । जे सद्बुद्धीतें ग्रासी । विवेकाचा ठावोचि पुंसी । निशाचरी जे ॥ ७९ ॥ तिये प्रकृती वरपंडे जाले । म्हणौनि चिंतेचेनि कंपोलें गेले । वरि तामसीयेचिये पडिले । मुखामाजीं ॥ १८० ॥ जेथ आशेचिये लाळे । आंतु हिंसा जीभ लोळे । तेवींचि असंतोषाचे चोंकळे । अखंड चघळी ॥ ८१ ॥ जे अनर्थांचे कानवेरी आंवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची दरी । सदाचि मातली ॥ ८२ ॥ जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । जे अगस्ती गवसणी मूढां । स्थूल बुद्धि ॥ ८३ ॥ ऐसे आसुरिये प्रकृतीचे तोंडीं । जे जाले गा भूतोंडीं । ते बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाच्यां ॥ ८४ ॥ एवं तमाचिये पाडिले गेंतें । नें पविजतीचि विचाराचेनि हातें । हें असो ते गेले जेथें । ते शुद्धीचि नाहीं ॥ ८५ ॥ म्हणौनि असोतु इयें वांयाणीं । कायशीं मूर्खांचीं बोलेणीं । वायां वाढवितां वाणी । शिणेल हन ॥ ८६ ॥ ऐसें बोलिलें देवें । तेथ जी जी म्हणितलें पांडवें । आइकें जेथ वाचा विसंवे । ते साधुकथा ॥ ८७ ॥

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः । भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

तरी जयाचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जया निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ ८८ ॥ जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा । जयाचें मन ओलावा । विवेकासी ॥ ८९ ॥ जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले । जे शांतीसी आले । पालेंव नवे ॥ १९० ॥ जें परिणामीं निघाले कोंभ । जें धैर्यमंडपाचे स्तंभ । जें आनंदसमुद्रीं कुंभ ।

अथवा मातीच्या चित्रांतले घोडेस्वार किंवा मांत्रिकानें जादुगिरीनें केलेलें अलंकार किंवा आकाशांत ढगांच्या विशिष्ट आकारामुळें गांवचें गांवकूस वगैरे दृष्टीस पडणारें नगर जसें मिथ्या असते. [ भासतेवेळींहि ते नसतातच म्हणून त्याच्यापासून फल असें कांहींच नाहीं ] ७३. जसे शेर किंवा कांड्या निवडुंग जरीं सरळ वाढला तरी आंत गाभा विरहित, पोकळ असून वर फळहि येत नसते किंवा शेळीच्या गळ्याला असलेल्या स्तनांतून [ गलोलांतून ] जसें दूध निघत नाहीं, म्हणून व्यर्थ असतात ७४. तसें त्या मूर्ख–विवेकशून्य लोकांचें जीवित निरर्थक होय. आणि साबरीच्या झाडाला फळ आलें असतां तें जसें कोणाला घेतां येत नाहीं, व देतांहि येत नाहीं त्याप्रमाणें त्यांच्या हातून केल्या जाणाऱ्या [ निरर्थक ] कर्मालाहि धिःक्कार असो! ७५. मग त्या मूर्खांनीं जें कांहीं शास्त्राध्ययन केलेलें असतें ते त्यास माकडानें नारळ तोडल्याप्रमाणें किंवा आंधळ्याला मोतीं सांपडावें त्याप्रमाणें [ निरुपयोगी ] आहे ७६. अधिक काय सांगावें! त्यांनीं अध्ययन केलेलीं शास्त्रें लहान मुलींच्या हातांत दिलेल्या शस्त्राप्रमाणें किंवा अशुचिर्भूताला बीजासह शिकविलेल्या मंत्राप्रमाणें अनर्थकारक होत ७७. धनंजया! त्याचप्रमाणें त्यांचें बाकीचें सर्व ज्ञान व त्यांनीं जे कांहीं आचरण केलें असेल ते सर्वच्या सर्व व्यर्थ होत. कारण ते [ शुद्ध–स्थिर–व्यवस्थित ] चित्तरहित असतात ७८. शिवाय तमोगुणाला ग्रासून टाकणारी, विवेकाचा ठाव ठिकाण नाहींसा करणारी, [ अज्ञानरूपी ] रात्रींत संचार करणारी, तमोगुणरूपी राक्षसी आहे ७९. त्या [ राक्षसी ] प्रकृतीच्या स्वाधीन झाले म्हणून ते सदोदित चिंतारूपी गालाच्या द्वारा आणखी तामसी प्रकृतीच्या आयतेच मुखामध्यें पडलें गेले १८०. ज्या राक्षसी प्रकृतीच्या मुखांत आशारूप लाळेंत हिंसारूप जीभ लोळते व त्याच बरोबर असंतोषरूप चवळ-घास [ मासांचे गोळे ] निरंतर चघळीत असते ८१. जी अनर्थरूप कानापर्यंत ओठांचे कांठ चाटीत बाहेर निघते; व जी प्रमादरूपी म्हणजे अनवधानता-भूलरूपी पर्वताची मोठी माजलेली [ भयप्रद ] दरी आहे असे समज ८२. जिच्या तोंडांत द्वेषरूप दाढा ज्ञानाचा खसखसा चावून चुराडा करितात व जी अगस्ति ऋषीला असलेल्या कुंभाच्या आवरणाप्रमाणें स्थूलबुद्धिच्या मूर्ख लोकांना आवरण करणारी जणुं गवसणीच आहे; ८३. अशा प्रकारच्या त्या आसुरी प्रकृतीच्या तोंडांत जें भूतास टाकलेल्या बळीप्रमाणें बळी होऊन पडतात, ते भ्रांतिरूप कुंडांत बुडून जातात ८४. याप्रमाणें जे अज्ञानाच्या खळग्यांत पडतात त्यांना विचाररूपी हाताचें साह्य मिळत नाहीं इतकेंच नव्हे तर ते अशा ठिकाणीं गेलें कीं, जेथें त्यांचा देखील पत्ता लागत नाहीं. ८५. म्हणून ही निष्फळ कथा, वर्णनें राहूं दे. कारण त्या मूर्ख लोकांच्या व्यर्थ कथा हव्यात कशाला? कारण, तिचा विचार केला असतां वाणीला व्यर्थ शीण मात्र होईल ८६. असें श्रीकृष्ण बोलले तेव्हां अर्जुन म्हणाला, 'हो, होय महाराज बरें!' नंतर भगवान् फिरून म्हणतात–ज्या साधू कथांचें वर्णन केलें असतां वाणी विश्रांतीस पावते ती 'साधूंची कथा' ऐक ८७.

**अन्वयार्थ**—**तु**–पण **पार्थ**–हे अर्जुना! **दैवीं प्रकृतिं आश्रिताः**–दैवी प्रकृतीचा आश्रय केलेलें–**महात्मानः**–महात्मे–**मां**–मला–**अव्ययं भूतादिं**–नित्य भूतांचें कारण–**ज्ञात्वा**–जाणून–**अनन्यमनसः**–अनन्यचित्त होऊन **भजन्ति**–भजतात १३.

ज्या साधूंच्या निर्मळ अंतःकरणरूपी क्षेत्रांत मी क्षेत्रसंन्यासी होऊन म्ह. आजन्म एकाच पवित्र क्षेत्रांत राहण्याच्या संकल्पानें वास करितो त्यांचा अधिकार काय सांगावा! अरे जे निजले असतांहि वैराग्य आपण होऊनच ज्यांची सेवा करितें, म्हणजे ज्यांचें स्वप्नांतहि वैषयिक भोग्य सुखाच्या वासनानें वैराग्य ढळत नाहीं ८८. ज्यांच्या परमात्मप्राप्तीच्या उत्कट आदरपूर्ण–चांगल्या भावनेंतच धर्म राज्य करितो व ज्यांचें मन नेहमीं सद्विचारालाच [ पुष्टि प्रदान करणारे ] जीवनच होय ८९. जे ज्ञानरूप गंगेंत स्नान करून अंतर्बाह्य शुद्ध झालें, जें पूर्णता जेऊन [ ब्रह्मस्थितिरूपपूर्णतेस प्राप्त होऊन ] तृप्त झालें व जे महात्मे म्हणजे जणुं–शांतिरूप वेलीस नवीन कोवळीं फुटलेली पालवीच होत १९०.

१ आकाशांत नगराप्रमाणें दिसणारा ढगांचा क्षणैक देखावा. २ गांवकुसें. ३ भासतात. ४ शेर, हुरा. ५ जीवित्व. ६ अशुचिर्भूतास. ७ चित्त स्वाधीन नसणारे. ८ नाहींसा करी. ९ जखीण. १० स्वाधीन झाले, ग्रस्त झाले. ११ दरींत, गुहेंत. १२ मांसगोळे. १३ कानापर्यंत. १४ ओठांचा भाग. १५ राक्षसी. १६ भूतबळी. १७ भ्रांतीच्या १८ अज्ञानाच्या. १९ खळग्यांत. २० पोंचत नाहींत. २१ त्याचा पत्ताच लागत नाहीं, म्हणून ह्या निष्फळ कथा राहूं दे. २२ वर्णन. २३ विश्रांति पावे. २४ सेवा करी. २५ राज्य. २६ पूर्ण ब्रह्मस्वरूपता. २७ तृप्त झाले. २८ पालवी. २९ ब्रह्माच्या रूपांतराला.

चुबकळोनि भरिले ॥ ९१ ॥ जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती । जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ ९२ ॥ जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं लेणीं । जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥ ९३ ॥ ऐसें जे महानुभाव । दैविये प्रकृतीचें दैव । जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥ ९४ ॥ मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे । परि दुजेपण मनोधर्मे । शिवतलें नाहीं ॥ ९५ ॥ ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक ॥ ९६ ॥

सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः । नमस्यन्तश्च मां भक्त्यानित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे । जें नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ ९७ ॥ यमदमां अवकळा आणिली । तीर्थे ठायावरूनि उठविलीं । यमलोकींची खुंटिली । राहाटी आघवी ॥ ९८ ॥ यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणतीं काय खावें । दोष ओखदासि नाहीं ॥ ९९ ॥ ऐसें माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ २०० ॥ ते पाहांटेवीण पाहावित । अमृतेंवीण जीववित । योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ॥ १ ॥ परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ॥ २ ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥ ३ ॥ तेजें सूर्य तैसें सोज्वळ । परि तोहि अस्तवे हें किडाळ । चंद्र संपूर्ण एखादे वेळ । हे सदा पुरते ॥ ४ ॥ मेघ उदार परी वोसरे । म्हणौनि उपमेसी न पुरे । हे निःशंकपणें सपांखरे । पंचानन ॥ ५ ॥ जयांचें वाचेपुढां भोजें । नाम नाचत असे माझें । जें जन्मसहस्रीं वोळगिजे । एकवेळ यावया ॥ ६ ॥ तो मी वैकुंठीं नसें । वेळु एक भानुबिंबींही न दिसें । वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय ॥ ६ ॥ परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिती माझा ॥ ८ ॥ कैसे माझ्या गुणीं धाले । देशकालातें विसरले । कीर्तनें सुखी झाले । आपणपांचि ॥ ९ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥

तसेच जे महात्मे म्हणजे जणुं काय पूर्ण परब्रह्म स्थितीस फुटलेले कोंभच आहेत किंवा जे सात्त्विक धैर्यरूप मंडपाचे खांबच होत, त्याचप्रमाणें जे ब्रह्मानंदात्मक समुद्रांत बुडवून तुडुंब–ओतप्रोत [ आनंदानें ] भरलेले जणुं घटच आहेत ९१. ज्यांना भक्तीची [ भक्तिरसाची ] इतकी प्राप्ती झाली आहे कीं, त्यापुढे जे मोक्षालाहि ' मागे सर ' पलीकडे हो ! असें म्हणतात व ज्यांच्या सहज व्यवहारांतील लीलेंतहि नीति जगलेली दिसतें ९२. ज्यांनीं आपल्या सर्व अवयवांत शांतीरूप अलंकार घातले आहेत व ज्यांचें चित्त म्हणजे सर्वव्यापक जो मी त्या मला आच्छादित करणारी जणूं खोळच होय ९३. असे जें महात्मे, ते व्यापकानुभूति संपन्न साधु होत. ते दैवी म्हणजे भगवद्भक्तीला अनुकूल असणाऱ्या सात्त्विक प्रकृतीचें दैव म्ह० भाग्यच होत. " हे सर्व माझेंच स्वरूप आहे असें जाणून ९४. मग ते महात्मे वाढत्या प्रेमानें मला भजतात, पण त्यांच्या मनोवृत्तीनें [ उपास्यभूत देव निराळा व मी उपासक निराळा अशा ] द्वैताला स्पर्शमुद्रां केलेला नसतो ९५. अर्जुना ! अशा प्रकारें जे मद्रूप होऊनहि पुनः काल्पनिक द्वैताचा स्वीकार करून माझी सेवा करतात, पण त्या सेवेचा प्रकार आश्चर्यकारकच असून तो सांगावयाचा राहिला आहे, तो ऐक ९६.

**अन्वयार्थ**––**सततम्**–अहोरात्र–**मां कीर्तयन्तः**–माझें कीर्तन–नामस्मरण करणारें–**च**–आणि–**यतन्तः**–इंद्रियनिग्रह.शम–दम इत्यादि धर्मांनी यत्न करणारे–**दृढव्रताः** –ज्यांचें अचांचल्य हेंच व्रत आहे किंवा ज्यांचें ब्रह्मचर्यादि व शमादि व्रत दृढ आहे ते दृढ व्रत–**च**–आणि–**मां**–मला–**नमस्यन्तः**–नमस्कार करणारे–**भक्त्या**–परम प्रेमानें-**नित्ययुक्ताः**·नित्यमुक्त होऊन–**उपासते**–उपासना करितात १४.

अरे ! माला मुद्रादिरूपानें नटून हरिकीर्तनाच्या प्रेमांत-छंदांत काय आनंदानें ते नाचतात म्हणून सांगावें त्यांच्या प्रेमयुक्त हरिनामसंकीर्तनाच्या उत्कर्षामुळें सर्व दोष नष्ट झालेलें असतात म्हणून प्रायश्चित्ताचे सर्व व्यापार नाश पावले आहेत, कारण त्यांनीं कीर्तनानें पापाचें नांव देखील राहणार नाहीं, असें केलें ९७. 'यम' म्हणजे मनोनिग्रह व ' दम ' म्हणजे इंद्रियनिग्रह यांना निस्तेजता-निकृष्टता आणिली, तीर्थें आपापल्या जाग्यांवरून उठवून लावलीं व यमलोकचे सर्व व्यापार बंद पाडलें ९८. 'यम' हे साधन म्हणूं लागले कीं, " कोणाचा मी आतां निग्रह करावा ! " दम हे साधन म्हणूं लागले कीं, "कोणत्या इंद्रियाचे मी दमन करावें व तीर्थें म्हणूं लागलीं " आम्ही तरी कशाचें क्षालन करावें ! कारण, दोषच औषधासहि उरला नाहीं ! " ९९. याप्रमाणें माझ्या नामघोषानें विश्वांतील सर्व प्राण्यांची दुःखें नाहींतशीं करितात, व सर्व जगच ब्रह्मसुखानें दुमदुमून घनदाट भरतात २००. ते साधू पहांट झाल्याशिवाय जीवांना प्रकाश म्हणजे आत्मज्ञानाची पहांट करून देतात; अमृताशिवाय जगाला ते जगवितात व योगसाधनाशिवाय लोकांस धडधडीत डोळ्यांस मोक्ष दाखवितात. [ ज्ञानचक्षूनें आत्मत्त्वानें ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार करून देतात ] १. परंतु हा राजा आहे व हा रंक आहे असा अन्तर, योग्यताभेद तें मानीत नाहींत. व लहान–थोर अशी निवड करण्याचेहि जाणींतच नाहींत. याप्रमाणें जगाला सरसकट, आनंदाचें गांवकूस वा माहेरघर होतात २. पूर्वी कधीं तरी वैकुंठास जाणारा एकादाच कचित् आढळात येत असे; परंतु यां साधूंनीं सर्व जगच ' वैकुंठ ' केलें. अशा माझ्या नामभजनाच्या, नाम–घोष–महात्म्यद्वारां अखिल विश्व धवळून काढलें. सर्व पवित्र केलें ३. त्या साधूंचें तेज सूर्याप्रमाणें निर्मळ आहे म्हणावें परंतु त्या सूर्यातहि, तो अस्तास जातो, हा दोष आहे.चंद्रासारखें म्हणावें तर तो एकादे वेळेसच म्ह० पौर्णिमेसच पूर्ण असतो, परंतु हे साधु नेहमींच [परब्रह्मस्थितीनें] पूर्ण असतात ४. यांचें औदार्य मेघाप्रमाणें म्हणावें, तर तो ओसरतो. म्हणून [ निरंतर ब्रह्मात्मैक्य बोधाची वृष्टि करणाऱ्या ] महात्म्यास उपमा देण्यास पुरेसा होत नाहीं; तर हे साधु निःशंकपणें कृपावंत असें जणुं सिंहच होत ५. जे माझे नाम एकवेळ मुखांत यावयास म्ह० एकदां यथार्थ उच्चार होण्याकरितां सहस्त्रावधि जन्म माझी सेवा करावी लागतें, तें माझें नांवच आपण होऊन ज्यांच्या वाचेपुढें मोठ्या प्रेमा कौतुकानें नाचत असतें ६. तो मी एक वेळ वैकुंठलोकींहि नसतो, एक वेळ सूर्यमंडळातहि दिसत नाहीं, इतकेंच नव्हे, तर एक वेळ योग्यांचीहि मनें उल्लंघन करून जातों; ७. परंतु हे पांडवा असा जरी मी हरवला असून कोठें सांपडलों नाहीं; तरीहि जेथें माझ्या नांवाचा सतत ' बरवा ' घोष करितात, त्यांच्या जवळ खात्रीनें सांपडायचाच ८. ते माझ्या " गुणसंकीर्तनांत " इतकें तृप्त झालेले असतात कीं, त्यामुळें ते देशकालाला विसरून मन्नामसंकीर्तनाच्या योगानें तें आपल्याच ठिकाणीं आपलें स्वरूपसुखद्वारां सुखी झालेलें असतात ९. ते महात्मे कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद या केवळ नांवाच्या उत्तम कविता गातात आणि मधून मधून शुद्ध आत्मविषयक चर्चा स्पष्ट रीतीनें पुष्कळच करितात २१०.

हे बहु असो यापरी । कीर्तितं मातें अवधारीं । एक विचरेती चराचरीं । पंडुकुमरा ॥ ११ ॥ मग आणिक ते अर्जुना । सावियाँ बहुवा जतंना । पंचप्राण मना । पाढाऊ घेउनी ॥ १२ ॥ बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंतु वज्रासनाची पौळी पन्नासिली । वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाहातीं यंत्रें ॥ १३ ॥ येथ उल्हाट शक्ती-चेनि उँजिवडें । मन पवनाचोनि सुरवाडें । सतरावियेचें पाणियाडें । बळियाविलें ॥ १४ ॥ तेव्हां प्रत्याहारें ख्याती केली । विकारांची सेंपिली बोहलीं । इंद्रियें बांधोनि आणिली । हृदयाआंतु ॥१५॥ तंव धारणावारु दाटिन्नले । महाभूतांतें एकवटिलें । मग चतुरंग सैन्य निवटिलें । संकल्पाचें ॥ १६ ॥ तयावरी जैतं रे जैतं । म्हणौनि ध्यानाचें निशाण वाजत । दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ॥ १७ ॥ पाठीं समाधि-श्रियेचा अशेखा । आत्मानुभव राज्यसुखा । पट्टाभिषेकु देखा । समरसें जाहला ॥१८॥ ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन । आतां ऐकें सांगेन । जे करिती एक ॥१९॥ तरी दोन्ही पालववेरी । जैसा एक तंतू अंबरीं । तैसा मीवांचूनि चराचरीं । जाणती ना ॥२२०॥ आदि ब्रह्मा करूनी । शेवटीं मशक धरूनी । माजी समस्त हें जाणोनि । स्वरूप माझें ॥ २१ ॥ मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजू लुंटिती । मीचि म्हणौनि ॥ २२ ॥ आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥ २३ ॥ जैसें उंचीं उदक पडिलें । ते तळवटवरी ये उगेलें । तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावोचि तयांचा ॥ २४ ॥ कां फळलिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा । तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥ २५ ॥ अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ती । जे जय जय मंत्रें अर्पिती । माझ्याचि ठायीं ॥ २६ ॥ नमितां मानापमान गळाले । म्हणौनि अवचितां मीचि जहाले । ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥ २७ ॥ अर्जुना हे गुरुवी भक्ती । सांगितली तुजप्रती । आतां ज्ञानयज्ञें यजिती । ते भक्त आइकें ॥ २८ ॥ परि भजन करिती हातवटी । तूं जाणत आहासि किरीटी । जे मागां इया गोष्टी । केलिया आम्हीं ॥ २९ ॥ तंव आथि जी अर्जुन म्हणे । हें दैविकिया प्रसादाचें करणें । तरि काय अमृताचें आरोगणें ।

हे फार वर्णन राहूं दे. अर्जुना! मग किती एक माझे भक्त माझें गुणानुवाद, कथा, वर्णन करीत चराचरात्मक जगतांत संचार करतात ११. दुसरे कित्येक जे आहेत ते सहजच पंचप्राण व मन यांना मार्गदर्शक, वाटाडे म्हणून मोठ्या तत्परतेने जतन करून घेऊन १२. [यापुढें महाराज क्रमानें अष्टांग योगाचें वर्णन करितात.] बाहेरच्या बाजूस यमनियमांचें कांटेरी कुंपण लावून त्या आंत मूळबंधाचा, वज्रासनाचा कोट तयार केला व त्या कोटावर प्राणायामरूपी सतत चालू असणाऱ्या, जणुं आग ओतणाऱ्या तोफा ठेविल्या १३. मग अधोमुख कुंडलिनी ऊर्ध्वमुख, जागृत होऊन तिच्या प्रकाशानें मन व प्राण यांच्या अनुकूलतेने चंद्रामृताचें अर्थात् सतराव्या जीवनकलेचें [आनंदाचे] तळें स्वाधीन करून घेतले १४. त्या वेळीं प्रत्याहारानें हा मोठा पराक्रम केला व तो म्हणजे कामक्रोधादि विकारांना प्रजेसह-परिवारासह जाळून टाकले आणि इंद्रियें बांधून हृदयांत आणली १५. तो इतक्यांत धारणारूप घोडेस्वारांनी शत्रूवर गर्दी करून, हल्ला करून पंचमहाभूतांस आटवून एकत्र केले व संकल्पाचें चतुरंग सैन्यदल [मन, बुद्धि, चित्त व अहंकार हे] पार नाहींसें केले १६. नंतर 'जिंकलें रे जिंकलें' असें म्हणून [आपला जयजयकार सर्वांस कळविणारा] ध्यानाचा नगारा वाजूं लागतो व [ध्यानाने परब्रह्माशीं झालेले] तद्रूपतेचें एक छत्र झळकत असलेलें दिसतें १७. नंतर समाधीचें संपूर्ण ऐश्वर्य ज्या आत्मानुभवांत आहे. त्या ब्रह्मात्मैक्यानुभवात्मक सामरस्यामुळें म्हणजे एकरसता झाल्यामुळें त्या आत्मानुभवाच्या राज्यसुखावरच त्या योग्याला पट्टाभिषेक झाला १८. हे अर्जुना! असें हे माझें गहन भजन, [अष्टांग योगद्वारां] कोण करितात ते तुला सांगितलें. आतां याशिवाय दुसरे कोणी अन्यप्रकारानें भजन करतात तो प्रकार सांगतो तें ऐक १९. तर वस्त्रामध्यें एका पदरापासून दुसऱ्या पदरापर्यंत जसा आडवा व उभा एक भरलेला तंतूच असतो त्याप्रमाणें चराचरात्मक विश्वामध्यें माझ्याशिवाय ते इतर दुसरे कांहींएक ओळखत नाहींत २२०. सर्वांमध्यें श्रेष्ठ असलेल्या ब्रह्मदेवापासून आरंभ करून तो अखेर अतिशय क्षुद्र असलेल्या चिलटापर्यंत मध्यंतरी जें जें कांहीं आहे तें तें सर्व माझेंच स्वरूप आहे, असें जाणून २१. मग 'हा लहान हा मोठा' असें न म्हणतां सजीव व निर्जीव असा भेद न जाणता जी जी 'वस्तु' दृष्टीस पडेल ती ती वस्तु मद्रूपच आहे, अशा [सर्वत्र परमात्माच सभराभरित आहे, या अन्वयात्मक] सरळ भावानें ते जीवमात्राला सरळ लोटांगण घालतात २२. त्यास आपले मोठेपण आठवत नसते. पुढें येणारी वस्तु योग्य आहे किंवा अयोग्य आहे असा विचार न करतां सर्व वस्तूला परमात्माच आहे, असें समजून सरसकट नमस्कार करणें हेंच त्यांना आवडतें २३. ते भूतांना कसे नम्र असतात पहा-उंचावरून पडणारे पाणी एकदम सहज सखल भागाकडे अगदीं तळाशीं येऊं लागते, त्याप्रमाणें दृष्टीस पडणाऱ्या भूतमात्रास नमस्कार करणें असा त्यांचा स्वभावच असतो २४. किंवा असें पहा कीं, फळ भाराने लगडलेल्या झाडाची खांदी जशी आपोआप भूईकडे लवलेली असते त्याप्रमाणें यच्चयावत् प्राणिमात्रापुढें ते अति विनम्रपणाने लवतात २५. ते नेहमी गर्वरहित होऊन राहत असतात व नम्रता हीच त्यांची संपत्ति असते व [ती संपत्ति व सर्व कर्में] ते 'जय जय' या मंत्रानें माझ्या ठिकाणीं समर्पण करतात २६. नम्रतापूर्वक नमस्कार केला असतां त्यांचें मान व अपमान गलित म्ह. नाहींसें झाले म्हणून ते सहजगत्या मत्स्वरूपच होऊन राहातात व अशा प्रकारें माझ्या स्वरूपांत मिसळून, ऐक्य होऊनहि निरंतर माझीच उपासना करितात २७. अर्जुना! अशा प्रकारें ही सर्व श्रेष्ठ प्रतीची भक्ति तुला सांगितली. आतां जे माझी ज्ञानयज्ञाने आराधना-भक्ति करतात, ते भक्त कोणते तें ऐक २८. पण अर्जुना! त्यांची भजन करण्याची शैली तुला माहीत आहेच. कारण या गोष्टी आम्हीं मागे [अध्याय ४१ श्लोक ३३ ते ४२] वर्णन केलेंच आहे २९. तेव्हां अर्जुन म्हणाला, "होय महाराज! हे ईश्वरी प्रसादाचेंच करणें आहे; [मागे हे मी ऐकलें आहे खरें] तथापि-अमृताचें

१ गुणानुवाद गात. २ हिंडतात. ३ जगतांत. ४ सर्वथा. ५ जिंकून. ६ मनाला पंचप्राण वाटाड्या. ७ जयपत्र. ८ कुंपण. ९ मूळबंधाची. १० आवार तयार करून घालून. ११ तोफा. १२ कुंडलिनीच्या प्रकाशानें. १३ अनुकूलतेनें. १४ चंद्रामृताचें, सतराव्या कलेचें. १५ तळें. १६ बळकाविलें, स्वाधीन करून घेतलें. १७ इंद्रियांच्या अंतर्मुखतेनें १८ पराक्रम. १९ परिवार. २० नाहींसा केला. २१ ध्यान-परिपक्वदशा हेच कोणी घोडे. २२ हल्ला केला. २३ ऐक्य केलें. २४ नाहींसें केलें. २५ जय रे जय. २६ नगारा, भेरी. २७ एकरूपतेचें. २८ सिंहासनीं. २९ अखंड.

पुरे म्हणवे ? ॥ २३० ॥ या बोला श्रीअनंतें । लागटा देखिलें तयांतें । कीं सुखावलेनि चित्तें । डोलतु असे ॥ ३१ ॥ म्हणे भलें केलें पार्था । एऱ्हवीं हा अनवसरु सर्वथा । परि बोलवीतसे आस्था । तुझी मातें ॥ ३२ ॥ तंव अर्जुन म्हणे हे कायी । चकोरेंवीण चांदणेंचि नाहीं । जगचि निववविजे हा तयाच्या ठायीं । स्वभावो कीं जी ॥ ३३ ॥ येरें चकोरें तिये आपुलिये चाडे । चांचू करिती चंद्राकडे । तेवीं आम्ही विनवूं तें थोकडें । देवो कृपासिंधु ॥ ३४ ॥ जी मेघु आपुलिये प्रौढी । जगाची आर्ती दवडी । वांचूनि चातकाची ताहान केवढी । तो वर्षावो पाहुनी ? ॥ ३५ ॥ परि चुळा एकाचिया चाडे । जेवीं गंगेतेंचि ठाकणें पडे । तेवीं आर्त बहु कां थोडे । तरी सांगावें देवें ॥ ३६ ॥ तेथें देवें म्हणितलें राहें । जो संतोषु आम्हां जाहला आहे । तयावरी स्तुति साहे । ऐसें उरलें नाहीं ॥ ३७ ॥ पैं परिसतु आह्मासि निकियापरी । तोंचि वक्तृत्वा वऱ्हाडीक करी । ऐसें पुरस्करोनि श्रीहरी । आदरिलें बोलों ॥ ३८ ॥

ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते । एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

तरी ज्ञानयज्ञु तो एवं रूपु । जेथ आदिसंकल्पु हा यूपु । महाभूतें मंडपु । भेदु तो पशु ॥ ३९ ॥ मग पांचांचे जे विशेष गुण । अथवा इंद्रियें आणि प्राण । हेचि यज्ञोपचारभरण । अज्ञान घृत ॥ २४० ॥ तेथ मनबुद्धीचिया कुंडा-। आंतु ज्ञानाग्नि धडफुडा । साम्य तेचि सुहाडा । वेदिका जाणें ॥ ४१ ॥ सविवेकमतिपाटव । तेचि मंत्र-विद्यागौरव । शांति स्रुक्स्रुव । जीवु यज्वा ॥ ४२ ॥ तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेकमहा-मंत्रें । ज्ञानाग्निहोत्रें । भेदु नाशी ॥ ४३ ॥ तेथ अज्ञान सरोनि जाये । आणि यजिता यजन हें ठाये । आत्मसमरसीं न्हाये । अवभृथीं जेव्हां ॥ ४४ ॥ तेव्हां भूतें विषय करणें । हें वेगळालें कांहीं न म्हणे । आघवें एकचि ऐसें जाणें । आत्मबुद्धि ॥ ४५ ॥ जैसा चेइला तो अर्जुना । म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना । मीचि जाहालों होतों ना । निद्रावशें ? ॥ ४६ ॥ आतां सेना ते सेना नव्हे । हें मीच एक आघवें । ऐसें एकत्वें मानवें । विश्व तयां ॥ ४७ ॥ मग तो जीवु हे भाष सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे । ऐसे भजती ज्ञानाध्वरें । एकत्वें येणें ॥ ४८ ॥ अथवा अनादि हें । अनेक । जें आनासारिखें एका एक । आणि नामरूपादिक । तेंही विषम ॥ ४९ ॥

सेवन कधीं पुरें असें म्हणवतें कां?" २३०. तेव्हां या अर्जुनाच्या वरील बोलण्यावरून तो हें श्रवणद्वारा जाणण्याविषयीं उत्सुक–आतुर आहे असें पाहून लागलीं व भगवान् सुखावलेल्या अंतःकरणानें डोलूं लागले ३१. आणि म्हणाले, पार्था फार चांगले केलेस नाहींतर मागें सांगितलेली गोष्ट पुनः सांगणें हें या युद्धाच्या वेळीं सर्वथैव अनुचित तर आहे खरेच; पण तुझी ऐकण्याची उत्कंठा मला बोलण्यास भाग पाडते" ३२. तेव्हां अर्जुन म्हणाला "देवा ! हें काय म्हणता ! चकोराशिवाय चांदण्याचा उपयोग नाहींच कीं, काय ? महाराज ! अखिल जगालाहि शांत करावें हा तर त्या चंद्राचा स्वभावच आहे ३३. आतां चकोरपक्षी आपल्या गरजेपुरतेच आपल्यास शांतता लाभावी या मर्यादित इच्छेनें चंद्राकडे चोच करतात त्याचप्रमाणें आम्हीं आपली विनंती करावी हें किती तरी थोडें आहे. परंतु देवा ! जगाचें कल्याण करण्याविषयीं आपण कृपासिंधु आहांत ३४. महाराज ! मेघ आपल्या उदारपणाच्या वर्षावानें संपूर्ण जगाची अडचण निवारण करितो, वास्तविक त्या त्याच्या मोठ्या उदार वर्षावाच्या मानानें पाहिलें असतां त्या चातकाची तहान ती केवढी असणार ! ३५. परंतु एक चूळभर पाण्याची जरी इच्छा झाली असली तरी ज्याप्रमाणें गंगेलाच जाणें भाग पडतें त्याप्रमाणें आमची श्रवणाची इच्छा थोडी असो कीं, फार असो, तरी ती देवांनाच पूर्ण करण्यासाठीं सांगितलें पाहिजे ३६. तेव्हां देव म्हणाले–"अर्जुना, आतां तुझें बोलणें राहूं दे. आम्हांला जो सांगण्याविषयीं संतोष झाला आहे, त्याला स्तुतीची आवश्यकता उरली, नाहीं ३७. परंतु तूं ज्याप्रमाणें लक्ष देऊन एवढा वेळ उत्तम तऱ्हेनें ऐकत आहेस ते श्रवण आमच्या बोलण्यास साहाय्यक आहे म्हणून तसेंच लक्ष देऊन आमच्या बोलण्यास मेजवानी कर, [ पुढेंहि तसेंच ऐक. ]" अशा रीतीनें श्रीहरींनीं अर्जुनास शाबासकी देऊन बोलण्यास सुरवात केली ३८.

**अन्वयार्थ**—**च अपि**–पण–**अन्ये**–कांहीं उत्तम अधिकारी–**ज्ञानयज्ञेन**–भगवानाविषयींचें ज्ञान हाच यज्ञ त्यानें–**यजन्तः**–पूजा करणारें–**मां**–मला–**एकत्वेन**–एकच परब्रह्म आहे, अशा ज्ञानानें–**उपासते**–उपासितात. कोणी–**पृथक्त्वेन**–सूर्य, चंद्र इत्यादि भेदानें माझी उपासना करितात व कोणी **विश्वतोमुखं**–तोच भगवान् सर्वतोमुख आहे असें समजून त्या विश्वरूपाला–**बहुधा**–अनेक प्रकारांनीं उपासितात १५.

तर "ज्ञानयज्ञ" तो अशा स्वरूपाचा आहे, की, ज्या ज्ञानयज्ञांत [ मी एक असलेला अनेक रूपांनीं व्हावें असा जो ] आदि संकल्प हाच [ पशू बांधावयाचा ] यज्ञस्तंभ होय, पंचमहाभूते हा यज्ञमंडप आहे. [ जीव व ईश्वर यांच्यातील ] भेद हाच पशु आहे ३९. मग पंचमहाभूतांचे शब्द स्पर्शादि जे विशेष गुण ते अथवा पांच इंद्रियें आणि पंचप्राण हीच यज्ञाची साहित्य–सामग्री होय व ब्रह्मविषयीं जें अज्ञान, तेंच तूप आहे २४०. हें अर्जुना ज्या यज्ञांत मन व बुद्धि हीं दोन कुंडें असून त्यांत ज्ञानरूपी अग्नि प्रदीप्त केला जातो [ सुख व दुःख द्वंद्वाविषयीं चित्ताची ] जी समता हीच बळकट वेदिका म्हणजे यज्ञकुंडाचा ओटा आहे, असें तूं समज ४१. आत्मनात्मविचार करण्याविषयीं जी बुद्धीची कुशलता तीच यज्ञांतील मंत्र होत; विद्येची महती हीं स्रुक् व शांति ही स्रुवा, [ स्रुक् व स्रुवा ही दोन लांकडीं पळ्यासारखीं यज्ञपात्र असतात ] व जीव हा यज्ञ करणारा यजमान होय ४२. तो यज्ञ करणारा जीव स्वानुभवरूप पात्रांनीं ब्रह्म विचाररूपी महामंत्रांनीं ज्ञानरूप अग्निहोत्र कर्मानें, उपर्युक्त जीव व ईश्वर यांच्या भिन्नपणाची आहुति देऊन तो भेद नाहींसा करितो ४३. त्या वेळेस अज्ञानरूपी तूप सरून जातें, यज्ञ करणारा व यज्ञक्रिया ही जागचे जागींच थांबतात. नंतर आत्मब्रह्मैक्यरसांत–आनंदरूपी पाण्यांत जीवरूपी यजमान जेव्हां अवभृथस्नान करतो ४४. तेव्हां यज्ञकर्ता, पंचमहाभूतें, शब्द स्पर्श इत्यादि विषय व इंद्रियें हीं कांहीं वेगळालीं आहेत, असें म्हणत नाहीं कारण, तो ब्रह्मात्मैक्य बुद्धीमुळें ही सर्व एकरूपच आहेत [ ब्रह्मरूपच ] आहेत, असें तो ज्ञानी जाणतो ४५. अर्जुना ज्याप्रमाणें झोंपेंतून जागा झालेला मनुष्य म्हणतो कीं, स्वप्नांत पाहिलेली चित्रविचित्र सेना झोंपेला वश झाल्यामुळें मीच झालों होतों ना ! ४६. आतां जी सेना स्वप्नांत पाहिली होती ती खरोखरीची सेना नव्हती, तर ती मीच एकटा झालों होतों,–अर्जुना, अशा प्रकारें त्या पुरुषाला सर्व जग एकरूपानें प्रत्ययास येते ४७. मग ती 'मी जीव आहें,' असा व्यवहार करणारी तादात्म्यभ्रांतीरूप वृत्ति नाहींशीं होतें. ब्रह्मदेवापासून तो तृणापर्यंत परमात्माच ओतप्रोत भरलेला आहे अशा प्रकारें ज्ञानयज्ञद्वारां ऐक्य बोधानें किती एक मला भजतात ४८. किंवा अनेकत्व हें अनादि स्वरूपाचेच आहे, कारण या विश्वामध्यें एका सारखेंच दुसरें, परंतु भिन्न भिन्न आहेत. त्यांचीं नांवें व रूपें ही सुद्धां निरनिराळीं आहेत. ४९. म्हणून त्यास विश्वामध्यें भेद दिसला तरी त्यांच्या ज्ञानांत भेद

म्हणौनि विश्व भिन्न । परि न भेदे तयाचें ज्ञान । जैसे अवयव तरि आन आन । परि एकेचि देहींचे ।। २५० ।। कां शाखा सानिया थोरा । परि आहाति एकाचिया तरुवरा । बहु रश्मि परि दिनकरा । एकाचे जेवीं ।। ५१ ।। तेवीं नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनानी वृत्ती । ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेदा मातें ।। ५२ ।। येणें वेगळालेपणें पांडवा । करिती ज्ञानयज्ञु बरवा । जे न भेदती जाणिवा । जाणते म्हणौनि ।।५३।। ना तरी जेधवां जिये ठायीं । देखती कां जें जें कांहीं । तें मीवांचूनि नाहीं । ऐसाचि बोधु ।। ५४ ।। पाहें पां बुडबुडा जेउता जाये । तेउतें जळचि एक तया आहे । मग विरे अथवा राहे । तऱ्ही जळाचिमाजीं ।। ५५ ।। कां पवनें परमाणु उचलले । ते पृथ्वीपणावेगळे नाहीं केले । आणि माघौते जरी पडले । तरी पृथ्वीचिवरी ।। ५६ ।। तैसें भलतेथ भलतेणें भावें । भलतेंही हो अथवा नोहावें । परि तें मी ऐसें आघवें । होऊनि ठेले ।।५७।। अगा हे जेव्हडी माझी व्याप्ती । तेव्हडीचि तयांची प्रतीती । ऐसें बहुधाकारीं वर्तती । बहुचि होउनि ।। ५८ ।। हें भानुबिंब आवडे तया । सन्मुख जैसें धनंजया । तैसे ते विश्वा यया । समोर सदा ।। ५९ ।। अगा तयांचिया ज्ञाना । पाठी पोट नाहीं अर्जुना । वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ।। २६० ।। तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुक तयांचिया सद्भावा । तरी न करितां पांडवा । भजन जहालें ।। ६१ ।। एऱ्हवीं तरी सकळ मीचि आहें । तरी कवणीं कें उपासिला नोहें ?। एथ एकें जाणणेवीण ठाये । अप्राप्तासी ।। ६२ ।। परि तें असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितसांते । उपासिती मातें । ते सांगितलें ।। ६३ ।। अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पत असे मज एकीं । कीं नेणणें यासाठीं मूर्खीं । न पविजेचि मातें ।। ६४ ।।

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् । मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ।। १६ ।।

तोचि जाणिवेचा जरी उदयो होये । तरी मुद्दल वेदु मीचि आहें । आणि तो विधानातें जया विये । तो क्रतुही मीचि ।। ६५ ।। मग तया कर्मापासूनि बरवा । जो सांगोपांगु आघवा । यज्ञु प्रगटे पांडवा । तोही मी गा ।।६६।। स्वाहा मी स्वधा । सोमादि औषधी विविधा । आज्य मी समिधा । मंत्रु मी हवि ।। ६७ ।। होता मी हवन

होत नाहीं, ज्याप्रमाणें अवयव जरी भिन्न भिन्न असेल तरी एकाच देहाचें आहेत २५०. किंवा फांद्या जरीं लहान मोठ्या असल्या तरी त्या एकाच झाडाच्या आश्रयावर असतात, अथवा पुष्कळ किरणें दृष्टीस पडलीं तरीहि ती जशीं एकाच सूर्याचीं असतात ५१. त्याप्रमाणें अनेक व्यक्ति त्यांचीं भिन्न भिन्न नांवें व स्वभावहि भिन्न भिन्न आहेत, अशा [ उपाधितः ] भेद पावलेल्या भूतांमध्यें [ प्रत्यक् ] अभिन्न जो मी, त्या मलाच ते जाणतात ५२. हे पांडवा ! अशा रीतीनें सर्व भूतें [ उपाधितः ] वेगवेगळीं भासत असली, तरीहि ते [ प्रत्यगभिन्न बोधामुळें ] चांगला-उत्तम असा 'ज्ञानयज्ञ' करितात, कारण ते जाणते असल्यामुळें [ विश्वांतील उपाधिकृत भेदामुळें ] ज्ञानानें भेदास पावत नाहींत. [ वेगवेगळ्या पदार्थज्ञानांतून अन्वयात्मक बोधानें सर्वांत अधिष्ठानरूपानें समान व्याप्त असणाऱ्या परमात्म्यास पाहतात ] ५३. किंवा जेव्हां व ज्या ठिकाणीं ते जे जे कांहीं पाहतात, ते ते माझ्या स्वरूपावांचून दुसरें कांहीं नाहीं असाच ज्यांचा दृढबोध असतो ५४. हें पहा ! पाण्यांवरील बुडबुडा जिकडे जातो तिकडे त्याला एक पाणीच आहे, मग तो नाहींसा झाला तरी पाण्यांत अथवा राहिला तरी तो पाणीरूपच असतो ५५. किंवा वाऱ्यानें मातीचे कण वर उंच उडाले तरी ते कांहीं पृथ्वीपणाहून वेगळे केलें जात नाहींत, आणि पुनः जरी ते धुळीकण खालीं पडले तरी ते पृथ्वीवरच पडतात ५६. त्याप्रमाणें वाटेल तेथें, वाटेल त्या भावनेनें, वाटेल तें होवो अथवा न होवो, परंतु तें सर्व 'मीच आहे' असें ते [ स्वानुभवानें ] होऊन राहिलेले असतात ५७. अर्जुना ! माझ्या स्वरूपाची जेवढी व्यापकता आहे तेवढीच त्याची अनुभूति [व्यापकस्वरूपाची] असतें असें जाणून बहुप्रकारानें जग दिसले, तरी बहुरूपानें मीच आहे, म्हणून ते वावरत असतात ५८. ज्याप्रमाणें हे सूर्यबिंब वाटेल त्यास आपल्यासमोर असल्यासारखें दिसतें, त्याप्रमाणें ते या सर्व विश्वाला [ व्यापकानुभूतीमुळें ] सदाच सन्मुख असतात ५९. अर्जुना ! त्यांच्या ज्ञानास आंतबाहेर, मागील बाजू-पुढील बाजू असा भेद नाहीं [ ज्ञानाच्या मागे आश्रय नाहीं व पुढें विषय नाहीं कारण ते दृश्य, द्रष्टाभावरहित, आश्रयविषयभावरहित आहे. ] ज्याप्रमाणें वायु हा आकाशाच्या सर्व अवकाशभर व्याप्त आहे २६०. त्याप्रमाणें मी जेवढा संपूर्ण आहे, त्याच तुलनेचा त्यांचा सद्भाव [ व्यापकब्रह्मानुभव ] असतो त्यामुळें [ व्यापकानुभूतिसंपन्नतेमुळें ] त्याने लोकांस दिसण्याजोगे कृतीरूप असें भजन न केलें तरीहि त्यांच्याकडून ते भजन सहजच घडत असतें ६१. अरे ! तसा सहज विचार करून पाहिले तर, यच्चयावत् [ सर्व जगदधिष्ठानभूत ब्रह्म व सर्व जीवांचा अधिष्ठानभूत आत्मा ] मीच आहे, तर मग माझी कोणाकडून व कोठे उपासना घडत नाहीं. [ यच्चयावत् जीव आपल्या नित्य निरतिशय आत्मसुख प्राप्त्यर्थच खटपट करीत असतात अर्थात् सर्वांचीच सर्वत्र सहजच उपासना चालू आहे ] असें असूनहि [अशा प्रकारच्या] एका ज्ञानाविना [ज्यांना मी अशा उपरिनिर्दिष्ट स्वरूपानें अज्ञात आहे त्यांना अशी यथार्थ जाणीव नसल्यामुळें ] ही सहज-उपासना घडत नाहीं [ म्हणजे माझ्या यथार्थ ज्ञानाच्या अभावीं त्यांचें भजन त्यास घडत नाहींसें, थांबल्यासारखें झालें आहे किंवा मी नित्यप्राप्त असून त्यांस अप्राप्तवत् होण्याचें एकमेव कारण म्हणजे त्यांना माझें यथार्थ ज्ञान नाहीं हे होय ] ६२. परंतु हें असो ! अशा स्वरूपाच्या योग्य ज्ञानयज्ञानें यजन करून जे माझी उपसना करतात ते भक्त मी तुला सांगितलें ६३. हे सर्व सर्वांच्याद्वारें, सदासर्वकालीं माझ्या एकट्याच्याच स्वरूपीं सर्वतोपरि सहजच अर्पण होत असते. परंतु हें मूर्खांनी न जाणल्यामुळें [ यथार्थ स्वरूपविषयक अबोधामुळें सहज समर्पित होणारी सर्व कर्मे ] मला प्राप्तच होत नाहींत ६४.

**अन्वयार्थ—अहं क्रतुः**—मी क्रतु—यज्ञ म्हणजे एक प्रकारचें वेदोक्त कर्म आहे—**अहं यज्ञः**—मी वैश्वदेवादि स्मार्त कर्म आहे—**अहं स्वधा**—मी पितरांना दिलेलें अन्न आहे—**अहम् औषधं**—तांदूळ गहूं इत्यादि धान्य ज्यापासून होतें त्या औषधी किंवा प्राणाकडून खाल्लें जाणारें जें अन्न तें औषध मी आहे—**मन्त्रः अहं**—मंत्र मी आहे—**अहम् एव आज्यं**—मीच आज्य म्हणजे घृतादि हवि आहे—**अहम् अग्निः**—मीच अग्नि आहे—**अहं हुतं**—मीच हवनकर्म आहे १६.

त्याच ज्ञानाचा जर उदय होईल तर मुळांत मुख्य वेद मीच आहे; आणि तो जी विधि-अनुष्ठानें सांगतो त्या अनुष्ठानाचें विधानरूप क्रतुहि [ यज्ञ कर्महि ] मीच आहे ६५. मग हे अर्जुना ! त्या वेदोक्त कर्मापासून अंगें व उपांगें यासहित प्रगट होणारा जो यथाविधि चांगला यज्ञ, तोहि मीच ६६. स्वाहा [ देवास द्यावयाच्या आहुतीचें अन्न ] मी आहे. स्वधा, पितरासहि द्यावयाच्या आहुतीचें अन्न मी आहे, यज्ञोपयोगी सोमवल्ली वगैरे नानाप्रकारच्या औषधी मी आहे. यज्ञांतील घृतहि मी आहे, समिधा मी आहे, यज्ञांत उच्चारावयाचें मंत्र मी आहे, होमद्रव्यहि मीच आहे ६७. होता म्हणजे यज्ञकर्म करण्या-

कीजे । तेथ अग्नी तो स्वरूप माझें । आणि हुतक वस्तु जें जें । तेही मीचि ॥ ६८ ॥

पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः । वेद्यं पवित्रमोंकार ऋक्सामयजुरेव च ॥ १७ ॥

पैं जयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीस्तव अष्टांगें । जन्म पाविजत असे जगें । तो पिता मी गा ॥ ६९ ॥ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेवीं मी चराचरीं । माताही होय ॥ २७० ॥ आणि जाहाले जग जेथ राहे । जेणें जीवित वाढत आहे । तें मी वांचूनि नोहे । आन निरुतें ॥ ७१ ॥ इयें प्रकृतिपुरुषें दोन्हीं । उपजलीं जयाचिया अमनेंमनीं । तो पितामह त्रिभुवनीं । विश्वाचा मी ॥ ७२ ॥ आणि आघवेया जाणणेयाचिया वाटा । जया गांवा येती गा सुभटा । वेदांचियां चोहटां । वेद्य जें म्हणिजे ॥७३॥ जेथ नानामतां बुझावणी जाहाली । एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली । चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं । जें पवित्र म्हणिजे ॥७४॥ पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु । घोषध्वनीनादाकारु । तयाचें गा भुवन जो ॐकारु । तोही मी गा ॥७५॥ जया ॐकाराचिये कुशीं । अक्षरें होतीं अउमकारेंसीं । जियें उपजत वेदेंसीं । उठलीं तिन्हीं ॥ ७६ ॥ म्हणौनि ऋग्यजुःसामु । हे तीन्ही म्हणे मी आत्मारामु । एवं मीचि कुळक्रमु । शब्दब्रह्माचा ॥ ७७ ॥

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् । प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

हें चराचर आघवें । जिये प्रकृती आंत सांठवे । ते शिणली जेथ विसवे । ते परम गती मी ॥ ७८ ॥ आणि जयाचेनि प्रकृती जिये । जेणें अधिष्ठिली विश्व विये । जो येऊनि प्रकृती इये । गुणातें भोगी ॥ ७९ ॥ तो विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा एथ पंडुसुता । मी गोसावी असे समस्ता । त्रैलोक्याचा ॥ २८० ॥ आकाशें सर्वत्र वसावें । वायुनें नावभरी उगे नसावें । पावकें दहावें । वर्षावें जळें ॥ १८ ॥ पर्वतीं बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी । पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥ ८२ ॥ म्यां बोलविल्या वेदु बोले । म्यां चालविल्या सूर्यु चाले । म्यां हालविल्या प्राणु हाले । जो जगातें चाळिता ॥८३॥ मियांचि नियमिलासांता । काळु ग्रासितसे भूतां । इयें म्हणियागतें पंडुसुता । सकळें जयाचीं ॥ ८४ ॥ जो ऐसा समर्थु । तो मी जगाचा नाथु । आणि गगनाऐसा साक्षिभूतु । तोही मीचि ॥ ८५ ॥ इहीं नामरूपीं आघवा । जो भरला असे पांडवा । आणि नामरूपांचाही वोल्हावा । आपणचि जो ॥ ८६ ॥ जैसे जळाचे कल्लोळ । आणि कल्लोळीं आथी जळ ।

साठीं नेमलेला ब्राह्मण ऋत्विज मी आहे, ज्यांत हवन करावयाचें तो अग्नि हे तर माझेंच स्वरूप आहे आणि अग्नींत हवन करण्याच्या ज्या ज्या वस्तु, त्याहि मीच आहे. ६८.

**अन्वयार्थ**—**अहम् अस्य जगतः**–मीं या जगाचा–**पिता**–जनक आहे–**माता**–जननी आहें–**धाता**–प्राण्यांना कर्मफल देणारा आहें–**पितामहः**–पित्याचा पिता आहें–**वेद्यं**–ब्रह्मादि ज्ञेय वस्तु मी आहें–**पवित्रं**–पावन करणारें यज्ञ–यागादि पुण्यकर्म मी आहें–**ओंकारः**–प्रणव मी आहें–**ऋक्**–ऋग्वेद–**साम**–सामवेद–**च यजुः एव**–आणि यजुर्वेद मी आहे १७.

हें पहा, ज्या परमात्म्याच्या अध्यासिक अंगसंगानें अष्टांग प्रकृतिपासून या जगास जन्म प्राप्त होतो, तो जगत्पिता मी आहे ६९. अर्धनारी नटेश्वर स्वरूपांत ज्याप्रमाणें पुरुष तोच स्त्री असतो–त्याचप्रमाणें स्थावरजंगमाचे बाबतींत माताहि मीच आहे २७०. आणि उत्पन्न झालेलें जग ज्या ठिकाणीं राहतें व ज्याच्या योगानें जगाचे जीवित–आयुष्य वाढत आहे ते स्थान म्हणजे निःसंशय माझ्याशिवाय दुसरें कोणतेच नाहीं ७१. प्रकृति व पुरुष हीं दोन्हीं ज्याच्या मन किंवा अंतःकरणोपाधिरहित असलेल्या स्वरूपांत म्हणजे निर्गुणस्वरूपांत उत्पन्न होतात, तो या त्रिभुवनांत विश्वाचा आजा मीच आहे [ माया विशिष्ट ईश्वर विश्वाचा 'पिता' म्ह० चैतन्यप्राधान्यानें विश्वाचे निमित्त कारण आहे. व तोच 'माता' म्ह० मायाप्राधान्यानें विश्वाचें उपादान कारण आहे. व प्रकृति–पुरुष यांस समव्याप्त कार्यकारणातीत विशुद्ध ब्रह्म 'पितामह' म्ह० अधिष्ठान आहे; अशी तीन पदांची तीन अर्थांमध्यें योजना संभवते ] ७२. अर्जुना, सर्व ज्ञानांच्या वाटा ज्या [ ब्रह्मरूपात्मक ] गांवात येऊन मिळतात व चारी वेदांच्या चव्हाट्यावर ज्याला [ देवाला ] 'वेद्य' असें म्हणतात ७३. त्या ठिकाणीं पुष्कळ प्रकारच्या मतांची समजूत पटून तीं ऐक्यतेस आलीं; सर्व शास्त्रांची एकमेकांशीं असलेली अनोळख फिटली व चुकलेलीं ज्ञानें जेथें एकत्र मिळालीं, असें जें स्थान [ परमात्म स्वरूप ] त्यालाच पवित्र म्हणतात ७४. हें पहा ब्रह्मरूप बीजाला फुटलेला अंकुर म्हणजे परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचांचे मंदिर असा जो ॐकार तोहि मीच आहे ७५. ज्या ॐकाराच्या पोटीं अ, उ व म् [ अकार, उकार व मकार ] अशीं तीन अक्षरें उत्पन्न होतात व जीं उपजताक्षणींच तिन्हीं वेदास घेऊनच प्रगट झालीं ७६. म्हणून ऋग्वेद, यजुर्वेद, व सामवेद हे तिन्हीं वेदहि मीच आहे. त्याप्रमाणें वेदांची अखिल वंशपरंपराहि मीच आहे." असें आत्माराम श्रीकृष्ण म्हणतात ७७.

**अन्वयार्थ**—**गतिः**–कर्माचें फल मीं आहें–**भर्ता**–कर्मफल देऊन पोषण करणारा मी आहें–**प्रभुः**–सर्वांचा स्वामी मी आहें–**साक्षी**–प्राण्यांनीं केलेलें व न केलेलें पुण्य पापादि पाहणारा मी आहे–**निवासः**–सर्व प्राण्यांचें निवासस्थान मी आहें–**शरणं**–रोगादिकांच्या योगानें आर्त होऊन शरण आलेल्या भक्तांची आर्ति–पीडा नाहींशी करणारा मी आहें–**सुहृत्**–उलट उपकाराची अपेक्षा न करितां उपकार करणार मी आहें–**प्रभवः**–जगाचा उत्पादक–**प्रलयः**–जगाचा संहार करणारा–**स्थानं**–जगाची स्थिति करणारा–**निधानं**–कर्मफलांचा निधि, व–**अव्ययं बीजं**–जगाचें अक्षय बीज मी आहें १८.

"हें सर्व स्थावरजंगमात्मक विश्व प्रलयकालीं ज्या प्रकृतीत सांठवते ती प्रकृति श्रमली असतां ज्या ठिकाणीं विश्रांति पावते, तें उत्तम स्थान, ती परमगति मी आहें; ७८. आणि ज्याच्यामुळें ही प्रकृति जगते, ज्यानें तिचा अंगीकार केला असतां ती विश्व प्रसवतें व जो प्रकृतीस्थ होऊन सत्त्व रज व तम या तिच्या गुणांचा उपभोग घेतो ७९. तो विश्वलक्ष्मीचा पति मीच आहे. आणि अर्जुना, या सर्व त्रैलोक्याचा सत्ताधारी स्वामीहि मीच आहे २८० आकाशानें सर्व ठिकाणीं असावें, वायुनें क्षणभर देखील स्वस्थ राहूं नये अग्नीनें जाळावें, मेघानें वर्षाव करावा ८१. पर्वतांनीं आपली बैठक सोडूं नये, समुद्रानीं आपली मर्यादा उल्लंघन करूं नये व पृथ्वीनें सर्व भूतांचा भार वाहावा अशी सर्व प्रकारची आज्ञा माझी आहे ८२. मी बोलविलें तर वेद बोलतात, मी चालविलें तर सूर्य चालतो, सर्व जगाचा चालक जो प्राण तोहि मी हालविलें तर हालतो; ८३. आणि मीच आज्ञापिलें असतां भूतांना हा काळ ग्रासतो. अर्जुना ! याप्रमाणें हीं सर्व ज्याचीं आज्ञाधारक आहेत ८४. असा जो समर्थ म्ह० सर्व शक्तिमान् आहे तो या जगाचा नाथ–मालक मीच आहे व आकाशाप्रमाणें सर्व ठिकाणीं व्याप्त असून साक्षिभूत, अलिप्त असणारा तोहि मीच ८५. हे अर्जुना ! याप्रमाणें या नामरूपांत जो सर्वत्र भरलेला आहे आणि जो आपणच नामरूपांचाहि आधारभूत जिव्हाळा आहे ८६. ज्याप्रमाणें लाटा पाण्यांतच उत्पन्न होतात आणि लाटांतहि पाणी असतें त्याप्रमाणें संपूर्ण जग ज्या ठिकाणीं वास्तव्य करून

१ स्थावरजंगमांत. २ अंतःकरणोपाधिरहित स्वरूपांत, निर्गुणांत. ३ चारी वेद एकत्र मिळण्याचें (स्थान) चोहटा त्यांत ज्याला वेद्य म्हणतात. ४ समजूत. ५ सरली. ६ मूळ ब्रह्माला. ७ कोंब. ८ परा, पश्यंती, मध्यमा व वैखरीरूप वाचा.

ऐसेनि वसवीतसे सकळ । तो निवासु मी ॥ ८७ ॥ जो मज होय अनन्य शरण । त्याचें निवारी मी जन्ममरण । यालागीं शरणागता शरण्यं । मीचि एकु ॥८८ ॥ मीचि एक अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतीगुणें । जीतं जगाचेनि प्राणें । वर्तत असें ॥ ८९ ॥ जैसा समुद्र थिल्लँर न म्हणतां । भलतेथ बिंबें सविता । तैसा ब्रह्मादि सर्वा भूतां । सुहृद तो मी ॥२९०॥ मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासि वोलावा । सृष्टिक्षयप्रभवां । मूळ तें मी ॥ ९१ ॥ बीज शाखांतें प्रसवे । मग तें रूखपण बीजीं सामावे । तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे ॥ ९२॥ ऐसें जगाचें बीज जो संकल्पु । अव्यंक्त वासनारूपु । तया कल्पांतीं जेथ निक्षेपुं । होय तें स्थान मी ॥९३॥ इयें नामरूपें लोटेती । वर्णव्यक्ती आटती । जातीचे भेद फिटती । जैं आकारू नाहीं ॥९४॥ तैं संकल्पवासनासंस्कार । मागौतें रचावया चराचर । जेथ राहोनि असती अमरे । तें निधान मी ॥ ९५ ॥

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च । अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥**

मी सूर्याचेनि वेषें । तपें तैं हें शोषे । पाठीं इंद्र होऊनि वर्षें । तैं पुढति भरे ॥ ९६ ॥ अग्नि काष्ठें खाये । तें काष्ठचि अग्नि होये । तैसें मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें ॥ ९७ ॥ यालागीं मृत्यूच्या भागीं जें जें । तेंही पैं रूप माझें । आणि न मरतें तंव सहजें । मीचि आहें ॥ ९८ ॥ आतां बहु बोलोनि सांगावें । तें एंकिहेळां घे पां आघवें । तरी सतासंतही जाणावे । मीचि पैं गा ॥ ९९ ॥ म्हणौनि अर्जुना मी नसें । ऐसा कवणु ठाव असे ? । परि प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें ? ॥ ३०० ॥ तरंग पाणियेवीण सुंकती ! ॥ रश्मि वातीवीण न देखती ! । तैसे मीचि ते मी नव्हती । विस्मो देखें ! ॥ १ ॥ हें आंतबाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिलें । कीं कैसें कर्म तयां आड आलें । जें मीचि नाहीं म्हणती ? ॥ २ ॥ परि अमृतकुहां पडिजे । कां आपणयांतें कडिये काडिजे । ऐसे आथी काय कीजे । अप्राप्तासी ॥ ३ ॥ ग्रासा एका अन्नासाठीं । अंधु धांवताहे किरीटी । आढळला चिंतामणि पायें लोटी । आंधळेपणें ॥ ४ ॥ तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे । म्हणौनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंवीण ॥ ५ ॥ आंधळेया गरुडाचे पांख आहाती । ते कवणा उपेगा जाती ? । तैसें सत्कर्माचे उपखे ठाती । ज्ञानेंवीण ॥ ६ ॥

असते. जगद्रचना होते अशा प्रकारें जगताचें वसतिस्थान मीच आहे ८७. जो मला एकनिष्ठपणें शरण येतो त्याचे जन्म व मी मरण निवारण करतो व त्यास मुक्त करितों. म्हणून शरणागतास शरण येण्यास योग्य असा एकटा मीच आहें ८८. मी [ तत्त्वतः ] एक असून [ मायाशक्तिमुळें ] अनेक रूपें धारण करून वेगवेगळ्या प्रकृतिगुणाप्रमाणें स्वभावानुसार जगांतील जीवंत प्राणीमात्रांत प्राणरूपानें मीच वागत असतो ८९. ज्याप्रमाणें सूर्य हा समुद्र किंवा डबकें असें न म्हणतां वाटेल तेथें प्रतिबिंबित होतो, त्याप्रमाणें ब्रह्मदेवापासून चिलटापर्यंत सर्व प्राणिमात्रांवर हा ब्रह्मदेव, हा कीटक असा भेद न करतां व प्रत्युपकाराची अपेक्षा न बाळगतां समान उपकार करणारा तो मीच आहे ९०. हे पांडवा या त्रिभुवनाचें जीवन मीच आहे आणि उत्पत्ति, स्थिती व लय या तीन अवस्थांस जे आद्य कारण तेंहि मीच ९१. बीजापासून वृक्ष, शाखा उत्पन्न होतात, मग तें संपूर्ण वृक्षपण त्या बीजांत समाविष्ट-लीन होते. त्याप्रमाणें आदि संकल्पापासून सर्व जगाची उत्पत्ति होते आणि पुनः तें सर्व जग आदिसंकल्पांतच लय पावतें ९२. असा जगाचें बीजभूत–आद्यकारणरूप संकल्प कीं जो इंद्रिया-दिकांस अगोचर सूक्ष्मवासनात्मक असतो तो संकल्पहि कल्पांतीं जेथें लय होतो तें स्थान मीच आहे ९३. जेव्हां हा व्यक्त आकार नाहींसा होतो तेव्हां हीं सर्व नाम–रूपें लय पावतात, वर्ण व्यक्ति आटून नाहींतशा होतात व निरनिराळ्या जातींचें भेदहि नाहींसें होतात ९४. त्यावेळीं पुन्हा जग निर्माण करण्याकरितां वासनात्मक संकल्पाचे सूक्ष्म संस्कार ज्या ठिकाणीं अमर होऊन राहातात तें ठिकाणहि मींच आहे ९५.

**अन्वयार्थ**––**अहं**–मीं सूर्यरूपानें–**तपामि**–ताप देतों, तापतों,-**अहं वर्षं निगृह्णामि**–मी पावसाचा निग्रह करितों–**च**–व–**उत्सृजामि**–मीच वृष्टि–पाऊस पाडतों–**अर्जुन**–हे अर्जुना !–**अहं**–मी–**अमृतं**–देवाचें अमृत–**च एव**–व–**मृत्युः**–मर्त्याचा मृत्यु आहें–**च**–व–**असत्**–कारण नामरूपांनीं व्यक्त न होणारें मी आहे १९.

मी सूर्याच्या रूपानें ज्या वेळेस प्रकाशतो–तापतों त्या वेळेस हें सर्व जल आटून जाते आणि पुनः मीच इंद्र होऊन जेव्हां पाऊस पाडतों तेव्हां पुनः समृद्धि होतें ९६. ज्याप्रमाणें अग्नी लांकडे भक्षण करतो तेव्हां ती लांकडेच अग्नीरूप होतात, त्याप्रमाणें मरणारें व मारणारें ही दोन्ही स्वरूपें माझीच आहेत असें जाण ९७. याकरितां मृत्युच्या वाट्यांला आलेलीं जीं जीं रूपें आहेत तीं तींहिं माझींच रूपें आहेत आणि जे न मरणारें अवि-नाश आहे ते तर सहज माझेंच रूप आहे ९८. आतां फार बोलून जे सांगावयाचें ते सर्व तुला एकदांच सांगतों तें लक्षांत ठेव, कीं सत् म्ह० व्यक्त कार्य व असत् म्हणजे अव्यक्त कारण अशीं ही दोन्हीं स्वरूपें करून मीच आहे असें जाण ९९. म्हणून अर्जुना मी नाहीं असें कोणतें ठिकाण आहे ? परंतु या प्राण्याचें दैव कसे चम-त्कारिक आहे पहा ! तें [सर्व व्यापक सर्वान्तर्यामी अशा] मला पाहात नाहींत ३००. अरे ! लाटा [ जलरूप असून ] पाण्याशिवाय सुकाव्यांत किंवा प्रकाशमय सूर्य-किरणें ती दिव्याच्या उजेडाशिवाय दिसूं नयेत, त्याप्रमाणें सर्व जीव तत्त्वतः मीच–मत्स्वरूच असून तें मला आत्म-त्वानें ओळखीत नाहींत, हें केवढें आश्चर्य आहे पाहा १. ह्या सकल विश्वांत अंतर्बाह्य मीच ओतप्रोत भरलेला आहे व हें जग केवळ माझेच ओतलेले म्ह. मद्रूपच आहे, परंतु जीवांचें कर्म त्यांनाच कसें आड ओढविलें आहे कीं, ते मीच–देवच ' नाहीं ' असें म्हणतात २. परंतु अमृताच्या आडांत पडावें आणि मग आपणच आपणांस बाहेर कांठावर काढण्याचा प्रयत्न कां करावा ? परंतु ते ज्यास अप्राप्त आहे त्यास असेंच होते तशा–त्या अभाग्याला काय करावे ? ३. हे किरीटी ! अन्नाच्या एका घांसासाठीं धांवणाऱ्या एका आंधळ्याच्या पायाला चिंतामणी रत्न लागून तो आडखळला पण तो आंधळा अर्थात् दृष्टि नसल्यामुळें तो जसा त्या रत्नाला पायानें बाजूस लोटून देतो ४. त्याप्रमाणें ज्ञान जीवास सोडून जाते म्हणजे यथार्थ ज्ञान प्राप्त नसते–त्यावेळीं जीवाची वरील आंधळ्याप्रमाणेंच स्थिति होते, म्हणून यथार्थ ज्ञानाशिवाय जें जें कांहीं करावें ते ते सर्व केल्यासारखें असें होतच नाहीं ५. आंधळ्या गरुडाला पंख जरी असले तरी ते त्याला कोणत्या उपयोगास पडतील ? जसा त्याला त्याचा उपयोग नाहीं, त्याप्रमाणें यथार्थ ज्ञानावांचून सत्कर्मानुष्ठानाचें केलेलें श्रम व्यर्थ ठरतात ६. केवढालीं सत्कर्में म्हणशील तर––

१ शरण जाण्यास योग्य आश्रयस्थान. २ स्वभावानुसार. ३ किंवा. ४ डबकें. ५ सूर्य. ६ आवडता. ७ सृष्टीच्या नाशाला व उत्पत्तीला. ८ वृक्षत्व. ९ पुनः १० गुप्त. ११ ठेवणें. १२ नामरूपादि लय पावतात. १३ रंग आणि आकार नाहींसे होतात. १४ संस्काररूप वासनाशक्ति. १५ पुनः. १६ देव. १७ एकदम. १८ व्यक्त व अव्यक्त. १९ स्थळ. २० आटतात. २१ सूर्यकिरण. २२ मी होत नाहींत. २३ आश्चर्य. २४ भरलें, व्यापिलें. २५ अमृताच्या कूपांत.

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिंप्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ।। २० ।।

देख पां गा किरीटी । आश्रमधर्मांचिया रोहाटी । विधिमार्गी कसवटी । जे आपणचि होती ।।७।। यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुकें । क्रिया फळेंसि उभी ठाके । पुढां जयां ।।८।। ऐसे दीक्षित जे सोमप । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप । तींहीं तयां पुण्याचेनि नांवें पाप । जोडिलें देखें ।। ९ ।। श्रुतित्रयातें जाणोनि । शतवरी यज्ञ करुनी । यजिलिया मातें चुकोनी । स्वर्गा वरिती ।। ३१० ।। जैसे कल्पतरूतळवटीं । बैसोनि झोळिये देतसे गांठी । मग निदैवं निघे किरीटी । दैन्यंचि करूं ।। ११ ।। तैसे शतक्रतु यजिलें मातें । कीं ईप्सितीति स्वर्गसुखातें । आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे ? ।। १२ ।। म्हणौनि मजवीण पाविजे स्वर्गु । तो अज्ञानाचा पुण्यमार्गु । ज्ञानिये तयातें उपसर्गु । हानि म्हणती ।। १३ ।। एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख । वांचूनि नित्यानंद गा निर्दोख । तें स्वरूप माझें ।। १४ ।। मज येतां पैं सुभटा । या द्विविधा गा आव्हांटा । स्वर्गु नरकु या वाटा । चोरांचिया ।। १५ ।। स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ।।१६।। आणि मजचिमाजीं असतां । जेणें मी दुऱ्हावें पंडु-सुता । तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न तुटे काई ? ।।१७।। परि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरि ते दीक्षित । यजूनि मातें याचित । स्वर्गभोगु ।। १८ ।। मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे । तेणें लाधलेनि सौरसें । स्वर्गा येती ।। १९ ।। जेथ अमरत्व हें सिंहासन । ऐरावतासारिखें वाहन । राजधानीभुवन । अमरावती । ।।३२०।। जेथ महासिद्धींचीं भांडारें । अमृताचीं कोठारें । जिये गांवीं खिल्लारें । कामधेनूंचीं ।। २१ ।। जेथ वोळगे देव पाइका । सैंघ चिंतामणीचिया भूमिका । विनोदवनवाटिका । सुरतरूंचिया ।। २२ ।। गंधर्व गात गाणीं । जेथ रंभेऐसिया नाचणी । उर्वसी मुख्य विलासिनी । अंतौरिया ।। २३ ।। मदन वोळगे शेजारें । जेथ चंद्र शिंपे सांवरें । पवनाऐसे म्हाणियारे । धांवणें जेथ ।। २४ ।। पैं बृहस्पती मुख्य आपण । ऐसे स्वस्तिश्रियेचे ब्राह्मण । ताटियेचे सुरगण । बहुवस जेथें ।। २५ ।। लोकपाळ रांगेचे । राउत जिये पदवीचे । उच्चैःश्रवा खांचे खोळणिये ।। २६ ।। हे

**अन्वयार्थ—त्रैविद्या**:-ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांचें अध्ययन करणारें, त्यांत सांगितलेलीं कर्मे करणारे-**सोमपाः**-सोमपान करणारे व त्यामुळें-**पूतपापाः**-निष्पाप झालेले-**मां**-मला-**यज्ञैः**-यज्ञांच्या योगानें-**इष्ट्वा**-पूजून-माझी पूजा करून-**स्वर्गति**-स्वर्गगतीची-**प्रार्थयन्ते**-प्रार्थना करितात - **ते** - ते-त्रैविद्या-**पुण्यं सुरेन्द्रलोकं**-पवित्र इंद्रलोकास-**आसाद्य**-प्राप्त होऊन-**दिवि**-स्वर्गात-**दिव्यान् देव-भोगान्**-अलौकिक देव-भोगास-**अश्नन्ति**-उपभोगितात २०.

अरे अर्जुना! असे पहा, आश्रमविहित धर्मांचें आचरणें करून जे आपणच विधिमार्गाची कसोटी बनतात [ वेदांतील 'विधि' ज्याच्या आदर्शभूत आचरणावरून समजतो ] ७. ते लीलेनें यज्ञ करूं लागले म्हणजे तिन्ही वेद संतोष पावून मान डोलवितात व ज्यांच्यापुढें साक्षात् यज्ञ क्रियाच फलप्राप्तीसह उभी राहते ८. याप्रमाणें यज्ञांतील सोमपान करणारे यज्ञकर्ते [ दीक्षित ] आहेत जे आपण स्वतःच यज्ञमूर्ति होतात पण खरे पाहिले तर त्यांनीं त्या यज्ञजन्य पुण्यांच्या नांवानें पापच आपल्या पदरीं जोडले आहे असें समज ९. [ कारण यज्ञ करून पापाची जोड कशी केली म्हणशील तर ] ते ऋक्, यजु व साम या तिन्ही वेदांस जाणून शेंकडो यज्ञांच्याद्वारां माझें यजन करितात; परंतु मला विसरून-माझ्या प्राप्तीची इच्छा सोडून क्षुद्र स्वर्गच पसंत करून त्याची इच्छा करितात हेच ते पाप ३१०. अर्जुना! ज्याप्रमाणें एखादा अभागी मनुष्य कल्पवृक्षाचे खालीं बसून कल्पतरूची योग्यता न समजल्यामुळें भीक मागण्याच्या इच्छेनें त्या झोळीला गांठी मारतो, आणि मग भिक्षा मागण्यासच निघतो ११. त्याप्रमाणें शेंकडो यज्ञांनीं माझें यजन केलें व मग ते स्वर्गसुखाची इच्छा करितात. तेव्हां हें पुण्य आहे काय? खरोखर पाप नव्हे काय? पुण्य नसून खरोखर ते पापच आहे असे समज १२. म्हणून माझ्या प्राप्तिविना स्वर्गाची प्राप्ति करून घेणें हा अज्ञानी लोकांचा पुण्यमार्ग आहे परंतु यथार्थ ज्ञानी त्या मार्गास 'प्रतिबंध' व 'हानि' करणारा [ जन्ममरणरूप फेऱ्यांत पाडणारा ] असे म्हणतात १३. सहज विचार केला तरी, नरकांतील दुःखाकडे पाहून त्याच्या सापेक्षतेनें स्वर्गप्राप्तीला 'सुख' हे 'नाम' मात्र आहे; परंतु नरक व तत्सापेक्ष स्वर्ग या दोहो पलीकडील त्रिकालाबाधित असा जो आनंद व अविद्यादि दोषरहित सुख, ते माझें स्वरूपच होय १४. हे महावीरा अर्जुना! खरोखर माझ्या यथार्थ स्वरूपप्राप्तीला येतांना स्वर्ग व नरक हे दोन आडमार्ग असून त्या निव्वळ चोरांच्याच वाटा आहेत १५. कारण, स्वर्ग प्राप्तीहि वरून दिसणाऱ्या पुण्यात्मक पापानें होते, व नरक प्राप्ति पापात्मक पापानें होते; पण खरें विचारशील तर ज्या पुण्यानें माझी प्राप्ति होते तेच शुद्ध पुण्य होय असें समज १६. हे पंडुसुता, जीव हें माझेच अंश असून ज्या [ सकाम ] कर्मांमुळें मी त्यांना अंतरतों, त्या कर्मास 'पुण्य' असें जर म्हटलें तर जीभ तुटणार नाहीं काय? १७. परंतु हें आतां राहूं दे. याप्रमाणें तें यज्ञकर्ते दीक्षित वस्तुतः माझें यजन करतात पण याचना मात्र अशा दिव्य स्वर्गभोगाची करितात १८. मग ज्या पुण्याने मी प्राप्त होणार नाहीं असें जें पापरूप पुण्य आहे त्याच्यामुळें मिळालेल्या योग्यतेनें ते स्वर्गास येतात १९. त्या स्वर्गाचे शास्त्रानें काय वर्णन केलें आहे!! ज्या स्वर्गात 'अमरपण' हेंच सिंहासन आहे, ऐरावत हत्तीसारखे वाहन आहे, अमरावती हेंच राजधानीचें शहर आहे ३२०. जेथें आणिमादि अष्टमहासिद्धींचीं भांडारें आहेत, अमृताचीं कोठारें आहेत व ज्या गांवांत कामधेनूंचीं खिल्लारें-कळप आहेत २१. जेथें देव समुदाय चाकर होऊन सेवा करितात जेथें सर्वत्र चिंतामणी नामक रत्नाच्या पुष्कळ वाटा-जमिनी आहेत व करमणुकीसाठीं लहान लहान कल्पतरूंची उपवनेंच आहेत २२. जेथें गंधर्व गाणीं गात आहेत, रंभेसारख्या अप्सरा नृत्य करणाऱ्या आहेत व विलासिनी स्त्रियांमध्यें जेथें 'उर्वशी' ही मुख्य आहे २३. ज्याठिकाणीं प्रत्यक्ष मदन शेजघरांत सेवा-चाकरी करितो आहे स्वतः चंद्रच [ आपल्या अमृत किरणांनी ] सडा संमार्जन करितो आहे. व वायुसारखे म्हटल्याबरोबर धावणारें चपळ चाकर सेवेस सज्ज आहेत २४. स्वतः देवगुरु बृहस्पति ज्यांत मुख्य आहेत असें आशीर्वाद देणारें व कल्याण इच्छिणारें ब्राह्मण आहेत जेथें स्तुतिपाठक असें बहुत देवगण आहेत; २५. ज्यांच्या सभोंवतीं लोकपालांसारखे राजे चालत असून जय मिळविलेलें पदवीधर सरदार आहेत व उच्चैःश्रवा नामक समुद्र मंथनापासून निघालेला संतमुखी घोडा पुढें चालणारा आहे २६. हें बहुत वर्णन

१ वर्णविहित धर्मानें. २ राहणीनें, वागणुकीनें. ३ कसोटी. सोन्यारुप्याचा कस पाहण्याचा दगड. ४ डोलें. ५ कर्मे. ६ यज्ञांतील सोमपान करणारे. ७ ऋक् यजु व साम. ८ शेंकडों. ९ हतभागी. १० भिक्षामार्गाला. ११ शंभर यज्ञांनीं. १२ इच्छितात. १३ खरोखर. १४ जन्ममरण, उपद्रव, नाश, विघ्न. १५ दोन प्रकारच्या. १६ आडवाटा. १७ पुण्यरूपीं पाप. १८ इच्छा करितात. १९ प्राप्त झाल्यामुळें. २० हौसेनें. २१ कळप. २२ राबतात. २३ चाकर.

असो बहु ऐसे । भोग इंद्रसुखासारिसे । ते भोगिजती जंव असे । पुण्यलेशु ॥ २७ ॥

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥

मग तया पुण्याची पोंउटी सरे । सवेंचि इंद्रपणाची उँटी उतरे । आणि येऊं लागती माघारे । मृत्युलोका ॥ २८ ॥ जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे । मग दारही चेपूं नये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों ? ॥ २९ ॥ एवं थितियां मातें चुकले । जींहीं पुण्यें स्वर्ग कामिलें । तयां अमरपण तें वांवों जालें । अंतीं मृत्युलोकु ॥ ३३० ॥ मातेचिया उदरकुहरीं । पंचूनि विष्ठेच्या दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ॥ ३१ ॥ अगा स्वप्नीं निधान फावे । परि चेइंलिया हारपे आघवें । तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञांचें ॥ ३२ ॥ अर्जुना वेदविद् जऱ्ही जाहला । तरी मातें नेणता वायां गेला । कणु सांडूनि उँपणिला । कोंडा जैसा ॥ ३३ ॥ म्हणौनि मज एकेंविण । हे त्रयीधर्म अकारण । आतां मातें जाणोनि कांहीं नेणें । तूं सुखिया होसी ॥ ३४ ॥

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

पैं सर्वभावेंसीं उखितें । जे वोपिलें मज चित्तें । जैसा गर्भगोळु उदरमांतें । कोणाही नेणे ॥ ३५ ॥ तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं । मजचि नाम पाहीं । जिणेंया ठेविलें ॥ ३६ ॥ ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांतें मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥ ३७ ॥ ते एकवेंटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणीं । तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥ ३८ ॥ मग तींहीं जें जें करावें । तें मजचि पाडिलें आघवें । जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी जिये ॥ ३९ ॥ आपुली तहान भूक नेणें । तान्हया निकें तें माउलीसीचि करणें । तैसें अनुसरले जे मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥ ३४० ॥ तया माझिया सायुज्यांची चाड । तरि तेंचि पुरवीं कोडें । कां सेवा म्हणती तरी आंड । प्रेम सूंयें ॥ ४१ ॥ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो तो पुढां पुढां लागे तयां देवों । आणि दिधलियाचा निर्वाहो । तोही मीचि करीं ॥ ४२ ॥ हा योगक्षेमु आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा । जयांचिया सर्वभावा । आश्रयो मी ॥ ४३ ॥

असो; याप्रमाणें जोपर्यंत यज्ञकर्त्याच्या पदरांत पुण्याचा अंश आहे, तोपर्यंत इंद्राच्या भोग्य सुखासारखें पुष्कळ भोगसुख ते याज्ञिक भोगतात २७.

**अन्वयार्थ–ते**–ते सर्व वैदिक कर्मी–**तं विशालं-स्वर्गलोकं**–त्या विस्तीर्ण स्वर्गलोकास– **भुक्त्वा**–भोगून– **–पुण्ये क्षीणे**–पुण्य क्षीण झालें असतां–**मर्त्यलोकं**–मर्त्य लोकांत–**विशन्ति**–शिरतात–**एवं**– याप्रमाणें– **त्रयीधर्मं**–वैदिक कर्ममार्गास–**अनुप्रपन्नाः**–अनुसरणारे–**कामकामाः**-विषयांची कामना करणारे–सकाम पुरुष–**गतागतं**–जा ये या अवस्थेस–**लभन्ते**–प्राप्त होतात २१.

मग त्यांच्या पुण्याची पुंजी संपतांक्षणींच इंद्रपणाच्या ऐश्वर्यावरून उतरून निस्तेजित होऊन पुनः ते मृत्युलोकीं माघारे येतात २८. ज्याप्रमाणें वेश्येच्या नादापायीं एखाद्याचे सर्व द्रव्य नाहीसें होतें मग त्याला तिच्या दाराला हात किंवा बोट देखील लावण्याची सोय–सत्ता राहात नसतें, त्याप्रमाणें स्वर्ग सोडून मृत्यु लोकांत येताना या यज्ञकर्त्यांची स्थिति अतीव लाजिरवाणी होते. ती तुला काय वर्णून सांगूं ? २९. अरे ! मुख्यतः ज्या वेळेस जपायाचे त्यावेळीं नित्य अतिसन्निहित अशा मला चुकलें व ज्यांनी यज्ञद्वारां आभासिक पुण्यमार्गाच्या आचरणानें स्वर्गप्राप्ति करून घेतली व क्षणमात्र अमर झाले खरें, पण त्यांचे अमरत्व वायां जाऊन सरतेंशेवटीं ते मृत्युलोकांतच परत येतात ३०. [ मृत्युलोकांत येतेवेळीं काय दुर्दशा आहे पहा ! ] अगोदर मातेच्या उदररूप गुहेंत विष्ठेच्या घरांत नव-महिनें उकडून पक्वदशेस येतात आणि पुनः पुनः जन्माला येऊन मरण पावतात. असें हें जन्म–मरणाचे रहाटगाडगें सारखें चालूं असतें ३१. स्वर्गांतील ऐश्वर्य कित्ती क्षणभंगुर आहे पहा ! अरे स्वप्नांत प्राप्त झालेला ठेवा जसा जागृत झाल्यावर सर्व पार नाहींसा होतो, त्याप्रमाणें यज्ञकर्त्याचें स्वर्ग सुख आहे, असें समजावें ३२. अर्जुना ! ज्याप्रमाणें धान्य काढून घेतलेला केवळ कोंडा उफणला असतां व्यर्थ होतो त्याप्रमाणें वेदार्थज्ञानी जरी झाला तरीहि मला जाणल्याशिवाय त्याचा जन्म व्यर्थ होय ३३. म्हणून माझ्या एकट्याशिवाय हे तिन्हीहि वेदोक्तधर्म व तदनुसारी सकामकर्में व त्यांची फलें व्यर्थ आहेत. तेव्हां मला आतां तुला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, तू माझें यथार्थ स्वरूप आत्मत्वानें जाणून घे, त्याविना दुसरें कांहीं जाणूं नकोस म्हणजेच तूं सुखी होशील ३४.

**अन्वयार्थ––अनन्याः चिन्तयन्तः** – परम देव जो नारायण त्याच्याशीं एकरूप होऊन चिंतन करणारे–**ये**–जे –**जनाः**–लोक–**मां**–मला–**पर्युपासते**–सर्व प्रकारें उपासितात–**तेषां नित्याभियुक्तानां**–त्या सतत ध्यान करीत असलेल्या विरक्तांचा–**योगक्षेमं**–योगक्षेम–**अहं**–मी–**वहामि**–वहातों २२.

हें पहा ! जे आपल्या चित्तानें सर्व भावेंकरून माझ्याच ठिकाणीं उक्तें विकलें गेले आहेत ज्याप्रमाणें मातेच्या गर्भांतील बालक कोणत्याहि व्यवहारास जाणत नाहीं ३५. त्याप्रमाणें माझ्याविना ज्यांस दुसरें चांगलेंच वाटत नाहीं. ज्यांनीं माझ्या प्रातींतच आपल्या जीविताचें सार्थक ठरविलें आहे; ३६. अशा प्रकारें एकनिष्ठ अंतःकरणानें जे माझें चिंतन करून माझी सेवा–भक्ति करितात, तशी त्यांचीहि सेवा मीच करितों ३७. ते ज्याक्षणीं एकनिष्ठेने माझ्या भजन–भक्ति–मार्गास लागले त्याच क्षणीं त्यांची सर्वतोपरीची चिंता मला पडली ३८. मग जें जें कांहीं करण्याचे ते मनांत आणतात, ते ते सर्व मलाच करावें लागतें. ज्याप्रमाणें पंख न फुटलेल्या पिलांच्या जीवनाकरितांच पक्षीण जगते ३९. किंवा आपली तहान भूक कांहींहि ज्यास कळत नाहीं अशा आपल्या तान्हया लेंकरास जें हितकर व सुखकारक असेल तें आईलाच करावें लागतें, त्याप्रमाणें जे मला मनःपूर्वक सर्व भाव मजवर टाकून भजले त्यांचें इच्छित सर्व कांही मीच करितों ४०. त्यांना माझ्या ऐक्याची–शुद्ध ब्रह्मस्थिति प्राप्तीची इच्छा असेल तर त्यांची तीच आवड पुरवितों; किंवा माझी सेवाच करावी असें ते म्हणतील, तर त्यांच्या व माझ्यामध्यें प्रेमभाव उत्पन्न करितों ४१. असें भक्त आपल्या मनांत जो जो हेतू धरितात, तो तो मी त्यांच्या पुढे [illegible] होऊन त्यांस देऊं लागतो आणि जें त्यांना दिलेलें असतें, त्याचें रक्षणाहि मीच करितों ४२. कारण, अर्जुना ! ज्याच्या सर्व मनोवृत्तींचा आश्रय एकमेव मीच असतो त्यांचा संपूर्ण योगक्षेम मलाच करावा. लागतो ४३.

१ पुंजी. २ तेज, रंग. ३ सर्वदा असणाऱ्या. ४ इच्छिलें. ५ व्यर्थ, वायां. ६ उदररूप गुहेंत. ७ शिजून. ८ उकाड्यांत. ९ ठेवा प्राप्त होतो. १० जागे झाल्यावर. ११ वेदार्थज्ञात्याचें. १२ वेद जाणणारा. १३ धान्य. १४ पाखडला, वाऱ्यावर धरिला. १५ वेदोक्त धर्म. १६ व्यर्थ. १७ जाणूं नको. १८ एकंदर, संपूर्ण. १९ जे पुरुष आपले मनोभावानें मला विकले. २० उ ोग. २१ चांगलें. २२ जीवाचें. २३ एकनिष्ठ. २४ चिंतित असतां. २५ ऐक्यतेस पावून. २६ मार्गाप्रत, भजनी. २७ चिंता. २८ पंख न फुटलेल्या पक्ष्याच्या. २९ जीवनार्थ. ३० खटपट करिते. ३१ ऐक्याची. ३२ कौतुक. ३३ मध्यें. ३४ घालतों. ३५ व्यवस्था, रक्षण. ३६ योग-अप्राप्ताची प्राप्ती, क्षेम-प्राप्ताचे संरक्षण.

येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः । तेऽपि मामव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

आतां आणिकही संप्रदायें । परी मातें नेणती समवायें । जें अग्निइंद्रसूर्य-सोमाये । म्हणौनि यजिती ॥ ४४ ॥ तेही कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें मीचि आहें । परि ते भजती उजरी नव्हे । विषम पडे ॥ ४५ ॥ पाहे पां शाखा पल्लव रुखांचें । हे काय नव्हती एकाचि बीजाचें ? । परी पाणी घेणें मुळाचें । तें मुळींचि घेंपे ॥ ४६ ॥ कां दहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकेचि देहींचीं होती । आणि इहीं सेविले विषयो जाती । एकाचि ठायीं ॥ ४७ ॥ तरि करोनि रेससोय बरवी । कानीं केवीं भरावी ? । फुलें आणोनि बांधावीं । डोळां केवीं ? ॥ ४८ ॥ तेथ रसु तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा । तैसा मी तो यजावां । मीचि म्हणौनि ॥ ४९ ॥ येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेंआन । म्हणौनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ३५० ॥

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च । न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥

एऱ्हवीं पाहे पां पंडुसुता । या यज्ञोपहारां समस्तां । मीवांचूनि भोक्ता । कवणु आहे ? ॥ ५१ ॥ मी सकळां यज्ञांचा आदि । आणि यजना या मीचि अवधि । कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवां भजले ॥ ५२ ॥ गंगेचें उदक गंगे जैसें । अर्पिजे देव-पितरोद्देशें । माझें मज देती तैसें । परि आनानीं भावीं ॥ ५३ ॥ म्हणौनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा । मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले ॥ ५४ ॥

यांति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः । भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥

मनें वाचा करणीं । जयांचीं भजनें देवांचिया वाहणीं । ते शरीर जातिये क्षणीं । देवचि जाले ॥ ५५ ॥ अथवा पितरांचीं व्रतें । वाहती जयांचीं चित्तें । जीवित सरलिया तयांतें । पितृत्व वरी ॥ ५६ ॥ कां क्षुद्रदेवतादि भूतें । तियेचि जयांचि परमदैवतें । जिहीं अभिचारिकीं तयांतें । उपासिलें ॥ ५७ ॥ तयां देहाची जवनिका फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति जाहली । एवं संकल्पवशें फळलीं । कर्में तयां ॥ ५८ ॥ मग मीचि डोळां देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला । मीचि मनीं भाविलां । वानिलां वाचा ॥ ५९ ॥ सर्वांगीं सर्वाठायीं । मीचि नमस्करिला जिहीं । दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरां ॥ ३६० ॥ जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले । जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ॥ ६१ ॥ जे

**अन्वयार्थ**—**ये**–जे–**अन्यदेवताभक्ताः अपि**–दुसऱ्या देवतांचे भक्तहि–**श्रद्धया**–श्रद्धेनें–**अन्विताः**–युक्त होऊन –**यजन्ते**–[ त्या अन्य देवतांची ] पूजा करितात–**ते अपि**–ते सुद्धां–**कौन्तेय**–हे कुंतीपुत्रा !–**माम् एव**–माझेंच **अविधिपूर्वकम्**–अज्ञानानें–**यजन्ति**–पूजन करितात २३.

आतां [ उपर्युक्त संप्रदायाखेरीज अज्ञानी उपासकांचे ] आणखीहि संप्रदाय आहेत; पण ते मला सर्वत्र व्यापकरूपानें जाणत नाहींत, तर फक्त अग्नि, इंद्र, सूर्य, चंद्र म्हणून [ भेद बुद्धीनें ] यजन करतात ४४. तें त्यांचें पूजनहि खरोखर माझेंच होय. कारण या सर्व रूपांनी मीच एक भरून राहिलेला आहे ना ! परंतु ती त्यांची 'भजन पद्धति' संप्रदायपूर्वक सरळ नसून चुकलेली आहे ४५. अर्जुना ! हें पहा ! वृक्षाच्या शाखा, पानें वगैरे ही एकाच बीजापासून उत्पन्न झालेली नव्हेत काय ? परंतु पाणी घेणे, हे मुळाचे काम असल्यानें जे पाणी घालावयाचें असेल तें मुळाशींच घातलें पाहिजे ४६ किंवा ही दहा इन्द्रियें जरी एकाच देहाचीं आहेत आणि त्यांनीं सेवन केलेले विषयहि जरी एकाच ठिकाणीं, एकाच भोक्त्यांस पोचतात ४७. उत्तम प्रकारचीं पक्वान्नें करून ती कानांत कशी भरावीत ? आणि फुलें आणून ती डोळ्यावर कशी बांधावीत ? ४८. तर तेथें अन्न हें तोंडानेंच सेवन केलें पाहिजे आणि सुवास तो नाकानेंच घेतला पाहिजे. त्याप्रमाणें, माझें भजनपूजन करावयाचे ते माझ्याच भावनेने करावयास पाहिजे ४९. एऱ्हवीं, मला न जाणतां जें भजन करणें तें कांहीं तरीच भलत्यास भलते असून, व्यर्थ होय. म्हणून कर्म आचरण्यास 'ज्ञान' ही दृष्टि आहे, तर तें ज्ञान निर्दोष असें झालें पाहिजे ३५०.

**अन्वयार्थ**—**हि**–कारण-**अहं**–मी–**सर्वयज्ञानां**–सर्व यज्ञांचा–**भोक्ता**–देवतारूपानें भोक्ता–**च**–व–**प्रभुः एव च**–प्रभुच आहे–**तु**–पण–**ते**–अन्य देवतांचे भक्त–**मां**–मला–**तत्त्वेन**–अशा तात्त्विक रूपानें–**न अभिजानन्ति**–जाणत नाहींत–**अतः**–म्हणून–**च्यवन्ति**–मुख्य फलापासून च्युत होतात २४.

अर्जुना ! एऱ्हवीं असें पहा कीं, या सर्व यज्ञोपचार सामुग्रीचा माझ्यावांचून दुसरा कोण भोक्ता आहे ? ५१. मीच सर्व यज्ञांचा आदि–आरंभ आहे व यजनाचा शेवटहि मीच आहें; परंतु जे याज्ञिक दुर्बुद्धिवान् असतात, ते मला सोडून इंद्रादि देवांस भजतात ५२. ज्याप्रमाणें गंगेचें पाणी घेऊन देव व पितर यांना उद्देशून तर्पण करण्याच्या नांवानें पुनः गंगेंतच अर्पण करतात त्याप्रमाणें ते माझें मलाच देतात, पण निरनिराळ्या भावनेनें देतात एवढेंच चुकते ५३. म्हणून पार्था ! ते कधींहि माझ्या यथार्थ स्वरूपास पावत नाहींत. तर ते मनांत ज्यांची इच्छा धारण करितात त्या त्या लोक विशेषाप्रत जातात ५४.

**अन्वयार्थ**—**देवव्रताः**–देवांमध्यें ज्यांचें व्रत, नियम किंवा भक्ति असते–देवांची जे भक्ति करितात, ते–**देवान्**–देवांस–**यान्ति**–प्राप्त होतात–**पितृव्रताः**–पितृभक्त–**पितॄन्**–पितरांस–**यान्ति**–प्राप्त होतात–**भूतेज्याः**–भूतांची पूजा करणारे–**भूतानि**–विनायक, मातृगण इत्यादि भूतगणांस–**यान्ति**–प्राप्त होतात–**मद्याजिनः अपि**–व माझी पूजा करणारेहि–**मां**–मला–**यान्ति**–प्राप्त होतात २५.

मनानें, वाचेनें व सर्व इन्द्रियांनी ज्यांचा भजनप्रवाह-ओघ जो इन्द्रादि देवमार्गाकडे [ देवतोद्देशानें ] आहे. ते त्यांचे शरीर जातांक्षणींच [दिव्य शरीरधारी] देवच होतात ५५ अथवा श्राद्धपक्षादि जी पितरांची व्रतें आहेत ती व्रतें जे मनःपूर्वक पाळतात त्यांना मरणोत्तर, पितृलोकाची प्राप्ति होते ५६. किंवा भूत-वेताळादि क्षुद्र देवता हीच ज्यांचीं परम दैवतें आहेत व त्यांची ज्यांनीं घातक अशा जारण-मारण साधण्याकरितां तामस कर्मांनी उपासना केली आहे ५७. त्यांना देहरूपी पडदा दूर होतांच [ मेल्यावर ] भूत-खेतादिकांची योनीच प्राप्त होते. अशा प्रकारें ज्यांच्या त्यांच्या संकल्पाप्रमाणें त्यांचीं कर्में त्यांना फलद्रूप होतात ! ५८. मग त्याच न्यायानें जे दृष्टीनें मलाच पाहातात, कानांनीं माझ्या नांवाचेंच वर्णन श्रवण करितात, मनानें माझेंच ध्यान करितात व वाचेनें माझेंच वर्णन करितात ५९. सर्वांगानें व सर्व ठिकाणीं मलाच जाणून नमस्कार करितात, ज्यांनी दानें, पुण्य वगैरे जे जे कांहीं केले ते ते सर्व माझ्याच उद्देशानें केलेले असते ३६०. ज्यांनी माझें स्वरूप यथार्थ जाणण्याकरितांच शास्त्रांचें अध्ययन केले आहे आणि माझ्याच योगानें अंतर्बाह्य तृप्त झाले आहेत. ज्यास माझ्यासाठींच आयुष्य लाभले आहे म्हणजे [ ज्यांनी आपले सर्व आयुष्य माझे साक्षात्कारात्मक आत्मत्वानें ज्ञान संपादिण्यासाठींच खर्च केले आहे ] ६१.

१ समष्टी रूपानें, सर्वव्यापकरूपानें. २ भजनाची सरळ पद्धत. ३ वांकडी, चुकलेली. ४ वृक्षाचे. ५ घातलें जातें. ६ स्वयंपाक. ७ पुजावा. ८ कांहीं तरी. ९ असलें पाहिजे. १० यज्ञांतील उपचारांना. ११ परिणाम, शेवट. १२ भिन्नभिन्न, वेगवेगळ्या. १३ धरिलीं. १४ इंद्रियांनीं. १५ ओघ, मार्ग, कारणें, निमित्तें. १६ धरिती. १७ गांवढळ, क्षुद्र देव. १८ जारणमारण कर्मांनी. १९ पडदा दूर झाला. २० ध्यान केलें. २१ वर्णिला. २२ उद्देशानें, प्रीत्यर्थ.

अहंकारु वाहत आंगीं । आम्ही हरीचे भुषावंयालागीं । जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें ॥६२॥ जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भुली सभ्रंम । नेणंती लोक ॥ ६३ ॥ जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडें जयांचेनि मंत्रें । ऐसें जे चेष्टामात्रें ! । भजले मज ॥ ६४ ॥ ते मरणा ऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे । मग मरणीं ओणिकीकडे । जातील केवीं ? ॥ ६५ ॥ म्हणौनि मंद्याजी जे जाहाले । ते माझियाचि सायुज्या आले । जिहीं उपचारमिषें दिधलें । आपणपें मज ॥ ६६ ॥ पैं अर्जुना माझे ठायीं । आपणपेंवीण सौरसु नाहीं । मी उपचारें कवणाही । नाकळें गा ॥ ६७ ॥ एथ जाणीव करी तोचि नेणें । आथिलेंपण मिरवी तेंचि उणें । आम्ही जाहलों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नव्हे ॥ ६८ ॥ अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपें हन जे हुटहुटी । ते तृणा एकासाठीं । नें सरे एथ ॥ ६९ ॥ पाहें पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदांपांसूनि असे आगळें ? । कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथी ? । ॥३७०॥ तोही आंथरुणातळवटीं दडे । येरु नेति नेति म्हणौनि बहुडे । एथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ॥ ७१ ॥ करितां तापसांची कडसणी । कवणु जवळां ठेविजे शूळपाणी । तोही अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे ॥ ७२ ॥ नातरी आथिलेपणें सरिशी । कवणी आहे लक्ष्मिये ऐसी ? । श्रियेसारिखिया दासी । घरीं जियेतें ॥७३॥ तिया खेळतां करिती घरकुलीं । तयां नामें अमरपुरें जरि ठेविलीं । तरि न होती काय बाहुलीं । इंद्रादिक तयांचीं ? ॥ ७४ ॥ तिया नावडोनि जेव्हां मोडिती । तेव्हां महेंद्राचे रंक होती । तिया झाडा जेउते पाहती । ते कल्पवृक्ष ॥७५॥ ऐसिया जियेचिया जवळिका । सामर्थ्यें घरींचिया पाइका । ते लक्ष्मी मुख्यनायका । न मनेचि एथ ॥ ७६ ॥ मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमानु सांडूनि पांडवा । ते पाय धुवावयाचिया दैवा । पात्र जाहाली ॥७७॥ म्हणौनि थोरपण पर्‍हां सांडिजे । एथ व्युत्पत्ती आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होईजे । तैं जवळीक माझी ॥ ७८ ॥ अगा सहस्रकिरणांचिये दिठी । पुढां चंद्रही लोपे किरिटी । तेथ खद्योत कां हुटहुटी । आपुलेनि तेजें ? ॥ ७९ ॥ तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे । जेथ शंभूचेंही तप न पुरे । तेथ येर प्राकृत हेंदरें ।

आम्ही ज्या हरीचे दास आहोत; हरिकीर्ति वाढविणारें आहोत, असें भूषण मिरविण्याकरितां जे आपल्या अंगीं अहंकार धारण करतात. जे जगांत एकमेव माझ्याच लोभानें लोभी आहेत ६२. माझ्याच प्राप्तीच्या इच्छेनें जे सकाम आहेत, त्यांना जर कशाची इच्छा असली तर ती माझीच, जे मद्‌विषयक प्रेमानें सप्रेम आहेत, जे माझ्या सगुणरूपाच्या ठिकाणीं भुलून गेल्यामुळें वेडे झाले आहेत म्हणून ते लौकिकास जाणत नाहींत ६३. मलाच ज्यांची शास्त्रें जाणतात आणि ज्यांच्या गुरुमंत्र जपापासून त्यांना माझीच प्राप्ति होते व अशा प्रकारें जे सर्व व्यवहारांत कायिक–वाचिक–मानसिक कर्मद्वारां माझेंच भजन करतात ६४. ते मरणाच्या अगोदरच माझ्या स्वरूपाशीं निश्चयानें एकरूप होऊन जातात. मग ते मरणानंतर माझ्याशिवाय इतर दुसरीकडे अन्यगतीस कसें जातील? ६५. म्हणून ते माझें यजन करणारे माझ्याच सायुज्य मोक्षास प्राप्त होतात. कारण, त्यांनीं सेवेच्या निमित्तानें अर्पण करतेवेळीं आपला आत्मभावच मला अर्पण केला आहे ६६. अर्जुना! भक्तानें माझ्या ठिकाणीं आत्मभाव-जीवभाव समर्पण केल्याशिवाय मला आनंद होत नाहीं. अरे! इतर दुसऱ्या कोणत्याहि उपचाराने मी कोणासहि आकलन होत नाहीं. म्हणजे माझी प्राप्ति होणार नाहीं ६७. येथें 'जो परमात्मविषयक ज्ञान मला झालें' असें पोकळ गर्वाने म्हणत असेल त्यालाच ते मुळीहि समजले नाहीं, असें निश्चित समजावें. जो आपले निष्कारण संपन्नत्व मिरवून दाखवितो तोच त्याचा उणेपणा होय. निष्कारण "मी मुक्त झालो" असें जो म्हणतो तो संपन्न वा मुक्त यांपैकीं कांहींच झाला नाहीं असें समजावें ६८. अथवा, हे किरीटी! आम्हीं यज्ञयाग केले, दानधर्म केला किंवा आम्हीं तप-तीर्थाटन केले, अशी जे पोकळ घमेंडी, गर्वफुंज बाळगतात, त्यांना माझ्याजवळ [ सायुज्यप्राप्तीच्या दृष्टीनें पाहिले असतां ] गवताच्या काडीइतकीहि किंमत वा योग्यता नसते ६९. अरे! मोठमोठ्यांची काय त्रेधा उडाली त्याचा विचार करून पहा. ज्ञानैश्वर्य संपन्नतेच्या बाबतींत वेदाहून कोणी तरी अधिक जाणता श्रेष्ठ आहे काय? किंवा हजारमुखांच्या शेषापेक्षां अधिक बोलणारा कोणी आहे काय? ३७०. पण तो शेषहि माझ्या अंथरुणाखालीं दडून बसतो म्हणजे तो शेवटीं परमात्म्याचें अंथरूण होतो, दुसरा जो वेद तोहि "नेति नेति" म्हणजे "ही स्थूल–मूर्त आकारवान् वस्तु परमात्मा नव्हे, ही अमूर्त-सूक्ष्म आकारवान् वस्तु परमात्मा नव्हे" इतकेंच म्हणून परत फिरतो, तसेंच सनकादिक माझ्या निर्विशेष परमात्मस्वरूपनिर्धाराविषयीं वेडे-पिसे होऊन म्ह. भांबावून गेले आहेत ७१. तपस्व्यांविषयीं निवड करून विचारपूर्वक पाहूं लागले तर महादेवाच्या तपश्चर्येच्या योग्यतेचा दुसरा कोण तपस्वी आहे? परंतु त्या शिवानेंहि अभिमान सोडून ज्याचें पादोदक म्हणजे भागीरथी आपल्या मस्तकावर धारण केली आहे ७२. किंवा ऐश्वर्यपूर्णतेंत खुद्द लक्ष्मीच्या योग्यतेसारखी दुसरी कोणी आहे काय? तिच्या दासीचेंच ऐश्वर्य पहा–ऋद्धि-सिद्धिसारख्या तिच्या दासी आहेत ७३. त्या दासींनी आपल्या भातुकलीच्या खेळांत केलेली जीं घरकुलीं त्यांचें नांव जर त्यांनी अमरपुरी असें ठेविलें तर इन्द्रादिक देव हे त्यांच्या घरकुल्यांतील बाहुलीं होणार नाहींत काय? ७४. पुढें त्या दासींना खेळाचा कंटाळा येऊन तीं घरकुलीं जेव्हां त्या दासी मोडतात तेव्हां मोठमोठें इन्द्रादिक देव रंक होतात तसेंच त्या ज्या झाडांकडे पाहतील तीं झाडें 'कल्पवृक्ष' होतात ७५. असें जिच्या घरांतील सन्निध असणाऱ्या दासींचें सामर्थ्य आहे, अशी ऐश्वर्याची मुख्य पट्टराणी श्रीलक्ष्मीचीहि माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं प्रतिष्ठा नाहीं ७६. असें लक्ष्मीनें पाहिल्यावर मग तिनें जेव्हां मनोभावानें सेवा केली व आपल्या ऐश्वर्याचा सर्व अभिमान टाकला तेव्हां ती माझे पाय धुण्याच्या दैवास–अधिकारास प्राप्त झाली ७७. म्हणून माझ्या प्राप्तीला थोरपणा एकीकडे ठेवून व शास्त्रीय ज्ञानाचा अभिमान विसरून, जेव्हां जगतांत नम्रपणानें वागण्याची सहज वृत्ति होते तेव्हांच त्यास माझी प्राप्ति होते ७८. हे किरीटी, ज्या ठिकाणीं सहस्र किरणांनी युक्त अशा सूर्याच्या तेजापुढें चंद्रहि लोपून जातो, तेथें काजव्यानें आपल्या यःकश्चित् तेजाबद्दल डौल कशाला मिरवावा ७९. त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं लक्ष्मीचेंहि ऐश्वर्य सरते होत नाहीं व शंभूचें तप पुरें पडत नाहीं? त्या ठिकाणीं इतर अज्ञानी व सामान्य लोक मला कसें जाणूं

१ गुण–कीर्ति वाढविण्यासाठीं. २ वेडावून जातात. ३ पर्वा करीत नाहींत. ४ सर्व व्यवहारांत. ५ स्पष्ट, पूर्वींच. ६ दुसरीकडे. ७ माझें यजन करणारे. ८ ऐक्याला. ९ सेवेच्या हेतूनें. १० आपलेपणा. ११ गोष्ट. १२ ज्ञान झालें असें म्हणणें. १३ थोरपणा, कृतार्थता. १४ कृतकृत्य. १५ प्रतिष्ठा दाखविणें. १६ तिळा [ हुटहुटीला ]. १७ गवताच्या एका काडी इतकीहि. १८ सर, योग्यता नसते, पाड नसतो. १९ ज्ञानाच्या. २० वेदापेक्षां. २१ अधिक. २२ वेद. २३ हें नव्हे, तें नव्हे इत्यादि निषेधमुखानें. २४ मार्गे सरे. २५ सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार.

केवीं जाणों लाहे ? ॥ ३८० ॥ यालागीं शरीरेंसांडोवा कीजे । सकळ गुणांचें लोण उतरिजे । संपत्तिमद्‌ु सांडिजे । कुरवंडी करुनी ॥ ८१ ॥

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

मग निस्सीमभाव उल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें । फळ एक आवडे तैसें । भलतयाचें हो ॥ ८२ ॥ भक्तु माझियाकडे दावी । आणि मी दोन्हीं हात वोडवीं । मग देंठु न फेडितां सेवीं । आदरेंशीं ॥ ८३ ॥ पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें । तें लेखें तरि म्यां तुरंबावें । परि मुखींचि घालीं ॥ ८४ ॥ हें असो कायसीं फुलें । पानचि एक आवडे तें जाहलें । तें साजुकही न हो सुकलें । भलतैसें ॥ ८५ ॥ परि सर्वभावें भरलें देखें । आणि भुकेला अमृतें तोखें । तैसें पत्रचि परि तेणें सुखें । आरोगूं लागें ॥ ८६ ॥ अथवा ऐसेंहीं एक घडे । जे पालाही परी न जोडे । तरि उदकाचें तंव सांकडे । नन्हेल कीं ? ॥ ८७ ॥ तें भलतेथ निमोलें । न जोडितां आहे जोडलें । तेंचि सर्वस्व करूनि अर्पिलें । जेणें मज ॥ ८८ ॥ तेणें वैकुंठापासोनि विशाळें । मजलागीं केलीं राऊळें । कौस्तुभाहोनि निर्मळें । लेणीं दिधलीं ॥ ८९ ॥ दुधाचीं सेजारें । क्षीराब्धी ऐसीं मनोहरें । मजलागीं अपारें । सृजिलीं तेणें ॥ ३९० ॥ कर्पूर चंदन अगरु । ऐसेया सुगंधाचा महामेरु । मज हातिवा लाविला दिनकरु । दीपमाळे ॥ ९१ ॥ गरुडासारिखीं वाहनें । मज सुरतरूंचीं उद्यानें । कामधेनूंचीं गोधनें । अर्पिलीं तेणें ॥ ९२ ॥ मज अमृताहूनि सुरसें । बोनीं वोगरिलीं बहुवसें । ऐसा भक्तांचेनि उदकलेशें । परितोषें गा ॥ ९३ ॥ हें सांगावें काय किरीटी । तुवांचि देखिलें आपुलिया दिठी । मी सुदामाचिया सोडीं गांठीं । पव्हयांलागीं ॥ ९४ ॥ पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणे । आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ॥ ९५ ॥ येर पत्र पुष्प फळ । हें भजावया मिस केवळ । वांचूनि आमुचा लाग निष्कळ । भक्तितत्त्व ॥ ९६ ॥ म्हणौनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धी एकी सोपारी करीं । तरि सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबें मातें ॥ ९७ ॥

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

जे जे कांहीं व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी । अथवा यज्ञीं यजिसी । नानाविधीं ॥ ९८ ॥ नातरी पात्रविशेषें दानें । कां सेवकां देसी जीवनें । तपादि हन

शकतील ! ३८०. याकरितां परमात्म्यावरून सर्व शरीर ओंवाळणी करून टाकावें [ देहासह अहंकाराचा बाध करावा ] आणि आपल्याजवळ असलेल्या सर्व गुणांचे लिंबलोण उतरावें आणि संपत्तीचा मद–गर्व फुंजहि मजवरून ओंवाळून टाकला पाहिजे ८१.

**अन्वयार्थ**––**यः**–जो–**मे**–मला–**पत्रं**–पान–पत्र–**पुष्पं** फुल–पुष्प–**फलं**–फळ–**तोयं**–जल–**भक्त्या**–भक्तीनें–**प्रयच्छति**–देतो––[ **तस्य** ] **प्रयतात्मनः**––त्या शुद्धचित्त पुरुषाचें–**भक्त्युपहृतं**–भक्तीनें अर्पण केलेलें–**तत्**–तें पत्रपुष्पादि–**अहं**–मी–**अश्नामि**–स्वीकारतों–त्याचा मी स्वीकार करतों २६.

नंतर दृढभक्तीनें, मला अर्पण करण्याच्या निमित्तानें एखादे फळ, मग ते हवें तसलें व हव्या त्या झाडाचें कां असेना ! ८२. भक्तानें ते माझ्याकडे केलें न केलें इतक्यांतच मी आपण होऊनच ते माझे दोन्हीं हात पुढें करून घेतो व त्याच्या भक्तीनें इतका वेडा होतो कीं; त्याचे देठ तोडण्याचें भानहि मला राहत नाहीं. ते आदरानें मी एकदम खाऊं लागतो इतकी मला घाई होते ८३. हें पहा, भक्तिभावानें जर मला कोणी भक्तानें एखादें फूल दिलें तर वास्तविक विचारपूर्वक पाहातां तें मी हुंगावें, त्याचा वास घ्यावा; पण तें सोडून देऊन भक्तिप्रेमाच्या भरांत ते मी तोंडांतच घालतों ! ८४. हे राहूं दे फुलांचीच काय स्थिति आहे ? परंतु मला कसल्याहि झाडाचें एक पानच कां होईना ! ते प्रिय आहे मग ते ताजेच पाहिजे असें नाहीं–सुकलेलें किंवा कसेंहि असलें तरी चालेल ८५. पण तें दिलेलें पान भक्तिभावानें परिपूर्ण भरलेलें आहे असें पाहातांच, ज्याप्रमाणें एखादा भुकेलेला मनुष्य अमृतानें तृप्त होतो, त्याप्रमाणें भक्तिभावानें परिपूर्ण भरलेलें पान तितक्याच आनंदानें मी खाऊं लागतो कारण; भक्तीमुळें ते मला अमृततुल्य लागते ८६. अथवा एखाद्या वेळेस असाहि प्रसंग येतो कीं, झाडाला कोठेंच पाला नाहीं–मग त्यानें मला काय अर्पण करावें ! ही अडचण खरी. पण पाणी मिळण्याचें तर संकट पडणार नाहीं ना ८७. तें पाणी वाटेल त्या ठिकाणीं फुकट मेहनतीशिवाय मिळतें. तेंच आपलें सर्वस्व समजून मला मनोभावानें जो अर्पण करितो, अर्जुना ! त्याची मला किती धन्यता वाटते म्हणून सांगू ! ८८. त्यानें त्या करण्यांत माझ्याकरितां वैकुंठाहूनहि मोठमोठी देवळें बांधली, कौस्तुभमण्याहूनहि अधिक तेजस्वी असें रत्नालंकार मला अर्पण केलें ८९. त्यानें दुधासारखीं स्वच्छ व क्षीरसमुद्राप्रमाणें चित्ताकर्षक अशी अगणित शय्यास्थानें माझ्याकरितां निर्माण केली आहेत ३९०. त्यानें त्या करण्यांत कापूर, चंदन, कृष्णागरु अशा सुगंधाच्या महामेरुएवढाला ढीग अर्पण केल्याप्रमाणें होते. त्यानें माझ्यापुढें काडवाती लावून सूर्याची दीपमाळ पाजळल्याप्रमाणें होते ९१. त्यानें गरुडासारखीं वाहनें, कल्पवृक्षांच्या बागा व कामधेनूंचे कळपच्याकळप मला अर्पण केल्याप्रमाणें आहेत, असे मला वाटते ९२. मला अमृताहूनहि मधुर रसपूर्ण अशी पुष्कळ पक्वान्नें नैवेद्यास वाढून दिली असे वाटते त्यामुळें मी जो संतोषास पावतो, तो अशाभक्तियुक्त अंतःकरणानें अर्पण केलेल्या पाण्याच्या एकाथेंबापासूनही होतो ९३. हे किरीटी ! हें सांगावयास हवे काय ? मला अर्पण करण्याच्या उद्देशानें आपली गरीबी जाणून पोह्यांच्या कणांची गाठोडी–पुरचुंडी सुदामजीनें प्रीतीनें खोल बगलेंत मारून आणली. तिच्या गांठी मी प्रेमानें, लगबगीनें स्वतःच्या हातानें सोडल्या त्या तूं आपल्या डोळ्यानें प्रत्यक्ष पाहिल्या नाहींस का ? ९४. म्हणून मी फक्त एक भक्तिच ओळखतों; त्या ठिकाणीं लहानथोर हें म्हणत नाहीं आणि वाटेल त्याच्या ठिकाणीं माझ्याविषयीं अनन्य भक्तिभाव असला म्हणजे त्याच्या घरचे आम्हीं नित्याचेच पाहुणे आहोंत ९५. एव्हवीं पत्र पुष्प फळ समर्पण करणे हे एक आमची भक्ति करण्याकरितां केवळ निमित्तमात्र आहे खरोखर पाहतां निष्कलंक भक्तिच मला आवडते. कारण, माझ्या प्राप्तीचे मुख्य साधन शुद्ध भक्तिच आहे. प्रेमात्मक भक्तितत्त्वाखेरीज इतर सर्व सामग्री आम्हीं व्यर्थ समजतों ९६. म्हणून अर्जुना, ऐक. तूं आपली एक बुद्धि आपल्या स्वाधीन करून घे. म्हणजे नेहमीं आपल्या मनोरूप मंदिरांत माझा विसर पडूं देऊं नकोस ९७.

**अन्वयार्थ**––**कौन्तेय**–हे अर्जुना !–**यत्**––तूं जे––**करोषि**–करतोस–**यत्**–**अश्नासि**–जे खातोस–**यत् जुहोषि** जे हवन करतोस–**यत् ददासि**–जें दान देतोस–**यत् तपस्यसि**–जें तप करतोस–**तत्**–तें सर्व–**मदर्पणं**–मला समर्पण–**कुरुष्व**–कर २७.

येवढ्याकरितां तूं जे जे कांहीं व्यवहार करशील किंवा ज्या भोग्य वस्तूंचा उपभोग घेशील अथवा ज्या पुष्कळ प्रकारच्या यज्ञांनीं माझे यजन करशील; ९८. किंवा विशिष्ट सत्पात्र पाहून जीं दानें करशील अथवा तूं आपल्या चाकरमाणसांस जीं वतनेंहि देशील आणि जीं जीं तपादि सर्व साधनें व व्रतें यांचीं अनुष्ठानें करशील;

१ शकेल. २ देहाभिमानाची ओवाळणी. ३ अत्यंत प्रेमोल्हासानें. ४ पुढें करी. ५ तोडितो. ६ हिशोबानें.

साधनें । व्रतें करिसी ॥ ९९ ॥ तें क्रियाजात आघवें । जें जैसें निपजेल स्वभावें । तें भावना करोनि करावें । माझिया मोहरा ॥ ४०० ॥ परि सर्वथा आपुले जीवीं । केलियाची से कांहींचि नुरवीं । ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं । माझिया हातीं ॥ १ ॥

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः । संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

मग अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे जेवीं मुकलीं । तेवीं न फळतीचि मज अर्पिलीं । शुभाशुभें ॥ २ ॥ अगा कर्में जैं उरावें । तैं तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तेयातें भोगावया यावें । देहा एका ॥ ३ ॥ तें उगाणिलें मज कर्में । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म । जन्मासवें श्रम । वरचिलही गेले ॥ ४ ॥ म्हणौनि अर्जुना यापरी । पांहेचा वेळु नव्हेल भारी । हे संन्यासयुक्ति सोपारी । दिधली तुज ॥ ५ ॥ या देहाचिया बांदोडीं न पडिजे । सुखदुःखांचिया सागरीं न बुडिजे । सुखें सुखरूपा घडिजे । माझियाचि आंगा ॥ ६ ॥

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः । ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥२९॥

तो मी पुससी कैसा । तरि जो सर्वभूतीं सदा सारिसा । जेथ आपपरु ऐसा । भागु नाहीं ॥७॥ जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनि । जे जीवें कर्में करूनि । मातें भजले ॥ ८ ॥ ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझ्या ठायीं । आणि मी तयांच्या हृदयीं । समग्र असें ॥ ९ ॥ सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजीं असे । आणि बीजकणु वसे । वटीं जेवीं ॥ ४१० ॥ तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेर नामाचींचि अंतरें । वांचूनि आंतुवटे वस्तुविचारें । मी तेचि ते ॥ ११ ॥ आतां जैयांचें जैसें लेणें । आंगावरी आहाचवाणें । तैसें देहधरणें । उदास तयांचें ॥१२॥ परिमळु निघालिया पवनापाठीं । मागें वोस फूल राहे देठीं । तैसें आयुष्याचिये मुठीं । केवळ देह ॥ १३ ॥ येर अवष्टंभु जो आघवा । तो आरूढोनि मद्भावा । मजाचि आंतु पांडवा । पैठा जाहला ॥ १४॥

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

ऐसें भजतेनि प्रेमभावें । जयां शरीरही पाठीं न पवे । तेणें भलतया व्हावें । जातीचिया ॥ १५ ॥ आणि आचरण पाहतां सुभटा । तो दुष्कृताचा कीर सेल वांटा । परि जीवित वेचिलें चोहटां । भक्तीचिया कीं ॥ १६ ॥ अगा अंतींचिया मती । साचपण पुढिले गती । म्हणौनि जीवित जेणें भक्ती । दिधलें शेखीं

९९. तीं सर्व व त्या व्यतिरिक्त इतर तुझ्या हातून सहजगत्या होणारीं सर्व कर्मे तूं माझ्या उद्देशानें भक्तिपुरःसर कर ४००. परंतु तीं कर्मे केल्याबद्दलची आपल्या मनांत फुशारकी तर राहोच, पण आठवणहि राहूं देऊं नकोस इतक्या निरहंकारानें व निष्कामबुद्धीनें केलेलीं अशी अहंकारात्मक मळ धुवून स्वच्छ कर्मे मला अर्पण कर १.

**अन्वयार्थ**--**एवं**-याप्रमाणें तूं करूं लागलास म्हणजे -**शुभाशुभफलैः**-शुभ अशुभ फलें देणाऱ्या-**कर्मबंधनैः**-कर्मरूप बंधनाकडून-**मोक्ष्यसे**-मुक्त केला जाशील व-**संन्यासयोगयुक्तात्मा**-ज्यांचें अंतःकरण संन्यास व योग यांनीं युक्त आहे असा तूं-**विमुक्तः**-अगदीं मुक्त होऊन -**मां**-मला-**उपैष्यसि**-प्राप्त होशील २८.

मग ज्याप्रमाणें अग्नीकुंडांत टाकून भाजलेले बीज अंकुरोत्पत्तीच्या योग्यतेस आंचवतें त्याप्रमाणें मला अर्पण केलेली शुभाशुभ कर्मे तुला कांहींच फल देणार नाहींत २. अरे! जेव्हां अगोदर कर्मे उर्वरित राहातात तेव्हां तर त्या कर्मानें, सुख-दुःख रूपानें फलद्रूप व्हावें आणि मग ती सुखदुःखें भोगण्याकरितां एखादा देह-जन्म घ्यावा ३. अशी रीत आहे; परंतु तेंच कर्म ज्यावेळीं मला अर्पण केलें; त्याचवेळीं मरण व जन्म पार चुकलें अर्थात् जन्माबरोबर जन्मानंतर येणारीं जीं दुःखें तींहि आपोआपच गेलीं ४. म्हणून अर्जुना! ही तुला सांगितलेली संन्यासाची सोपी युक्ति आहे. 'पाहूं आतां' 'उद्या अमलांत आणूं' असें म्हणून वेळ गमवण्यासारखीं नाहीं. कारण तितकाच फलप्राप्तीसहि अधिक वेळ लागणार नाहीं काय? ५. ह्या युक्तीनें देहरूपी बंदीखान्यांत पडावें लागत नाहीं व सुखदुःखाच्या सागरांत बुडावें लागत नाहीं तर अनायासानें सुखरूप असें जें माझें स्वरूप त्या माझ्या स्वरूपांत एकरूप होऊन रहा ६.

**अन्वयार्थ**—**अहं सर्वभूतेषु**-मी सर्व भूतांमध्यें-**समः**-सम आहे-**मे द्वेष्यः न अस्ति**-माझा कोणी द्वेष्य-द्वेषपात्र-शत्रु नाहीं व-**प्रियः**-प्रिय-**न**-नाहीं-**तु**-पण-**ये**-जे-**मां**-मला-**भक्त्या**-भक्तीनें-**भजन्ति**--भजतात -**ते**-ते-**मयि**-माझ्यामध्यें-मजपाशीं स्वभावतःच असतात-**च**-आणि-**अहम् अपि**-मीहि-**तेषु**-त्यांच्यामध्यें स्वभावतःच असतो २९.

तो मी कसा आहें म्हणून विचारशील, तर सर्व भूतांमध्यें नेहमी सारखा व्याप्त असून, माझ्या ठिकाणीं 'आपला' व 'परका' असा भेद नाहीं ७. जे अशा माझ्या सर्व व्यापक स्वरूपाला आत्मत्वानें जाणतात व अहंकाराचा बीमोड करून कायावाचामनेंकरून होणाऱ्या कर्मानें मलाच भजतात ८. ते जगांत देहानें व्यवहार करितांना दिसतात खरें, तथापि देहतादात्म्यांत नसून मत्स्वरूपीं रममाण झालेलें आहेत व मी संपूर्ण त्यांचें हृदयांत असतो ९. ज्याप्रमाणे वडाचें मोठें झाड आपल्या विस्तारासह वडाच्या बीजांतच असतें व बीजहि त्या झाडांतच असतें ४१०. त्याप्रमाणें माझ्यांत व त्यांच्यांत एकमेकांत केवळ बाह्य नांवाचेंच अंतर असतें, बाकी तत्त्वतः अंतःस्थितीचा विचार करून पाहतां ते व मी एक परब्रह्मरूपच आहोंत ११. त्याचा देह व्यवहार कसा उदासीनपणानें असतो हे खालील दृष्टांताप्रमाणें पहा-लग्नकार्यांत आतां लोकांचें तात्पुरतें मागून आणलेलें दागिनें अंगावर घातलें तरी त्या दागिन्यांविषयीं घालणाऱ्याचें मनांत जशी उदासीनता असतें, त्याचप्रमाणें त्यांचें देहधारण करणें उदासीनपणाचें असतें १२. वाऱ्याबरोबर ज्याप्रमाणें फुलाचा सुगंध त्याचें मागोमाग जातो व देंठापाशीं फूल जसें सुगंधरहित राहतें त्याचप्रमाणें, आयुष्याची मुदत संपण्यापुरताच प्रारब्धावशेष भोगार्थ त्यांचा देह असतो १३. हे पांडवा! जो अभिमान म्हणून आहे, तो सर्व माझी भक्ति पावून माझ्या स्वरूपांतच मिळाला अशी त्यांची स्थिति आहे १४.

**अन्वयार्थ**--**अपि चेत्**-जरी कदाचित-**सुदुराचारः**-अतिशय निंद्य आचरण करणारा एखादा-**अनन्यभाक्**-अनन्य भक्त होऊन-**मां**-मला-**भजते**-भजूं लागला तरी-**सः**-तो-**साधुः एव**-सदाचरणसंपन्नच आहे असें-**मन्तव्यः**-मानावें-**हि**-कारण-**सः**-तो-**सम्यक्**-चांगल्या प्रकारें-**व्यवसितः**-निश्चित झालेला असतो ३०.

अशा प्रेमभावानें जे मला भजतात व ज्यांना हें शरीरहि पुनः प्राप्त होत नाहीं, ते इन्या त्या जातीचे का असेनात! असोत १५. आणि हे अर्जुना! त्यांचें आचरणाचा विचार केला तर ते पाप करणाऱ्यांत पहिल्या प्रतीचे असलें, तरी ज्यांनीं आपल्या आयुष्याचा [उर्वरित] शेवट भक्तिमार्गांत खर्च केला असल्यामुळें त्यांना माझेंच स्वरूप प्राप्त होतें १६.

---

१ मत्प्रीत्यर्थ. २ कर्मफळाला. ३ अर्पण केलें. ४ वरील, पुढील. ५ ज्यांचा, पुढचा. ६ फार लांब नाहीं. ७ कर्मफळाचा त्याग करण्याची युक्ति. ८ बंधनांत. ९ अनायासें. १० मिसळून जा. ११ सम, सारखा. १२ वरटी. १३ काया-वाचा-मनानें. १४ वडाचें झाड. १५ अंतर्यामांतील. १६ दुसऱ्याचें उसनें आणलेलें, केव्हांतरीं जाणारें. १७ वरवरच, व्यर्थ. १८ वाऱ्यामागून. १९ मुदतीपर्यंत. २० अहंकार. २१ मिळाला. २२ पुनः. २३ पापाचा.

॥ १७ ॥ तो आधीं जरी दुराचारी ॥ तरी सर्वोत्तमुचि अवधारीं । जैसा बुडाला महापुरीं । न मरतु निघाला ॥ १८ ॥ तयाचें जीवित ऐलथडिये आलें । म्हणौनि बुडालेपण जेवीं वायां गेलें । तेवीं नुरेचि पाप केलें । शेवटलिये भक्ती ॥ १९ ॥ यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहाला । तरी अनुतापतीर्थीं न्हाला । न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावें ॥ ४२० ॥ तरी आतां पवित्र तयाचेंचि कुळ । आभिजात्य तेंचि निर्मळ । जन्मलेयाचें फळ । तयासीच जोडलें ॥ २१ ॥ तो सकळही पढिन्नला । तपें तोचि तपिन्नला । अष्टांग अभ्यासिला । योगु तेणें ॥ २२ ॥ हें असो बहुत पार्था । तो उतरला कर्मं सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं ॥ २३ ॥ अवघिया मनोबुद्धीचिया राहटी । भरोनि एकनिष्ठेची पेटी । मजमाजीं किरीटी । निक्षेपिलीं जेणें ॥ २४ ॥

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति । कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥

तो आतां अवसरें मजसारिखा होईल । ऐसा हन भाव तुज जाईल । हां गा अमृताआंत राहील । तया मरण कैचें ? ॥ २५ ॥ पैं सूर्यु जो वेळु नुदैजे । तया वेळा कीं रात्रि म्हणिजे । तेवीं माझिये भक्तीविण जें कीजे । तें महापाप नोहें ? ॥ २६ ॥ म्हणौनि तयाचिया चित्ता । माझी जवळिक पंडुसुता । तेव्हांचि तो तत्त्वता । स्वरूप माझें ॥ २७ ॥ जैसा दीपें दीपु लाविजे । तेथ आदील कोण हें नोळखिजे । तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके ॥ २८ ॥ मग माझी नित्य शांती । तया दशा तेचि कांती । किंबहुना जिती । माझेनि जीवें ॥ २९ ॥ एथ पार्था पुढतपुढती । तेंचि तें सांगों किती । जरी मियां चाड तरी भक्ती । न विसंबिजे गा ॥ ४३० ॥ अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । आभिजात्य झणीं श्लाघा । व्युत्पत्तीचा वाउगा । सोसुं कां वहावा ? ॥ ३१ ॥ कां रूपवयसा माजा । आथिलेपणें कां गाजा ? । एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ॥ ३२ ॥ कणेंविण सोपटें । कणसें लागलीं घनदाटें । काय करावें गोमटें । वोस नगर ? ॥ ३३ ॥ नातरी सरोवर आटलें । रानीं दुःखिया दुःखी भेटलें । कां वांझ फुलीं फुललें । झाड जैसें ॥ ३४ ॥ तैसें सकळ तें वैभव । अथवा कुळ जाति गौरव । जैसें शरीर आहे सावेव । परि जीवचि नाहीं ॥ ३५ ॥

अरे! असा नियमच आहे कीं, अंतकाळीं जशी बुद्धि असते तशीच गति त्याला पुढील जन्मीं प्राप्त होते; म्हणून आपल्या आयुष्याचा शेवटचा काळ ज्यांनीं माझ्या भक्तीस अर्पण केला १७. तो पूर्वीचा जरी दुराचरण करणारा असला, तरी तो सर्वोत्तमच आहे, असें समज. एखाद्या मनुष्यानें महापुरांत उडी घातली व सर्व मनुष्यांस तो बुडून मेला असें वाटलें, परंतु शेवटीं तो जर न मरतां बाहेर निघाला १८. तो जिवन्त अलीकडच्या काठांवर आला, त्यामुळें त्याचे बुडालेपण-जसें व्यर्थ होते. त्याप्रमाणें पूर्वी केलेलें पाप अखेरीस केलेल्या अनन्यभक्तीनें नाहीसें होते, उरतच नाहीं १९. याकरितां कोणी पूर्वीचा पापाचरण करणारा जरी असला तरी नन्तर त्यांनीं अनुतापरूपी तीर्थांत स्नान केले व असा तीर्थांत न्हाऊन जर सर्वभावानें मला शरण आला. ४२०. तर त्या भक्तीनेंच त्याचें आतां कुल पवित्रच झालें, त्यालाच निर्मळ शुद्ध खरी अशी कुलीनता प्राप्त झाली आणि जन्माला आल्याचे त्यासच फळ मिळून त्याचे सार्थक झालें २१. त्यानें सर्वहि शास्त्रें वगैरे अध्ययन करून अवगत केलीं, त्यास तपाचीहि आचरणें केल्याचें श्रेय आलें व त्यानें आसनादि अष्टांग योगाभ्यास केला असे समज २२. अर्जुना! हे बहुत वर्णन असो; ज्याची अखण्ड तीव्रस्वरूपाची आवड प्रेमलक्षणात्मक वृत्ति मद्विषयकच आहे. अरे! तो कर्मरूपी बंधांतून सर्वतोपरि, निश्चयानें पार पडला २३. हे अर्जुना! ज्यानें आपल्या मनबुद्धिचे—सारे व्यवहार एकनिष्ठारूपी संदुकेंत [ माझ्या विषयींची अनन्य श्रद्धा—रूपी पेटींत ] भरून संदुका माझ्या स्वरूपामध्यें ठेविली २४.

**अन्वयार्थ**—[ सः—तो ]–**क्षिप्रं**—सत्वर –**धर्मात्मा**—धर्मात्मा–धार्मिक–**भवति**–होतो आणि –**शश्वत्**–नित्य–**शांति**–शांतीला –**निगच्छति** –प्राप्त होतो –**कौन्तेय**–हे अर्जुना! **मे**–**भक्तः**–माझा भक्त–**न प्रणश्यति**–कधींहि नाश पावत नाहीं, असें तूं–**प्रतिजानीहि**–जाण ३१.

आतां तो भक्त कांहीं अवकाशानें [ मरणोत्तर ] मजसारखा होईल, असा तुझा कदाचित् समज होईल; पण अगा अर्जुना! जो अमृतांतच वास्तव्य करितो, त्याला मरण कोठून प्राप्त होणार? २५. हें बघ, ज्या वेळीं सूर्य उदय पावलेला नसतो याच वेळेला रात्र असें म्हणतात, त्याचप्रमाणें माझ्या भक्तिविना जें जें करणें तें-तें महापाप नव्हे काय? २६. म्हणून हें पंडुसुता त्याच्या चित्ताला जेव्हां माझे स्वरूप सान्निध्याचा योग येतो, म्हणजे त्याचें चित्त मद्रूप होतें, तेव्हांच खरोखर तो माझ्या यथार्थ स्वरूपाला प्राप्त होतो २७. ज्याप्रमाणें एका दिव्यानें दुसरा दिवा लावला असतां त्यांतील पहिला कोणता हें ओळखतां येत नाहीं त्याप्रमाणें जो सर्वभावांनीं मला भजतो, तो मद्रूपच होऊन राहतो २८. मग त्याला माझी नित्य उपलब्धरूप शांति, तीच त्याची स्थिति व कांति त्यास सहज प्राप्त होते. फार काय सांगावे!! तो माझ्या जीवनानेच–जीवंत राहतो २९. पार्था! सांगितलेलें येथें वारंवार तेंच तें किती सांगूं? पण जर तुला माझ्या प्राप्तीची इच्छा असेल तर माझी भक्ति क्षणभरहि विसरूं नकोस हो! ४३०. अरे! कुळाच्या चांगुलपणाची आवश्यकता नाहीं म्हणून त्याचा अभिमान ठेवूं नका. चांगल्या जातीचीहि अडचण नाहीं. कदाचित् आमचें कुळ शुद्ध आहे म्हणाल पण तसें स्तवूं नका. मग विद्वत्तेची तरी उगीच हांव पाहिजे कशाला? ३१. अथवा सुस्वरूपाच्या आणि वयाच्या प्रतिष्ठेनें मस्त कां व्हावें? किंवा संपत्ती संपन्नतेचा डौल कशाला मिरवावा? कारण एक माझ्या ठिकाणीं जर भक्ति नसली तर हा सर्व पसारा व्यर्थ–निष्फल आहे ३२. दाण्याविना रिकामीं, पिशा असलेली कणसें जरी पुष्कळ दाट लागलीं असलीं तरी त्याचा काय उपयोग? अथवा सुंदर शहर असून तें जर वस्तीविरहित अर्थात् ओसाड असेल, तर त्याला घेऊन काय करावयाचें आहे! ३३. किंवा मोठा तलाव किंवा सरोवर आहे; पण त्यांतील पाणी जर आटले, तसेंच रानांत एका दुःखी कष्टी मनुष्यास दुसरा तसाच दुःखी कष्टी भेटला! अथवा ज्याप्रमाणें, वांझ फुलांनीं एखादें झाड फुललें ३४. त्याप्रमाणें, सर्व वैभव, कुल अथवा जाती यांचा मोठेपणा माझ्या भक्तिवांचून व्यर्थ होय. जसें सर्व अवयवांनीं युक्त असें एखादे शरीर असून त्यांत फक्त एक जीवच नसावा ३५. त्याचप्रमाणें माझ्या भक्तीवांचून जे जगणें

१ शेवटच्या ज्ञानोत्तर भक्तीनें. २ पापी. ३ पश्चात्तापरूप तीर्थांत. ४ कुलीनपणा. ५ फळ जी भक्ति. ६ अष्टांगयोगसाधनांची सिद्धि. ७ सर्व कर्मांतून पार पडला. ८ व्यापार. ९ ठेविली. १० अवकाशानें. ११ ज्यावेळीं उदय पावत नाहीं. १२ सान्निध्य. १३ पहिला. १४ स्थिति. १५ जिवंत राहतो. १६ अगत्य. १७ पाहूं नका. १८ कुलीनत्व. १९ स्तवूं नका. २० हांव. २१ रूपाच्या आणि तारुण्याच्या प्रतिष्ठेनें चढून कां जावें? २२ संपत्तींच्या डौलानें. २३ डौल. २४ व्यर्थ. २५ दाण्याशिवाय. २६ रिकामीं. २७ अवयवयुक्त.

तैसें माझिये भक्तीविण । जळो तें जियालेंपण । अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ? ॥ ३६ ॥ पैं हिंवराची दाट साउली । सज्जनीं जैसी वाळिली । तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तांतें ॥ ३७ ॥ निंब निंबोळियों मोडोनि आला । तरी तो काउळियांसीचि सुकाळु जाहला । तैसा भक्तिहीनु वाढिन्नला । दोषांचिलागीं ॥ ३८ ॥ कां षड्रस खापरीं वाढिले । वाढूनि चोहटां ठेविले । ते सुणियांचेचि ऐसे झाले । जियापरी ॥ ३९ ॥ तैसें भक्तिहीनाचें जिणें । जो स्वप्नींहि परि सुकृत नेणें । तेणें संसारदुःखासि भाणें । वोगरिलें ॥ ४४० ॥ म्हणौनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें । वरि देहाचेनि नांवें । पशूचेंही लाभो ॥ ४१ ॥ पाहें पां सांवजें हांतिरू धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें । कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पावलिया मातें ॥ ४२ ॥

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥३२॥

अगा नांवें घेतां वोखटीं । जें आघवेया अधमांचिये शेवटीं । तिये पापयोनींही किरीटी । जन्मले जे ॥ ४३ ॥ ते पापयोनि मूढ । मूर्ख जैसें कां दगड । परि माझ्या ठायीं दृढ । सर्वभावें ॥ ४४ ॥ जयांचिये वाचें माझे आलाप । दृष्टी भोगी माझेंचि रूप । जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे ॥ ४५ ॥ माझिया कीर्तिविण । जयांचें रितें नाहीं श्रवण । जयां सर्वांगीं भूषण । माझी सेवा ॥४६॥ जयांचें ज्ञान विषो नेणे । जाणीव मज एकातेंचि जाणे । जया ऐसें लाभे तरी जिणें । एऱ्हवीं मरण ॥४७॥ ऐसा आघवाचि परी पांडवा । जिहीं आपुलिया सर्वभावा । जिया-वयालागीं वोलावा । मीचि केला ॥४८॥ ते पापयोनीही होतु कां । ते श्रुताधी-तही न होतु कां । परि मजसीं तुकितां तुकां । तुटी नाहीं ॥ ४९ ॥ पाहें पां भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यीं देवां आणिलें उणें । माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिये महिमे ॥ ४५० ॥ तो प्रल्हादु गा मजसाठीं । घेतां बहुतें संकटें सदा किरीटी । कां जें मियां द्यावें ते गोष्टी । तयाचिया जोडे ॥ ५१ ॥ एऱ्हवीं दैत्यकुळ सौचोकारें । परि इंद्रही सैरी न लाहे उंपरें । म्हणौनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण ॥ ५२ ॥ राजाज्ञेचीं अक्षरें आहाती । तियें चांमा एका जया पडती । तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥ ५३ ॥ वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ

आहे त्यास आग लागो. अरे, पृथ्वीच्या पाठीवर दगड नाहींत काय ? ३६. तसेच अभक्ताचें जीणे आहे. हे पहा ! हिंवराच्या झाडांची अगदी दाट सावली आहे खरी, पण सज्जनांनीं ती निषिद्ध मानून टाळली आहे, त्याप्रमाणें जो माझी भक्ति करीत नाहीं त्याला पुण्यें डावळून निघून जातात ३७. लिंब हा लिंबोळ्यांच्या भारानें जरी वांकला इतक्या निंबोळ्या आल्या तरी त्यापासून ज्याप्रमाणें कावळ्यांनाच सुकाळ होतो. त्याप्रमाणें, माझी भक्ति न करणारा मनुष्य पापाचीच जोड करण्याकरितां वाढलेला असतो ३८. किंवा ज्याप्रमाणे षड्रस अन्न खापरांत वाढलें व अन्नांनीं भरलेलें ते खापर चव्हाठ्यावर ठेविलें म्हणजे कुत्र्यांच्याच उपयोगाला येतें ३९. त्याप्रमाणें जो स्वप्नांतहि पुण्यमार्गाचें आचरण करण्याचे जाणत नाहीं, त्या भक्तिहीनाचें जिणें म्हणजे संसारदुःखांना ताट वाढून आमंत्रण देऊन ठेवल्याप्रमाणेंच होय ४४०. म्हणूनच उत्तम कुल असले पाहिजे असें नाहीं अथवा जातीनें अंत्यजहि असला तरी चालेल, इतकेच काय पण पशूचाहि देह प्राप्त झाला असला तरी चालेल, पण माझी भक्ति पाहिजे म्हणजे कृतार्थता लाभेल ४१. पहा कीं, नक्रानें गजेंद्राला धरल्यावर त्यानें त्यांतून सुटण्याकरितां दीनपणानें माझें स्मरण करून माझा धांवा केला त्या वेळेस तो मजप्रत प्राप्त झाल्यामुळें त्याचें पशुपण व्यर्थ झालें ४२.

**अन्वयार्थ**—**हि**—कारण—**पार्थ**—हें अर्जुना !—**मां**—मला—**व्यपाश्रित्य**—आश्रय या रूपानें स्वीकारून—**स्त्रियः**—स्त्रिया—**वैश्याः**—वैश्य—**तथा शूद्राः**—किंवा त्याचप्रमाणें शूद्र असे—**ये**—जे—**पापयोनयः**—**अपि**—पापजातीत उत्पन्न झालेलेहि—**स्युः**—असतात—**ते अपि**—ते सुद्धां—**परां गतिं**—परम गतीला—**यान्ति**—जातात ४२.

अरे ! जी अधमाहून अधम व जिचें नांव देखील घेणेंहि वाईट आहे अशा पापयोनींत जे जन्मास आले आहेत ४३. जन्म तर अशा पाप जातीतील अविवेकी आणि केवळ दगडाप्रमाणें मूर्ख असें असेनात, परंतु एक माझ्याठिकाणीं मात्र सर्वस्वी दृढ भक्तिभाव आहे म्हणजे ४४. ज्यांच्या वाणीनें माझाच नामोच्चार होतो, ज्यांची दृष्टि माझेंच रूप पहाते व ज्यांचे मन माझ्याच विषयींचा विचार–संकल्प करीत असतें; ४५. ज्यांचे कान माझे गुणानुवाद ऐकण्याशिवाय रिकामे नसतात व ज्यांच्या शरीरांतील सर्व अवयवांना माझ्या सेवेशिवाय दुसरें कशाचेच भूषण नाहीं; ४६. ज्यांच्या ज्ञानवृत्तीस पंचविषय मुळींच दिसत नाहींत, त्यांची जाणिव मला एकास जाणते अशी स्थिति लाभली तरच त्यास जिवंत राहण्यांत सार्थकता वाटते नाहींतर जगणें मरणप्राय वाटते ४७. हे पांडवा ! अशा सर्व प्रकारांनीं ज्यांनीं आपल्या भावभावनांना सर्वस्वी मजवर ठेवून आपल्या जीवित जगण्याचा आधार मलाच केलें ४८. ते पापयोनींत जन्म घेतलेलें असेनात कां ! ते शास्त्र देखील ऐकलेले किंवा पढलेले नसेनात कां ! पण त्यांची माझ्याशीं तुलना केली असतां ते मजपेक्षां कमी भरत नाहींत हे पक्के लक्षांत ठेव ४९. अरे ! असें पहा कीं, भक्तीच्या संपन्नतेनें दैत्यांनीं देवांनाहि उणेपणा आणून मागे टाकीले नाही का पहा! त्या प्रल्हादाच्या भक्तीच्या महिम्याकरितां मला नरसिंह अवताररूपी अलंकार धारण करावा लागला ४५०. हे किरीटी, ज्यासाठीं प्रल्हादानें माझ्या प्राप्तीकरितां सदाच अनंत संकटें सोशिलीं, त्या प्रल्हादाचें चरित्र जर कोणीं वर्णन केलें, तर त्याला माझ्या प्रसन्नतेपासून जी फलप्राप्ती होते, तीच फलप्राप्ति त्या प्रल्हाद–चरित्रवर्णनापासून होते ५१. नाहीतर वास्तविक पाहतां त्यानें दैत्यकुळांत जन्म घेतला खरे तरीपण त्यांच्यापेक्षां अधिक मोठेपणा इंद्रादिकांहि प्राप्त झालेला नाहीं; म्हणून अर्जुना ! माझी प्राप्ती करून घेण्याला एक भक्तिच सरती–पुरेशी आहे, जात वगैरेंचीं कांहींएक किंमत नाहीं ५२. राजाज्ञेचीं अक्षरें ज्या एका कातड्याचें तुकड्यावर पडली–उमटली आहेत त्या कातड्याच्या मोबदल्यांत सर्व वस्तु प्राप्त करून घेता येतात ५३. त्या अक्षरावांचून प्रत्यक्ष सोनें

१ जीवित. २ या नांवाचें एक कांटेरी झाड. ३ निषिद्ध मानली, वर्जिली. ४ सोडून. ५ कडू लिंबाची फळें. ६ दाट–भरूट येऊन वांकला. ७ लेह्य–चाटणें, चोष्य–चोखणें, खाद्य–खाणें, पेय–पिणें, भक्ष्य–पातळ, भोज्य–पक्वान्नें. ८ चव्हाट्यावर. ९ कुत्र्यांच्या. १० पुण्य. ११ ताट. १२ वाढिलें. १३ महार. १४ नक्रानें. १५ हत्ती. १६ व्यर्थ, दूर. १७ गुणानुवाद, नामोच्चार. १८ पांच विषय. १९ कालक्रमणा करण्याकरितां. २० असेनात कां. २१ शास्त्र पढलेले. २२ वजनांत. २३ महत्त्वानें, अस्तित्वानें. २४ अवतार धारण करणें. २५ मोठेपणासाठीं. २६ खरेपणानें. २७ बरोबरी. २८ अधिकपणानें. २९ पुरें होतें, शोभतें. ३० चामडें, कातडें.

राजाज्ञाचि समर्थ आहे । तेंचि चाम एक जैं लाहे । तेणें विकती आघवीं ॥५४॥ तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे । जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ५५ ॥ म्हणौनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेंपण। सार्थक एक ॥५६॥ तेंचि भलतेणें भावें। मन मज आंतु येतें होआवें। आलें तरी आघवें। मागील वावो ॥५७॥ जैसें तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ। मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ५८ ॥ कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंवचि घटे । जंव नं घापती एकवटे । अग्नीमाजीं ॥५९॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया । जाति तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥४६०॥ मग जाती व्यक्ती पडे बिंदुले । जेव्हां भावें होती मज मीनलें । जैसे लवणकण घातले । सागरामाजीं ॥ ६१ ॥ तंववरी नदानदींचीं नांवें । तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे । जंव न येती आघवे । समुद्रामाजीं ॥ ६२ ॥ हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ६३ ॥ अगा वरी फोडावयालागीं । लोहो मिळो कां परिसाचे आंगीं। कां जे मिळतिये प्रसंगीं । सोनेंचि होईल ॥ ६४ ॥ पाहें पां वालभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनांचीं निजें । मज मीनलिया काय माझें । स्वरूप नव्हती ? ॥ ६५ ॥ नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें ? । कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ॥ ६६ ॥ अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां ॥६७॥ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इयां भक्तीं मी धनुर्धरा । प्राप्यु जैसा ॥ ६८ ॥ तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें । येरां घातकां मनोधर्में । शिशुपालादिकां ॥ ६९ ॥ अगा मी एकुलाणीचें खागें । मज येवो पां भलतेनि मार्गें । भक्ती कां विषयविरागें । अथवा वैरें ॥ ४७० ॥ म्हणौनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं । उपायांची नाहीं । वाणी एथ ॥ ७१ ॥ आणि भलतिया जातीं जन्मावें । मग भाजिजे कां विरोधावें । परि भक्त कां वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ७२ ॥ अगा कवणें एकें बोलें । माझेपण जऱ्ही जाहालें । तरी मी होणें आलें । हाता निरुतें ॥ ७३ ॥ यालागीं पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ७४ ॥

रूपें जरी असले तरी त्यास किंमत नाहीं ? तर तेथें व्यवहारांत राजाज्ञा हीच मुख्य प्रबल होय व त्याच राजशिक्क्याच्या–राजाच्या हुकमाची अक्षरें असलेल्या एका कातड्यानें सर्व वस्तु विकत घेतां येतात ५४. त्याप्रमाणें आपला मोठेपणा त्याचवेळीं टिकून राहतो व आपला सर्वज्ञपणा त्याचवेळीं सरता होतो कीं, जेव्हां मन व बुद्धि ही माझ्याच प्रेमानें युक्त होतात ५५. म्हणून कुळ, जाति व वर्ण हे सर्वच माझ्या प्राप्तीला निष्फल आहेत. तर अर्जुना ! येथें फक्त एक माझी अनन्यभक्ति केली तरच सार्थक होते ५६. ती माझी भक्ति वाटेल त्यानें, वाटेल त्या हेतूनें कां होईना, पण माझ्या स्वरूपीं येईल असें झालें पाहिजे. मन एकदां कां माझ्या स्वरूपांत आले कीं मागील जाति, कुळ निरर्थक ठरतात ५७. ओढे जोपर्यंत गंगेस मिळालें नाहींत, तोंपर्यंतच त्यांतील पाण्यास ओहोळ, वहाळ वगैरे म्हणतात; पण ते गंगेस मिळाल्यावर जसे केवळ गंगारूपच होऊन राहतात ५८. किंवा लांकडे जोपर्यंत एकत्र करून अग्नींत घातली नाहींत तोपर्यंतच त्यास खैराचें लांकूड, चंदनाचें लांकूड व इतर रायवळ लांकूड अशी निवड होऊं शकते ५९. त्याप्रमाणें जोपर्यंत भक्त मद्रूपतेस प्राप्त झाले नाहींत, तोपर्यंतच क्षत्रिय, वैश्य, स्त्री, शूद्र आणि अंत्यज इत्यादि जाती वेगवेगळ्या असतात ४६०. ज्याप्रमाणें समुद्रांत मिठाचें कण घातल्यावर ते समुद्राशी एकरूप होऊन जातात. त्यांचा कणपणा नाहींसा होतो. त्याप्रमाणें सर्व भाव-भावना-वृत्ति मद्रूपतेस मिळतात तेव्हां जाति व व्यक्ति यांच्या नांवानें शून्य पडते म्हणजे सर्व भेद नाहींसा होतो ६१. जोंपर्यंत समुद्राला येऊन मिळाले नाहींत, तोंपर्यंतच हा नद, ही नदी, ही पूर्ववाहिनी, ही पश्चिमवाहिनी वगैरे केवळ नाममात्र भेद असतो ६२. त्याप्रमाणें कोणत्याहि एका निमित्तानें कां होईना ! हेच चित्त माझ्या स्वरूपीं प्रविष्ट झाले म्हणजे पुरे. कारण ऐवढें झालें कीं, मग सहजच मद्रूप होणें [ अटळ, निश्चित ] आहे ६३. अरे ! परिसाला फोडण्याकरितां कां होईना पण जरी लोखंडाचा घण परिसावर पडो तरीहि घणाचा परिसाशीं संबंध येताच त्याचे लागलीच सोन होत असते ६४. हें पहा ! त्या गोपींची अंतःकरणें विषयाच्या प्रीतीच्या निमित्तानें माझ्या ठिकाणीं येऊन मिळाली असतां त्या गोपी मद्रूप झाल्या नाहींत काय ? ६५. किंवा भीतीच्या योगानें कंस मद्रूप झाला नाहीं काय ? किंवा माझ्याशीं अखंड वैर केल्याचे निमित्तानें शिशुपालादिक मत्स्वरूपास प्राप्त झाले नाहींत काय ? ६६. अरे ! तसेंच पांडव व यादव यांस सोयरिकीच्या नात्यानेंच व वसुदेवादिक सर्वांस ममत्वानें माझें सायुज्य-स्वरूप मिळालें नाहीं काय ? ६७. हे धनुर्धरा ! नारदास, ध्रुवास, अक्रूरास, शुकास आणि सनत्कुमार यांना जसा मी भक्तीनें प्राप्त करून घेण्यास योग्य झालों आहे ६८. तसाच गोपींना विषयबुद्धीनें, कंसाला भयाच्या भ्रांतीनें व शिशुपालादिकांना त्यांच्या त्या वैरबुद्धीनें मी प्राप्त झालों आहे ६९. अरे ! सर्व मार्गांचें मी एकच निर्वाणीचें प्राप्यस्थान आहे, त्यामुळें वाटेल त्या मार्गानें मत्स्वरूपास प्राप्त होतां येते. मग ते भक्तीनें, विषयबुद्धीनें, विरक्ततेने अथवा वैराने, कसेंहि असो [ त्यास मुळींहि हरकत नाहीं] ४७०. म्हणून पार्था ! हें पहा कीं, माझ्या स्वरूपांत येऊन मिळण्याकरितां येथें उपायांची कमतरता–उणीव अशी मुळींच नाहीं ७१. आणि वाटेल त्या जातींत जन्मास आले तरी चालेल आणि मग माझी भजन–भक्ति करो अथवा वैर करो; त्यास हरकत नाहीं परंतु भक्त किंवा वैरी जे व्हावयाचें असेल तें माझेंच व्हावें ७२. अरे, कोणत्याहि कां निमित्तानें होईना ! जर माझ्याशीं निकट संबंध आला, तर मद्रूप होणें हें अगदीं खास त्याच्या हातीं आले आहे ७३. यास्तव हें अर्जुना ! पापयोनींत जन्म घेतलेले किंवा वैश्य, शूद्र अथवा स्त्रिया यांनीं माझी भजन–भक्ति केली असतां तीं माझ्या स्वरूपाप्रत येऊन मिळतात ७४.

१ विकत मिळतात. २ शोभतें. ३ निष्फळ. ४ भक्तपणा. ५ कोणत्याहि. ६ पूर्वीचे. ७ व्यर्थ. ८ लहान ओढे. ९ विचार. १० घातली जात नाहीं. ११ शून्य. १२ मिळाले. १३ मिठाचे खडे. १४ ओहोळ, ओढे. १५ परिसाला फोडण्याकरितां. १६ स्पर्शमात्रानें. १७ प्रियाच्या. १८ निमित्तानें. १९ गोपस्त्रियांची. २० अंतःकरणें. २१ शिशुपालादिकांनीं. २२ भक्तीस्तव. २३ विषयबुद्धीनें. २४ निर्वाणीचें स्थान. २५ विरक्ततेनें. २६ उणीव.

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा । अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

मग वर्णांमाजीं छत्रचामर । स्वर्ग जयांचें अग्रहार । मंत्रविद्येसि माहेर । ब्राह्मण जे ॥ ७५ ॥ जे पृथ्वीतळींचें देव । जे तपोवतारं सावयवं । सकळ तीर्थांसि दैव । उदयलें जें ॥ ७६ ॥ जेथ अखंड वासिजे यागीं । जे वेदांची वेज्रांगी । जयांचेनि दिठीचिया उत्संगीं । मंगळ वाढे ॥ ७७ ॥ जयांचिये आस्थेचेनि वोलें । सत्कर्म पोल्हाळीं गेलें । संकल्पें सत्य जियालें । जियांचेनि ॥ ७८ ॥ जयांचेनि गा बोलें । अग्नीसि आयुष्य जाहालें । म्हणौनि समुद्रें पाणी आपुलें । दिधलें यांचिया प्रीती ॥ ७९ ॥ मियां लक्ष्मी डोंवलोनि केली परौती । फेडौनि कौस्तुभ घेतला हातीं । मग वोडविली वक्षःस्थळाची वोखती । चरणरजां ॥ ४८० ॥ आझुनि पाउलाची मुद्रा । मी हृदयीं वाहे गा सुभद्रा । जे आपुलिया दैवसमुद्रा । जतनेलागीं ॥ ८१ ॥ जयांचा कोप सुभटा । काळाग्निरुद्राचा वसौटा । जयांचे प्रसादीं फुकटा । जोडती सिद्धी ॥ ८२ ॥ ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझ्या ठायीं अतिनिपुण । आतां मातें पावती हे कवण । समर्थावें ? ॥ ८३ ॥ पाहें पां चंदनाचेनि अंगानिळें । शिवंतिले निंब होते जे जवळें । तिहीं निर्जिवींही देवांचीं निडळें । बैसणीं केलीं ॥ ८४ ॥ मग तो चंदनु तेथ न पवे । ऐसें मनीं कैसेनि धरावें । अथवा पातला हें समर्थावें । तेव्हां कायी साच ? ॥ ८५ ॥ जेथ निववील ऐशिया आशा । हरें चंद्रमा औधा ऐसा । वाहिजत असे शिरेंसा । निरंतर ॥ ८६ ॥ तेथ निववीता आणि सगळा । परिमळें चंद्राहूनि आगळा । तो चंदनु केवीं अंवलीळा । सर्वांगीं न बैसे ? ॥ ८७ ॥ कां रथ्योदकें जियेचिये कासे । लागलिया समुद्र जालीं अनायासें । तिये गंगेसि काय अनारिसें । गत्यंतर असे ? ॥ ८८ ॥ म्हणौनि राजर्षि कां ब्राह्मण । जयां गति मति मीचि शरण्य । तयां त्रिशुद्धी मीच निर्वाण । स्थितीही मीचि ॥ ८९ ॥ यालागीं शतजर्जर नावें । रिगोनि केवीं निश्चितें होआवें । कैसेनि उघाडिया असावें । शस्त्रवर्षी ॥ ४९० ॥ आंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केवीं वोडण । रोगें दाटलां आणि उदासपण । वोखदेंसी ? ॥ ९१ ॥ जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केवीं पांडवा । तेवीं

**अन्वयार्थ—पुन:**–मग–**पुण्या: ब्राह्मणा:**–पुण्ययोनींत जन्मलेले ब्राह्मण–**तथा**–त्याचप्रमाणें–**भक्ता: राजर्षय:**–भक्त राजर्षि–ज्ञानी क्षत्रिय श्रेष्ठ गतीला जातील हें–**किं**–काय सांगावें ! यास्तव–**इमम् अनित्यम् असुखं लोकं**–या अनित्य व सुखरहित मृत्युलोकास–**प्राप्य**–प्राप्त होऊन–**मां भजस्व**–मला भज ३३.

मग स्वर्गलोक म्हणजे ज्यांचें केवळ निर्वाहाकरितां दिलेला इनाम गांवच आहे आणि जे वेदांतील मंत्रविद्येचें माहेरघरच आहेत; जे सर्व वर्णांमध्यें छत्रचामराप्रमाणें श्रेष्ठ आहेत असें जे ब्राह्मण ७५. जे या पृथ्वीवरील देवच आहेत; जे तपश्चर्येचे मूर्तिमंत अवतार आहेत; जे सर्व तीर्थांचें उदय पावलेलें मूर्त दैवच आहेत ७६. ज्यांच्या ठिकाणीं यज्ञांचें अखंड वास्तव्य असते, जे वेदांची बळकट वज्रकवचें आहेत व ज्यांच्या कृपादृष्टीच्या मांडीवर सर्व कल्याणाची-मंगलाची वाढ होत राहते ७७. ज्यांच्या श्रद्धापूर्ण इच्छारूपी ओलाव्यानें सत्कर्मरूपी वेल विस्तार पावला आहे व ज्यांच्या निश्चयात्मक संकल्पावर सत्य जिवंत राहिले आहे ७८. ज्यांच्या आशीर्वादानें अग्नीचें आयुष्य वाढलें म्हणून त्यांच्या प्रीतीस्तव अग्नीला समुद्रानें आपले पाणी दिले ७९. मी लक्ष्मीला बाजूला सारून पलीकडे केली व कौस्तुभमणिहि गळ्यांतून काढून हातांत घेतला, आणि मग भृगुच्या पायधुळीच्या प्राप्तीकरितां मी आपल्या छातीचा खळगा पुढें केला ४८०. अरे ! अर्जुना ! ज्या भृगुच्या पावलांची खूण म्ह. श्रीवत्सलांछन मी अजूनपर्यंत हृदयावर वागवीत आहे. ती कां वागवितो असें म्हणशील तर त्याचे कारण म्हणजे आपल्या षड्गुणैश्वर्यरूपी शांत-भाग्य-समुद्राचें रक्षण करण्याकरितां हे होय ८१. हे महावीरा, ज्यांचा कोप म्हणजे काळ, अग्नि व रुद्र यांचें वसतिस्थान आहे. इतकें ते भयंकर आहेत व तेच प्रसन्न झाले असतां फुकट–अनायासानें अष्टमहासिद्धि प्राप्त होतात ८२. असें पुण्यवंत व पूज्य जे ब्राह्मण आणि त्यांतून जे माझ्या ठिकाणीं पूर्ण भक्ति तत्पर आहेत ते मद्रूप होतात. हे काय निराळें समर्थन करून सिद्ध करायला पाहिजे ? ८३ हें पहा ! चंदनाच्या अंगवायूनें स्पर्श केलेल्या जवळच्या निर्जीव म्ह. कमी किंमतीच्या लिंबांनीहि चंदनाचा वास लागल्यामुळें जर देवाच्या मस्तकावर राहण्यास स्थान मिळविलें ८४. तर मग प्रत्यक्ष चंदनाचें वास्तव्य तेथें घडणार नाहीं, असें मनांत तरी कसें आणावें ? अथवा त्या ठिकाणीं त्याचें वास्तव्य घडलें असें सिद्ध केले तरच तें खरें ठरणार, नाहींतर तें खोटें, असें आहे कीं काय ? ८५. शंकरांनी विष प्राशन केल्यानें त्यापासून दाह होत होता तो शमन होईल, या आशेनें अर्धा असा चंद्र मस्तकावर निरंतर धारण केला आहे ८६. दाहाचें शमन करणारा, व पूर्ण आणि चंद्राहून सुवासानें अधिक असा जो चंदन, तो सर्वांगावर सहजच कां धारण केला जाणार नाहीं ? ८७. किंवा रस्त्यावरील उदकेंहि जिचा आश्रय केल्यामुळें समुद्रांत जाऊन सहजच मिळतात त्या गंगेला समुद्राशिवाय दुसरी कांहीं गती आहे काय ? ८८. म्हणून राजर्षि असोत किंवा ब्राह्मण असोत, ज्यांच्या क्रियेला व बुद्धीला [30]च रक्षण करणारा व आश्रयस्थान आहे त्यांना निश्चयानें परमगति मीच आहे आणि स्थिति म्ह. असणेंहि मीच आहे ८९. यास्तव शतावधि छिद्रांच्या नावेंत बसून आपण बुडणार नाहीं, अशा भरंवशानें निष्काळजी स्वस्थ कसें राहावें ? तसेंच शस्त्रांचा वर्षाव चालला असतां आपल्यास दुखापत होणार नाहीं, अशा भरंवशानें उघड्या अंगानें कसें असावें ? ४९०. अंगावर दगड पडत असतां ढाल पुढें कां करूं नये ? रोगानें ग्रस्त झालें असतां औषध घेण्याविषयीं उदासीन कसें रहावें ? ९१.

१ श्रेष्ठ राजे. २ इनामगांव. ३ तपाचे अवतार. ४ मूर्तिमान्. ५ यज्ञांनीं. ६ वज्र, कवच. ७ कृपादृष्टीच्या मांडीवर. ८ इच्छा. ९ ओलाव्यानें. १० विस्तारले. ११ ब्राह्मणाच्या प्राप्तीस्तव. १२ दूर सारून. १३ काढून. १४ पुढें केली. १५ उराचीं. १६ खळगी. १७ ठसा, खूण. १८ वसतिस्थान. १९ प्रतिपादावें. २० अंगवायूच्या योगानें. २१ स्पर्शलें. २२ कमी किंमतीच्या. २३ मस्तकें, कपाळें. २४ बसविण्याची स्थानें. २५ अर्धा. २६ मस्तकावर. २७ सहज २८ रस्त्यावरील पाणी. २९ निराळें, भिन्न. ३० रक्षण करणारा. ३१ सर्वेथैव, खरोखर. ३२ शेवट, मुक्ति. ३३ भुक्ति. ३४ शतावधि भोकांच्या फुटक्या नावेंत. ३५ निष्काळजी. ३६ शस्त्रवृष्टींत. ३७ पुढें न करावें. ३८ ढाल.

लोकां येऊनि सोपद्रवां । केवीं न भजिजे मातें ॥ ९२ ॥ अगा मातें न भजावया-लागीं । कवण बळ पां आपुलिया आंगीं । काई घरीं कीं[२] भोगी । निश्चिंती केली ? ॥ ९३ ॥ नातरी विद्या कीं वयसा । ययां प्राणियांसि हा ऐसा । मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ? ॥ ९४ ॥ तरी भोग्यजातें जेतुलें । तें एका देहाचिया निकियो लागलें । आणि एथ देह तंव असे पडिलें । काळा-चिये तोंडीं ॥ ९५ ॥ बाप दुःखाचें केणें सुटलें । जेथ मरणाचे भरे लोटले । तिये मृत्युलोकींचिये शेवंटिलें । येणें जाहालें हांटवेळे ॥ ९६ ॥ आतां सुखेंसि जीविता । कैंचीं ग्रौहिकी कीजेल पंडुसुता । काय राखोंडी फुंकितां । दीपु लागे ? ॥ ९७ ॥ अगा विषाचे कांदे वाटुनी । जो रसु घेईजे पिळुनी । तया नाम अमृत ठेवुनी । जैसें अमर होणें ॥ ९८ ॥ तेवीं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ९९ ॥ कां शीस खांडूनि आपुलें । पायींच्या खैतीं बांधिलें । तैसे मृत्युलोकींचें भलें । आहे आघवें ॥ ५०० ॥ म्हणौनि मृत्युलोकीं सुखाची कैहाणी । ऐकिजेल कवणा-चिये श्रेवणीं । कैंची सुखनिद्रा अंथरुणीं । इंगळांच्या ! ॥ १ ॥ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं । दुःख लेऊनि सुखाची आंगी । सळिते जगातें ॥ २ ॥ जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पोहेरी । मृत्यु उदराचिया परिवरीं । गर्भु गिंवसी ॥ ३ ॥ जे नाहीं तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वीं । गेलियाची कवणें गांवीं । शुद्धी न लगे ॥ ४ ॥ अगा गिंवसितां आघविया वाटी । परतलें पाऊलचि नाहीं किरीटी । सैंघ निमालियांचिया गोठी । तियें पुराणें जेथिंचीं ॥ ५ ॥ जेथिंचिये अनि-त्यतेची थोरी । करितैंया ब्रह्मयाचे आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं । निपैटूनियां ॥ ६ ॥ ऐसी लोकींची जिये नांदणूक । तेथ जन्मले आथि जे लोक । तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ॥ ७॥ पैं दृष्टादृष्टाचिये जोडी- । लागीं भांडवल न सुटे कवडी । जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी । वेंचिती गा ॥ ८ ॥ जो बहुवें विषयविलासें गुंफे । तो म्हणती उंवाई पडिला सोंपे । जों अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ॥ ९ ॥ जयाचें आयुष्य थोंकुटें होय । बळ

अरे ! चोहोंकडून वणवा लागल्यावर तेथून बाहेर कसें पडूं नये ? त्याप्रमाणें, अनेक दुःखांनीं भरलेल्या मृत्युलोकांस प्राप्त होऊन मला कां भजूं नये बरे ? ९२. अरे ! माझें भजन न करण्याला आपले कल्याण करून घेण्याचें असें सामर्थ्य जीवाच्या अंगीं काय आहे ! कोणास ठाऊक ! त्यांच्या घरीं अशी कोणती भोग्य वस्तूची समृद्धि आहे कीं, ज्याच्या जोरावर हे निष्काळजी झालें आहेत ? ९३. अथवा विद्या किंवा तारुण्य यांपैकी कोणाच्या जोरावर हे बेपर्वा होऊन बसले आहेत ? मला न भजतां, बेपर्वाईनें बसण्यासारखी व निश्चित सुखप्राप्ति होईल, असा या प्राण्यांना कोणाचा भरवसा आहे कोणास ठाऊक ? ९४. तर बाबारे ! जितक्या म्हणून भोग्य वस्तु आहेत, तितक्या सर्व एका देहाच्याच सुखाकरितां उपयोगांत आल्या आहेत आणि तो देह पहावा तर ह्या मृत्युलोकीं काळाच्या तोंडांत पडलेला आहे ! ९५. अरे ! बापरे ! ! या मृत्युलोकांतील बाजारांत जेथें दुःखरूपी माल आलेला असून तो मरणरूपी मापानें मोजला जात आहे. अशा बाजाराच्या नरदेहरूपी अगदीं शेवटच्या वेळीं येणें झाले आहे ९६. तर हे पंडुसुता ! अशा दुःखरूपी बाजारांत जीवाला सुख होईल, सुखानें जगतां येईल अशी वस्तु येथे कशी खरेदी करतां येईल ? हें पहा, विस्तव विझवून गेल्यावर राहिलेली राखुंडी फुंकीत बसलें तर त्यापासून कधीं दिवा लागेल काय ? ९७. अरे ! विषाचे कांदे वाटून ते पिळून त्याचा रस निघेल त्याला ' अमृत ' असें नांव ठेवून व ते पिऊन त्यापासून ज्याप्रमाणें अमर होण्याची इच्छा करावी ९८. त्याप्रमाणें या विषयापासून होणारें जें सुख, तें केवळ महत दुःखच आहे. परंतु काय करावें ! ! जें अज्ञानी मूर्ख लोक आहेत त्यांना त्या विषयाचें सेवन केल्याशिवाय राहवतच नाहीं ९९. त्यांचें करणें कसें आहे पहा ! पायास झालेल्या जखमेवर आपलें मस्तक तोडून बांधावें हे जितकें चांगलें तितक्याच या मृत्युलोकांतील सगळ्या गोष्टी चांगल्या आहेत ५००. म्हणून या मृत्युलोकीं सुखाची नुसती गोष्टहि कोणास आपल्या कानानें ऐकतां येईल काय ? विस्तवाचें निखारें असणाऱ्या अंथरूणावर निजलें असतां आनंदानें गाढ झोप कोठून लागणार ? १. अरे ! ज्या मृत्युलोकींचा चंद्र क्षयरोगग्रस्त आहे, जेथे [ सूर्यादिकांचा ] उदयच मुळीं अस्ताकरितां होतो व जेथें दुःख हें सुखाचा अंगरखा–पोषाख घालून जगाला सदा छळीत आहे २. जेथें कल्याणकारक गोष्टींचा अंकुर फुटतो न फुटतो तोंच त्यावर अकल्याणाची कीड वा आच्छादन पडतें व मृत्यु हा पोटाच्या घरांत असतांनाच गर्भाला देखील शोधीत येतो ३. जे प्राप्त चिंतनार्ह नाहीं तिचें चिंतन करावयास लावते, त्याचे चिंतन न करितो तोंच त्याला यमदूत घेऊन जातात. बरे ते कोणत्या गांवीं घेऊन जातात याचा पत्ताहि लागत नाहीं ४. अरे ! सर्व वाटा शोधल्या असतांहि मृत्युमुखीं गेलेल्यांचें एकहि पाऊल माघारीं फिरलेले दिसत नाहीं व ज्या ठिकाणची मृत्यु पावलेल्या असंख्य लोकांच्याच सर्व गोष्टी हीच पुराणें आहेत ५. तेथील अशाश्वततेची महती सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या आयुष्यापर्यंत जरी सांगत बसले तरी सविस्तर वर्णन होणे शक्य नाहीं ! ६. अशी ज्या मृत्युलोकाची स्थिति, तेथें जन्म घेणाऱ्या लोकांच्या स्वस्थपणाकडे पाहून मोठें नवल वाटतें ७. त्याचा स्वभाव किती विलक्षण आहे; पहा. अरे ! या किंवा परलोकीं होणाऱ्या लाभाच्या प्राप्तीकरितां ज्याचे हातून एका कवडीचेहि भांडवल सुटत नाहीं; तेच जेथे सर्वस्वाची हानि होते अशा ठिकाणीं कोट्यावधि रुपये खर्च करितात ! ८. जो पुष्कळ विषयविलासांत गुंततो त्यालाच प्रस्तुतकालीं विषय सुखांत आहे असें म्हणतात व जो लोभग्रस्त झाला आहे. त्यालाच ' ज्ञानी ' असें म्हणतात ९. ज्यांचें आयुष्य थोडे

१ दुःखरूप मृत्युलोकीं. २ भोग्यवस्तूची. ३ समृद्धि ४ तारुण्य. ५ सर्व उपभोग्य वस्तू. ६ सुखाकरितां. ७ माल, मालाच्या गठ्याची दोरी. ८ पायल्या–फरा. ९ मनुष्यरूपानें शेवटचें जन्म. १० बाजाराच्या समयीं. ११ सवदा, खरेदी. १२ क्षतावर. १३ गोष्ट. १४ कानांनीं १५ आंगरखा. १६ छळितें. १७ कल्याणाचा. १८ आच्छादन. १९ परवर म्हणजे घरांतील जमीन. २० यमदूतांना. २१ वार्ता, शोक. २२ शोधितां. २३ सर्व, बहुत. २४ मेलेल्या लोकांच्या. २५ सृष्टि उत्पन्न करणारा. २६ आयुष्यापर्यंत [ ब्रह्मासुद्धां अनित्य आहे ] २७ सर्वथैव. २८ ऐहिक व पारलौकिक सुखाकरितां. २९ कोट्यावधि द्रव्य. ३० अडके, गुंतें. ३१ सुखामध्यें. ३२ प्रस्तुत, सांप्रत. ३३ लोभानें. ३४ उणें, कमी.

प्रज्ञा जिरौनि जाय । तयाचे नमस्कारिती पाय । वडील म्हणुनी ॥ ५१० ॥ जंव जंव बाळ बळिया वाढे । तंव तंव भोजें नाचती कोडें । आयुष्य निमालें आंतुलियेकडे । ते ग्लानीचि नाहीं ॥११॥ जन्मलिया दिवसदिवसें । हों लागे काळाचेंचि ऐसें । कीं वाढती करिती उल्हासें । उभविती गुढिया ॥ १२ ॥ अगा मर हा बोलु न साहती । आणि मेलिया तरी रडती । परि असतें जात न गणिती । गर्हिंसंपणें ॥ १३ ॥ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया वेंटाळी जिभा । तैसें प्राणिये कवणा लोभा । वाढविती तृष्णा ॥ १४ ॥ अहा कैंटकटा हें वोखटें । इये मृत्युलोकींचें उफराटें । एथ अर्जुना जरी अवचटें । जन्मलासी तूं ॥ १५ ॥ तरि झडझडोनि वेंहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ १६ ॥

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥
इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ॥ १७ ॥ माझेनि अनुसंधानें देख । संकल्पु जाळणें निःशेख । मद्याजी चोखं । याचि नांव ॥ १८ ॥ ऐसा मियां आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी । हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलिजत असें ॥ १९ ॥ अगा अवघिया चोरिया आपुलें । जें सर्वस्व आम्हीं असें ठेविलें । तें पावोनि सुख संचलें । होऊनि ठाेंसी ॥ ५२० ॥ ऐसें सांवळेनि परब्रह्में । भक्तकाम-कल्पद्रुमें । बोलिलें आत्मारामें । संजयो म्हणे ॥ २१ ॥ अहो ऐकिजत असें कीं अवधारा । तंव इया बोला निवांत म्हातारा । जैसा म्हैसा नुठी कां पुरा । तैसा उगाचि असे ॥ २२ ॥ तेथ संजयें माथा तुकिला । अहा अमृताचा पाऊस वर्षला । कीं हा एथ असतुचि गेला । सेजिया गांवा ॥ २३ ॥ तऱ्ही दातारु हा आमुचा । म्हणौनि हें बोलतां मैळेल वाचा । काय कीजे ययाचा । स्वभावोचि ऐसा ॥ २४ ॥ परि बाप भाग्य माझें । जे वृत्तांतु सांगावयाचेनि व्याजें । कैसा रक्षिलों मुनिराजें । श्रीव्यासदेवें ॥ २५ ॥ येतुलें हें वाड सायासें । जंव बोलत असे दृढमानसें । तंव न धरवेचि आपुलिया

उर्वरित राहिलें आहे व ज्याची शक्ति व बुद्धि पार नाहींशी झाली आहे, त्या म्हाताऱ्यास 'वडिल, श्रेष्ठ' म्हणून नमस्कार करितात ५१०. लहान मूल जो जो मोठे वाढत जाते तो तो संतोष मानून कौतुकानें नाचतात-परंतु वरून वाढतांना दिसलें तरी आंतून त्याचे आयुष्य, उलट सरून जात आहे त्याची त्यांना खंतीच वाटत नाहीं ११. जन्मापासून दिवसेंदिवस तें काळाच्याच स्वाधीन होत असते; असें असूनहि आनंदानें त्याचा वाढदिवस करतात व उल्हास दर्शक गुढ्याहि उभारतात १२. अरे, ! 'मर' असें म्हटलें तर हा शब्द देखील सहन होत नाहीं आणि मेल्यावर मात्र रडत बसतात ! परंतु असलेलें आयुष्य व्यर्थ संपत चाललें आहे याची मूर्खपणानें मुळींहि जाणीव नसते १३. असें पहा कीं, बेडूक सापाकडून उभा गिळीला जात आहे; तरीपण मरणाची कल्पना मनांत न आणितां, तो बेडूक पुन्हा जिभेनें उडत असलेल्या माशा धरून गिळीत असतो त्याप्रमाणें हे प्राणी कोणत्या लाभाकरितां आपली तृष्णा वाढवीत असतात कोण जाणें ! १४. अरे ! अरे ! किती हे वाईट आहे वा सर्वच न्याय, या मृत्यु लोकाचा व्यवहार–वर वर्णन केल्याप्रमाणें अगदीं उफराटा आहे. अर्जुना ! अशा मृत्युलोकांत तूं अकल्पित, यदृच्छेनें, दैववशात जन्मास आला आहेस, १५. तर मी तुला बजावून सांगतों कीं, तूं झटकन् अंग झाडून–या रहाटींतून–मोकळा हो ! आणि या भक्तिमार्गास लाग, की ज्या योगानें माझ्या अविनाशी निर्दोष स्वरूपस्थितीला प्राप्त होशील १६.

**अन्वयार्थ—मन्मनाः भव**–माझ्या ठिकाणींच ज्याचें मन आहे, असा, तूं हो-**मद्भक्तः**–[ **भव** ]–माझाच भक्त हो–**मद्याजी** [ **भव** ]-माझीच पूजा करण्याचें ज्याचें शील आहे असा हो–**मां नमस्कुरु**–मला नमस्कार कर–**एवं**–याप्रमाणें भगवानांचें ठिकाणीं चित्ताला–**युक्त्वा**-समाहित शांत–स्थिर करून–**मत्परायणः**–मत्परायण झालेला तूं–**आत्मनं माम् एव**–सर्वांचा आत्मा असा जो मी–ईश्वर त्याला–**एष्यसि**–प्राप्त होशील ३४.

आतां भगवान् ब्रह्मरूप होण्यास अधिकार भेदानें साधनें सांगतात–त्यांत प्रथम आपलें मन तूं मद्रूप कर, नाहींतर माझ्या प्रेमानें भजन करणारा भक्त हो, तसें होत नसेल [ तर माझ्या उद्देशानें यजन कर म्हणजे कर्म करते होत नसेल तर ] सर्व मीच आहे, असें समजून मला एकाला नमस्कार तरी कर १७. हें पहा, जो माझ्या अनुसंधानानें मनांतील सर्व संकल्प पूर्णपणें जाळून नाहींतसे करतो तोच माझें चांगलें यजन करणारा असें नांव पावतो १८. असा माझ्या योगानें संपन्न होशील त्याच वेळेस माझ्या स्वरूपाला पावशील. ही माझ्या अंतःकरणांतील अत्यंत गुह्य गोष्ट तुझ्याजवळ मी सांगत आहे १९. अरे ! सर्वांना चोरून ठेविलेली अशी आमची सर्वस्व गुप्त अशी गोष्ट म्हणजे अध्यात्मविद्या ती प्राप्त करून घेतलीस तर सुखरूपच होऊन राहशील ५२०. संजय धृतराष्ट्रास सांगतोः—"शामवर्ण परब्रह्म व भक्तांची इच्छा पूर्ण करणारा कल्पवृक्ष जो श्रीकृष्ण तो याप्रमाणें बोलला" २१. संजय धृतराष्ट्रास म्हणाला अहो नीट ऐकत आहां ना ? पण हे ऐकून ज्याप्रमाणें रेडा महापूर आला तरी त्यास न जुमानतां पाण्यांतच बसतो–उठत नाहीं त्याप्रमाणें हा कृष्णार्जुन संवाद ऐकूनहि हा म्हातारा धृतराष्ट्र–स्वस्थच [ वृत्तिवर परिणाम न होता ] बसला होता २२. त्या वेळीं संजय मान डोलवून आपल्याशीच म्हणाला–अहाहा ! ! काय भगवद्मुखांतून अमृताचा वर्षाव झाला हा ! परंतु हा दुर्दैवी धृतराष्ट्र येथेंच असूनहि शेजारच्या गांवास गेल्यासारखा आहे २३. तरीपण हा आमचा धनी असल्यामुळें अशा रीतीनें त्याला स्पष्ट बोललो असतां आमची वाणी दूषित होईल म्ह. मला दोष लागेल, पण यांचा स्वभावच असा असल्यामुळें येथें कोणी काय करावें ! असो २४. परंतु मुनिश्रेष्ठ व्यासदेवांनीं श्रीकृष्णार्जुनांचा संवाद धृतराष्ट्रास सांगण्याचें निमित्तानें माझें रक्षण केलें; माझा उद्धार केला, माझें मात्र भाग्य धन्य होय ! २५.

१ बुद्धि. २ सोंगें नाचे. ३ आवडीनें ४. कमी झालें. ५ आंतून. ६ दुःखःच. ७ काळाच्या स्वाधीन. ८ वाढदिवस. ९ सोशीत नाहींत. १० मूर्खपणानें. ११ हायहाय. १२ दैववशात्. १३ वेगळा. १४ ज्याभक्तीनें. १५ लक्ष्य लावल्यानें. १६ माझें यजन करणारा. १७ निर्मळ. १८ माझ्या योगानें संपन्न. १९ चोरून ठेवलेलें. २० रहाशील. २१ श्यामवर्ण.

ऐसें । सात्त्विकें केलें ॥ २६ ॥ चित्त चाकाटलें आटु घेत । वाचा पांगुळली जेथिंची तेथ । आपाद कंचुकित । रोमांच आले ॥ २७ ॥ अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें । आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे ॥ २८ ॥ पैं आघवाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी । लेइला मोतियांची कडियाळीं । आवडे तैसा ॥ २९ ॥ ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे । तेथ निरोपिलें व्यासें । तें नेदीचं हों ॥ ५३० ॥ आणिक श्रीकृष्णाचें बोलणें । घोकंरी आलें श्रवणें । कीं देहस्मृतीचा तेणें । वापसां केला ॥ ३१ ॥ तेव्हां नेत्रींचें जळ विसर्जी । सर्वांगींचा स्वेदु परिमांर्जी । तेवींचि अवधारा म्हणे हो जी । धृतराष्ट्रातें ॥ ३२ ॥ आतां श्रीकृष्णवाँक्यबीजा निवाड । आणि संजय सात्त्विकाचा बिवडुं । म्हणौनि श्रोतयां होईल सुरवाड । प्रमेय पिकाचा ॥ ३३ ॥ अहो अंळुमाळ अवधान देयावें । येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें । बाप श्रवणेंद्रिया दैवें । घातली माळ ॥ ३४ ॥ म्हणौनि विभूतींचा ठावो । अर्जुना दावील सिद्धांचा रावो । तो ऐका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ५३५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ श्लोक ३४, ओंव्या ५३५.

*

श्रीज्ञानेश्वरमहाराज संजयाची स्थिति सांगतात. संजय इतका मनाचा निश्चय करून मोठ्या सायासांनी बोलत असतां अष्टसात्त्विक भाव उत्पन्न होऊन त्यास त्यांनी असें आपल्या आधीन करून घेतले कीं तो त्यास आवरेना २६. ते अष्टसात्त्विक भाव असें त्या श्रीकृष्णार्जुन संवादामध्यें चित्त चकित झाले व स्थिर होऊन आटावयास लागले. वाणी जागच्या जागीं स्तब्ध राहिली आणि अंगांत अंगरखा घातल्यासारखें नखशिखांत रोमांच उभे राहिले २७. डोळे अर्धवट उघडलेले राहून, त्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले व अंतर्यामीं होणाऱ्या सुखाचा लाटांच्या वेगामुळें बाहेरून त्याचे अंगास कंप सुटला २८. सर्व रोमरंध्रांतून निर्मळ. घामाचे बारीक कण उद्भवल्यामुळें मोत्यांची जाळीच घातली आहे कीं काय असा तो भासूं लागला २९. असें या महासुखाच्या प्रेमानें जीवदशेची आटणी होऊं पाहते तोंच व्यासांनीं युद्धवृत्तांत सांगण्याची केलेली आज्ञा ती आटणी होऊं देईना ५३०. इतक्यांत श्रीकृष्णार्जुनाच्या संवादाचे बोलणें घो घो करीत येऊन संजयाच्या कानीं पडतांच त्या बोलण्यानें संजयाच्या देहस्मृतीचा वाफसा केला. [ तो देह भानावर येऊन आपल्याकडे सोंपविलेलें काम करण्यास तयार झाला. ] ३१. मग लागलींच डोळ्यांतील आनंदाश्रु त्यानें पुसले व सर्वांगास आलेला घाम पुसून धृतराष्ट्राला म्हणाला, ‘ महाराज, ऐका ! ’ लक्ष द्या ३२. आतां श्रीकृष्णवाक्यरूपी हींच कोणी उत्तम बीजें व त्यास संजयाच्या अष्टसात्त्विकतेची बिवडाचीं जमीन मिळाली [ पहिलें पीक काढल्यानंतर दुसऱ्या पिकास तयार होणाऱ्या जमिनीस बिवड म्हणतात ] म्हणजे पूर्वार्धाच्या ज्ञानाचें पीक संजयाच्या अंतःकरणांत आलेंच आहे. आतां उत्तरार्धांतील ज्ञानाचें पीक होण्यास संजयाच्या अंतःकरणाची तयारी आहे व त्यामुळें श्रोत्यांनाहि सिद्धांतरूप पिकाचा सुकाळ होईल ३३. अहो ! किंचितसे ‘ अवधान द्याल ’ तर एवढ्यानें आनंदरूप राशीवर बसाल; [ ‘ तरी अवधान एकले दीजे ’ या प्रथम ओवीचा उपसंहार ] कारण, श्रवणेंद्रियांस दैवानें माळ घातली आहे, धन्य आहे त्या श्रवणेन्द्रियाची ! ! ३४. म्हणून ईश्वर विभूतींचीं जीं स्थळें आहेत तो सर्व सिद्धांचा राजा जो भगवान् श्रीकृष्ण तो अर्जुनास दाखवील. श्रीनिवृत्तिनाथांचें शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतातः—तो कथा प्रसंग ऐका ५३५.

१ चकित झालें, गढून गेलें. २ संकोच, आटणी. ३ नखशिखांत आच्छादनासारखें. ४ अर्धे उघडलेलें. ५ घामाचे बारीक कण. ६ जाळी, माळ. ७ वाटला, दिसला. ८ सोंपविलें. ९ करीना. १० आवाज करीत. ११ वाफ आलेली भूमि. १२ पुसी, टाकी. १३ पुसी. १४ श्रीकृष्णवाक्य हेंच निवडक बीं. १५ खतावलेली जमीन. १६ सुकाळ. १७ सिद्धांतरूपी पिकाचा. १८ किंचित्. १९ ईश्वरमूर्तीचें स्थान.



# अध्याय संगति व नवव्या अध्यायाचें तात्पर्य

## तुज ज्ञान विज्ञान तैसे । वाटूनि देऊं ।। अ. ९–४४

मागील अध्यायाच्या 'वेदेषु यज्ञेषु' या शेवटच्या श्लोकांत 'सर्वमिदं विदित्वा योगी परंस्थानमुपैति चाद्यम्' असें सांगितलें आहे. त्याचा अर्थ म्हणजे वेदाध्ययन, यज्ञ, तप, दानादिकांपासून उत्पन्न होणाऱ्या पुण्याला मागे टाकून योगी–ज्ञानी त्यास आत्मत्वानें जाणून 'ब्रह्मविदाप्नोति परम्', 'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति' या श्रुतींत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मरूपतेस प्राप्त होतात म्हणजे सत्–चिद्–घन् निरतिशयानंद ब्रह्मच होतात, हा होय. निरतिशयानंद प्राप्ति आणि सकल संसार दुःख निवृत्ति हें मोक्षाचें स्वरूप होय. त्यांपैकीं अत्यन्त गुह्यतम तत्त्वज्ञानानें निरतिशयानंद प्राप्त होतो, असें देवांनीं सांगितलें आहे. आतां त्याच तत्त्वज्ञानानें संसार दुःखाची आत्यंतिक निवृत्तिहि होते, हें सांगण्यांस आरंभ करून, त्यास निश्चित साधनरूप जी 'सगुण–भक्ति' तिचें विस्तारें करून वर्णन केलें आहे; किंबहुना ! ! अठराव्या अध्यायास जसें 'एकाध्यायी गीता' असें श्रीज्ञानेशांनीं म्हटलें आहे त्याप्रमाणेंच "जो अभिप्रावो सातिशतीं ! तो एकलाचि नवमीं" या शब्दांत श्रीज्ञानेशांनीं नवव्या अध्यायासहि 'एकाध्यायी गीता' असेंच म्हटलें आहे. बरे ! ते सर्वतोपरी बरोबरहि आहे. कारण, गीतेंतील सर्व मुख्य सिद्धान्त या अध्यायांत आलेच आहेत. ते असें–जीव तत्त्वतः सुखरूप असूनहि अज्ञान व देह तादात्म्यामुळें जीवदशेस आला; विषयासक्तीनेंच ब्रह्मात्मैक्य साक्षात्काराकडे दुर्लक्ष करून केवळ विषयसुखच परमावधी समजून क्षुद्रक देवदेवतांची, ऐहिकपारत्रिक सुख प्राप्त्यर्थ भक्ति करतो. त्याचें फळहि अन्तवन्त मिळते. याकरितां विषयांतील वारंवार दोष दर्शनानें, विवेक वैराग्ययुक्त भक्तीनें, त्या कर्मबंधांतून सुटावें असा उपदेश; व सगुण स्वरूपापेक्षां निर्गुणस्वरूप तात्त्विक आहे. चराचराचें अभिन्ननिमित्तोपादन कारण मी–परमात्माच आहे, त्या स्वरूपप्राप्तीसाठीं अनन्यभक्ति, हेंच सर्व सुलभ साधन होय. त्या अनन्य हरिभक्ताचा पुरुषार्थप्राप्ति व त्याचें शाश्वतजतनरूप योगक्षेम देवच चालवितो, तो त्यास पापमुक्त करतो. आधींचा पापीहि अनुतापपूर्वक अनन्यभक्ति करील तर तोहि सायुज्य मोक्षास–ब्रह्मस्थितीस पोंचूं शकेल; नित्यस्वरूपभूत ब्रह्मात्मैक्यानंदापुढें भोग्यरूप ऐहिक–पारत्रिक सुखें तुच्छ आहेत, जगत् कारणत्व देवविषयक अज्ञानकालांत आहे, ज्ञानकालांत नाहीं, अजातवादानें माझें स्वरूपीं भूतें नाहींतच, व अज्ञानानें भासलीच तर विवर्त आहेत, हे अद्वैतवादांतील प्रमेय उर्फ 'खुणा' सांगितल्या. सर्वत्र ब्रह्मभावरूप अन्तिम साध्याचे निश्चितसाधन अव्यभिचारी भक्ति होय. याप्रकारें अद्वैत वेदान्तांत जे सिद्धान्त, उपसिद्धान्त अथवा जीं प्रयोजनें सांगितली आहेत, ती या नवव्या अध्यायांत सांगितली आहेत. असा हा नववा अध्याय गीतेच्या पूर्वखंडातील शेवटचा, महत्त्वाचा व भक्तिरसपूर्ण, भक्तिप्रधान अध्याय असून श्रीज्ञानेश्वरमहाराजहि त्याचेवर 'भाष्य' लिहिण्यापूर्वीं श्रीगुरु निवृत्तिनाथांना केलेल्या मंगलाचरणांत लडीवाळपणानें विनवितात—

अहो ! आपण "अवधान एकले दीजे" म्हणजे सर्व सुखास पात्र व्हाल, पण महाराज ! 'लक्ष द्यावें' हे माझे आढ्यतेचें बोलणें नसून माझी लडिवाळपणाची विनंती आहे. शिवाय लहान मूल बापाच्या ताटांत जेवावयास बसते व त्याच्या पानांतील पदार्थ घेऊन बापासच जेवूं घालावयास लागते; पण त्यामुळें बाप न रागावतां उलट आनंदाच्या भरांत आपण होऊन आपलें तोंड, बालकाचा घांस घेण्यासाठीं त्याच्या पुढें करतो. त्याप्रमाणें मी आपल्याशी सलगी करून बालबुद्धीनें गीतेचें व्याख्यान करण्याचा प्रयत्न करीत आहे व मजविषयीं तुमच्या अंतःकरणांत आपलेपणाचे प्रेम असल्याकारणें माझ्या या प्रयत्नांचें कौतुक वाटून ते माझें कार्य आपण सिद्धीस नेत आहांत, 'ज्ञानोबा आपला आहे' अशा प्रेमामुळें मी सलगीनें जे कांहीं बोलेन त्याचा आपणास राग येणार नाहीं; उलट आपला संतोष अधिकच वाढेल. किंबहुना ! ! आपलें निजलेलें कृपाळुपण माझ्या बोलण्यानें जागृत झालें, असें जाणूनच मी हें कार्य अंगीकारिलें आहे. यद्यपि हें कार्य सामान्य नव्हे ! कारण जेथें वेदाचीहि मति कुंठित होते तो गीतार्थ मराठी भाषेंत सांगण्याजोगी कां माझी योग्यता आहे ? पण जर मजवर आपण कृपा केली तर माझ्या बुद्धींत अर्थपूर्ण असें अनेक अभिप्राय–कल्पना स्फुरूं लागतील. अर्थात् मी जरी गीतेवर भाष्य करीत असलों तरी मला बोलावयास लावणारे सामर्थ्य खरोखरी आपल्याच ठिकाणचें आहे. किंबहुना ! ! अधिकारी स्थिर चित्ताच्या श्रोत्याविना वक्ता हा वक्ताच नव्हे ! श्रीनिवृत्तिनाथ म्हणाले, 'अरे ! तुझी विनंती आम्हांस पावली. आतां श्रीकृष्णार्जुन संवाद सांग' यावर श्रीज्ञानेश्वरमहाराज संतोष पावून म्हणाले 'जी महाराज ! श्रीकृष्ण देवाच्या बोलण्याचा अनुवाद करतो; ऐका.' [१ ते ३३].

सातव्या अध्यायात सांगितलेला 'ज्ञान–विज्ञान' हा विषय मी तुला पुनः सांगतों. ही माझ्या जीवींची गुह्य गोष्ट आहे; पण तूं सुमन, शुद्धबुद्धीचा, अनिंदक, एकनिष्ठ आणि आस्थेची–तीव्र जिज्ञासेची मूर्ति असल्याकारणें, तें गूढ ज्ञान श्रवण करण्यास 'अधिकारी' आहेस. तुझ्यासारखा निष्ठावन्त व आज्ञेनुसार अनुष्ठान करणारा श्रोता आज लाभल्यामुळें मला किती संतोष झाला आहे ! मला वाटते कीं, आमच्या अंतःकरणांतील गुह्यतम ज्ञान तुझ्या मनांत उतरो ! ! कारण, हें साक्षात्कारात्मक ज्ञान प्राप्त झालें असतां असार संसार व सार परमात्मा यांतील भेद–वेगळीक करून म्हणजेच 'विवेक' होऊन त्यास मोक्षैश्वर्याचा लाभ होतो.

हें ज्ञान सर्वज्ञानांत श्रेष्ठ आहे. कारण, तें निश्चित मोक्षदायी आहे. अत्यन्त गुह्यतम, उत्तम, पवित्र, सत् धर्माचें निजधाम म्हणजे हेंच ज्ञान होय. तें ज्ञान श्रीगुरु मुखानें 'तत्त्वमस्या'दि महावाक्यद्वारां 'उदैजत' म्ह० उदय पावतांना दिसतें, पण तें प्रत्येकाच्या हृदयांत मूळचें स्वयंसिद्धच असतें. श्रीगुरुकृपेनें त्याचा उदय झाला असतां 'भोक्ता–भोग्य भोग' या त्रिपुटीचा लय होतो, असे हें ज्ञान सुलभ, सोपें आहें. आनंदमय आहे. या ज्ञानानें साधक 'आनंदरूपच' होतो हेंच परब्रह्म होय. हें ज्ञान एकदां प्राप्त झालें कीं, हातांतून जात नाहीं, कमी होत नाहीं व विटतहि नाहीं. हे तर्ककुशल अर्जुना ! यावर तूं ज्ञान हें रम्य व पवित्र, स्वसुख असून धर्म–अविरोधी, इतके असूनहि शारीरिक कष्टाविना सुलभ व अंतरींच लाभणारें आहे. अर्थात् एवढ्या सद्गुणांचा समन्वय असतांना हें ज्ञान लोकांच्या सेवनांतून कसे राहिलें ? अशी शंका घेशील, पण ती घेऊं नकोस [ ३४ ते ५६ ].

कारण, अंतरींच असलेल्या सुखाचा आश्रय सोडून अविद्या तत्कार्य देहतादात्म्य, विषयासक्तीमुळें बहिर्मुख हतभाग्याचें मन सुखबुद्धीनें पंच विषयांकडे धांवतें. सर्वांच्या हृदयांत सर्वसुखाचा जणुं उपवनच असा मी असतांना, विषयांतील सुखाभासास भाळून विषयांत सुख आहे, या भ्रांत समजुतीनें सुखार्थ–बाह्य विषयांकडेच अज्ञानी लोक धांवतात. सुख हें बाह्यविषयांपासून आंत येणारे किंवा उत्पन्न होणारे नसून कचित् बाह्य विषयप्राप्तीच्या निमित्तानें वृत्ति स्थिर होऊन सुख अंतरींच अभिव्यक्त होत असतें. त्यामुळें विषयांत सुख आहे असा भ्रम होतो. आत्मा आनंद रूप आहे, याचें ज्ञान नसतें. उलट आत्मा आनंदरूप असतां तर आनंदासाठीं विषयांत प्रवृत्तिच संभवली नसती ज्या अर्थी आनंदप्राप्त्यर्थ विषयाकडे प्रवृत्ति होऊन किंचित् विषयलाभानें आनंद होतो त्या अर्थी आत्मा आनंदरूप नाहीं असा निश्चय भ्रांत जीव करतात यासच शास्त्रीय परिभाषेत 'अनानंदापादक आवरण' म्हणतात. विषयप्राप्ति हें सुखसाधन आहे, अशी प्रमाबुद्धि झाल्यामुळें लोकांच्या मनाची विषय सेवनाकडेच प्रवृत्ति होते; किंबहुना ! ! अहम्, ममता भ्रांतीमुळें, अश्रद्धेमुळें, अज्ञानी लोक जन्म–मरणात्मक दुथड्या नदींत गटांगळ्या खात राहिले आहेत. त्यांना अधिष्ठान-भूत ब्रह्मसुखाची जाणीव नसल्यामुळें अर्थात् माझे प्रमाण महिमेनें–'ज्ञानगत प्रत्यक्ष' नसल्यामुळें त्यांची सुखासाठीं विषयाकडे होणारी प्रवृत्ति-परिणामीं व्यर्थच ठरते. वास्तविक पाहतां सामान्यरूपेंन, स्वरूप महिमेनें "विषयगत प्रत्यक्ष" मात्र सर्वांस सदाच आहे. [ ५७ ते ६३ ]

कारण, मी सर्वाधिष्ठानभूत असल्यामुळें–सर्व विश्वांत मीच सामान्यरूपानें व्याप्त आहे. जसा पाण्यावर फेस भासतो तशीच महत्तत्त्वापासून तो देहापर्यंत, हीं सर्वभूतें माझ्या ठिकाणीं कल्पित मायेमुळें भासतात; तरीपण भूता-धाररूपें करून भूतांमध्यें माझी स्थिति नाहीं, हे तुला मागें सातव्या अध्यायांत सांगितलें आहे. तुझी दृष्टि माझ्या यथार्थ स्वरूपांत प्रवेश करो ! [ म्हणजे माझें अत्यंत निर्विशेष स्वरूपाचें तुला आत्मत्वानें ज्ञान व्हावें, हा या प्रति-पादनांतील मुख्य उद्देश होय. 'हे सर्व जगत माझेच स्वरूप आहे' अशी अन्वयबोधाची भूमिका–सामान्यांच्या ध्यानांत येणार नाहीं. म्हणून अध्यारोप व अपवाद प्रक्रियेनें परमात्म्याच्या निर्विशेष–स्वरूपाची ओळख आत्मत्वानें होऊं शकते. म्हणून श्रीभगवंत "माझ्या ठिकाणीं सर्व भूतमात्र आहेत" असा विवर्तरूप अध्यारोप सांगून "माझ्या ठिकाणीं भूतमात्र मुळींहि नाहींत" असा अजातवाददृष्ट्या अपवाद सांगतात व आपल्या "नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव" निर्विशेष स्वरूपाची ओळख करून देतात. शिवाय ज्या परमात्मस्वरूपाचें-ठिकाणीं हीं भूतमात्रें, किंबहुना ! ! विशाल विश्व प्रपंच भासतो त्याच परमात्म्याचें ठिकाणीं स्वतः भगवंतांनींच प्रपंचाचा निषेध केला असल्यामुळें प्रपंच अध्यस्त, अस-ल्याचें अर्थतः सिद्ध होते. कारण, प्रतीत होणारी वस्तु अध्यस्त असेल तरच त्याचा त्या अधिष्ठानावर निषेध संभवतो. महावाक्य श्रवणद्वारां निर्विशेष–ब्रह्मात्मैक्यापरोक्षाज्ञान झालें असतां प्रमात्म्याच्या ठिकाणीं प्रपंचाचा त्रैकालिकात्यंताभाव असल्याचा निश्चय होतो अर्थात पारमार्थिक सत्तेनें प्रपंच झाला नाहीं, आतां नाहीं, व यापुढेंहि होणें शक्य नाहीं;

असा त्रैकालिक निषेध होतो. त्या निषेधाचा प्रतियोगी प्रपंच असल्याकारणेंहि प्रपंच मिथ्या आहे, हे सिद्ध होते. अधिकरण परमात्म्याचें असल्यामुळें ज्याकालीं अधिष्ठान परमात्म्याचे ठिकाणीं अध्यस्त जगत भासते त्याकालींहि तेथें परमार्थतः जगताचा अत्यंताभावच असल्याचें सिद्ध होतें; पण अज्ञानामुळें वा कल्पनेमुळे प्रपंच "भासतो" एवढेच. ]

मायोपाधीच्या पलीकडे असणारी, तत्पद लक्ष्यभूत जी आमची शुद्ध ब्रह्मस्वरूपस्थिति ती जर तूं कल्पना-उपाधि टाकून पाहशील तर मात्र सर्वत्र मींच ओतप्रोत व्याप्त असल्यामुळें "माझ्या ठिकाणीं प्राणि आहेत" हें म्हणणेंहि व्यर्थ आहे, कारण सर्व मीच आहे. [ 'मायाभासेन जीवेशौ करोति' या श्रुत्यनुसार एकमेवाद्वितीय चैतन्याचें ठिकाणीं ही मायाच प्रतिबिंबद्वारां जीवभाव व शिवभाव निर्माण करते. तत्त्वतः जीव व शिव विशुद्ध चैतन्याशीं अभिन्न आहेत. कारण, 'त्वम्' या जीवपदवाच्यार्थांत अविद्या, कल्पना हा 'विशेषण' भाग असून 'विशेष्य' भाग कूटस्थ चैतन्य आहे. तसेंच 'तत्' या शिवपद वाच्यार्थांत सर्वज्ञत्व, जगत्कारणत्व संपादक 'प्रकृति' 'माया' हा 'विशेषण' भाग असून 'ब्रह्मचैतन्य' भाग 'विशेष्य' आहे अर्थात् जीवाधिष्ठानभूत कूटस्थ चैतन्य व शिवाधिष्ठानभूत ब्रह्मचैतन्य हीं दोन्हीं चैतन्यें तत्त्वतः एकच आहेत. या ओवींत 'आमुचा प्रकृतिपैलीकडील भावो' यानें 'तत्'पदाचें वाच्यार्थांतील भागत्याग लक्षणेनें ब्रह्मचैतन्याचा स्वीकार सांगून 'कल्पनेवीण लागसी पाहो' यानें 'त्वम्' पदाचे वाच्यार्थांतील भागत्याग लक्षणेनें 'कूटस्थ चैतन्याचा स्वीकार' सांगितला आहे. "मजमाजीं भूतें हेंहि वावो' यानें कार्य–कारणात्मक उपाधीचे मिथ्यात्व सांगितलें आहे. 'जे मी सर्व म्हणोनि' यानें जीव–शिवांत उपाधिदृष्ट्या भेद असला तरी चिद्रूपानें अखंडैकरस विशुद्धचैतन्यदृष्ट्या अभेदच आहे, असा या ओवीचा गर्भितार्थ आहे. ] विशाल विश्वप्रपंच भासतो, हा सारा केवळ कल्पनामात्र आहे. माझ्या निर्विकल्प–स्वरूपाच्या ठिकाणीं पाहणाऱ्याच्या कल्पनेमुळें भूतांचा भास होतो. ती कल्पना मावळली म्हणजे माझे नित्यसिद्ध अखंडार्थ स्वरूप आहे, तसेंच एकमेवाद्वितीय आहे. अर्जुना! तुला ही ज्ञानजागृति आली ना? आतां द्वैत स्वप्न मिथ्या झालें कीं, नाहीं? आतां या कल्पनारूपी झोंपेचा पूर्ण मार्ग मोडेल व आपण केवळ स्वरूप जागृतिरूपच होऊन जाऊं याचे वर्म तुला उघड–उघड दाखवितों [ ६४ ते ९६ ].

[ केवळ निर्गुण, निरुपाधिक, एकमेवाद्वितीय ब्रह्मापासून त्रिगुणात्मक, वैचित्र्यपूर्ण जगत् निर्माण होणें शक्य नाहीं; किंबहुना!! असें जगत् कसें निर्माण होऊं शकेल? म्हणून चैतन्याच्या अधिष्ठानावर असलेली 'माया' चराचरात्मक प्रपंचाची उत्पत्ति करते. ती माया स्वतः सत्तास्फूर्तिशून्य असल्यामुळें कल्पित असून तिला चैतन्याच्या अधिष्ठानाची जरूरी आहे. जगाचे व मायेचे काल्पनिकत्व लक्षांत आले म्हणजे, जगाचे, मायेचे व अधिष्ठान ब्रह्माचे पूर्णैक्य लक्षांत सहज येते. पारमार्थिक सत्तेनें जगाचा अत्यंताभाव असल्यामुळें एकमेवाद्वितीय परमात्म्यापेक्षां भिन्न दुसरे असें स्वतंत्र यत्किंचितहि नाहीं म्हणूनच तत्त्वतः आधाराधेयभाव किंवा ऐक्य सांगण्यापुरतेंहि द्वैत नाहीं. मीच विश्व आहे म्हणजे स्वभिन्न विश्वासिद्धि सांगावयाची नसून माझ्या सत्ता-स्फूर्तिविना भिन्न असे कांहींएक नाहीं असें आहे पण हे वर्म फारांच्या ध्यानांत येत नसल्याचे दिसतें म्हणून माझ्या-अध्यक्षतेमुळें माया प्रपंचोत्पत्ति करते. त्यांत मी चैतन्य प्राधान्यें जगाचें निमित्तकारण आहे व मायोपाधीद्वारां उपादान कारण आहे अर्थात् मायाविशिष्ट असा मी जगाचा अभिन्ननिमित्तोपादनकारण आहे. म्हणून मी सृष्टि कर्ता व कारण आहे, ही युक्ति येथें जुळते-एरवीं माझ्या निरवधिक व्यापक अत्यंत निर्विशेष स्वरूपाच्या ठिकाणीं प्रपंचाचा पारमार्थिक सत्तेनें अत्यंताभावच आहे [यासच अजात वाद म्हणतात या दृष्टीनें ] भूतें माझ्या ठिकाणीं नाहींत व मीहि भूतांमध्यें नाहीं; हे मुख्य वर्म तूं कधींहि विसरूं नकोस! या माझ्या 'ऐश्वर्य योगास' तूं विचारानें पाहा. याचा अनुभव घ्यावयाचा असेल तर मात्र इंद्रियांची विषयाकडील धांव टाकून देऊन ती इंद्रियें अंतर्मुख केली पाहिजेत. माझे यथार्थ स्वरूप न जाणतां केवळ तर्कबलानें अगर शाब्दिक अवडंबर पूर्ण वाक्चातुर्य–बलानें परमात्मानुभव आला असल्याचे जें कोणी दाखवितात ते उगीच आपली आपण फसवणूक करून घेतात; पण खऱ्या बोध परीक्षेची वेळ आली म्हणजे तसा त्यांचा तत्त्वतः बोध नसतोहि व त्यास पुढें यथार्थ बोध होण्याचीही शक्यता नाहीं [ ९७ ते १३९ ].

फार काय सांगावें!! जर तू संसारास भीत असशील व माझ्या यथार्थ स्वरूपाच्या ऐक्यबोधाची तीव्र इच्छा असेल तर मात्र वर सांगितलेले युक्तियुक्त गूढज्ञान तूं आपल्या पूर्णतया लक्षांत ठेव. माझें निरवधिक व्यापक स्वरूप न जाणतां जे मला मानुषी तनु धारण करणारा मर्यादित स्वरूपाचा आहे असें समजतात, त्यांचा तो थूलदृष्टीनें

केलेला निश्चय भ्रमरूप असल्यामुळें वांया जातो. माझ्या अत्यंत निर्विशेष स्वरूपाच्या ठिकाणीं यच्चयावत् आकार अगर प्रपंचाकारहि मुळींच संभवत नसतांना मला आकार कल्पितात, मी कार्य–कारणात्मक उपाधिरहित असतांना मला गंधफुलांच्याद्वारें पूजेचे उपचार अर्पण करतात. गुणातीतास गुणयुक्त मानतात, अवयव रहितास अवयवांची कल्पना करतात, मी निरपेक्ष अव्यक्त असतांना मला व्यक्त–इन्द्रियगोचर मानतात, अखंड उपलब्धिस्वरूप मी असतांना मला आवाहन करतात व माझे विसर्जनहि करितात. फार काय सांगावें ! ! असें जें मनुष्याचे प्राकृतधर्म त्यांनीं मी युक्त आहे, मी परिच्छिन्न मानव शरीरधारी आहे, एवढेंच ज्यांचे विपरीत ज्ञान असतें तें ज्ञान माझ्या खऱ्या स्वरूपाच्या ज्ञानाला प्रतिबंध करणारें अज्ञानच होय. [ कारण, तत्त्वत: मी सर्व प्रमाण–अविषय व प्रमाणास उपजीव्यभूत सत्घन, चिद्घन व आनंदघन असून अत्यत निर्विशेष निर्गुण आहे; असा श्रुतिसिद्धांत आहे; पण कित्येक नास्तिक लोक तर परमात्म्याचें अस्तित्वहि मानीत नाहींत; कांहीं द्वैतवादी परमात्म्याचें अस्तित्व मानतात; पण परमात्म्याचें अत्यंत निर्विशेष स्वरूप मानीत नाहींत; तर कांहीं "ऐकांतिक निर्गुणवादी" केवळ निर्विशेष स्वरूपच परमात्मा मानतात. सगुण स्वरूप मानीत नाहींत; पण अद्वैत–सिद्धान्तांत परमात्म्याची सगुण व निर्गुण अशी उभयरूपें मान्य आहेत; पण जे कोणी लोक परमात्म्याच्या निर्विशेष, निर्गुण रूपास न मानतां परमात्मा केवळ सगुण-साकार परिच्छिन्नच आहे, असें भ्रमानें मानतात. ते तसें मानणें श्रीज्ञानेश्वरमहाराजांना मान्य नाहीं. हे वरील विषयांत स्पष्ट आहे; पण याचा अर्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांना देवाचें सगुणरूप अजिबात मान्य नाहीं, असा मात्र नाहीं. कारण, जसा पारमार्थिक रूपेंकरून परमात्मा 'निर्गुण–निराकार' आहे तसा भक्ती-करितां सगुणहि आहे. सगुणभक्ति ही निर्गुण प्राप्तीचें साधन व निर्गुणाचे उपलक्षणहि आहे. या कारणें परमात्म्याचें सगुणरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांना मान्यहि आहे; पण परमात्मा फक्त सगुणच आहे असें मात्र मान्य नाहीं. कारण, केवळ सगुणच, परिच्छिन्नच परमात्मा आहे, असें समजणें व तसा निश्चय करणें तत्त्वज्ञानदृष्ट्या तो एक निव्वळ भ्रमच होय. गुणातीत, आकारातीत देवास मानवदेहधारी सकुंचित मानणें, हीच देवाची अवहेलना, अवज्ञा होय व हेंच अज्ञान होय. यांत सगुणास दोष दिलेला नाहीं, हे चांगले ध्यानांत हवे. सगुण, निर्गुणाचे उपलक्षण होय. हे न कळणें म्हणजेच अज्ञान असें सांगितलें आहे. ] सारांश, परमात्मा सगुण-निर्गुण उभयस्वरूपाचा असल्यामुळें तो केवळ परिच्छिन्न मानुषी तनुधारी आहे हे ज्ञान निर्विशेष परमात्म ज्ञानास आड येते; किंबहुना ! ! यथार्थ ज्ञानास झांकून टाकणारें तें अज्ञानच होय [ १४० ते १७१ ].

देवालाहि मानव तनुधारण करणारा मानतात, त्यांचें चित्त भ्रमलेले, अव्यवस्थित असते. त्यामुळें त्यांच्या आशा, त्यांची कर्मे, त्यांचें ज्ञान, हे सर्व मोक्षाच्या, खऱ्या हिताच्या दृष्टीनें व्यर्थ ठरतात. त्यांचे शास्त्राध्ययनहि व्यर्थच ठरते; किंबहुना ! ! आशा, चिंता, द्वेष, अहंकार इत्यादि विकारांनी, तमोगुणांनी ग्रासले जातात ते पूर्ण अध:पतनास पावतात [ १७२ ते १८९ ].

याच्या उलट जे दैवी प्रकृतीचे पुरुष आहेत. त्यांचे अज्ञान निवृत्त झाल्यामुळें त्यांस देहतादात्म्य राहत नाहीं, ते महात्मे परमात्म्याचे जगदाद्य कारणत्व, अविनाशित्व, जाणूनहि अनन्यचित्तानें माझी भक्ति करतात; एवढेंच नव्हे तर परमेश्वरांत व माझ्यांत भेद आहे, ही द्वैत कल्पना त्यांच्या मनास केव्हांच शिवत नाहीं. ते ज्ञानामृत भोजनानें पूर्णतेस पावलेले असतात, त्यांच्या सहज आत्मौपम्यबुद्धीनें, होणाऱ्या आचरणांत नीति जगलेली दिसते. किंबहुना ! ! मद्रूपतेस प्राप्त होऊन माझी भक्ति–सेवा करतात, हीच ऐकात्म्यलक्षण, अद्वैत भक्ति होय व हीच साध्यात्मक पराभक्ति किंवा सहज भक्ति होय. ते निरंतर माझें नामसंकीर्तन, स्मरण करीत विश्वांतील पातकें नाहींशीं करून अखिल विश्व हरिभजनानें, हरिनाम घोषानें धवळून काढतात, प्रकाशित करतात. हरिभजनानें विश्वांतील दु:खेंहि पूर्णतया नाहींशीं करून तें सारें विश्व महासुखानें दुमदुमून भरतात. सकाम सगुणोपासनानुष्ठानानें कधीं एखाद्यानें वैकुंठास जावे असें होते; पण सर्वत्र व्यापकानुभूतिसंपन्न ज्ञानीभक्त असें आहेत कीं, सर्वांस सर्वव्यापक परमेश्वराचें यथार्थ ज्ञान देऊन आघवे विश्वच वैकुंठ करतात. हे सूर्याप्रमाणें सोज्वळ असतात, पण सूर्यास अस्त असतो, या भक्तांना अस्त नसतो चंद्र पौर्णिमेलाच संपूर्ण असतो हे भक्त सदाचेच संपूर्ण असून चंद्राप्रमाणें सुशीतल प्रकाश व आनंद देणारे असतात, त्यामुळें त्या नामधारक भक्तांना मी इतका वश होतो कीं; मीं आपण होऊन त्या भक्तांच्या घरीं, त्या भक्तांच्या मेळाव्यांत जातो, राहतो. मला सर्व साधनामध्यें 'नामसंकीर्तन' हे अतिशय आवडत असल्यामुळें मी दिव्य अशा वैकुंठांतहि एकवेळ नसतो, सूर्यबिंबांत नसतो, योग्यांची हृदयेंहि उल्लंघन करून जातो; पण असा मी जर हरवलों

तर माझे भक्त जेथें 'बरवा' नामघोष करतात तेथें मला शोधावा म्हणजे मी तेथें हमखास, निश्चित सांपडावयाचाच. कृष्ण-विष्णु-हरि-गोविंद या ईश्वराच्या विविध नामांचे 'संकीर्तन' करीत असतां नामरूपी ग्रंथाचा स्पष्ट अर्थ' ईश्वराचें सर्व व्यापकत्व, निर्विशेषत्व हे सर्व विवेचन करून हे ज्ञानीभक्त सांगतात. ही 'नामसंकीर्तनभक्ति' वारकरी संप्रदायांत अन्यसाधन निरपेक्ष, सर्व मार्ग वरिष्ठ, निश्चित परमफल पर्यवसायी व महत्त्वाची मानली जाते. या भक्तांशिवाय कित्येक भक्त अष्टांगयोगादिक अवघड मार्गानें वाटचाल करून समरसतेनें, समाधिद्वारां आत्मानुभवरूपी राज्यसुख पावतात. कित्येक भक्त तर 'नमन–भक्ति' करतात. अर्थात ब्रह्मदेवापासून अतिशय क्षुद्र चिलटापर्यंत यच्चयावत चराचरांत मीच ओतप्रोत भरून राहिलों आहे. या बोधानें नम्रतापूर्वक सर्वत्र नमस्कार करणें, हा त्या भक्तांचा स्वभावच झालेला असतो. फलभारानें जशा वृक्षाच्या फांद्या जमिनीकडे लवतात. त्याचप्रमाणें ज्यांचे 'जीवनसाफल्य' झाले, तेहि सहजच भूतमात्रांपुढें नम्र होतात, हीच गुरवीभक्ति होय. अखंड निरभिमान होऊन असतात. विनय हीच त्यांची संपत्ति होय. किंबहुना!! या 'नमनभक्ति'मुळें ते मद्रूपतेस प्राप्त होऊन राहतात [ १८६ ते २२७ ].

याखेरीजहि माझ्या प्राप्तीचा एक मार्ग आहे व तो म्हणजे 'ज्ञानयज्ञ' हा होय. त्याचे मागे चवथ्या अध्यायांत वर्णन केले असले तरीहि येथें पुनः सांगतो. याचे कारण म्हणजे तुझी "आस्था" मला बोलण्यास भाग पाडते. व तुझ्या निमित्तानें जगाचेहि कार्य सहजच होणार आहे, हे होय. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी यांत श्रीसद्गुरूंच्या कृपाळुपणाचे वर्णन सांगून पुनरुक्ति दोषाचा समर्पक दृष्टान्तद्वारां परिहार दिला आहे.

यज्ञकर्ता जीव, स्वरूपानुभव–पात्रानें, ब्रह्मात्मैक्य विचाररूप महामंत्रानें, जीवेश्वरांतील द्वैत प्रतिभास व त्या द्वैत प्रतिभासास कारणीभूत असणारें अज्ञान याचा होम करून "सर्व मीच आहे" अशी ऐक्यपूर्ण व्यापक अनुभूति त्यास लाभते. ब्रह्मच सर्वत्र ओतप्रोत, व्यापक रूपानें भरले आहे. या अन्तिम साध्यरूप ज्ञानानें तो परिपूर्ण होतो. पंचमहाभूतें, शब्दादि विषय, इन्द्रियें हीं वेगवेगळी न समजतां त्या वैचित्र्यपूर्ण जगतास अधिष्ठान ब्रह्मरूप समजतो; हा एक ज्ञानयज्ञ भक्तीचा प्रकार आहे.

अथवा व्यावहारिकदृष्ट्या विश्वांतील सर्व पदार्थ नाम, रूप, संबंध, जाति, क्रिया, सत्त्व-रज-तम या अगर अशाच कांहीं कारणानें एकमेकापासून भिन्न भिन्न भासत असले तरी तो नामरूपात्मक भेद कल्पित असून तत्त्वतः सर्व विश्व ब्रह्मरूप आहे, असें सर्वांत समव्याप्त जो मी त्या मला अन्वयदृष्ट्या जाणून घेण्याचा 'ज्ञानयज्ञ भक्ती'चा दुसरा प्रकार होय. आणि तिसरा प्रकार म्हणजे वाटेल तेव्हां, वाटेल त्या ठिकाणीं, हव्या त्या स्थितींत "हे जगदादि सर्व कांहीं परमात्म्याचेच स्वरूप आहे" असा सर्वत्र ब्रह्मभावरूप त्याचा बोध असतो अशी ज्या तत्त्वज्ञानी भक्ताची अन्वयाची भूमिका असते त्यानें लोकांस दिसणारे कृतीनें भजन न केले तरी तो जें जें करील तें तें माझी अखंड 'सहज भजनभक्ति' त्याचे ठिकाणीं असतेच; हा होय. [ यांत दृष्टि म्हणजे ज्ञान, परमात्मरूप ज्ञान तद्रूपच सृष्टि आहे, तद्व्यतिरिक्त सृष्टीच नाहीं; असें 'दृष्टिसृष्टिवादाचे' अत्युच्च अन्वय भूमिकेवरून स्वरूप सांगितलें आहे. ] सर्व रूपानें मीच समव्याप्त असल्याकारणानें सर्वांच्याद्वारें सदोदित माझेच ठिकाणीं सर्व अर्पण सहजच होत असते; पण मूर्खांनीं हे न जाणल्यामुळें ते सहज अर्पण होणारे कर्म मला अर्पण होत नाहीं [ २२८ ते २६४ ].

अर्जुना! वेद, यज्ञकर्म, सोमादिक वनस्पति, तूप, समिधा, मंत्र, यज्ञ, द्रव्यें, अग्नि हे सर्व मी आहे. सारांश यज्ञांतील मंत्र, देवता, हविर्द्रव्य किंबहुना!! यच्चयावत अंगें, उपांगें ही सर्व मीच आहे. [ कारण, जगाचें कारण परमात्मा असल्यामुळें जडाजडांत परमात्म्याचीच व्याप्ति आहे, किंबहुना!! आब्रह्मस्तंबपर्यंत जीं जीं अनंतरूपें, अनंतवेषें भासतात त्यांत अधिष्ठानरूपानें, सामान्यरूपानें व्याप्त असा परमात्माच भासतो, असें अन्वय भूमिकेचे वर्म यांत सांगितलें आहे ] [ २६५ ते २६८ ].

शुद्ध, असंग परमात्मा निर्विशेष असल्याकारणें जगाचें कारण नाहीं, तरीपण मायाविशिष्ट परमात्मा 'जगत्-कारण' आहे. ज्याच्या अंगसंगानें अष्टांग प्रकृतीपासून जगास जन्म प्राप्त होतो तो मीं चराचरात्मक जगताचा पिता व माताहि आहे. अर्जुना! सर्व ज्ञानांच्या वाटा ज्या परमात्मरूपी गांवास येऊन मिळतात व ज्या परमात्म्यास वेदाच्या चव्हाट्यावर "वेद्य" [ वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः सर्वे वेदा, यत् पदमामनन्ति ] म्हणतात. सर्वशास्त्रें जेव्हां जड पदार्थाच्या निर्णयास निघाली तेव्हां त्या बाबतींत प्रथमतः त्या निरनिराळ्या शास्त्रकारांचीं निरनिराळी बहुत मतें व बराच मतभेद होऊन गोंधळ माजला, तरीपण ज्या चेतन परमात्मतत्त्व प्रदिपादनांत, ब्रह्मस्वरूपनिर्णयांतमात्र त्या

नानामतांमधील मतभेद नाहींसा होऊन, समजूत पटल्यामुळें सर्वांचें मतैक्य झालें. अगदीं आरंभीं सर्व शास्त्रें पदार्थ वर्णनांत प्रवृत्त झालीं तेव्हां त्यांचीं एकमेकांशीं ओळखच नव्हती, तरीपण शेवटीं सर्वशास्त्रें साक्षात् वा पर्यायानें एकाच परमात्म्याचें वर्णन करण्यास आलीं तेव्हां परमात्मरूप वेद्यस्थानीं चुकलेल्या ज्ञानांची एकमेकांशीं भेट होऊन अनोळख फिटली, परस्परांची ओळख पटली, परब्रह्मतत्त्व प्रतिपादनांत सर्वशास्त्रांचा समन्वय असल्याचें सिद्ध झालें. त्या परमात्म्यासच ' पवित्र ' म्हणतात. ब्रह्मरूपी बीजास घोष, ध्वनि, नाद, आकार, परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी यांचें मंदीर असा जो ओंकार तोहि मीच आहे व संपूर्ण वेदहि मीच आहे, असें आत्माराम श्रीकृष्ण म्हणाले [ येथें चराचरात्मक जगत् व परमात्मा यांच्यांत कार्य-कारणभाव असल्याचें सांगितलें आहे. त्यामुळें परमात्म्याच्या पारमार्थिक एकत्वाचा अद्वयत्वाचा मुळींहि बाध होत नाहीं. कारण, कार्यरूप जगतास कारणरूप परमात्म्याव्यतिरिक्त स्वतंत्र सत्ता नसल्यामुळें कार्यकारणांत भेद सिद्ध होत नाहीं, तर तत्त्वतः कारण परमात्माच सत्य असून कार्य मिथ्या आहे, असेंच सिद्ध होतें. जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाला कारण मीच आहे, असें सांगण्यामुळें परमात्मा व जगत् यांतील कार्यकारणभाव सांगून कार्यरूप जगतास परमात्म्याविना स्वतंत्र सत्ताच नाहीं, असें सूचित केलें आहे ]. मी विश्वलक्ष्मीचा भर्ता व त्रैलोक्याचा धनी आहे. आकाशानें सर्वत्र पसरून राहावें, वाऱ्यानें क्षणभरहि स्वस्थ राहूं नये, अग्नीनें जळावें, पाण्यानें वर्षाव करावा, डोंगरांनीं आपलें आसन सोडूं नये, समुद्रांनीं आपली मर्यादा उल्लंघूं नये, पृथ्वीनें सर्व प्राण्यांचा भार वाहावा, हे सर्व ज्याच्या आज्ञेनें चाललें आहे, तो मी सर्व जगाचा नाथ सर्वांमध्यें राहून आकाशाप्रमाणें अलिप्त, साक्षी व सर्वांचें नियमन करणारा आहे, पण प्राण्यांचें दुर्दैव कीं सर्वव्यापक अशा मला कोठेंच तें ओळखूं शकत नाहींत. अंतर्बाह्य सर्वत्र ओतप्रोत मीच व्याप्त असून माझ्या अकुंठित सत्तेनें विश्वांतील सारी कार्ये चालत असूनहि मला आत्मत्वानें न जाणल्यामुळें सत्कर्मांचें श्रम वायां जातात; हेंच प्राण्यांचें दुर्दैव होय. [ यांत परमात्म्याचें सर्वधारकत्व व सर्व नियामकत्व कसें आहे हें दर्शवून कोणत्याहि अचेतनास कार्यप्रवण होण्यासाठीं चैतन्यसंबंधाची जरूर असतें. अचेतन आपण होऊन कधींहि कार्यप्रवण होऊं शकत नाहीं, हें ध्वनित केलें आहे] [ २६९ ते ३०६ ].

तसेंच प्राण्यांचें दुर्दैवच कीं, ते मला न जाणतां सुखप्राप्तीसाठीं यज्ञयागादि कर्मानुष्ठान करतात; पण मला न जाणतां त्यांनीं कितीहि सत्कर्में केलीं, तरी ती निरर्थकच होत. कारण, ते वेदविहित यज्ञादि सकाम कर्मानुष्ठान करून माझ्याकडे येण्याचें सोडून स्वर्गसुखच पसंत करतात, ते स्वर्गांतील सुख वास्तविक पाहतां अपातरणीय, अविचारित रमणीयच असतें, वेदविहित सकाम कर्मानें पुण्यरूप पापानें स्वर्गास जाता येतें, पापरूप पापानें नरकास जाणें होतें व माझी [ परमात्म्याची ] प्राप्ति ज्यामुळें होतें तें शुद्ध पुण्य होय. म्हणून तेंच ' पुण्य ' या शब्दाचें यथार्थ वाच्य आहे. मी परमात्मा ज्यामुळें अंतरतो, दुरावला जातो त्या कृत्यास पुण्य म्हटलें असतां जिव्हा झडणार नाहीं काय ? त्या स्वर्गांतील लोकांस मिळणारें सुख, हें फल परिच्छिन्न रूपाचें असतें. नरकदुःख सापेक्ष त्यास सुख हें नांव आहे; तरीपण पुण्याचा क्षय झाला असतां स्वर्गांतील जीवास पुनः दुःखपूर्ण अशा या मर्त्य लोकांत यावें लागतें ते लागतेंच. त्याची ती स्थिति खरोखरीच लज्जास्पद असतें ती काय वर्णावी ? त्यांत वेदविहित सकामकर्मापासून निर्माण होणारें पुण्य व स्वर्गसुख अनित्य असल्याचें सांगितलें आहे. पुण्याचें सीमितत्व किंवा असीमत्व हें त्याच्यापासून साक्षात् अगर परंपरेनें मिळणाऱ्या फलावर अवलंबून आहे. ज्याचें फल अनित्य मर्यादित आहे त्याचें जनक पुण्यहि सीमितच समजावें व ज्याचें फल अमर्याद आहे. त्याचें जनक पुण्यहि अपरिच्छिन्न, अमर्यादित जाणावें. सारांश, उपरिनिर्दिष्ट फलबल-कल्प न्यायानें लौकिक क्रिया संपादित भोगांप्रमाणें काम्य कर्मजन्य पुण्यानें प्राप्त होणारे पारत्रिक भोगहि परिच्छिन्न व अनित्यच आहेत. म्हणजे स्वर्गप्राप्ति व दिव्यभोग-विलास-वैभव मिळालें तरींहि जन्ममृत्यूचें चक्र संपत नाहीं, नित्यानंदाच्या मानानें इतर सर्व बंधनकारक आहे. व ब्रह्मस्थिति लाभणें, हेंच उच्चतम अंतिम साध्य आहे चिरसुखरूपता व त्यापुढें इतर ध्येयें अगदींच क्षुल्लक असल्याचें अत्यंत प्रभावीपणानें सोदाहरण प्रतिपादिलें आहे [ ३०७ ते ३३४ ].

स्वर्गादि आडमार्गांचा त्याग करून जे माझे भक्त अनन्यभावानें, प्रेमभक्तिपूर्वक सर्वभावानें मलाच शरण येतात. तेच माझे खरे भक्त होत. त्यांच्या प्रपंच व परमार्थाच्या योगक्षेमाचा सर्वभार मीच स्वीकारतों. योग म्हणजे अप्राप्ताची प्राप्ति व क्षेम म्हणजे प्राप्ताचें परिपालन अर्थात् पारमार्थिक योगक्षेमास पोषक अशा व्यावहारिक योगक्षेमाचा भारहि मीच घेतो त्यास ब्रह्मस्थितिरूप साध्य प्राप्तीस उपकारक प्रापंचिक परिस्थिति मीच देतो.

[ भक्तानें प्रपंच–परमार्थाचा भार देवावर टाकून निरंतर, दीर्घकाल, आदरयुक्त देवाव्यतिरिक्त कोठेंहि प्रेम न ठेवतां केवळ देवास प्रेमानें चित्त समर्पण करणे, अशी अनन्य ' भगवत्–भक्ति ' करावी, म्हणजे देव स्वतः भक्तास ज्ञानोपदेश देऊन, विशुद्ध, अभेदात्मक ब्रह्मस्थितिरूप सायुज्य मुक्ति देतो. जिज्ञासा बुद्धीनें अनन्य ' हरिभक्ति ' करणाऱ्या भक्तास याच देहांत अद्वैतज्ञान प्राप्त होऊन अज्ञान व तत्कार्य देहतादात्म्य यांचा निरास होतो व त्यास मूळ सिद्ध असलेली ब्रह्मस्थिति प्राप्त होतें. उर्वरित आयुष्यांत पूर्व संस्कारानुरूप ते माझी भक्ति करतील तर त्यापासून त्यांस जीवन्मुक्तीचे विलक्षण सुख प्राप्त होतें व देहांती तो विदेह कैवल्यास पावतो. म्हणून देवाची जिज्ञासाबुद्धीनें अनन्य भक्ति करावी. येथें श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं एकांतांत ब्रह्मानंदाचा उपभोग घेणारा असा एक ज्ञानी भक्तांचा वर्ग आणि ज्या ज्ञान्यांना लोकसंग्रहाकरितां किंवा जीवन्मुक्तीच्या विलक्षण सुखाकरितां पूर्वसंस्कारबलानें ज्ञानोत्तर भक्तीची इच्छा उत्पन्न होतें, असा दुसरा वर्ग दाखविलेला आहे. वास्तविक दोघेंहि, देहतादात्म्यरहित, स्वरूपावरणरहित ब्रह्मस्थितीस प्राप्त झालेलें असल्यामुळें योग्यतेनें, बोधानें सारखेंच आहेत. कारण, ज्ञानोत्तर व्यवहार पूर्वसंस्कारानुसार, पण कर्तव्य-बुद्धिरहित सहज लीलेनें होतो, असा तात्पर्यार्थ आहे ].

पण लोकांत सकामबुद्धीनें इंद्रादिदेवतांचें भजन करण्याचेच प्रकार फार आहेत. सर्वनियामक, जगत्कारण ईश्वराविना कामनापूर्तीसाठीं लोक भिन्नभिन्न जीव कोटींतील क्षुद्र देवतांची उपासना करतात. ती भक्ति व्यभिचारी आहे. उच्चतम ब्रह्मस्थितिरूप फलपर्यवसायि ईश्वरोपासना सोडून क्षुल्लक अशा उपासना विधीचा अज्ञानपणानें अवलंब करणें हाच व्यभिचार होय. ती खरी शुद्ध भक्ति नव्हे. याचकरितां " कर्माचें डोळे जें ज्ञान तेंच प्रथम शुद्ध असावें. " कारण, कर्म हें ज्ञानोत्तरच घडत असते त्यामुळें कोणतेंहि कर्मानुष्ठान ज्या ज्ञानदृष्टीनें होते ती ज्ञानदृष्टि शुद्ध–स्वच्छ असली तरच तदनुसार होणारी कर्में अर्थात् मानसिक कर्मरूप उपासना व शारीरिक क्रियारूप कर्में शुद्ध होऊं शकतील. इतर देवतांच्या उपासना शेवटीं मला प्राप्त होत असल्या तरी त्या भक्तांच्या तशा भावना नसतात. त्यामुळें त्यांच्या भावनेनुसार देवत्व, पितृत्व इत्यादि कांहीं अन्तवन्त फलें मिळालीं, तरी माझे भजन माझ्याच भावनेनें करावें लागतें; म्हणून माझी त्यांना प्राप्ति होत नाहीं [ ३२४ ते ३९८ ].

पण जे भक्त माझीच अनन्यभावानें उपासना करतात त्यांस विशुद्ध ब्रह्मस्थितिरूप ' सायुज्यमोक्ष ' मिळतो. माझी भक्ति करावयाची म्हणजे पुष्कळ–उपचार अर्पण केलें पाहिजेत असें नाहीं; पण––

' ऐश्वर्य–वैभव यांच्यामुळें अभिमानानें माझी पूजा, भक्ति करतात; पण जेथें श्रीशंकराचें तप पुरे पडत नाहीं, जेथें सर्वज्ञ तुल्य वेदाच्या जाणिवेचा लाग लागत नाहीं, देवी लक्ष्मीचेंहि ऐश्वर्य पुरे पडत नाहीं; तेथें सामान्य जीवांना आपल्या जाणपणा, अभिमान, तप व ऐश्वर्य यांच्या बळावर माझी प्राप्ति होणें कसे शक्य आहे ? वास्तविक पाहतां परमार्थांत आपला व्यावहारिक थोरपणा बाजूला सारून आपण आपले सर्वस्व व आपले गुण यांचें परमात्म्यावरून निंबलोण उतरून टाकले पाहिजे. सर्व सामर्थ्याचा फुंज सोडून देऊन माझे ठिकाणीं नितान्त प्रेम ठेवून 'अनन्यभक्ति' करणेंच हितावह आहे. भक्तिपूर्वक अर्पिलेलें साधे पानहि मला पुरेसे आहे. पुष्पादि पूजासाहित्य अन्य उपचार ही भक्ति–भाव व्यक्तविण्याची केवळ निमित्तें होत. त्यास महत्त्व नसून मी भक्तांचा–आंतरिक प्रेमभाव पाहतो.

एवढ्याच करितां तुला सर्व सुलभ साधन सांगतों, ते म्हणजे मनोमंदिरांत मला न विसरतां नितांत भावनेनें वेदविहित केलेली सत्कर्में अहंकाराचा मळ न लागूं देतां माझ्या हातीं अर्पण करणें, हे होय. कर्तृत्वाहंकार व फलाशा सोडून स्वकर्में केली म्हणजे तुला जन्ममरणरूप बंध होणार नाहीं. तर सुखरूप अशा माझ्या स्वरूपाशीं अनायासें ऐक्य होईल.

ज्यांच्या अंतःकरणांत ब्रह्मात्मैक्य बोध उत्पन्न होऊन म्हणजे सर्वत्र मीच भरून राहिलेला आहे, अशा अपार बोधरूपास प्राप्त होऊनहि जे माझी भक्ति करतात ते लोकदृष्ट्या देहादि उपाधींद्वारां व्यवहारांत वावरत असलेलें दिसलें तरी ते मद्रूपच असतात. ते केवळ प्रारब्धावशेष भोग संपविण्यासाठींच असंग बोधानें–देहेंद्रियद्वारां होणाऱ्या व्यवहारांत राहतात [ ३९९ ते ४१४ ].

अनन्य प्रेमपूर्वक भक्ति करणारा भक्त कोणत्या जातीचा आहे याचा मुळींहि प्रतिबंध नाहीं; इतकेंच नव्हे तर ! तो आधीं जरी दुराचारी–असला तरी त्यास अनुताप झाल्यामुळें उर्वरित आयुष्य माझ्या भक्तिसेवेंत खर्च केले तर तो हळुंहळूं निष्पाप होऊन सम्यग्–व्यवसित होतो. योग्य निश्चय करून हरिभक्तिद्वारां साधु होतो. तो मद्रूप होतो [ ४१९ ते ४२८ ].

याच्या उलट मनांत प्रेमलक्षणात्मक भक्ति नसतांना बरेंच शास्त्राध्ययन केले असले तरी त्या दांभिक भक्तास माझी प्राप्ति होत नाहीं. जसे नाले, ओढे हा भेद गंगेस मिळेपर्यंतच असतो, किंवा हे खैराचे लांकूड, हे चंदनाचे लांकूड असा व्यवहार भेद जोपर्यंत लांकडे अग्नींत घातली नाहींत तोपर्यंतच असतो. त्याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र, अत्यंज, स्त्रिया इत्यादि वेगवेगळ्या कुळजातीचा भेद जोंवर मद्रूपता लाभली नाहीं. तोपर्यंतच असतो. जेव्हां सर्व वृत्ति मद्रूपतेस पावतात तेव्हां मात्र जाति व व्यक्ति या उभयांच्या नांवानें बिंदुले–शून्य पडते. त्यांत स्त्री, पुरुष, कुळ जात्यादि भेद नाहींत; हीच खरी संतमान्य अध्यात्मिक समता होय; हे यांत सांगितलें आहे.

माझ्या प्राप्तीसाठीं साधनांची उणीव अशी मुळींच नाहीं. अनन्य भक्तीनें तर मी प्राप्त होतोच होतो; पण गोपिकाप्रमाणें कामानें; कंसाप्रमाणें–विरोध भक्तीनेंहि माझ्याशीं दृढ संबंध आला कीं, "मद्रूप होणेंविना गति नाहीं" असें खास जाणावें. वैश्य, शुद्र अथवा स्त्रिया इत्यादिकांनीं माझें–भजन केलें तर मद्रूपतेस ते पावतात तर मग–पुण्यवान् ब्राह्मण, भक्त किंवा राजर्षि यांनीं माझी भक्ति केली तर तेही मद्रूपतेस पावतील हें काय निराळें सांगावयास हवें ?

अर्जुना ! तूं या अनित्य, दुःखरूप अशा मृत्युलोकांत अकस्मात् जन्मला आहेस ! शेकडों ठिकाणीं खिळखिळी झालेली ही आयुष्य–नौका आहे. ही केव्हां बुडेल याचा मुळींहि नेम नाहीं; पण या मृत्युलोकांतील लोकांकडे पहावे तर बेपर्वा होऊन या जीर्ण नौकेंत निवांत बसलें आहेत,–वैषयिक सुखांत निश्चित होऊन, मग्न होऊन राहिलें आहेत. माझे भजन न करण्याला या प्राण्यांच्या अंगीं असें कोणते सामर्थ्य आहे कोणास ठाऊक ? हे घर–भोग यांच्याबळावर निश्चित झाले आहेत–कीं काय ? त्याचें फार नवल वाटते ! ! ऐहिक–पारत्रिक कल्याण करणाऱ्या धर्मार्थ एक कवडीहि खर्च करण्यास जे लोक तयार नसतात, ते जेथें सर्वस्व हानी आहे तेथें मात्र कोट्यावधि रुपये खर्च करतात ! जो बहु विषय विलासांत दंग आहे, जो विषयाभिलाष भारानें पार दडपला गेला आहे, त्यांस लोक सुखी व ज्ञानी समजून मान देतात. जो जो आयुष्य घटत जाते तो तो मृत्यु जवळ जवळ येत आहे. त्याची त्यास खंतीच नसते. निष्कारण विषय लोभानें मरेपर्यंत तृष्णा वाढवीत जातात, अरेरे ! ! किती वाईट हे. ! या मृत्युलोकांतील सर्वच न्याय उफराटा ! !; पण अर्जुना ! येथें तूं अकस्मात् जन्मला आहेस ! ! तूं या उफराट्या राहटीच्या नादीं न लागतां झटकन् मोकळा हो ! आणि माझ्या भक्तिपंथास लाग;–म्हणजे त्यामुळें तूं माझ्या अव्यंग स्वरूपास पावशील. माझी भक्ति म्हणजे माझ्या भजनी नितान्त प्रेम ठेवणें, आपलें मन मद्रूप करणें व सर्वत्र माझेंच स्वरूप जाणून नमस्कार करणें होय. त्यामुळें माझ्या अभेद साक्षात्कारानें सुखरूप होशील. हेंच परमार्थांतील अन्तिमसाध्य होय. [ यांत वैषयिक सुखाचा त्याग करून विवेक वैराग्यपूर्वक अनन्य अव्यभिचारी भक्तीनें परमात्म्याचे आत्मत्वानें साक्षात्कारात्मकज्ञान प्राप्त होऊन सर्वत्र ब्रह्मभावरूप अशी सन्तांची अन्वयात्मक थोर भूमिका प्राप्त होते, असें निःसंदिग्ध सांगितलें आहे. तो यथार्थ मार्ग सोडून अज्ञानामुळें, तामसी व्यभिचारी भक्तीनें त्यांचा अधःपात होतो, जन्ममरणाची अविश्रांत वाट चालावी लागते–म्हणून अनित्य, दुःखद अशा मृत्युलोकांतील उफराट्या गोष्टीचा त्याग करून सात्त्विक–अखंडानुसंधानरूप अनन्य भक्तिद्वारां सुखरूप विशुद्ध ब्रह्मस्थितिरूप सायुज्यता मुक्ति प्राप्त करून घे. असा कळकळपूर्ण उपदेश केला आहे [ ४२९ ते ५२० ].

असें आपलें 'गुज' भगवन्त अर्जुनास सांगत होते व तो वृत्तांत सत्वसंपन्न संजय–धृतराष्ट्रांस सांगत असतांना तो अष्ट सात्त्विकभावांनीं युक्त झाला तोच आनंद धृतराष्ट्रांसहि द्यावा, असें वाटल्यावरून त्याला म्हणाला "आपण ऐकत आहां काय ?" पण त्या बोलण्याकडे धृतराष्ट्राचे अवधानच नव्हते, हे पाहून तो मनांत खिन्न झाला पण धृतराष्ट्रास सांगण्याच्या निमित्तानें श्रीव्यासदेवांनीं माझे जन्म–मृत्युपासून रक्षण केले, हे माझे भाग्यच होय ! असें संजय म्हणाला.

आतां श्रीकृष्ण वाक्यरूपी उत्तम बीजें असून त्यांस संजय हीच कोणी एक अष्ट सात्त्विक भावरूप पीकाची विवडाची जमीन मिळाल्यामुळें श्रोत्यांनीं थोडे लक्ष द्यावे म्हणजे त्यांस प्रमेय पिकांचा सुकाळ होऊन सर्व सुखाच्या राशीवर बसतां येईल. असें सांगून या उपसंहाराची व "अवधान एकले दीजे ! मग सर्व सुखासी पात्र होईजे" आरंभींच्या प्रतिज्ञात्मक उपक्रमाशीं एकवाक्यता करून श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेवांनीं या अध्यायांवरील 'भाष्य' संपविले आहे [ ५२१ ते ५३५ ].

[ या संपूर्ण नवव्या अध्यायांतील नकाशे क्रमांक ११ व १२ पहावेत. ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय दहावा

नमो विशदबोधविदग्धा । विद्यारविंदप्रबोधा । पराप्रमेयप्रमदा । विलासिया ॥ १ ॥ नमो संसारतमसूर्या । अपरिमितपरमवीर्या । तरुणतरतूर्या । लालनलीला ॥ २ ॥ नमो जगदखिलपालना । मंगळमणिनिधाना । सज्जनवनचंदना । आराध्यलिंगा ॥ ३ ॥ नमो चतुरचित्तचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा । श्रुतिसारसमुद्रा । मन्मथमन्मथा ॥ ४ ॥ नमो सुभावभजनभाजना । भवेभकुंभभंजना । विश्वोद्भवभुवना । श्रीगुरुराया ॥ ५ ॥ तुमचा अनुग्रहो गणेशु । जैं दे आपुला सौरसु । तैं सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥ ६ ॥ जी दैविकीं उदार वाचा । जैं उद्देशु दे नांभिकाराचा । तैं नवरससुधाब्धीचा । थाॅवो लाभे ॥ ७ ॥ जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी । जरी मुकेयातें अंगिकारी । तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधुहोडा ॥ ८ ॥ हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे । तो जीवचि परि तुके महेशेंसीं ॥ ९ ॥ एवढें जिये महिमेचें करणें । तें वाचाबळें वानूं मी कवणें । कां सूर्याचिया आंगा उटणें । लागत असे ? ॥ १० ॥ केउता कल्पतरुवरी फुलौरा ? । कायसेनि पाहुणेरु क्षीरसागरा ? । कवणें वासीं कापुरा । सुवासु देवों ? ॥ ११ ॥ चंदनातें कायसेनि चर्चावें । अमृतातें केउतें रांधावें । गगनावरी उभवावें । घडे केवीं ? ॥ १२ ॥ तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें कें असे साधन ? । हें जाणोनि मियां नमन । निवांत केलें ॥ १३ ॥ जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें । श्रीगुरुसामर्थ्या रूप करूं म्हणे । तरि ते मोतियां भिंग देणें । तैसें होईल ॥ १४ ॥ कां साडेपंधरया रजतवणी । तैशीं स्तुतींचीं बोलणीं । उगियाचि माथा ठेविजे चरणीं । हेंचि भलें ॥ १५ ॥ मग म्हणितलें जी स्वामी । भलेनि ममत्वें देखिलें तुम्हीं । म्हणौनि कृष्णार्जुनसंगमीं । प्रयागवटु जाहलों ॥ १६ ॥ मागां दूध दे म्हणतलियासाठीं । आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥ १७ ॥

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय दहावा

[ हे श्रीगुरो ! ] ब्रह्मज्ञानाचा स्पष्ट बोध करण्यांत चतुर, विद्यारूपी कमलाला विकसित करणारे [ म्ह. श्रोत्रिय ] आणि परारूप ज्ञानवाणीचा विषय जी स्वरूपस्थिति हीच कोणी एक प्रमदा म्हणजे तरुण स्त्री, हिशीं विलास करणारे [ म्ह. ब्रह्मनिष्ठ ] असे जे आपण त्या आपणास माझा नमस्कार असो ! १. संसाररूपी अंधकाराचा–अज्ञानाचा नाश करण्यांत सूर्याप्रमाणें अति निरुपम–असीम सामर्थ्यवान् व तारुण्यभरांत असणाऱ्या चवथ्या तुर्यावस्थेचें सहज लीलेनें पालन करणारें असें जें आपण त्या आपणास माझा नमस्कार असो ! २. सर्व जगाचें पालन करणारा, कल्याणरूप रत्नांची खाण, सज्जनरूप वनांतील चंदनासारखे श्रेष्ठ आणि ज्याचें स्वरूप आराधन करण्यास योग्य देव, असे जे आपण त्या आपणास माझा नमस्कार असो ! ३. भक्तांच्या चतुरचित्तरूप चकोरपक्षांस आनंद देणाऱ्या चंद्रा, ब्रह्मानंदरूप अनुभवाचा राजा, श्रुतीच्या तात्पर्य विषयीभूत ज्ञानाच्या समुद्रा ! आणि मदनाचा गर्व नाहींसा करणारें असें जे आपण त्या आपणास माझा नमस्कार असो ४. शुद्ध भावयुक्त ज्ञानाच्या भजनास पात्र, संसाररूप हत्तीचें गंडस्थळ फोडणाऱ्या व जगाच्या उत्पत्तीचें स्थान असणाऱ्या अशा हे श्रीगुरुराया ! तुम्हाप्रत माझा नमस्कार असो ! ५. तुमचा कृपारूपी गणेश जेव्हां आपला सामर्थ्यरूप प्रसाद देतो तेव्हां लहान मुलालाहि सर्व शास्त्रविद्येंत प्रवेश होऊन गुह्य सिद्धांताचें ज्ञान होतें ६. हे श्रीगुरो ! आपली उदारवाणी जेव्हां आश्वासक अभय वचन देते तेव्हां शांतादि नवरसरूपी अमृत समुद्राचा थांग लागतो ७. महाराज जेव्हां आपली प्रेमरूपी सरस्वती मुक्याचाहि अंगीकार करते, तेव्हां ग्रंथ करण्याचें बाबतींत तो बृहस्पतीशींसुद्धां पैज मारूं शकतो ८. हे असो फार तर काय, परंतु ज्यावर आपली कृपादृष्टि पडत किंवा ज्याच्या मस्तकावर आपला कृपेनें वरदहस्त ठेविला जातो तो जीवच खरा, तरीपण तो महेशाच्या साम्यतेस पात्रतो ९. एवढा ज्या श्रीगुरुकृपेचा महिमा आहे, तिचें वर्णन मी कोणच्या वाचेच्या बलानें करूं शकेन ? कारण, सूर्याच्या अंगाला घासून स्वच्छ करण्याची आवश्यकता आहे काय ? १०. कल्पतरूला फलद्रूपतेसाठीं फुलें येण्याची काय जरूरी आहे ? [ कारण तो सर्वदा फलद्रूपच आहे. ] क्षीरसागराला कशानें पाहुणचार करावा ? कापराला दुसऱ्या कशाचा सुवास देऊन सुगंधित करावें ? ११. चंदनाला कशाची उटी लावावी ? अमृताला कसें शिजवावें ? गगनापेक्षां [ कांहींसा ] उंच मांडव करावा हें कसें घडून येणार ? १२. त्याचप्रमाणें, श्रीगुरूंचा महिमा आकलन करणारे साधन कोठें आहे ? हे समजूनच मी गुरूंना मुकाट्यानें स्वस्थ राहून नमस्कार केला १३. जर बुद्धिसंपन्नतेच्या जोरावर श्रीगुरूंच्या सामर्थ्याचें यथार्थ वर्णन करूं म्हटलें तर तें माझें करणें मोत्याला अभ्रकाचें पुट देण्यासारखें होईल १४. किंवा साडेपंधरा दराच्या बावन्नकसी उत्तम सोन्यावर रुप्याचा मुलामा द्यावा. त्याचप्रमाणें श्रीगुरूंची स्तुति करूं लागलें असतां तसाच प्रकार होईल; म्हणून श्रीगुरुचरणीं लीन होऊन कांहींएक न बोलतां त्यांच्या पदीं मस्तक ठेवणें हेंच बरें ! १५. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणाले:–हे स्वामी ! तुम्ही माझ्याकडे मोठ्या प्रेमानें आत्मतत्पूर्ण अशा कृपादृष्टीनें पाहिलें त्यामुळें श्रीकृष्णार्जुन संवादरूपी संगमांत मी प्रयाग येथील जणुं वटवृक्षच झालो आहें १६. पूर्वी 'मला दूध हवें' असें उपमन्यूनें विनविल्यावरून शंकरांनीं ज्याप्रमाणें

१ स्पष्ट बोध करण्याविषयीं कुशल. २ विद्या हेंच कोणी कमळ त्याला विकासविणारा. ३ परा-वाणी प्रमेय-अर्थ, प्रमदा–स्त्री-परावाणीच्या अर्थरूप स्त्रीशीं विलास करण्याविषयीं कुशल. ४ सामर्थ्यवंता. ५ अत्यंत तरुण तूर्येचें लालन हीच ज्याची लीला. ६ कल्याणरूप रत्न, ७ राजा. ८ मदनाच गर्व हरण करणारा. ९ संसाररूप गजाचें गंडस्थळ फोडणारा. १० जगदुत्पत्तिस्थान. ११ कृपा. १२ प्रसाद. १३ सर्व विद्यांत. १४ गुरूची. १५ अभयवचनाचा. १६ थांग.

ना तरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें । बुंझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ॥ १८ ॥ तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकल शास्त्रांचा विसंवता ठावो । ते भगवद्गीता वोंविये गावों । ऐसें केलें ॥ १९ ॥ जें बोलणियाचे रानीं हिंडतां । नायकिजे फळलिया अक्षराची वार्ता । परि ते वाचाचि केली कल्पलता । विवेकाची ॥ २० ॥ होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदभांडारा केली वोंवरी । मन गीतार्थ-सागरीं । जळशयन जालें ॥२१॥ ऐसें एकेक देवांचें करणें । तें अपार बोलों केवीं मी जाणें । तऱ्ही अनुवादलों धीटपणें । ते उंपसाहिजो जी ॥ २२ ॥ आतां आपुलेनि कृपाप्रसादें । मियां भगवद्गीता वोंवीप्रबंधें । पूर्वखंडें विनोदें । वाखाणिलें ॥ २३ ॥ प्रथमीं अर्जुनाचा विषादु । दुजीं बोलिला योगु विशदु । परि सांख्यबुद्धीसि भेदु । दाऊनियां ॥२४॥ तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें । तेंचि चतुर्थीं ज्ञानेंशीं प्रगटिलें । पंचमीं गौंव्हरिलें । योगतत्त्व ॥२५॥ तेचि षष्ठामाजीं प्रगट । आसनालागोनि स्पष्ट । जीवात्मभाव एकवट । होती जेणें ॥ २६ ॥ तैसी जे योगस्थिती । आणि योगभ्रष्टां जे गती । तें आघवीचि उंपपत्ती । सांगितली षष्ठीं ॥ २७ ॥ तयावरी सप्तमीं । प्रकृति-परिहार उंपक्रमीं । करूनि भजती जे पुरुषोत्तमीं । ते बोलिले चौऱ्ही ॥२८॥ पाठीं-सप्तप्रश्नविधि । बोलोनि प्रयाणसमयसिद्धी । एवं सकळ वाक्यावधि । अष्टमाध्यायीं ॥ २९ ॥ मग शब्दब्रह्मीं असंख्याकें । जेतुला कांहीं अभिप्राय पिके । तेतुला महा-भारतें एकें । लक्षें जोडे ॥३०॥ तिये आघवांचि जें महाभारतीं । तें लाभे कृष्णार्जुन-वाचोक्तीं । आणि जो अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाचि नवमीं ॥ ३१ ॥ म्हणौनि नवमींचिया अभिप्राया । सहसा मुंद्रा लावावया । बिहाला मग मी वायां । गर्व कां करूं? ॥ ३२ ॥ अहो गूळासाखरे मौलयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आनआन जैसें ॥ ३३ ॥ एकें जाणो-नियां बोलती । एक ठौयें ठावो जाणविती । एक जाणां जातां हारपती । जाणते गुणेंशीं ॥ ३४ ॥ हें ऐसें अध्याय गीतेचे । परि अनिर्वाच्यपण नवमाचें । तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥ अहो ऐंकाचि शाटी तपिन्नली । ऐंकीं सृष्टीवरी सृष्टी केली । ऐंकीं पाषाणीं वाऊनि उतरलीं । समुद्रीं कटकें । ॥ ३६ ॥ ऐंकीं आकाशीं सूर्यातें धरिलें । ऐंकीं चुळींचि सागरातें भरिलें ।

सर्वेच क्षीरसमुद्राची वाटी करून त्या उपमन्युपुढें ठेवली १७. किंवा ध्रुव रुसला असतां त्याला अढळपदाचा खाऊ देऊन वैकुंठाधीश श्रीविष्णूंनीं त्याची कौतुकानें समजूत घातली १८. त्याचप्रमाणें, ब्रह्मविद्येमध्यें श्रेष्ठ व सकल-शास्त्राचें विश्रांतिस्थान असणारी अशी जी अध्यात्मविद्या-रूप भगवद्गीता ती मी प्राकृत ओवीरूपानें वर्णन करावी असें मला श्रीगुरूंनी केलें! १९. अहो! शब्दरूपी रानांत हवें तितके हिंडले असतां वाचावृक्ष फलद्रूप म्हणजे मोक्षरूपी फलप्राप्ति करून देणारा झाला असल्याचें एकहि अक्षर ऐकूं येत नाहीं. पण ती वाचाच निश्चित फलदायि विचारांचा कल्पवृक्षच आपण केली २०. ज्या माझ्या बुद्धीची गति पूर्वी देहातादात्म्यापलीकडे जात नव्हती, ती बुद्धीच आज ब्रह्मानंदरूपी भांडाराची खोली आपण बनविली आहे आणि जणुं काय माझ्या मनाला गीतार्थरूपी क्षीरसागरांत जलमंदीर बांधून दिलें. जलशयन करविलें आहे २१. याप्रमाणें श्रीगुरूंच्या एकेक लीलात्मक करणी आहेत त्या अगाध असल्यामुळें, मला त्यांच्या अपार सामर्थ्याचें शब्दद्वारां वर्णन करावयाचें कसें कळेल? असें असूनहि महाराज! जें कांहीं मी धिटाईनें अनुवादा-त्मक बोललों ते सहन करून त्याची मला क्षमा असावी २२. आतांपर्यंत आपल्या कृपाप्रसादानें मी भगवद्गीतेच्या पूर्वखंडाचें ओवीबद्ध छंदांत वर्णन सहज लीलेनें केलें २३. पहिल्या अध्यायांत आप्तस्वकीयांबरोबर युद्ध करणें अयोग्य आहे, असें वाटल्यामुळें अर्जुनास खेद उत्पन्न झाल्याचें सांगितलें. दुसऱ्यांत निष्काम कर्मयोग स्पष्ट सांगितला आहे, परंतु त्यांत साध्य-साधन भावानें ज्ञान-योग व कर्मयोग यांतील भेद दाखवून सांगितला २४. तिसऱ्यांत केवळ 'कर्मच' प्रतिपादन केलें आहे; तोंच 'कर्मयोग' चौथ्यांत ज्ञानासह प्रगट केला आहे व पांचव्यांत योगतत्व गूढरूपानें सूचित केलें आहे २५. तेच योगतत्त्व सहाव्या अध्यायांत आसनविधीपासून [ समाधिपर्यंत ] की ज्यामुळें जीवात्म्याचें ऐक्य होते. ते स्पष्ट सांगितलें आहे २६. त्याप्रमाणें, अष्टांगयोग सिद्ध झालेल्यांची स्थिति व योगभ्रष्टांस मिळणारी गति यांविषयीं सर्व सिद्धांत सहाव्या अध्यायांत सांगितलें आहेत २७. नंतर सातव्यांत आरंभीं परा-अपरा प्रकृतीचा उपक्रम सांगून व परिहार सांगून, नंतर ईश्वराचें भजन करणाऱ्या चार प्रकारच्या भक्तांचें वर्णन केलें आहे २८. पुढें अर्जु-नाच्या 'प्रश्नसप्तकांचें' स्पष्टीकरण करून प्रयाणकाल-सिद्धि म्हणजे मरणकालीं कालानुरोधानें कोणती स्थिति प्राप्त होते. या प्रकारें सर्व सात प्रश्नांचीं उत्तरें आठव्या अध्यायाच्या शेवटपर्यंत सांगून ते प्रश्न संपविलें २९. मग असंख्यांत असलेल्या वेदांत जेवढा कांहीं मुख्य अभिप्राय आहे, तेवढा सर्व एक लक्ष महाभारतांत भगवान् व्यासांनीं आणिला आहे ३०. व संपूर्ण महाभारतांत सांगितलेला सर्व अभिप्राय कृष्णार्जुनांच्या संवादरूपी गीतेच्या सातशें श्लोकांत आहे. तोच सातशें श्लोकांतील अभिप्राय एका या नवव्या अध्यायांत आणला आहे ३१. म्हणून नवव्या अध्यायाचा अभिप्राय पूर्ण झाला असें दाखविणारा लेखन सीमेचा शिक्का त्यावर घालावयास भ्यालेला जो मी तो नवव्या अध्यायांतील अभिप्राय स्पष्ट करून सांगितला असा व्यर्थ गर्व कशासाठीं धरूं ३२. अहो! गूळ, साखर व राब किंवा ढेपा जरी एकाच रसाचे तयार झालेले असतात तरी त्यांच्या गोडीचा स्वाद निरनिराळा असतो ३३. [ त्याचप्रमाणें गीतेच्या सर्व अध्यायांत जरी ब्रह्मतत्त्वाचें वर्णन केलें आहे तरी ] कांहीं अध्यायांत ब्रह्म जाणून त्याचें प्रतिपादन केलें आहे, कांहीं अध्यायांत ब्रह्माचे ठिकाण दर्शविलें आहे व कांहीं अध्यायांत अधिकारी ब्रह्म जाणण्यास गेला असतां आपल्या जाणत्या गुणासह ब्रह्म-रूपच होतो, असें प्रतिपादन केलें आहे ३४. याप्रमाणें गीतेचे अध्याय आहेत; परंतु नववा अध्याय असा आहे कीं, त्याचें आगळे महत्त्व शब्दाने वर्णन करतां येत नाहीं. प्रभो, असा जो अत्यंत गंभीर अशा वेदांत प्रमे-याचा नववा अध्याय तोहि मी वर्णन केला, हें तुमचें सामर्थ्य होय ३५. अहो, एका ऋषीच्या [ वसिष्ठांच्या ] छाटीनें सूर्यासारखा प्रकाश दिला, एकानें [ विश्वामित्रानें ] ब्रह्मदेवाच्या सृष्टीवर ताण करून प्रतिसृष्टि निर्माण केली; एकांनीं [ रामचंद्रांनीं नळ वानरांच्या हातीं ] समुद्रावर दगडाचा सेतु बांधून सर्व वानर सैन्य पार उतरविलें ३६.

---

१ समजाविला. २ खाऊ. ३ गीता. ४ विश्रांतिस्थान. ५ शब्दाच्या. ६ वृक्ष. ७ एकदम. ८ शांतिस्थान. ९ गुरूंचें. १० क्षमा करावी. ११ पूर्वार्ध. १२ स्पष्ट. १३ ज्ञानकर्म. १४ गौरविलें, वर्णिलें, आरंभिलें. १५ प्रतिपादन. १६ नाश. १७ आरंभीं. १८ 'आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ' या श्लोकांत. १९ वेदांमध्यें. २० लक्षग्रंथानें. २१ स्पष्ट सांगण्याला. २२ भ्याला. २३ ढेपीचे. २४ भिन्नभिन्न. २५ कांहीं ब्रह्मस्वरूप जाणून. २६ जेथल्या तेथें. २७ वसि-ष्ठांचें वस्त्र. २८ विश्वामित्रानें. २९ श्रीरामचंद्रांनीं. ३० सैन्यें, वानरसमूह. ३१ मारुतीनें. ३२ अगस्तीनें.

तैसें मज मुक्याकरवीं बोलविलें । अनिर्वाच्य तुम्हीं ॥ ३७ ॥ परि हें असो एथ ऐसें । राम रावण झुंजिन्नले कैसे । राम रावण जैसे । मीनले समरीं ॥ ३८॥ तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें । तें नवमीचियाचि ऐसें मी म्हणे । या निवाडा तत्त्वज्ञु जाणें । जया गीतार्थु हातीं ॥ ३९ ॥ एवं नवही अध्याय पहिले । मियां मतीसारिखे वाखाणिले । आतां उत्तरखंड उंवाइलें । ग्रंथाचें ऐका ॥ ४० ॥ जेथ विभूति प्रतिविभूती । प्रस्तुत अर्जुना सांगिजेती । ते विदग्धा रसवृत्ती । म्हणिपैल कथा ॥ ४१ ॥ देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जिंणें । तरि ओंविया होती लेणें । साहित्यासि ॥ ४२ ॥ मूळग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाठी नीट पढतां । अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवे ॥ ४३ ॥ जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें । तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥ तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥ उठावलिया भावा रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडप । चातुर्य म्हणे पडप । जोडलें आम्हां ॥ ४६ ॥ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ॥ ४७ ॥ जो चराचर परमगुरु । चतुर चित्तचमत्कारु । तो ऐका यादवेश्वरु । बोलता जाहला ॥ ४८ ॥ ज्ञानदेव निवृत्तीचा म्हणे । ऐसें बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आघवियाची मातु अंतःकरणें । धेंडौता आहासि ॥ ४९ ॥

श्रीभगवानुवाच :—

भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः । यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

आम्हीं मागील जें निरूपण केलें । तें तुझें अवधानचि पाहिलें । तंव टांचें नव्हे भलें । पुरतें आहे ॥ ५० ॥ घटीं थोडेसें उदक घालिजे । तेणें न गळे तरी वरिता भरिजे । ऐसा परिसौनि पाहिलासि तंव परिसविजे । ऐसेंचि होतसे ॥५१॥ अवचितयावरी सर्वस्व सांडिजे । मग चोख तरी तोचि भांडारी कीजे । तैसा किरीटी तूं आतां माझें । निजधाम कीं ॥५२॥ ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें । पाहोनि बोलिलें अत्यादरें । गिरी देखोनि सुभरें । मेघु जैसा ॥ ५३ ॥ तैसा कृपाळुवांचा

एकानें [ मारुतीनें ] आकाशांत असणाऱ्या सूर्याला धरून ठेविले आणि एकानीं [ अगस्ति ऋषींनी ] एका चुळींतच म्ह० आचमनानें समुद्र प्राशन केला, त्याचप्रमाणें मी जो मुका–अजाण त्या माझ्याकडून वाणीला अगम्य असलेल्या नवव्या अध्यायाचा अभिप्राय [ ब्रह्मतत्त्व ] तुम्ही बोलविले ३७. पण हें राहूं द्या. कारण, जेथें असें आहे कीं, रामरावणाचें युद्ध कसें झालें हे सांगावयाचें असेल तर, रामरावणाच्या युद्धाप्रमाणेंच झालें म्हणून सांगावें लागेल. [ असे ते अनुपमेय होय ] ३८. त्याचप्रमाणें नवव्या अध्यायांतील श्रीकृष्णाचें उपदेशात्मक बोलणें हें नवव्या अध्यायासारखेंच आहे असें मी म्हणतों ज्या तत्त्वज्ञान्यांना गीतेच्या यथार्थ अर्थाचें ज्ञान झालें आहे, त्यांनाच हे माझें निर्णयात्मक म्हणणें पटेल ३९. अशा प्रकारें पहिल्या नऊ अध्यायाचें मी यथामति व्याख्यान केलें आहे; आतां येथून गीताग्रंथाच्या उत्तरखंडास आरंभ झाला आहे, तें ऐका ४०. या उत्तरखंडांतील आरंभींच्या अध्यायांत श्रीकृष्ण हें अर्जुनास आपल्या मुख्य व गौण विभूति सांगतील. ती उत्तम चातुर्यानें रसभरित कथा तुम्हांला मी सांगतों ४१. ती कथा मी सांगणार देशी भाषेंतच; पण त्या देशी भाषेच्या सुंदरपणानें भरलेला शांतरस शृंगाररसालाहि जिंकील, या माझ्या मराठी भाषेंतील ओंव्याच अलंकारशास्त्राला भूषणासारख्या शोभतील ४२. मूळ संस्कृत गीताग्रंथ व त्यावरील माझी मराठी टीका वाचली, जर दोन्हीचा खरा अभिप्रायात्मक अर्थ मनास पटला तर त्यांतील मूळ ग्रंथ कोणता ? हें समजणार नाहीं ४३. ज्याप्रमाणें शरीराच्या सौंदर्यानें शरीर हेंच दगिन्यांना भूषण होतें, [ तेथें शरीर व अलंकार ] यांत कोणी कोणाला शोभा आणली आहे, याची निवड करितां येत नाही ४४. त्याप्रमाणें मराठी भाषा आणि संस्कृत भाषा या दोन्हीहि एकाच ग्रंथाचा [ गीतेचा ] भावार्थ वर्णन करण्याचें बाबतींत समान योग्यतेच्या असून, त्या एकाच आसनांत कशा शोभतात, ते शुद्ध निर्मळ बुद्धीनें ऐका ४५. गीतेंतील कोणताहि अभिप्राय प्रकट करितांना शृंगारादि नवरसांचीं वृष्टि होते, तेव्हां चातुर्य म्हणते ' आम्हांला प्रतिष्ठाच प्राप्त झाली ' ४६. वरील ओवींत सांगितल्याप्रमाणें ज्याच्यायोगानें होईल तसें मराठी भाषेचें सौंदर्य घेऊन [ शृंगारादि नवरसांना ] तारुण्य आणले व मग त्या योगानें अगणित अशा गीता तत्त्वाची मी रचना केली ४७. पण आतां मूळ गीता सांगणारा जो स्थावरजंगमांचा परमगुरु व चतुर जनांच्या चित्तांस आश्चर्यभूत असणारा, असा जो यादवेश्वर श्रीकृष्ण तो काय बोलला, तें ऐका ४८. " अर्जुना ! सर्व प्रकारानें श्रवण करण्याविषयीं तूं अंतःकरणानें धड म्ह० सर्व प्रकारें तत्पर आहेस ना ? " असें त्या भगवान् श्रीकृष्णानें भाषण केलें असें श्रीनिवृत्तिनाथांचें शिष्य श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ४९.

**अन्वयार्थ—महाबाहो**–हे शूर अर्जुना !–**भूयः एव**–पुनरपि – **मे**–माझें–**परमं**–**वचः**–श्रेष्ठ वचन–**शृणु**–ऐक–**यत्**–जें–**अहं**–मी–**प्रीयमाणाय ते**–ऐकून संतुष्ट होणाऱ्या तुला–**हितकाम्यया**–तुझें हित व्हावें, या इच्छेनें –**वक्ष्यामि**–सांगत आहे १.

" आम्हीं मागें [ नऊ अध्यायांत ] जें कांहीं निरूपण केलें ते त्यांत, आमच्या बोलण्याकडे तुझें लक्ष कितपत आहे हें अजमाऊन पाहिले, तो तें अपुरें नाहीं तर चांगलें पूर्ण आहे, असें आम्हांस आढळून आले ५०. ज्याप्रमाणें घागरींत थोडेसें पाणी घालावें व तें गळाले नाहीं तर आणखीं त्यात पाणी घालून तें पूर्ण भरावें त्याप्रमाणें तुला आम्हीं थोडेंसे ऐकविलें, तों तुझें पुरते अवधान आहे अशी आमची खात्री झाल्यावरून तुला आणखी ऐकवावें, असेंच आम्हास वाटूं लागलें ५१. ज्याप्रमाणें एखादा नवीन चाकर ठेवल्यावर त्याची कसोटी पाहण्याकरितां त्याच्या जाण्यायेण्याच्या वाटेंत वाटेल तें टाकतात व तें त्यानें आपल्याजवळ न ठेवतां मालकाच्या स्वाधीन केल्यावर, अर्थात् प्रामाणिक आहे असें आढळून आल्यावर त्याची खजिनदार म्हणून नेमणूक करितात त्याचप्रमाणें अर्जुना ! तूं उपर्युक्तरीत्या आमच्या कसोटीस उतरल्यामुळें, तूं माझ्या ज्ञानरूपी जामदारखान्याचा मालक झाला आहेस ५२. असें अधिकारसंपन्न अर्जुनाला पाहून सर्वेश्वर श्रीकृष्ण मोठ्या प्रेमानें बोललें आणि ज्याप्रमाणें डोंगर पाहून मेघाची फळी दाट भरून येतें ५३. त्याप्रमाणें

---

१ वाणीला अगम्य, ब्रह्म. २ यथामति. ३ आरंभिलें. ४ गौण. ५ सुंदर. ६ सुंदरपणानें. ७ जिंकील. ८ अलंकारशास्त्राला. ९ मूळग्रंथ. १० सांगवत नाहीं. ११ आवडीनें.

१२ अभिप्राय. १३ वृष्टी. १४ प्रतिष्ठा. १५ गुरु चार प्रकारचे—गुरु, परमगुरु, परमेष्ठिगुरु व परात्परगुरु. १६ धड, म्हणजे पात्र. १७ अल्प, अपुरे.

रावो । म्हणे आइकें गा महाबाहो । सांगितलाचि अभिप्रावो । सांगेन पुढती ॥ ५४ ॥ पैं प्रतिवर्षी क्षेत्र पेरिजे । पिकाची जंव जंव वाढी देखिजे । यालागीं नुबैगिजे । वाहो करितां ॥ ५५ ॥ पुढतपुढती पुटें देतां । जोडे वानियेची अधिकता । म्हणौनि सोनें पंडुसुता । शोधूंचि आंवडे ॥ ५६ ॥ तैसें एथ पार्था । तुज आभार नाहीं सर्वथा । आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलों पुढती ॥ ५७ ॥ जैसें बाळका लेवविजे लेणें । तया शृंगारा बाळ काइ जाणे ? । परि ते सुखाचे सोहळे भोगणें । माउलिये दिठी ॥ ५८ ॥ तैसें तुझें हित आघवें । जंव जंव कां तुज फांवे । तंव तंव आमुचें सुख दुणावे । ऐसें आहे ॥ ५९ ॥ आतां अर्जुना असो हे विकडी । मज उघड तुझी आवडी । म्हणौनि तृप्तीची सवडी । बोलतां न पडे ॥ ६० ॥ आम्हां येतुलियाचि कारणें । तेंचि तें तुजशीं बोलणें । परि असो हें अंतःकरणें । अवधान देईं ॥ ६१ ॥ तरी ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊनी परब्रह्म । तुज खेंवासि आलें ॥ ६२ ॥ परी किरीटी तूं मातें । नेणसी ना निरुतें । तरि तो गा जो मी एथें । तें विश्वचि हें ॥ ६३ ॥

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः । अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥

ऐथ वेद मुके जाहाले । मन पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशी जेथ ॥ ६४ ॥ अगा उदरींचा गर्भु जैसा । न देखे आपुलिये मातेची वयसा । मी आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ॥ ६५ ॥ आणि जळचरां उदधीचें मान । मशका नोलांडवेचि गगन । तेवीं महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ॥ ६६ ॥ मी कवण पां केतुला । कवणाचा कैं जाहला । या निरुती करितां बोला । कल्प गेले ॥ ६७ ॥ कां जे महर्षी आणि या देवां । येरां भूतजातां सर्वां । मी आदि म्हणौनि पांडवा । अवघड जाणतां ॥ ६८ ॥ उतरलें उदक पर्वत वेळघे । जरी झाड वाढत मुळीं लागे । तरी मियां जालेनि जगें । जाणिजे मातें ॥ ६९ ॥ कां गाभेवनें वटु गिंवसवे । जरी तरंगीं सागरु सांठवे । कां परमाणूमाजीं सामावे । भूगोलु हा ॥ ७० ॥ तरी मियां जालिया जीवां । महर्षी अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाशु गा ॥ ७१ ॥ ऐसाही जरी विपायें । सांडूनि पुढील पाये । सर्वेंद्रियांसि होये । पाठिमोरा जो ॥ ७२ ॥ प्रवर्तलाही वेगीं

कृपाळूंचे राजे भगवान् म्हणतात् अर्जुना! पूर्वी सांगितलेलाच अभिप्राय तुला पुनः सांगतों, ऐक ५४. हे पहा! हर एक वर्षास शेताची पेरणी करावी व मग जसजसें पीक अधिकाधिक येऊं लागते, तसतसें त्याची पुनः मेहनत–मशागत व लागवड करण्याचा कंटाळा करूं नये ५५. अथवा हे पंडुसुता! ज्याप्रमाणें सोन्याला वरचेवर पुटे–ताव दिल्यानें सोन्याचा कस अधिकाधिक वाढतो, म्हणून तें सोनें अधिक शुद्ध करावेंसेंच वाटते ५६. त्याप्रमाणें येथेंहि आहे. पार्था! हा अभिप्राय सांगण्यांत आम्ही तुझ्यावर मुळींच उपकार करीत नाहीं. कारण, आम्ही आपल्या स्वार्थाकरितां–[स्वतःच्या आनंदाकरितां] पुनः तुला सांगत आहोत ५७. जसें बालकाला दागिने घालावेत, पण ते मूल त्याचे सुखास किंवा अलंकारास जाणत असते काय? परंतु त्या सुखाचा उपभोग आईसच, तिचे दृष्टीनें होतो ५८. त्याप्रमाणें जों जों तुझें सर्व हितच तुला प्राप्त होत जाईल, तों तों आमचाच आनंद दुप्पट वाढत असतो अशीच वस्तुस्थिति आहे ५९. अर्जुना! आतां हें अलंकारिक बोलणें राहूं दे. खरोखर माझें तुझ्यावर उघड प्रेम आहे; म्हणून मी तुझ्याशीं किती जरी बोललों तरी माझ्याच तृप्तीचा शेवट होत नाहीं ६०. एवढ्याचकरितां आम्हांला तीच ती गोष्ट तुझ्याशीं बोलावी लागते; पण हें असूं दे, तूं आमच्या बोलण्याकडे अंतःकरणपूर्वक लक्ष दे ६१. तर हे मर्मज्ञ अर्जुना, अत्युत्तम असें जें माझें वाक्य; तें ऐक. खरोखर तें माझें वाक्य नसून अक्षररूपी अंगरखा घालून प्रत्यक्ष परब्रह्मच तुला आलिंगन देण्यास आलें आहे ६२. परंतु हे किरीटी तूं खरोखर मला जाणत नाहीस ना? जर यथार्थ रूपानें मला जाणत नसलास तर सांगतों कीं, जो मी तुला येथें तुझ्यापुढें उभा दिसतो आहे तसा परिच्छिन्न नसून मीच हें सर्व विश्व आहे, असें समज ६३.

**अन्वयार्थ**––**मे**––माझ्या––**प्रभवं**––प्रभावाला किंवा उत्पत्तीला–**सुरगणाः**–ब्रह्मदेवादि देवांचे गण– **न विदुः**–जाणत नाहींत. **महर्षयः न**–भृगु इत्यादि महर्षीहि माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला जाणत नाहींत **हि**–कारण–**अहं**–मी–**देवानां च महर्षीणां**–देवांचें व महर्षींचे–**सर्वशः**–सर्व प्रकारें–**आदिः**–कारण आहे २.

ते माझें स्वरूप जाणण्याविषयीं वेदांची वाणी कुंठित झाली, मन व प्राण यांचीहि गति खुंटली व माझ्या तेजापुढें रात्र झाल्याशिवाय सूर्य व हे चंद्र मावळले. [म्हणजे माझ्या स्वयंप्रकाश स्वरूपाचें तें प्रकाशन करूं शकत नाहींत] ६४. अरे! ज्याप्रमाणें प्रोटांत असलेला गर्भ आपल्या मातेचे वय जाणूं शकत नाहीं, त्याप्रमाणें माझ्यापासून उत्पन्न झालेले सर्व देव माझे यथार्थ स्वरूप जाणण्यास समर्थ नाहींत ६५. आणि जलचरांना जसा समुद्राचा अंत कळत नसतो किंवा मशकाला आकाश ओलांडितां येत नाहीं, त्याप्रमाणें महर्षींचें ज्ञानहि मला ओळखूं शकत नाहीं ६६. मी कोण, केवढा, कोणाचा, कोठें, केव्हां झालों या गोष्टींचा निर्णय व निश्चय करितां करितां कित्येक युगें लोटलीं गेलीं ६७. तरीहि अर्जुना! हें सर्व महर्षि, देव व इतर जेवढे म्हणून प्राणी आहेत त्या सर्वांचें मूळ कारण मी असल्यामुळें मला जाणणें त्यांना कठीण आहे ६८. अरे! जर पर्वतावरून खालीं आलेलें पाणी पुनः पर्वतावर चढेल, अथवा झाड वाढत असतांना मुळाला लागेल तर माझ्यापासून झालेलें जग मला जाणील ६९. किंवा वडाच्या सूक्ष्म बीजाच्या गाभ्यांत जर वडाचे विस्तीर्ण झाड सांपडेल अथवा लाटांत जर समुद्र सांठवला जाईल तसेंच परमाणूंमध्यें जर या अखिल पृथ्वीचा समावेश होईल ७०. तर मात्र माझ्यापासून उत्पन्न झालेल्या जीवांस, महर्षींस किंवा देवांस मला जाणण्यास अवसर-वाव मिळेल ७१. याप्रमाणें जरी मी जाणण्यास कठीण आहे, तरी सहज चुकून जो कोणी बाह्य प्रवृत्तीची वाट सोडून इंद्रियांना पाठमोरा होतो [इंद्रियें जिंकतो] ७२.

---

१ शेत. २ वृद्धि. ३ न कंटाळावें. ४ मेहनत, लागवड. ५ वरचेवर. ६ कांतीची, कसाची. ७ शुद्ध करावेंसें वाटतें. ८ उपकार. ९ अलंकार घालावा. १० समजेल. ११ अलंकारिक भाषण. १२ शेवट. १३ अत्यंत मार्मिक. १४ आलिंगन देण्याला. १५ खरेपणानें. १६ माझ्या स्वरूपाचे ठिकाणीं. १७ प्राण, वायु. १८ वय, तारुण्य. १९ माशीला २० केवढा. २१ निश्चय. २२ चढेल. २३ मुळास पोंचेल. २४ सांपडेल. २५ क्वचित्. २६ बाह्य प्रवृत्ति.

बहुडे । देह सांडूनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥ ७३ ॥

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् । असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

तेथ राहोनि ठायाठिके । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥ ७४ ॥ मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु । ऐसिया मातें जो नरु । यापरी जाणें ॥ ७५ ॥ तो पाषाणामाजीं परिसु । जैसा रसाआंतु सिद्धरसु । तैसा मनुष्याआंतु तो अंशु । माझाचि जाण ॥ ७६ ॥ तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । येर माणुसपण तें भांब । लौकिक भागु ॥ ७७ ॥ अगा अवचिता कापुरा- । माजीं सांपडला हिरा । वरी पडिलिया नीरा । न निगे केवीं ॥ ७८ ॥ तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरी जाहला प्राकृतु । तऱ्ही प्रकृतिदोषाची मातु । नेणेंचि कीं ॥ ७९ ॥ तो आपसयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदनु सर्पीं । तेवीं मातें जाणें तो संकल्पीं । वर्जूनि घापे ॥ ८० ॥ तेंचि आमुतें कैसें जाणिजे । ऐसें कल्पी जरी चित्त तुझें । तरी मी ऐसा हें माझें । भाव ऐकें ॥ ८१ ॥ जे वेगळालिया भूतीं । सारिखे होऊनि प्रकृती । विखुरले आहेती त्रिजगतीं । आघवियें ॥ ८२ ॥

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः । सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥
अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः । भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

तेथ प्रथम जाण बुद्धी । मग ज्ञान जें निरवधी । असंमोह सहनसिद्धी । क्षमा सत्य ॥ ८३ ॥ मग शम दम दोन्ही । सुखदुःख वर्ते जें जनीं । अर्जुना भावाभाव मानीं । भावाचिमाजीं ॥ ८४ ॥ पैं भय आणि निर्भयता । अहिंसा आणि समता । तुष्टि तप पंडुसुता । दान जें गा ॥ ८५ ॥ अगा यश अपकीर्ती । हे जे भाव सर्वत्र दिसती । ते मजचि पासूनि होती । भूतांचिया ठायीं ॥ ८६ ॥ जैसीं भूतें आहाति सिनानीं । तैसेचि हेही वेगळाले मानीं । एक उपजती माझ्या ज्ञानीं । एक नेणती मातें ॥ ८७ ॥ प्रकाशु आणि कडवसें । हें सूर्याचिस्तव जैसें । प्रकाश उदयीं दिसे । तम अस्तुसीं ॥ ८८ ॥ आणि माझें जाणणें नेणणें । तें तंव भूतांचिया दैवाचें करणें । म्हणौनि भूतीं भावाचें होणें । विषम पडे ॥ ८९ ॥ यापरी माझिया भावीं । हे जीवसृष्टि आहे आघवी । गुंतली असे जाणावी । पंडुकुमरा ॥ ९० ॥ आतां इये सृष्टीचे पालक । जयां आधीन वर्तती लोक । ते अकरा भाव आणिक । सांगेन तुज ॥ ९१ ॥

तसेंच कदाचित् त्याची बाह्य प्रवृत्ति झालीच तरी तो तेथून वेगानें चटकन् [ अंतर्मुख होऊन ] माघारी फिरतो [ स्थूल-सूक्ष्म-कारण ] हे देह मागे सोडून [ विचारानें देहाचा निरास करून ] जो पंचमहाभूतांच्याहि माथ्यावर चढतो [ पंचमहाभूतांचें मिथ्यात्व जाणून, निरास करून त्याचे अधिष्ठान जे ब्रह्म तेथें जाऊन पोचतो ] ७३.

**अन्वयार्थ**—**यः**—जो-**मां**-मला-**अजं**-जन्मरहित-**अनादिं**-कारणरहित-**च**-व-**लोकमहेश्वरं**-सर्व लोकांचा महेश्वर-**वेत्ति**-जाणतो -**सः**-तो-**मर्त्येषु**—मर्त्यांमध्यें—मनुष्यांमध्यें-**असंमूढः**-मोहित न झालेला-**सर्वपापैः**-सर्व पापांपासून-**प्रमुच्यते**-सर्वथा मुक्त होतो ३.

असें त्या ठिकाणीं चांगल्या रीतीनें स्थिर राहून, स्वयंप्रकाश विशुद्ध आत्मप्रकाशानें, आपल्या ज्ञानचक्षूनें उत्पत्तिरहित असें जे माझें स्वरूप, ते तो [आत्मत्वानें] पाहतो ७४. मी सर्वांच्या आरंभाच्याहि पलिकडचा म्ह० अनादि आणि सर्व लोकांत श्रेष्ठ व त्यांचा स्वामी आहे; अशा मला जो मनुष्य [वरीलप्रमाणें] जाणतो ७५. तो दगडांत जसा परीस श्रेष्ठ किंवा रसांत जसें अमृत श्रेष्ठ तसा सर्व मनुष्यांत तो माझा अंश [ श्रेष्ठ विभूति ] आहे असें समज ७६. तो चालत्या बोलत्या ज्ञानाची केवळ मूर्तिच आहे व त्याचे ते अवयव म्हणजे जणुं सुखाला फुंटलेलें अंकुर आहेत, एऱ्हवीं लौकिकदृष्ट्या त्याचे जे इतरासारखें मनुष्यपण दिसते तो केवळ भ्रम होय ७७. अरे! कापुराच्या ढिगांत अवचित हिरा सांपडला व तो कापूरासारखा दिसला तरी तत्त्वतः तो कापूर नव्हे त्यावर जरी पाणी पडले तरी हिरा त्या पाण्याकडून कापराप्रमाणें न विरघळता वेगळा निघणार नाहीं कसा ? ७८. त्याप्रमाणें तो जरी या मनुष्यलोकांत साधारण मनुष्याप्रमाणें देहद्वारां वावरतो असें दिसले; तरीपण तो [ जन्ममरणादि ] प्रकृति दोषांची गोष्टहि ओळखित नाहीं ७९. कारण, आपलाच नाश होईल या भीतीनें पापें आपण होऊन त्याला सोडून जातात. सर्पाचें राहण्याचें स्थान जें चंदनाचें झाड, तें जर जळत असलें, तर तो सर्प त्याचा त्याग करितो. त्याप्रमाणे जो मला जाणतो तो सर्व संकल्पाकडून टाकला जातो ८० तेच मला कसें जाणावें अशी जर तुझ्या मनांत कल्पना येईल तर मी असा आहे व माझ्यापासून उत्पन्न झालेलें विकार, पदार्थ असे आहेत ते ऐक ८१. हे विकार निरनिराळ्या प्राण्यांत त्यांच्या त्यांच्या प्रकृतीसारखे पूर्व संस्काराप्रमाणें बनून सर्व त्रिभुवनांत पसरले आहेत ८२.

**अन्वयार्थ**—**बुद्धिः**—अंतःकरणांतील सूक्ष्म विषय जाणण्याचे सामर्थ्य-**ज्ञानम्**-आत्मा, प्रकृति इत्यादि शब्दांच्या अर्थाचा बोध-**असंमोहः**-ज्ञातव्य व कर्तव्य पदार्थामध्यें विवेकपूर्वक प्रवृत्ति-**क्षमा**-कोणी शिव्या दिल्या किंवा ताडन केलें असतांहि चित्ताला विकार होऊं न देणें-**सत्यं**-जसें कळलें असेल तसेच दुसऱ्याला सांगणें-**दमः**-बाह्य इंद्रियांचा उपशम-**शमः**-अंतःकरणाचा उपशम-**सुखं**-आल्हाद-**दुःखं**-संताप -**भवः**-उद्भव-**अभावः**-नाश-**च भयं**-आणि भीति-**च अभयम् एव**-अभयच-**अहिंसा**-प्राण्यांना पीडा न करणें-**समता**-समचित्तत्व-**तुष्टिः**-संतोष-**तपः**-इंद्रियांचा संयम करून शरीराला पीडणें-**दानं**-द्रव्यादिक यथाशक्ति सत्पात्रीं देणें -**यशः**-धर्मसंबंधी कीर्ति-**अयशः**-अधर्मसंबंधीं अपकीर्ति इत्यादि-**भूतानां पृथग्विधाः भावाः मत्तः एव भवन्ति**-प्राण्यांचे नाना प्रकारचे भाव माझ्यापासूनच होतात ४-५.

त्या विकारांपैकीं पहिली 'बुद्धि' आहे असें समज, मग अमर्याद ज्ञान, मोह न होणें, सहज सहन करण्याचा स्वभावरूप क्षमा व सत्य ८३. मग मनोनिग्रह व इन्द्रियनिग्रह हे दोन्ही, आणखी अर्जुना! लोकांत होत असलेले सुखदुःख व भावाभाव म्ह. जन्ममरण हे मूळचा भावरूप परमात्मा जो मी त्या माझेच ठिकाणीं [ कल्पित ] आहेत असें समज ८४. पंडुसुता! भय व निर्भयपणा, अहिंसा, समता, संतोष, तप आणि दान ८५. अरे! याशिवाय सर्व भूतांच्या ठिकाणीं यश, अपकीर्ति इत्यादि जे भाव दृष्टीस पडतात, ते सर्व माझ्यापासून भूतांचे ठिकाणीं उत्पन्न होतात ८६. जशी भूतें निरनिराळीं आहेत, तसें हे विकारहि वेगवेगळाले आहेत असें समज, त्यापैकीं जन्मास येऊन कोणी माझें ज्ञान संपादन करतात व कोणी मला जाणत नाहीं. [ कित्येक विकार माझ्या ज्ञानापासून उत्पन्न झालेले दिसतात, तर कित्येक विकार मला न जाणतां माझ्या अज्ञानापासून उत्पन्न झालेले दिसतात असाहि एक अर्थ संभवतो ] ८७. ज्याप्रमाणें प्रकाश व अंधार हे परस्पर विरुद्ध धर्म एका सूर्यापासूनच उत्पन्न होतात, त्यापैकीं प्रकाश सूर्याच्या उदयाबरोबर व अंधार सूर्याच्या अस्ताबरोबर दृष्टीस पडतो ८८. त्याप्रमाणें माझें ज्ञान होणें अगर अबोध होणें, हें प्राण्यांच्या पूर्व दैवाचे कर्तृत्व फळ आहे; म्हणूनच त्यांच्या ठिकाणीं निरनिराळें न्यूनाधिक विकार प्राप्त होतात ८९. याप्रमाणें अर्जुना! ही संपूर्ण जीवसृष्टि माझ्या विकारांनी व्यापलेली आहे, असें समज ९०. आतां जे सृष्टीचे पालक आहेत आणि ज्यांच्या आज्ञेत सर्व लोक वर्तन करितात, असें आणखी अकरा भाव आहेत, ते तुला सांगतों ९१.

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा । मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥

तरी आघवांचि गुणीं वृद्ध । जे महर्षींमाजीं प्रबुद्ध । कश्यपादि प्रसिद्ध । सप्तऋषी ॥ ९२ ॥ अणिकही सांगिजतील । जे कां चौदाआंतुलें मुद्दल । स्वायंभू मुख्य वडील । चारी मनु ॥ ९३ ॥ ऐसें हे अकरा । मोझ्या मनीं जाहाले धनुर्धरा । सृष्टीचिया व्यापारां -। लागोनियां ॥ ९४ ॥ जैं लोकांची व्यवस्था न पडे । जैं या त्रिभुवनाचे कांहीं न मांडे । तैं महाभूतांचें दळवाडें । अचुंबित असे ॥ ९५ ॥ तैंचि हे जाहाले । मग इहीं लोकें केले । तेथ अध्यक्षें रचूनि ठेविले । इहीं जन ॥ ९६ ॥ म्हणौनि अकराही हे राजा । मग येर जग यांचिया प्रजा । एवं विश्वविस्तारु हा माझा । ऐसेंचि जाण ॥ ९७ ॥ पाहें पां आरंभीं बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया बूड जाहालें । बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ॥ ९८ ॥ खांदियांपासूनि अनेका । फुटलिया नाना शाखा । शाखांस्तव देखा । पल्लव पानें ॥ ९९ ॥ पल्लवीं फूल फळ । एवं वृक्षत्व जाहालें सकळ । तें निर्धारितां केवळ । बीजचि आघवें ॥ १०० ॥ तैसें मी एकचि पहिलें । मग मी तेंचि मनातें व्यालें । तेथ सप्तऋषि जाहाले । आणि चारी मनु ॥ १ ॥ इहीं लोकपाळ केले । लोकपाळीं विविध लोक सृजिले । लोकांपासूनि निपजले । प्रजाजात ॥ २ ॥ ऐसेनि हें विश्व येथें । मीचि विस्तारिलोंसें निरुतें । परी भावाचेनि हातें । मने जया ॥ ३ ॥

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः । सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

यालागीं सुभद्रापती । हे भाव इया माझिया विभूती । आणि यांचिया व्याप्ती । व्यापिलें जग ॥ ४ ॥ म्हणौनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकावरी । मीवांचूनि दुसरी । गोठी नाहीं ॥ ५ ॥ ऐसें जाणे जो साचें । तया चेइरे जाहालें ज्ञानाचें । म्हणौनि उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न न देखे ॥ ६ ॥ मी माझिया विभूती । विभूतीं अधिष्ठिलिया व्यक्ती । हें आघवें योगें प्रतीती । एकचि मानी ॥ ७ ॥ म्हणौनि निःशंकें येणें महायोगें । मज मीनला मनाचेनि आंगें । एथ संशय करणें न लगे । तो त्रिशुद्धी जाहला ॥ ८ ॥ कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी । तयाचिये भजनाचे नोटीं । सूती मज ॥ ९ ॥ म्हणौनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ शंका नाहीं नये खंगु ।

**अन्वयार्थ**—**पूर्वे**–पूर्वींचे–**सप्त**–सात–**महर्षयः**–भृगु वगैरे महर्षी–**तथा**–तसेंच–**चत्वारः**–चार–**मनवः**–स्वायंभुवादि मनु हे सर्व–**मद्भावाः**–माझ्यामध्येंच भावना ठेवणारे असून–**मानसाः जाताः**–मी मनानेच उत्पन्न केलेले असे झाले आहेत–**येषां**–ज्यांच्या–**लोके**–या लोकांत–**इमाः प्रजाः**–या सर्व प्रजा आहेत ६.

तर सर्व गुणांनीं संपन्न, श्रेष्ठ व महर्षींमध्यें ज्ञाते असें जे कश्यपादि प्रख्यात सात ऋषि आहेत ९२. व आणखी जे मुळांत चौदा मनु आहेत, त्यांतील स्वायंभू आदि मुख्य श्रेष्ठ जे चार मनु, तेहि तुला सांगितलें जातील ९३. हे धनुर्धरा ! असें हे अकरा भाव सृष्टीच्या व्यवहाराकरितां म्हणून माझ्या मनापासून उत्पन्न झालेले आहेत ९४. जेव्हां लोकांची कांहीं व्यवस्था लागली नव्हती व या त्रिभुवनाची रचनाहि झाली नव्हती, तेव्हां पंचमहाभूतांचा समुदाय कार्य केल्याशिवाय जागचे जागींच मूळच्या स्थितींतच होता ९५. तेव्हां हे सात ऋषि व चार मनु उत्पन्न झाले व मग त्यांनी अष्टलोकपाल उत्पन्न करून त्यांना या सर्व जगतांत दिशांचे मुख्य स्वामी लोकनायक करून ठेविलें ९६. म्हणून हे उपर्युक्त अकराजण राजाप्रमाणें आहेत आणि इतर सर्व लोक ही त्यांची प्रजा आहे, अशा प्रकारें हा सर्व विश्वविस्तार माझाच आहे, असें समज ९७. हे पहा ! पहिल्या प्रथम बीज एकटेंच असतें; मग तेंच अंकुरित झाल्यावर त्याचाच बुड-बुंधा बनतो व बुंध्याला कोंभ निघालें कीं, त्याच्याच फांद्या होतात ९८. त्या फांद्यांपासून लहानमोठें पुष्कळ फाटे फुटून त्यांना कोंवळी पालवी व पानें येतात असें समज ९९. आणि पानें फुटल्यावर मग फुलें व फळें येतात. याप्रमाणें सर्व झाड तयार होतें, मग तें विचारपूर्वक कारणदृष्टीनें पाहूं लागल्यास सर्व झाड म्हणजे केवळ बीजच आहे, असें सिद्ध होतें १००. त्याचप्रमाणें अगदीं मुळारंभीं मी एकटाच होतों, नंतर तोच मी त्या मनास उत्पन्न करतां झालो व त्या मनापासून उपरिनिर्दिष्ट सात ऋषि आणि चार मनु उत्पन्न झाले १. मग त्यांनीं इन्द्रादि अष्टलोकपाल उत्पन्न केले व त्या लोकपालांनीं पुष्कळ प्रकारचें लोक उत्पन्न केले; आणि त्या लोकांपासूनहि सर्वच्या सर्व प्रजा उत्पन्न झाली २. याप्रमाणें खरोखर सर्व विश्वाचा विस्तार मीच झालो आहे; परंतु हे ज्यानें श्रद्धापूर्वक उपर्युक्त भाव, माझ्यापासून कसें निर्माण झालें आहेत, हे नीट जाणून घेतले आहे व त्याच दृष्टीनें जो पाहील त्यालाच समजणार आहे ३.

**अन्वयार्थ**—**यः**–जो–**मम**–माझ्या–**एतां विभूतिं**–या विभूतीला–**च**–व–**योगं**–घटनेला–**तत्त्वतः**–तत्त्वतः–**वेत्ति**–जाणतो–**सः**–तो–**अविकंपेन योगेन**–निश्चल योगानें–सम्यग्दर्शनाच्या स्थैर्यरूप योगानें–**युज्यते**–युक्त होतो–**अत्र**–यांत–**संशयः न**–कांहीं संशय नाहीं ७.

यास्तव, हे सुभद्रापते ! हे माझे वर सांगितलेले भाव व ह्या माझ्या विभूति आहेत व यांनीं हे सर्व जग व्यापलें आहे ४. म्हणून ब्रह्मदेवापासून आरंभ करून तो शेवट मुंगीपर्यंत याप्रमाणें माझ्याशिवाय दुसरी वस्तूच नाहीं ५. अशा रीतीनें माझ्या सत्यस्वरूपाला जो यथार्थ जाणतो त्यालाच खऱ्या ज्ञानाची जागृति झाली आहे, आणि म्हणूनच तो उत्तम, अधमपणाचें, अशा प्राण्यांतील भेदाचें द्वैत भ्रांतिरूप दुःस्वप्नहि पहांत नाहीं ६. मी व माझ्या विभूति आणि माझ्या विभूतींनी व्यापलेले प्राणि हे सर्व अनुभवानें एकच म्ह. परमात्मरूपच आहेत, असें जो जाणतो ७. म्हणून खरोखर या निःसंदेह ब्रह्मात्मक्यैज्ञानरूपी महायोगानें जो मनोवृत्तिद्वारां माझ्याशीं एकरूप झाला, तो खरोखर कृतार्थ झाला यांत संशय घेण्याचें कारणच नाहीं ८. कारण अर्जुना ! अशा अभेददृष्टीनें जो मला भजतो, त्याच्या भजनाच्या छंदांतच मीहि सहजच गोवला जातो ९. म्हणून

१ सर्वगुणी. २ ज्ञाते. ३ कश्यप, अत्रि, भारद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि वसिष्ठ. ४ चौदा मनूंतील स्वायंभुवादि मुख्य चार मनु. ५ स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस. ६ माझ्या मनापासून. ७ उत्पत्तीकरितां. ८ लागली नव्हती. ९ रचना झाली नव्हती. १० समुदाय. ११ अस्पष्ट विकारहीन. १२ इंद्रादिक. १३ श्रेष्ठ. १४ वाढल्यावर, अंकुर आल्यावर. १५ कारणदृष्टीनें विचार करून पाहतां. १६ बहुत प्रकारचें व्हावें ही इच्छा. १७ उत्पन्न केलें. १८ भावाच्या योगानें. १९ मानतें. २० वीस विकार. २१ अकरा विभूति. २२ ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत. २३ जागृती. २४ अनुभव. २५ ज्ञानयोगानें. २६ मला मिळालें. २७ मनाच्या योगानें. २८ सिद्ध, कृतार्थ. २९ ठिकाणीं, पत्त्यावर.

करितां ठेला तरी चांगु । तें सांगितलें षष्ठीं ॥ ११० ॥ तोचि अभेदु कैसा । हें जाणावया मानसा । सैाद जाली तरी परियेसा । बोलिजेल ॥ ११ ॥

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते । इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥

तरी मीचि एक सर्वां । या जगा जन्म पांडवा । आणि मजचिपासूनि आघवा । निर्वाहो यांचा ॥ १२ ॥ कल्लोळमाळा अनेगा । जन्म जळींचि पैं गा । आणि तयां जळचि आश्रयो तरंगा । जीवनही जळ ॥ १३ ॥ ऐसें आघवाचि ठायीं । तया जळचि जेवीं पाहीं । तैसा मीवांचूनि नाहीं । विश्वीं इये ॥ १४ ॥ ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेंथें । परि साँचोकारें उदितें । प्रेमभावें ॥ १५ ॥ देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न । जैसा वायु होऊन गगन । गगनींचि विचरे ॥ १६ ॥ ऐसेनि जे निजज्ञानी । खेळत सुखें त्रिभुवनीं । जगद्रूपा मनीं । सांठऊनि मातें ॥ १७ ॥ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥ १८ ॥

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् । कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥ ९ ॥

चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले । जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ॥ १९ ॥ मग तया बोधाचेनि माजे । नाचती संवादसुखाचीं भोजें । आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी ॥ १२० ॥ जैशीं जवळिकेंचीं सरोवरें । उचंबळलिया कालवंती परस्परें । मग तरंगासि धवळारें । तरंगचि होती ॥ २१ ॥ तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंदकल्लोळांची वेणी । तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥ २२ ॥ जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या क्षेमें दिधलें । ना तरी सरिसेनि पाडें मीनले । दोनी वोघ ॥ २३ ॥ तैसें प्रयाग होत सामरस्याचें । वरी वोसंण तरत सात्त्विकाचें । ते संवादचतुष्पथींचे । गणेश जाहले ॥ २४ ॥ तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गांवाबाहेरें । मियां धाले तेणें उद्गारें । लागती गाजों ॥ २५ ॥ पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाची वदंती । ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती सैंघ ॥ २६ ॥ जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे । दे राया रंका पारणें । आमोदाचें ॥ २७ ॥

असा अभेद बोधरूप जो भक्तियोग सांगितला याजविषयीं मुळींच शंका नाहीं व त्याचे आचरण करीत असतां कोणता व्यत्ययहि येत नाहीं. असें भक्तियोगानुष्ठान करीत असतां आयुष्य संपल्यामुळें तो मरण पावला, योगसिद्धीस प्राप्त झाला नाहीं तरीहि त्याच्यापासून मिळणारे फल उत्तमच आहे, हे सहाव्या अध्यायांत [ चाळीसाव्या श्लोकांत ] पूर्णपणें सांगितलेंच आहे ११०. तोच अभेदभक्ति योग कसा असतो हें जाणण्याची जर तुझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाली असेल तर सांगतों, ऐक ११.

**अन्वयार्थ**—**अहं**-मी वासुदेवसंज्ञक परब्रह्म-**सर्वस्य** सर्व जगाची-**प्रभवः**-उत्पत्ति आहे-**मत्तः**-मजपासून **सर्वं**-सर्व जगत्-**प्रवर्तते**-प्रवृत्त होतें-**इति**-असें-**मत्वा** समजून-**भावसमन्विताः**-परमार्थतत्त्वाविषयींच्या भावनेनें युक्त असलेलें-**बुधाः**-तत्त्ववेत्ते-**मां**-मला-**भजन्ते**-भजतात-माझी भक्तिसेवा करितात ८.

अर्जुना ! या सर्व जगास उत्पन्नकर्ता मीच आहे व त्या सर्वांची पालनात्मक स्थितिहि माझ्यापासूनच आहे. १२. अरे ज्याप्रमाणें अनेक लाटांच्या परंपरेचा जन्म पाण्यांतच होतो, त्या तरंगास आश्रयहि पाण्याचाच असतो, त्याचें जीवनहि पाणीच असतें; १३. याप्रमाणें पहा ! त्या लाटांना जसें सर्व स्थितींत एक पाणींच असतें त्याप्रमाणें या सर्व विश्वांत माझ्याशिवाय दुसरें असें कांहीं नाहीं १४. अशा प्रकारें मी सर्व व्यापक आहे असें जाणून जे वाटेल त्या ठिकाणीं-मला भजतात पण ते त्यांचें भजन खऱ्या उत्कंठेनें व प्रेमभावानें केलेलें असते १५. देशकालवर्तमान या सर्वांस माझ्या स्वरूपाशीं अभिन्न करून [ असें जाणून मला भजतात ]; ज्याप्रमाणें वायु हा आकाशरूप होऊन आकाशांतच संचार करतो १६. त्याप्रमाणें असे जे आत्मज्ञानी आहेत तें सर्वव्यापक असा जो मी, त्या मला मनांत सांठवून सुखानें त्रिभुवनांत खेळीमेळीनें कालक्रमणा करीत असतात; १७. आणि जो जो प्राणी दृष्टीस पडेल, तो तो भगवत् स्वरूप आहे, असे समजणें हा माझा खरा ' भक्तियोग ' आहे असें निश्चित समज १८.

**अन्वयार्थ**—[ **ते**-ते-माझे भक्त-तत्त्ववेत्ते ]-**मच्चित्ताः**-ज्यांचें चित्त मज-वासुदेवामध्यें आहे असे-**मद्गतप्राणाः**-माझ्यामध्येंच ज्यांचीं सर्व इंद्रियें आहेत असे होत्साते **परस्परं**-ते-**बोधयन्तः**-शिष्य आचार्यापासून ऐकलेलें भागवततत्त्व आपापसांत समजावून देत असतात-**च**-व-**मां**-मला-**नित्य**-सतत- **कथयन्तः**-ज्ञान-बल-वीर्यादिकांच्या योगानें विशिष्ट म्हणून सांगतात-**च**-आणि त्यामुळें-**तुष्यन्ति**-संतोष पावतात-**च**-व-**रमन्ति** रममाण होतात ९.

जे चित्तानें मद्रूपच झाले व माझ्याच सुखस्वरूपानुभवानें ज्यांचें प्राण तृप्त आहेत व जे यथार्थ बोधाच्या नादांत जिवंतपणाचें किंवा मरणाचें त्यांना भानहि नसतें १९. नंतर त्या बोधाच्या जोरावरच ते कौतुकानें दुसऱ्या ज्ञानी भक्ताबरोबर होणाऱ्या संवादसुखांत नाचूं लागतात, अशा स्थितींत त्या एकमेकांमधील देण्या-घेण्याचा व्यवहारहि ज्ञानाचाच होतो १२०. ज्याप्रमाणें जवळ जवळ असलेलें तलाव पाण्यानें भरून उसळले असतां त्यांचें पाणी एकमेकांत मिसळतें मग अशा स्थितींत लाटांना लाटांचीच घरें आश्रयभूत होतात २१. त्याप्रमाणें दोन ज्ञानी भक्त एके ठिकाणीं मिळालें असतां परस्परांमध्यें ब्रह्मानंदरूपी लाटांची वेणीच गुंफली जाते अशा स्थितींत आत्मबोध हा-आत्मबोधाचा अलंकार घालून आत्मबोधावरच शोभतो २२. ज्याप्रमाणें सूर्यानें सूर्यालाच ओंवाळावें, किंवा चंद्रानें चंद्रालाच आलिंगन द्यावें अथवा दोन ओघ सारख्या योग्यतेनें एकरूप होतात २३. [ दोन ज्ञानी भक्त एकत्र जमतात तेव्हां ] त्याप्रमाणें ब्रह्मात्मैक्यरसाचा संगम होतो. ऐक्यरसाच्याच पुरावर अष्ट-सात्विक भावरूपीं केरकचरा तरंगून वर आला म्हणजे ते ज्ञानी भक्त जणुं संवादरूपी-चव्हाट्यावरील श्रीगणेशच बनतात २४. तेव्हां या ब्रह्मानंदाच्या भरांत देहरूप गांवाच्या बाहेर धावूं लागून म्ह. देहभाव विसरून-माझ्या प्राप्तीमुळें संतोषित होऊन तृप्तीच्या मोठ्या आनंदानें गर्जना करूं लागतात २५. गुरुशिष्यांच्या एकान्तांत जो एकाक्षरी [ ॐ संज्ञक ब्रह्माचा ] मंत्र सांगतात, त्याचीच ते महात्मे मेघगर्जनेप्रमाणें तिन्ही लोकांत गर्जना करतात २६. ज्याप्रमाणें कमळाची कळी ही विकसित झाल्यावर आपल्यांतील मकरंदास झांकून ठेवूं शकत नाहीं, तर ती राजापासून तो रंकापर्यंत सर्वांना सारखी अशी आपल्या सुवासाची मेजवानी करिते २७.

१ बंद पडला. २ ध्वनि, इच्छा. ३ लाटा. ४ खऱ्या उत्कंठेनें. ५ संचार करितो. ६ प्रकारें. ७ आत्मज्ञानी. ८ संतोषातें पावलें. ९ कौतुकानें. १० मिळतात. ११ घरें. १२ आलिंगन. १३ सारख्या योग्यतेनें. १४ एकत्वाचें. १५ पुरांतील लांकडें, केरकचरा. १६ संवादरूप चार वाटांचे, चव्हाटयावरचें. १७ पुष्कळ. १८ विकसित झाल्यावर.

तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजीं विरंत । आंगें जीवें ॥ २८ ॥ ऐसें प्रेमाचेनि बहुवेंसपणें । नाहीं राती दिवो जाणणें । केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेयां जिहीं ॥ २९ ॥

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १० ॥

तयां मग जें आम्ही कांहीं । द्यावें अर्जुना पाहीं । ते ठायींचीच तिहीं । घेतली सेल ॥ १३० ॥ कां जे ते जिया वाटा । निगाले गा सुभटा । ते सोय पाहोनि अव्हांटा । स्वर्गापवर्ग ॥ ३१ ॥ म्हणौनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उँपाइलें । परि आम्हीं देयावें हेंहि केलें । तिहींची म्हणिपे ॥ ३२ ॥ आतां यावरी येतुलें घडे । जें तेंचि सुख आगळें वाढे । आणि काळाची दृष्टि न पडे । हें आम्हां करणें ॥ ३३ ॥ लळेयांचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी । जैसी खेळतां पाठोपाठीं । माउली धांवे ॥ ३४ ॥ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा करूनि ठेवी । तैसी उंपास्तीची पदवी । पोषित मी जायें ॥ ३५ ॥ जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें । हे पांळती मज विशेखें । आवडे करूं ॥ ३६ ॥ पैं गा भक्तासि माझें कोडें । मज तयाचे अनन्यगतीची चाड । कां जे प्रेमळांचें सांकेंड । आमुचिया घरीं ॥ ३७ ॥ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपांइले । दोन्ही मार्ग तयाचिये वाहेंणी केले । आम्हीं आंगही शेखीं वेंचिलें । लक्ष्मियेसीं ॥ ३८ ॥ परि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमळालागीं देख । ठेविलें जतन ॥ ३९ ॥ हा ठांयवरी किरीटी । आम्ही प्रेमंळु घेवों आपणयासाठीं । या बोलीं बोलिजत गोष्टी । तैसिया नव्हती गा ॥ १४० ॥

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

म्हणौनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मीवांचूनि वांवो । येर मानिलें जिहीं ॥ ४१ ॥ तयां तत्वज्ञां चोखटां । दिवी पोतेंसाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ॥ ४२ ॥ अज्ञानाचिये राती- । माजीं तमाचि मिळेंणी दाटती । तें नाशूनि घालीं परौती । तयां करीं नित्योदयो ॥ ४३ ॥ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें । तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों म्हणतसे ॥ ४४ ॥ हां हो जी अवधारा । भला केरु

त्या प्रमाणेंच जगतांत माझे गुण-गातात व त्या गाण्याच्या आनंदाच्या भरांत ते स्तब्ध राहतात, माझे वर्णन करण्याचेहि विसरतात अशा स्थितींत त्या विसरांत त्यांचे जीवभाव व देहभाव हे दोन्ही पूर्णतया हारपतात. २८. अशा प्रकारें प्रेमभरांत ज्यांना-रात्र व दिवस यांचे भानच नसते. कारण, माझे परिपूर्ण सुख त्यांनीं आत्मत्वानें घेतले आहे असें समज. २९.

**अन्वयार्थ-सततयुक्तानां**-सतत माझ्यामध्यें चित्ताला स्थिर केलेल्या-**प्रीतिपूर्वकं** - प्रीतिपूर्वक-मोठ्या प्रेमानें-**भजतां तेषां**-मला भजणाऱ्या त्यांना मी-**तं बुद्धियोगं**-तो बुद्धियोग-ज्ञानयोग - **ददामि**-देतो कीं-**येन** - त्याच्या योगानें-**ते**-ते-**मां**-मला-**उपयान्ति**-प्राप्त होतात १०.

त्यांना अर्जुना, आम्ही जें कांहीं निर्निमित्त प्रेम द्यावयाचें, तो शेलकाच वांटा ते आपल्या ठिकाणीं मी देण्याच्या अगोदरच घेतात. १३०. कारण, अर्जुना, ते ज्या मार्गानें माझ्याकडे येण्यास निघाले, त्या मार्गाच्या तुलनात्मक दृष्टीनें स्वर्ग व मोक्ष ह्या आडवांटा आहेत असें त्यांस वाटतें ३१. म्हणून त्यांनीं माझ्या ठिकाणीं जी प्रेमलक्षणात्मक भक्ति केली तेंच आमचे देणें होय. परंतु मी जे कांहीं त्यांस द्यावयाचे तें, ते भक्त अगोदरच आपल्या स्वाधीन करून घेतात; पण म्हणतात मात्र आम्ही दिलें म्हणून ३२. यावर एवढे घडेल कीं आतां माझ्या भक्तीचें जें प्रेमसुख तें जास्त वाढवावें व अशा माझ्या भक्तांवर काळाची दृष्टि न पडावी, याविषयीं मला जपलें पाहिजे, हे कर्तव्य मात्र आम्हांला करावें लागते ३३. हे किरीटी ! ज्याप्रमाणें आपले लाडके लेकरूं खेळत असतां आई त्याजवर प्रेमदृष्टीचे पांघरूण घालून त्या लेकराच्या मागोमाग धांवते ३४. ते बालक जो जो नवीन खेळ दाखवील-मागेल तो तो खेळ, ती आई त्या समोर सोन्याचा करून ठेवते, त्याप्रमाणें माझ्या भक्ताच्या उपासनेचा अधिकार व संप्रदाय मला पोषण करावा लागतो ३५. जे संप्रदाय व अधिकार वाढविल्यानें माझे भक्त मला सहज येऊन मिळतात ते संप्रदाय राखावे [ व विशेषेंकरून त्यांच्या उपासनेचा अधिकार वाढवावा ] हेंच मला आवडते ३६. भक्तांना माझी अत्यंत आवड असते; म्हणून मलाहि त्यांच्या अनन्यभावाची आवड असते; कारण, माझ्या घरीं प्रेमळ भक्तांचीच फार उणीव आहे ३७. हें पहा, वरवर स्वर्ग व मोक्ष असे दोन मार्ग [ वेगवेगळ्या अधिकाऱ्याकरितां ] उत्पन्न केले आहेत आणि लक्ष्मीसह मी आपले शरीर शेषाच्या स्वाधीन केले आहे; ३८. परंतु बाह्य शरीराव्यतिरिक्त जें एक अत्युत्कृष्ट सोलीव सुख-आत्मसुख-तें प्रेमळ भक्तांकरितां तसेंच राखून ठेवले आहे असें समज ३९. अर्जुना ! इतके आम्ही प्रेमळ भक्तांना आपलेपणा देऊन त्याच्या मोबदल्यांत प्रेमळ भक्त घेतो ह्या गोष्टी शब्दांत बोलून दाखविण्यासारख्या नाहींत, [ तर अनुभवानें समजणाऱ्या आहेत ] १४०.

**अन्वयार्थ-अहं**-मी-**तेषाम् एव अनुकंपार्थं**-त्यांच्यावरच दया करण्यासाठीं-**आत्मभावस्थः**-[**सन्**]-त्यांच्या अंतःकरणांत स्थिर होऊन-**भास्वता ज्ञानदीपेन**-तेजस्वी-दैदीप्यमान ज्ञानदीपानें-**अज्ञानजं तमः**-अज्ञानामुळें उत्पन्न झालेला अविवेक-**नाशयामि**-घालवितो ११.

म्हणून सर्वांचा आत्मा जो मी, त्या माझी प्रेमस्वरूप भक्ति हेंच आपल्या जगण्यास कारण ठरवून ज्यांनीं माझ्याशिवाय इतर सर्व वस्तु व्यर्थ मानल्या आहेत ४१. अर्जुना ! त्या शुद्ध आत्मज्ञानी भक्ताकरितां [ ज्ञानरूपी ] कापराची मशाल पाजळून मशालजी बनून त्यांच्या पुढे पुढें मीच चालतो ४२. कारण कीं, अज्ञानरूप रात्रींत त्याच्यापुढे गर्द अंधार येऊन मिळाला असता त्याचा नाश करून ती पलिकडे सारतो, त्या भक्तांकरितां मी नेहमीं ज्ञानरूपी सूर्याचा उदय करितो ४३. प्रेमळ भक्तांना प्रिय असा पुरुषोत्तम, जेव्हां याप्रमाणें बोलला, तेव्हां अर्जुन म्हणाला :-" देवा ! आज माझे सर्व मनोरथ पूर्ण होऊन मन शान्त झाले ! ४४. हे पहा महाराज ! आपण माझ्यावरील जन्ममरणात्मक संसाररूप

१ विरघळतात, रममाण होतात. २ आधिक्यानें. ३ पूर्ण. ४ उत्पन्न झाले. ५ आज्ञाधारक. ६ अधिक. ७ लाडक्या. ८ सोनुल्याचा. ९ उपासनेचा मार्ग. १० सहज सुखानें. ११ राखण. १२ आवड, प्रेम. १३ उणीव, दुष्काळ. १४ उत्पन्न झाले. १५ स्वाधीन. १६ शेषीं, शेषावर, शेखीं वेचिलें-शेषाला दिलें. १७ लक्ष्मीसह. १८ आपल्याशिवाय. [ माझ्या देहाशिवाय ] १९ येथपर्यंत. २० प्रेमळभक्ताला घेतो. २१ व्यर्थ. २२ कापुराची मशाल. २३ समुदाय.

फेडिला संसारा । जाहलों जननीजठरजोहरा-। वेगळा प्रभू ॥ ४५॥ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हातां चढलें । आवडतसें ॥ ४६ ॥ आजि आयुष्या उजवणें जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेंनि मुखें ॥ ४७॥ आतां येणें वेंचन तेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । म्हणौनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ॥ ४८ ॥

अर्जुन उवाच :—

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥

तरी होसी गा तूं परब्रह्म । जें या महभूतां विसंवतें धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ॥४९॥ तूं परम दैवत तिहीं देवां । तूं पुरुष जी पंचविसावा । दिव्य तूं प्रकृतिभांवा- । पैलीकडील ॥ १५० ॥ अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नोकळिजसी जन्मधर्मीं । तो तूं हें आम्ही । जाणितलें आतां ॥ ५१ ॥ तूं या काळत्रयासि सूत्री । तूं जीवकळेची अधिष्ठात्री । तूं ब्रह्मकटाहधात्री । हें कळलें फुडें ॥ ५२ ॥

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा । असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥

पैं आणिकही एक परी । इये प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूंतें ॥५३॥ परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । म्हणौनि देवा ॥५४॥ एऱ्हवीं नारदु अखंड जवळां ये । तोही ऐसेंचि वचनीं गाये । परि अर्थ न बुजोनि ठाये । गीतसुखाचि ऐकों ॥ ५५ ॥ जी आंधळेयांच्या गांवीं । आपणपें प्रगटलें रवी । तरी तिहीं वोतेंपलीचि घ्यावी । वांचूनि प्रकाशु कैंचा ? ॥ ५६ ॥ परि देवर्षि अध्यात्म गातां । आहाच रागांगेंसीं जे मधुरता । तेचि फावे येर चित्ता । नलगेचि कांहीं ॥५७॥ पैं असिता देवलाचेनि मुखें । मी एवंविधा तूतें आइकें । परी तैं बुद्धि विषयविखें । घारिली होती ॥ ५८ ॥ विषयविषाचा पडिपाडू । गोड परमार्थु लागे कडू । कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ॥५९॥ आणि हें आणिकांचें काय सांगावें । राउळा आपणचि येऊनि व्यासदेवें । तुझें स्वरूप आघवें । सर्वदा सांगिजे ॥ १६० ॥ परि तो अंधारीं चिंतामणि देखिला । जेवीं नव्हे या बुद्धी उपेक्षिला । पाठीं दिनोदयीं वोळखिला । होय म्हणौनि ॥६१॥

केर चांगला झाडून टाकला आणि प्रभो, त्यामुळें मी मातेच्या उदरांतील अग्निकुंडापासून म्ह. पुनर्जन्मापासून मुक्त झालों! ४५. अहो महाराज! आज हा माझा जन्म मी आपल्या डोळ्यांनीं पाहिला. श्रीगुरुशरणागति व आत्मबोध लाभ हा नवा जन्म होय व माझें जीवित आज माझ्या हातीं आलें असें मला वाटतें. म्ह. आपल्या उपदेशानें मी अजरामर–ब्रह्मरूप झालों ४६. प्रभो, आपल्या मुखांतून हें उपदेशामृत पूर्ण असें बोलणें ऐकून व कृपा लाभल्यानें माझ्या आयुष्याचें सार्थक झालें, आणि माझ्या दैवाचा भाग्योदय झाला! ४७. आतां या वचनरूप सूर्यप्रकाशानें माझ्या अंतर्बाह्य अज्ञानांधकाराचा नाश झाला, म्हणून मी आतां तुमचें यथार्थ स्वरूप पहात आहे ४८.

**अन्वयार्थ**––**भवान् परंब्रह्म**–आपण परमात्मा आहां –**परंधाम**–सर्वोत्तम तेज आहां,–**परमं पवित्रं**–परम अत्यन्त–पावन आहां, –**पुरुषं**–पुरुष–**शाश्वतं**–शाश्वत, नित्य–**दिव्यं**–दिव्य–**आदिदेवं** – सर्व देवांच्या आरंभीं झालेला देव, – **अजं** – अज, जन्मरहित – **विभुं** – विभु, अपरिच्छिन्न आहां १२.

यावर अर्जुन म्हणतोः–"तरी कृष्णा! आपण परब्रह्म आहां, व सर्व महाभूतांचें विश्रांतिस्थान असून पवित्र आणि सर्व जगाचे पालनकर्ते व श्रेष्ठ आहां ४९. तूं ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांचें पूज्य अधिदैवत आहेस; देवा! पंचविसावें तत्त्व जो पुरुष ते तूंच आहेस आणि मायेच्या पलीकडील जो दिव्य भाव, तोहि तूंच आहेस १५०. हे स्वामी! तुम्ही अनादि नित्यसिद्ध असून तुम्हांला जन्मादि धर्म नाहींत; असें तुम्ही आहां हें मला आतां समजलें ५१. तुम्ही तीन कालांचे चालक आहां, तुम्ही जीवकलेची मुख्य देवतां आहां, व तुम्ही ब्रह्मांडरूपी कढईस आश्रयभूत आहां, असें आतां मला निश्चित कळलें ५२.

**अन्वयार्थ**–[**इदृशम्**] **त्वां सर्वे ऋषयः आहुः**–अशा सर्व प्रकारचा तूं आहेस, असें वसिष्ठादिक सर्व ऋषि म्हणतात–**तथा**–त्याचप्रमाणें – **देवर्षिः नारदः** –देवर्षि नारद–**असितः देवलः**–असित देवलहि व **व्यासः**–व्यासहि असेंच म्हणतात – **च** – आणि–**स्वयंएव**–तूं स्वतःच–स्वतःहि–**मे**–मला–**ब्रवीषि**–असेंच [ स्वस्वरूपाविषयीं ] सांगतोस १३.

"हें पहा, आणखी दुसऱ्याहि एका तऱ्हेनें त्या अनुभूतीच्या खरेपणाविषयीं, थोरपणाविषयीं खात्री होते. ती अशी कीं, पूर्वीं तुमच्याविषयीं अशाच गोष्टी पुष्कळ थोर थोर ऋषींनीं सांगितल्या होत्या ५३. परंतु त्यांनीं सांगितल्याचा खरेपणा आज माझ्या अंतःकरणास कळून आला. पण तें सुद्धां तुम्ही कृपा केली म्हणूनच ५४. एऱ्हवीं नारदमुनी आमच्या घरीं नेहमीं येत असत, ते सुद्धां हेंच गात असत, पण त्यावेळीं त्याचा मार्मिक अर्थ न समजतां आम्ही फक्त गायनसुखाचाच अनुभव घेत होतों ५५. महाराज!–आंधळ्यांच्या गांवीं सूर्य जरी स्वतः प्रकट झाला, तरी त्यानी फक्त त्याच्या कोंवळ्या उन्हाचेंच सुख घ्यावें; बाकी त्यांला प्रकाश कसा दिसणार! ५६. त्याचप्रमाणें, नारद हे अध्यात्म गायन करीत असतां मला त्यांच्या रागरागिणींचें वरवरचे माधुर्यच तेवढें त्या वेळीं समजत असे दुसरें कांहीं समजत नसें ५७. त्याचप्रमाणें, असित व देवल या ऋषींच्या तोंडूनहि तुमचे याच प्रकारचे स्वरूप व गुणानुवाद मी ऐकत असें! परंतु त्या वेळेस माझी बुद्धि विषयरूप विषानें व्यापली होती ५८. विषयरूप विषाचा महिमा केवढा विलक्षण आहे पहा! वस्तुतः परमार्थ गोड असून तोच जिवास कडू लागतो व शब्दादि विषय स्वाभाविक कडू असून तेच जीवास गोड लागतात ५९. आणखी दुसऱ्याविषयीं काय सांगूं! परंतु सर्वश्रेष्ठ जे भगवान् व्यासमुनि, ते देखील स्वतः आमच्या राजवाड्यांत येऊन तुमच्या संपूर्ण स्वरूपाचें असेंच वर्णन करीत असत १६०. परंतु त्यांचा तो उपदेश म्हणजे एखाद्याला अंधारांत चिंतामणी सांपडून तो चिंतामणि नव्हे, या बुद्धीनें तो टाकून देतो, आणि मागाहून दिवस उगवल्यावर तोच चिंतामणि आहे म्हणून त्यास ओळख पटावी ६१. त्याप्रमाणें कृष्णा! व्यासादिक

१ हवें तसें. २ साफल्य. ३ देवाच्या मुखानें. ४ वचनरूपी सूर्यानें. ५ काळोख. ६ यथार्थ. ७ विश्रांतिस्थान. ८ ब्रह्मा, विष्णु, महेश यांना. ९ चोवीस तत्त्वांपलीकडचा. १० मायेच्या पलीकडचा विकार. ११ आकर्षिला जात नाहींस, सांपडत नाहींस. १२ काळरूप यंत्राचा. १३ सूत्रधार, चालक. १४ मुख्य देवता. १५ ब्रह्मांडाला आश्रयभूत, कढई. १६ स्पष्ट. १७ अनुभवावी. १८ राहे. १९ कोंवळें ऊन. २० आत्मज्ञान. २१ वरवरचं. २२ समजे. २३ या प्रकारच्या. २४ व्यापिली. २५ थोरीव. २६ घरीं. २७ टाकून दिली.

तैसीं व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी । परि उपेक्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ॥ ६२ ॥

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव । न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥

ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले । आणि ऋषीं मार्ग होते जे कथिले । तयां आघवियांचेंचि फिटलें । अनोळखपण ॥ ६३ ॥ जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल । माझीं हृदयभूमिके पडिले सखोल । वरि इये कृपेची जाहाली वोल । म्हणौनि संवाद फळेंशीं उठलें ॥ ६४ ॥ अहो नारदादिकां संतां । त्यांचिया उक्तिरूप सरितां । मी महोदधी जाहलों अनंता । संवादसुखाचा ॥ ६५ ॥ प्रभु आघवेनि येणें जन्में । जिंयें पुण्यें केलीं मियां उत्तमें । तयांचीं न ठकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ॥ ६६ ॥ एऱ्हवीं वडिलवडिलांचेनि मुखें । मी सदां तूंतें कानीं आइकें । परि कृपा न कीजेचि तुवां एकें । तंव नेणवेचि कांहीं ॥ ६७ ॥ म्हणौनि भाग्य जैं सानुकूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ । तैसे श्रुताधीत सकळ । गुरुकृपीं साच ॥ ६८ ॥ जी बनकरु झाडें सिंपी जीवें-सांटीं । पाढूनि जन्में काढी आटी । परि फळेंसीं तैंचि भेटी । जैं वसंतु पावे ॥ ६९ ॥ अहो विषमा जैं वोहट पडे । तैं मधुर ते मधुर आवडे । पैं रसायनें तैं गोडें । जैं आरोग्य देहीं ॥ १७० ॥ कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तैंचि सार्थकपण । जैं चैतन्य येऊनि आपण । संचरे माजीं ॥ ७१ ॥ तैसें शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें । तें तैंचि म्हणों ये आपुलें । जैं सानुकूल श्रीगुरु ॥ ७२ ॥ ऐसिये जालिये प्रतीतीचेनि माजें । अर्जुन निश्चयाचि नाचतुसे भोजें । तेवींचि म्हणे देवा तुझें । वाक्य मज मानलें ॥ ७३ ॥ तरि साचचि हें कैवल्यपती । मज त्रिशुद्धी आली प्रतीती । जे तूं देवदानवांचिये मती- । जोगा नव्हसी ॥ ७४ ॥ तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा । जो आपुलिया जाणे जाणिवा । तो कहींचि नोहे हें मद्भावा । भरंवसेनि आलें ॥ ७५ ॥

स्वयमेवाऽऽत्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम । भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

एथ आपुलें वाढपण जैसें । आपणचि जाणिजे आकाशें । कां मी येतुली घनवट ऐसें । पृथ्वीचि जाणे ॥ ७६ ॥ तैसा आपुलिये सर्वशक्ती । तुज तूंचि

मुनींचीं भाषणें म्हणजे मजपाशीं ज्ञानरूप रत्नांच्या खाणीप्रमाणें असून, तुमच्या उपदेशरूप सूर्याशिवाय मजकडून त्या अनादरानें टाकून दिल्या जात होत्या ६२.

**अन्वयार्थ—केशव**–हे केशवा !–**यत्**–जे–**मां**–मला **वदसि**–तूं सांगत आहेस–**एतत् सर्वं**–हे सर्व–**ऋतं**–खरें –**मन्ये**–मी समजतों–**भगवन्**–हे भगवन् !–**ते व्यक्तिं**– तुझ्या निरुपाधिक स्वरूपाला–**हि देवाः न विदुः**–खरोखर देव जाणत नाहींत व–**दानवाः न** [ **विदुः** ]–दानव जाणत नाहींत १४.

"ते आतां तुमचे वाक्यरूपी सूर्यकिरण माझ्या हृदयांत सर्वत्र फांकून ऋषींनीं सांगितलेल्या त्या मार्गाविषयींचे अज्ञान अर्थात् त्यांचा अपरिचितपणा पार नाहींसा झाला ६३. महाराज ! त्यांचे शब्द म्हणजे ज्ञानाचें बीज, तें माझ्या हृदयरूपी खोल जमिनींत पडलें होतें; पण आतां त्याला तुमची कृपारूप ओल मिळाली त्यामुळें त्यास संवादरूप फळें आली आहेत ६४. अहो अनंता ! नारदादिक संतांच्या भाषणरूपी नद्यांस, तुमचा व माझा जो संवाद त्या संवादरूपी सुखाचा मी समुद्र झालों ६५. हे प्रभो ! सद्गुरो ! ! मी जन्मजन्मांतरीं जीं जीं उत्तम पुण्यें केलीं होतीं त्यांनीं तुमची म्ह. योग्य सद्गुरूंची प्राप्ति करून देऊन ती आज माझ्या ऋणांतून मुक्त झालीं, त्यांचेवर माझी कामगिरी राहिली नाहीं ६६. एऱ्हवीं, वाडवडिलांच्या मुखांतून तुमचे गुणानुवाद माझ्या कानीं नेहमीं पडत असत; परंतु जोपर्यंत तुम्ही एकल्याने कृपा केली नव्हती, तोपर्यंत त्याजविषयीं मी कांहींच ओळखलें नव्हतें ६७. म्हणून नशीब जेव्हां अतीव अनुकूल होतें तेव्हांच सर्व केलेले उद्योग सफळ होतात, त्याप्रमाणें श्रीगुरुकृपा झाली म्हणजे ऐकलेलें व अध्ययन केलेलें सर्व खरें आहे, असें फल-पर्यवसित झाल्याचे रूपानें अनुभवास येतें ६८. महाराज ! जसा माळी ज्या झाडांना पाणी घालून त्या झाडांविषयीं आपल्या जिवापाड मेहनत करून जन्म काढतो; पण जेव्हां वसंतऋतु येतो त्याचवेळीं फळें येऊन त्यांची प्राप्ति होते ६९. अहो ! जेव्हां विषमज्वराला उतार पडतो तेव्हांच गोड असलेले पदार्थ गोड लागतात. हे पहा, जेव्हां देहांत आरोग्य येतें, तेव्हांच घेतलेले औषध चांगलें परिणाम-कारक असल्याचें ठरतें १७०. किंवा इन्द्रियें, वाचा व प्राण यांचे तेव्हांच खरें, सार्थक होतें, जेव्हां चैतन्य येऊन देहांत स्वतः संचार करतें ७१. तसें सर्व अभ्यास-लेलीं वेदशास्त्रें अथवा अभ्यासलेलीं योगादिक साधनें जेव्हां प्रसन्नतेनें श्रीगुरूंची कृपा होईल तेव्हांच ती आपली आहेत असे म्हणता येते म्ह. त्यांचे सार्थक होते ७२. याप्रमाणें अनुभव आल्यामुळें अर्जुन निश्चयपूर्वक संतोषानें नाचूं लागला व देवास म्हणाला कीं, "देवा ! तुमचें बोलणें माझ्या प्रत्ययास आलें" ७३. तेव्हां हें मुक्तिदात्या श्रीकृष्णा ! मला खरोखर असा अनुभव आला आहे कीं, तुम्ही देव व राक्षस यांच्या बुद्धींना आकलन होण्याजोगे नाहीं ७४. देवा ! तुमच्या उपदेशाचा अनु-भव न येतां अगोदरच जो आपल्याच ज्ञानाच्या जोरावर तुम्हाला जाणले असें म्हणतो, तर तसें जीवबुद्धीच्या सामर्थ्यावर जाणले जाणारें तुम्ही केव्हांच नाहीं, असें माझ्या अनुभवाला पक्के [खात्रीपूर्वक] आले आहे ७५.

**अन्वयार्थ—हे पुरुषोत्तम**–हे पुरुषोत्तमा ! –**भूत-भावन**–हे भूतांना उत्पन्न करणाऱ्या–**भूतेश**–हे भूतांच्या नियामका !–**देवदेव**–हे देवांच्याहि देवा !–**जगत्पते**– हे जगत्पालका !–**त्वं**–तूं–**स्वयम् एव**–स्वतःच–**आत्मना** –ज्ञानरूपानें–**आत्मानं**–निरतिशय ज्ञानैश्वर्यसंपन्न अशा स्वतःला–**वेत्थ**–जाणतोस १५.

ज्याप्रमाणें आकाशाचें स्वतःचें मोठेपण आका-शालाच स्वतःला समजतें किंवा मी एवढी भरीव आहे हें प्रमाण पृथ्वीचें पृथ्वीलाच समजतें ७६. त्याप्रमाणें

---

१ तत्त्वज्ञानरूप रत्नांच्या. २ वाक्यरूपी सूर्यकिरण. ३ अज्ञानपण. ४ फार खोल, गूढ. ५ एकवाक्यतारूपी फळ. ६ नद्यांना. ७ जीं जीं. ८ तुझे गुणानुवाद. ९ उद्योग. १० ऐकिलेलें व अध्ययन केलेलें. ११ गुरुकृपेनें. १२ माळी. १३ जिवापाड. १४ श्रम. १५ विषमज्वराला. १६ उतार. १७ वेदशास्त्रादि. १८ अभ्यासिलें. १९ सोंगें. २० खरेंच. २१ मुक्तिदात्या श्रीकृष्णा. २२ बुद्धीनें जाणण्याजोगा. २३ अनु-भवाला. २४ ज्ञानानें. २५ माझ्या अनुभवाला. २६ मोठेपणा.

जाणसी लक्ष्मीपती । येर वेदादिक मती । मिरवती वायां ॥ ७७ ॥ हां गगनातें मागां सांडावें । पवनातें वोवीं मवावें । आदिशून्य तरोनि जावें । केउतें बाहीं ॥ ७८ ॥ तैसें हें तुझें जाणणें आहे । म्हणौनि कोणाही ठाउकें नोहे । आतां तुझें ज्ञान होये । तुजचिजोगें ॥ ७९ ॥ जी आपणयातें तूंचि जाणसी । आणिकातें सांगावयाही समर्थ होसी । तरी आतां एक वेळ घाम पुसीं । आर्तीचिये निडेळींचा ॥ १८० ॥ हें आइकिलें कीं भूतभावना । त्रिभुवनगजपंचानना । सकळदेवदेवतार्चना । जगन्नायका ॥ ८१ ॥ जरी थोरी तुझी पाहात आहों । तरी पांसीं उभे ठाकावयांही योग्य नोहों । या शोच्यता जरी विनवूं बिहों । तरी आन उपायो नाहीं ॥ ८२ ॥ भरले समुद्र सरिता चहूंकडे । परि ते बापियांसि कोरडे । कां जें मेघौनि थेंबुटा पडे । तें पाणी कीं तया ॥ ८३ ॥ तैसे श्रीगुरु सर्वत्र आथी । परि कृष्णा आम्हां तूंचि गती । हें असो मजप्रती । विभूती सांगें ॥ ८४ ॥

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः । याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

जी तुझिया विभूती आघविया । परि व्यापिती शक्ति दिव्या जिया । तिया आपुलिया दावाविया । आपण मज ॥ ८५ ॥ जिहीं विभूतीं ययां समस्तां । लोकांतें व्यापूनि आहासी अनंता । तिया प्रधाना नामांकिता । प्रगटा करीं ॥ ८६ ॥

कथं विद्यामहं योगींस्त्वां सदा परिचिन्तयन् । केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥

जी कैसें मियां जाणावें । काय जाणोनि सदा चिंतावें । जरी तूंचि म्हणों आघवें । तरि चिंतनचि न घडे ॥ ८७ ॥ म्हणौनि मागां भाव जैसे । आपुले सांगितले तुवां उद्देशें । आतां विस्तारोनि तैसे । एक वेळ बोलें ॥ ८८ ॥ जया जया भावाचिया ठायीं । तूंतें चिंतितां मज सायासु नाहीं । तो विवंळ करूनि देईं । योगु आपुला ॥ ८९ ॥

विस्तरेणाऽऽत्मनो योगं विभूतिं च जनार्दन । भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

आणि पुसालिया जिया विभूती । त्याही बोलाविया भूतपती । येथ म्हणसी जरी पुढती । काय सांगों ? ॥ १९० ॥ तरी हा भाव मना । झणें जाय हो जनार्दना । पैं प्राकृताही अमृतपाना । ना न म्हणवे जेवीं ॥ ९१ ॥ जे काळकूटाचें सहोदरें । जें मृत्यूभेणें प्याले अमर । तरि दिहांचे पुरंदरें । चौदा जाती ॥ ९२ ॥ ऐसा

हें लक्ष्मीपते, तुमची सर्व शक्ति तुम्हीच जाणतां. एऱ्हवीं तुमची शक्ति आम्हांला कळली असा, इतर जे वेदादिक ते व्यर्थ बढाईपूर्वक गर्व वाहतात ७७. अहो! सर्वांत चंचल अशा मनाच्या गतीलाहि शर्यतींत कसें मागें टाकावें? वाऱ्याला बाहा पसरून वावेंत कसें धरावें? आणि आपल्या बाहूंनीं माया कशी तरून जावी? ७८. त्याचप्रमाणें, तुमचें ज्ञान होणें फार दुस्तर आहे, म्हणून तें कोणाला होत नाहीं, तर तुमचें ज्ञान तुम्हांलाच होण्याजोगें आहे ७९. महाराज! तुमचें स्वरूपास तुम्हीच जाणता व तें ज्ञान आपणच दुसऱ्यांनाहि समजून देण्यास समर्थ आहां, तर एकदां आमच्या हौसेच्या तीव्र इच्छारूपी कपाळाचा घाम पुसून टाका बरें! श्रवणेच्छा पूर्ण करा १८०. अहो! प्राणिमात्रांचे उत्पादक! अहो त्रिभुवनात्मक संसाररूपी गजाचा नाश करणाऱ्या पंचानना! म्हणजे सिंहा! अहो सर्व देवदेवतांना पूज्य असणाऱ्या जगदधिपते श्रीकृष्णा! आपण हें ऐकलें कां? ८१. तुमच्या स्वरूपाच्या मोठेपणाचा विचार केला तर तुमच्याजवळ उभें राहण्यासहि आम्ही योग्य नाहीं, अशी शंका येऊन वाईट वाटून जर आम्ही तुमची विनंति केली नाहीं, तर आमच्या मनाच्या समाधानाला तुमचे स्वरूपास जाणण्याचा, याविना दुसरा उपाय नाहीं ८२. चोहींकडे समुद्र व नद्या जरी पाण्यानें तुडुंब भरलेल्या आहेत, तरी चातकांस त्यांचा काय उपयोग? कारण त्याला ते ठणठणीत कोरडेच! जेव्हां खास मेघांचे थेंब [ जमिनीवर न पडतां त्याचें तोंडांत ] पडतील तेव्हांच त्याला पाणी पिण्यास मिळेल ८३. त्याचप्रमाणें कृष्णा! जगतांत जरी चोहींकडे-घरोघर गुरु आहेत, तरी आज तुम्हीच आश्रयस्थान आहांत, आम्हांला तुमच्यावांचून गुरु नाहीं. हें असो, आतां मला तुमच्या विभूति सांगा ८४.

**अन्वयार्थ**--**याभिः विभूतिभिः**--ज्या विभूतींनीं-**त्वं**-तूं-**इमान् लोकान्**-या लोकांस-**व्याप्य**-व्यापून **तिष्ठसि**-राहतोस-[ **ताः** ]-**दिव्याः आत्मविभूतयः हि** त्या आपल्या दिव्य विभूति खरोखर-**अशेषेण**-संपूर्णपणें-**वक्तुम् अर्हसि**-सांगण्यास तूं योग्य आहेस १६.

"महाराज,! आपल्या ज्या कांहीं सर्व विभूति असतील त्यांतून जेवढ्या व्यापक, शक्तिमान् व सतेज अशा आहेत त्या तेवढ्या तरी तुम्ही मला दाखवाव्यात ८५. हें अनंता! ज्या तुमच्या विभूतींनीं तिन्ही लोकांना व्यापून टाकले आहे, त्यांतील मुख्य मुख्य व नांवाजलेल्या विभूति असतील त्या सांगा ८६.

**अन्वयार्थ**--**योगिन्**-हे योगिन्!-**त्वां**-तुझें-**सदा-परिचिन्तयन् अहं**-सर्वदा चिंतन करणाऱ्या मीं-[ **त्वां**-तुला ]-**कथं**-कसें बरें-**विद्याम्**-जाणावें--**भगवन्**--**हे** भगवन्!-**केषु केषु च भावेषु**-कोणकोणत्या भावांमध्यें-पदार्थामध्यें-**मया**-मजकडून-**चिन्त्यः असि** [ तूं ]-चिन्त्य-चिंतन करण्यास योग्य आहेस? [ ते सांगा ] १७.

"हे महाराज! मी तुम्हांला कसें जाणावें? व नेहमीं कशा रूपानें जाणून चिंतन करावें? बरें जर सर्व तुम्हींच आहां, असें म्हणावें तर माझ्याकडून तुमचें चिंतनच होणार नाहीं ८७. म्हणून पूर्वीं [सातव्या, नवव्या अध्यायांत व या अध्यायाचे आरंभीं] ज्या संक्षेपानें आपल्या विभूति सांगितल्या, त्यांचाच आतां विस्तार करून एक वेळ सांगा ८८. ज्या ज्या विभूतींच्या ठिकाणीं तुम्ही आहां असें समजून चिंतन केलें असतां मला श्रम वा अडचण पडणार नाहीं, असा तुमच्या प्राप्तीचा उपायभूत जो आपला 'विभूति योग' तो स्पष्ट करून मला सांगा ८९.

**अन्वयार्थ**--**जनार्दन**--हे जनार्दना!--**आत्मनः**-तुझे आत्म्याचे-**योगं**-विस्तार-विशेष प्रकारचें योगैश्वर्य-**च**-व-**विभूतिं**-ध्यानास योग्य असलेल्या पदार्थांचा विस्तार-**विस्तरेण**-सविस्तर--**भूयः**--पुनरपि--**कथय**-सांग-**हि**-कारण-**अमृतं शृण्वतः मे**-वाक्यामृत ऐकणाऱ्या माझी-**तृप्तिः**-तृप्ति **नास्ति**-होत नाहीं १८.

"हे भूतपते, मी ज्या विभूतीबद्दल तुम्हांला विचारलें आहे त्या सांगा, त्यांत याप्रसंगीं त्याच त्या पुनः काय सांगावयाच्या आहेत, असें जर कदाचित् म्हणाल, १९०. तर हे जनार्दना, असा भाव मनांत कदाचित् येईल पण येऊं देऊं नका. कारण, जगांतील साधारण असलेलें जे अमृतपान त्यालाहि पुरे असें कोणाच्यानें म्हणवत नाहीं ९१. जें अमृत कालकूट विषाचें सख्खे भावंड आहे, तें मरणाच्या भीतीनें देवांनीं प्राशन केलें तरी सुद्धां ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र होतात व लयहि पावतात! ९२. क्षीराब्धींचा असा कोणी एक द्रवस्वरूप रस आहे कीं, ज्याला व्यर्थच

१ गर्व वहातात. २ वावांनीं मोजावें. ३ माया, अव्यक्त. ४ बाहूंनीं. ५ श्रमलेल्या. ६ कपाळाचा. ७ जग उत्पन्न करणाऱ्या. ८ संसाररूपी हत्तीला मरणाऱ्या सिंहा. ९ ओळखतो. १० जवळ. ११ उभे राहण्यास. १२ दीनतेनें, संकटानें. १३ भिऊं. १४ दुसरा. १५ चातकाला. १६ अवतार, मूर्ति. १७ श्रेष्ठ, मुख्य. १८ घर्मे. १९ स्पष्ट. २० प्राप्तीचा योग, युक्ति. २१ येऊं देऊं नका. २२ भावंड. २३ देव. २४ दिवसांचे. २५ इंद्र.

कवण एक क्षीराब्धीचा रसु । जया वायांचि अमृतपणाचा आभासु । तयाचाही मीठांशु । जे पुरे म्हणों नेदी ॥ ९३ ॥ तया पाबळेयाही येतुलेवरी । गोडियेचि आथि थोरी । मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें ॥ ९४ ॥ जें मंदराचळु नँ ढाळितां । क्षीरसागरु नें डहुळितां । अनादि स्वभावता । आइतें आहे ॥ ९५ ॥ जें द्रवे ना नव्हे बँद्ध । जेथ नेणिजती रस गंध । जें भलतयांही सिद्ध । आठवलेंचि फावे ॥ ९६ ॥ जयाची गोठीचि ऐकंतखेंवो । आघवा संसारु होय वींवो । बळियें नित्यंता लागे येवों । आपणपेंया ॥ ९७ ॥ जन्ममृत्यूची भाखँ । हारपोनि जाय निःशेख । आंत बाहेरी महासुख । वाढोंचि लागे ॥ ९८ ॥ मग दैवगत्या जरी सेविजे । तरी तें आपणचि होऊनि ठाकिजे । तें तुजें देतां चित्त माझें । पुरें म्हणों न शके ॥ ९९ ॥ तुझें नामचि आम्हां आवडे । वरि भेटी होय आणि जैवळिक जोडे । पाठीं गोठी सांगसी सुरवाडें । आनंदाचेनी ॥ २०० ॥ आतां हें सुख कायिसयासारिखें । कांहीं निर्वचेनें मज परितोखें । तरि येतुलें जाणें जे येणें मुखें । पुनरुक्तेंही हो ॥ १ ॥ हां गा सूर्य काय शिळा ? । अग्नि म्हणों येत आहे वोंविळा ? । कां नित्य वाहातया गंगाजळा । पौरसेपण असे ? ॥ २ ॥ तुवां स्वमुखें जें बोलिलें । हें आम्ही नौदासि रूप देखिलें । आजि चंदनतरूचीं फुलें । तुरंबीतें आहों मां ॥ ३ ॥ तया पार्थाचिया बोला । सर्वांगें श्रीकृष्ण डोलला । म्हणे भक्तिज्ञानासि जाहला । आगरु हा ॥४॥ ऐसा पतिकरौचिया तोषा आंतु । प्रेमाचा वेगु उचंबळतु । सायासें सांवरूनि अनंतु । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच :—

हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः । प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

मी पितामहोंचा पिता । हें आठवितांही नाठवे चित्ता । कीं म्हणतसे बा पंडुसुता । भलें केलें ॥ ६ ॥ अर्जुनातें बा म्हणे एथ कांहीं । आम्हां विस्मो करावया कारण नाहीं । आंगें तो लेंकरूं काई । नव्हेचि नंदाचें ? ॥ ७ ॥ परि प्रस्तुत ऐसें असो । हें करवी आवडीचा अतिसो । मग म्हणे आइकें सांगतसों । धर्नुधरा ॥८॥ तरी तुवां पुसलिया विभूती । तयांचें अपारपण सुभद्रापती । ज्या माझियाचि परि माझिये मती । आकळंती ना ॥ ९ ॥ आंगींचिया रोमा किती । जयाचिया

अमृतपणाच्या आभासामुळें अमृत हे नांव प्राप्त झालें आहे.पण तेंहि सेवन करतांना 'हे पुरे बुवा!' असें कोणाच्यानेंहि म्हणवत नाहीं ९३. असा त्या तुच्छ दर्जाच्या अमृताच्या गोडीचा जर एवढा महिमा आहे, तर मग असें पहा कीं, हें तुमचे बोलणें तर खरोखरच परमामृत आहे ९४. हें परमामृत तर मंदराचलास न हालवितां, क्षीरसागर न घुसळितां अनादि असून स्वभावतः, स्वयमेव नित्यसिद्ध आहे ९५. जें परमामृत पातळ नाहीं व घट्टहि नाहीं व ज्याच्या ठिकाणची गोडी व सुवासही माहीत पडत नाहींत व हें परमामृत आठवण करण्याबरोबर वाटेल त्याला प्राप्त होतें, अनुभवास येतें ९६. याची नुसती गोष्ट ऐकतांक्षणींच सर्व संसाराचा निरास होऊन तो मिथ्या वाटूं लागतो व यामुळें अढळ, अचल अशी नित्यता सहज आपल्याच ठिकाणीं प्राप्त होतें ९७. शिवाय याच्या योगानें जन्ममृत्यूंची वार्ता समूळ नाहींशी होते व अंतर्बाह्य ब्रह्मस्वरूप महासुखाची वाढच होते ९८. मग दैवयोगानें जर तें सेवन केलें तर त्यामुळें सेवन करणारा आत्मरूपच होऊन राहतो, अशा प्रकारचें जें तुमचें परमामृत, तें तुम्ही मला पाजीत असतां माझें चित्त 'पुरे' म्हणूं शकत नाहीं ९९. फार काय सांगावें !! आधीं तुमचें नांवच मला आवडतें, त्यांतहि तुमची भेट होऊन सान्निध्य-सहवास घडला आहे व तशांत आनंदयुक्त होऊन तुम्ही बोधाच्या गोष्टीहि सांगत आहांत २००. तेव्हां आतां तें सुख कशासारखें आहे म्हणून म्हणावें तर याजबद्दल माझ्यानें कांहींच सांगवत नाहीं, परंतु मला फार संतोष होत आहे खरे. तसेंच मला असें मात्र वाटतें कीं, तुमच्या मुखानें पुनः एक वेळ ऐकावें. मग त्यांत विभूती सांगण्याची पुनरुक्ति झाली तरींहि हरकत नाहीं १. [ कदाचित् तुमच्या मनांत शंका येईल कीं, एकवार सांगितलेलें पुनः कसें सांगावें ? ] तर महाराज ! असें पहा, दररोज उगवतो म्हणून सूर्यास वा सूर्याच्या प्रकाशाला शिळा म्हणतां येईल काय ? अग्नीला ओंवळा म्हणतां येईल काय ? किंवा अखंड वाहणाऱ्या गंगोदकास पारोसेंपणा येतो, असें आहे काय ? २. तुम्ही आपल्या मुखानें जें ज्ञान सांगितलें,तें ऐकून आम्हांला असें वाटलें कीं, नादब्रह्मच मूर्तिमंत आमच्यापुढें उभें असल्याचें पाहिलें आहे; तसेंच या बोधाच्या गोष्टी ऐकणें म्हणजे, दुर्मिळ अशा चंदनाच्या फुलांचा आम्ही आज सुवास घेत आहों ना ! " ३. अर्जुनाचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण सर्वांगानें डोलूं लागलें आणि म्हणाले:–' आज हा पार्थ भक्ति व ज्ञान यांचे चांगले आगरच झाला आहे ' ४. याप्रमाणें आपला आवडता भक्त अर्जुन याला जो आनंद झाला, तो पाहून देवांनाहि प्रेमाचा वेग आला; परंतु तो कष्टानें आंवरून धरून श्रीअनंत काय बोलूं लागलें ! ५.

**अन्वयार्थ–हन्त**–बरें आहे–[**तात**–बाबारे!] आतां मी **ते**–तुला–**दिव्याः आत्मविभूतयः**–दिव्य आत्मविभूति–**प्राधान्यतः**–मुख्यमुख्यच–**कथयिष्यामि**–सांगेन–**हि** कारण–**कुरुश्रेष्ठ**–हे कुरुकुलांतील श्रेष्ठा !–**मे विस्तरस्य** माझ्या विस्ताराचा–**अन्तः**–अंत **नास्ति**–नाहीं १९.

देवाला मी ब्रह्मदेवाचा बाप आहे हे माहीत असूनहि त्याची आठवण त्यास होईना. भगवान् एकदम म्हणाले, "बापा अर्जुना ! फार चांगलें केलें" ६. [ श्रीज्ञानेश म्हणतात ] आतां भगवंतांनीं अर्जुनाला त्याप्रसंगीं 'बापा' असें म्हटलें म्हणून आपणांस आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. कारण कीं, भगवान् स्वतः नंदपुत्र होऊन खेळ खेळले नाहींत काय ? ७. पण सध्यां तें असो; हें सर्व आवडीच्या पराकाष्ठेनें घडत असतें. मग भगवान् म्हणाले हे धनुर्धरा ! मी सांगतों, तें ऐक ८. हे सुभद्रापते! तूं ज्या माझ्या विभूतींबद्दल विचारलेस त्या इतक्या असंख्य, अगणित आहेत कीं, त्या जरी माझ्याच आहेत तरी माझ्याहि बुद्धीनें त्याची गणना करून मला आकलन करितां येत नाहींत ९. ज्याप्रमाणें आपल्या

१ तुच्छालाहि, नाशवंतालाहि. २ ज्ञानामृत. ३ खरें. ४ न हालवितां. ५ न घुसळतां. ६ पातळ होत नाहीं. ७ घट्ट. ८ पाहिजेत त्याला. ९ प्राप्त होते. १० ऐकतो क्षणींच, ११ मिथ्या. १२ बळकट. १३ अविनाशीपण. १४ वार्ता, भाषा बोली. १५ तूं समर्थ देत असतां. १६ सहवास, सांनिध्य. १७ आनंदानें, सुखानें. १८ बोलवेना. १९ संतोषानें. २० पुनः बोललेलें होईल. २१ शिळेपणा. २२ जें ज्ञान. २३ नादब्रह्माचें. २४ हुंगीत. २५ मला, स्थान. २६ अनुभवाच्या. २७ ब्रह्मदेवाच्या. २८ आश्चर्य. २९ आधिक्य. ३० गणना करतां येत नाहीं.

तयासि न गणवती। तैसिया माझिया विभूती। असंख्य मज ॥ २१० ॥ एऱ्हवीं तरी मी कैसा केवढा। म्हणौनि आपणपयांही नव्हेचि फुडा। यालागीं प्रधाना जिया रूढा। तिया आइकें ॥ ११ ॥ जिया जाणतलियासाठीं। आघवीया जाणवतील किरीटी। जैसें बीज आलिया मुठीं। तरूचि आला होय ॥ १२ ॥ कां उद्यान हाता चढिन्नलें। तरी आपैसीं सांपडलीं फळें फुलें। तेवीं देखिलिया जिया देखवलें। विश्व सकळ ॥ १३ ॥ एऱ्हवीं साचचि गा धनुर्धरा। नाहीं शेवटु माझिया विस्तारा। पैं गगना ऐशिया अपारा। मजमाजीं लपणें ॥ १४ ॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः। अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥ २० ॥

आइकें कुटिलालकमस्तका। धनुर्वेदत्र्यंबका। मी आत्मा असें एकेका। भूतामात्राच्या ठायीं ॥ १५ ॥ आंतुलीकडे मीचि यांचे अंतःकरणीं। भूतांबाहेरी माझीच गंवसणी। आदि मी निर्वाणीं। मध्यही मीचि ॥ १६ ॥ जैसें मेघां या तैळीं वरी। एक आकाशचि आंत बाहेरी। आणि आकाशींचि जाले अवधारीं। असणेंही आकाशीं ॥ १७ ॥ पांठीं लया जे वेळीं जाती। ते वेळीं आकाशचि होऊनि ठाती। तेवीं आदि स्थिती गती। भूतांसि मी ॥ १८ ॥ ऐसें बहुवस आणि व्यापकपण। माझें विभूतियोगें जाण। तरी जीवचि करूनि श्रवण। आइकोनि आइक ॥ १९ ॥ याहीवरी त्या विभूती। सांगणें ठेलें सुभद्रापती। सांगेन म्हाणितलें तुजप्रती। त्या प्रधाना आइकें ॥ २२० ॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्। मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

हें बोलोनि तो कृपावंतु। म्हणे विष्णु मी आदित्यांआंतु। रवी मी रश्मिवंतु। सुप्रभांमाजीं ॥ २१ ॥ मरुद्गणांच्या वर्गीं। मरीचि म्हणे मी शार्ङ्गी। चंद्रु मी गगनरंगीं। तारांमाजीं ॥ २२ ॥

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः। इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

वेदांआंतु सामवेदु। तो मी म्हणे गोविंदु। देवांमाजीं मरुद्बंधु। महेंद्रु तो मी ॥ २३ ॥ इंद्रियांमाजीं अकरावें। मन तें मी हें जाणावें। भूतांमाजीं स्वभावें। चेतना ते मी ॥ २४ ॥

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम। वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥

अंगावरील केस वा लव किती आहे हे ज्याचे त्यासहि मोजतां येत नाहीं, त्याचप्रमाणें माझ्याच विभूति असून त्या मलाहि मोजतां येत नाहींत २१०. एऱ्हवीं देखील तत्त्वतः मीं कसा व केवढा आहें, हें माझें मलाच नक्की कळत नाहीं. याकरितां माझ्या मुख्य मुख्य विभूति कीं, ज्या प्रसिद्ध आहेत, त्याच तेवढ्या ऐक ११. हे किरीटी! त्या जाणल्या असतां इतर सर्व विभूति जाणल्या सारख्या होतील, ज्याप्रमाणें झाडाचें बीं हातीं आलें असतां झाडच हातीं आल्याप्रमाणें होतें; १२. किंवा बाग हातीं आल्यावर आपोआप फळें व फुलें सहजच हातीं लागतात, त्याप्रमाणें त्या विभूति जाणल्या असतां सर्व विश्व जाणल्याप्रमाणें होतें १३. हे धनुर्धरा! बाकी खरोखर माझ्या विस्ताराचा–व्याप्तीचा अंत नाहीं, हें पहा, गगनासारखे मोठमोठे पदार्थहि माझ्या ठिकाणीं कोणीकडे लपून जातात त्याचा पत्ताहि लागत नाहीं. एवढा माझा विस्तार आहे १४.

**अन्वयार्थ**—**गुडाकेश**–हे अर्जुना!-**अहं**–मी –**सर्वभूताशयस्थितः**–सर्व प्राण्यांच्या हृदयांत स्थित असलेला -**आत्मा**–आहें-**च**–आणि-**अहं**–मी-**भूतानां**–सर्व भूतांचा-**आदिः**–आदि म्ह० कारण–**च मध्यं**–व मध्य म्ह० स्थिती –**च अन्तः एव**–व अंत म्ह० प्रलय आहें २०.

कुरळे केश मस्तकीं धारण करणाऱ्या व धनुर्विद्येंत शिवाप्रमाणें प्रवीण–निष्णात असणाऱ्या अशा अर्जुना! ऐक. प्रत्येक प्राणीमात्राच्या ठिकाणीं जो आत्मा आहे, तो मी आहें १५. त्यांचे शरीरांत असलेल्या अंतःकरणांत मीच आहें, प्राणिमात्रांच्या बाहेरच्या बाजूसहि माझेंच आच्छादन आहे, आणि प्राणिमात्राच्या प्रारंभीं, अंतीं व मध्येंहि मीच आहें १६. ज्याप्रमाणें मेघाच्या खालीं व वर, आंत व बाहेर सर्वत्र एकमेव आकाशच असतें आणि ते मेघ आकाशांत उत्पन्न होतात व आकाशांतच राहात असतात १७. आणि मग शेवटीं ज्या वेळेस ते मेघ लय पावतात, त्या वेळेसहि आकाशरूपच होऊन राहतात, त्याप्रमाणें प्राणिमात्रांच्या उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही गतीस आश्रय मीच आहें १८. याप्रमाणें हें माझें अनंतत्व आणि व्यापकपण हें माझ्या 'विभूतींच्या योगानें' समज; तरी आतां जीवालाच कान करून [ अंतःकरणपूर्वक ] पूर्वी ऐकलेल्या गोष्टींवर अनुसंधान ठेवून, ऐकलेलेंच पुढें ऐक १९. हे सुभद्रापते! असें व्यापक स्वरूप सांगितल्यावर यापुढें तुला विभूति सांगावयाच्या निराळ्या राहिलेल्या आहेत काय! पण ज्या तुला प्रेमामें सांगतों म्हणून म्हटलें होतें, त्यांतील मुख्य मुख्य विभूति सांगतों ऐक."२२०

**अन्वयार्थ**--**अहं**–मी –**आदित्यानाम्**–आदित्यांतील **विष्णुः**–विष्णु आहें–**ज्योतिषां**–ज्योतींतील – **अंशुमान्**-किरणवान्–**रविः**–सूर्य आहें–**मरुतां**–मरुत् या नांवाच्या देवांतील मी–**मरीचिः**–मरीचि–**अस्मि**–**आहें**–**अहं**–मी-**नक्षत्राणां**–नक्षत्रांतील–**शशी**–चंद्र आहें २१.

इतकें बोलल्यावर ते कृपावंत श्रीकृष्ण म्हणाले, "बारा आदित्यांत विष्णु नामक देवता मी आहे; तेजस्वी वस्तूंत किरणयुक्त सूर्य तो मी आहे" २१. श्रीकृष्ण म्हणतात, "एकूणपन्नास मरुद्गणांत मरीचि मी आहे व आकाशरूपी रंगणांतील नक्षत्रांत चंद्र मी आहे" [ म्हणजे ह्या माझ्या विभूती आहेत ] २२.

**अन्वयार्थ**–**वेदानां सामवेदः अस्मि**–वेदांतील सामवेद मी आहें–**देवानां वासवः अस्मि**–देवांतील इंद्र मी आहें–**च इंद्रियाणां मनः अस्मि**–आणि इंद्रियांतील मन मी आहें–**भूतानां चेतना अस्मि**–व भूतांची चेतना मी आहें २२.

श्रीगोविंद म्हणाले, "ऋग्वेदादि चार वेदांत सामवेद हा मी आहें, देवांत मरुद्बंधु जो महेंद्र तो मी आहें २३. आणि दहा इंद्रियांत अकरावें असणारे जे मन तें मी आहे असें जाण तसेंच प्राणिमात्रांत जी मूळ चेतना–जीवकळा ती मी आहे" २४.

**अन्वयार्थ**–[ **अहं** ] **रुद्राणां शंकरः अस्मि**–मी अकरा रुद्रांतील शंकर आहें–**च यक्षरक्षसां वित्तेशः**–व यक्ष राक्षस यांतील कुबेर मी आहें–**वसूनां पावकः अस्मि**–आठ वसूंतील पावक–अग्नि या नांवाचा वसु मी आहें–**च अहं शिखरिणां मेरुः**–व मी शिखरयुक्त पर्वतांतील मेरु आहें २३.

---

१ स्पष्ट, प्रकट. २ मुख्य. ३ प्रसिद्ध. ४ जाणल्या असतां. ५ बाग. ६ आपोआप. ७ ज्या विभूति. ८ काळे कुरळे केस मस्तकीं धारण करणाऱ्या. ९ धनुर्विद्येविषयीं केवळ शिवच अशा. १० आच्छादन. ११ शेवटीं, अंतीं. १२ खालीं. १३ पुनः, मग. १४ राहतात. १५ देवांत, बारा आदित्यांत–सूर्यांत. १६ किरणवान्. १७ तेजस्वी पदार्थांमध्यें. १८ एकूणपन्नास मरुद्गणांत. १९ शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धारण करणारा श्रीकृष्ण. २० आकाशांत २१ इंद्र. २२ जीवकला–चैतन्य.

अशेषांही रुद्रांमाझारीं । शंकर जो मदनारी । तो मी येथ न धरीं । भ्रांति कांहीं ॥ २५ ॥ यक्षरक्षोगणांआंतु । शंभूचा सखा जो धनवंतु । तो कुबेरु मी हें अनंतु । म्हणता जाहला ॥ २६ ॥ मग आठांही वसूंमाझारीं । पावकु तो मी अवधारीं । शिखराथिलियां सर्वोपरी । मेरु तो मी ॥ २७ ॥

पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् । सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥
महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् । यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

जो स्वर्गसिंहासनीं सावांवो । सर्वज्ञते आदीचा ठावो । तो पुरोहितांमाजीं रावो । बृहस्पती मी ॥ २८ ॥ त्रिभुवनींचिया सेनापतीं- । आंत स्कंदु तो मी महामती । जो हरवीर्यें अग्निसंगती । कृत्तिकाआंतु जाहला ॥ २९ ॥ सकळिकां सरोवरांसी । माजीं समुद्र तो मी जळराशी । महर्षींआंतु तपोराशी । भृगु तो मी ॥ २३० ॥ अशेषांही वाचा- । माजीं नेटनाच सत्याचा । तें अक्षर एक मी वैकुंठींचा । वेल्हाळु म्हणे ॥ ३१ ॥ समस्तांही यज्ञांच्या पैकीं । जपयज्ञु मी ये लोकीं । जो कर्मत्यागें प्रणवादिकीं । निफजविजे ॥ ३२ ॥ नामजपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थें ॥ ३३ ॥ स्थावरां गिरीआंतु । पुंण्यपुंज जो हिमवंतु । तो मी म्हणे कांतु । लक्ष्मियेचा ॥ ३४ ॥

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः । गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥
उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् । ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७॥

कल्पद्रुम हन पारिजातु । गुणें चंदनुही वाडें विख्यातु । तरि ययां वृक्षजातांआंतु । अश्वत्थु तो मी ॥ ३५ ॥ देवऋषींआंतु पांडवा । नारदु तो मी जाणावा । चित्ररथु मी गंधर्वा । सकळिकांमाजीं ॥ ३६ ॥ ययां अशेषांही सिद्धां- । माजीं कपिलाचार्यु मी प्रबुद्धा । तुरंगजातां प्रसिद्धां- । आंत उचैःश्रवा मी ॥ ३७ ॥ राजभूषण गजांआंतु । अर्जुना मी गा ऐरावतु । पयोराशी सुरमथितु । अमृतांशु तो मी ॥ ३८ ॥ ययां नरांमाजीं राजा । तो विभूतिविशेष माझा । जयातें सकळ लोक प्रजा । होऊनि सेविती ॥ ३९ ॥

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् । प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥
अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् । पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

" सगळ्या रुद्रांमध्यें मदनाचा शत्रु जो शंकर तो मी आहे. याबद्दल मनांत मुळींच शंका धरूं नको " २५. श्रीअनंत म्हणतात, " यक्षराक्षसांत शंकराचा परम मित्र जो धनवान् कुबेर, तो मी आहे २६. मग अष्टवसूंमध्यें अग्नि तो मी आहे व सर्व मोठाली शिखरें धारण करणाऱ्या पर्वतांत सर्वांत उंच असा जो मेरुपर्वत तो मी आहे" २७.

**अन्वयार्थ–पार्थ**–हे पार्था !–**मां पुरोधसां मुख्यं बृहस्पतिं विद्धि**–मी पुरोहितांतील मुख्य बृहस्पति आहें असें तूं जाण–**अहं सेनानीनां स्कन्दः**–मीं सेनापतींतील स्कंद आहें–**च सारसां सागरः अस्मि**–व मी देवनिर्मित सरोवरांतील सागर आहें २४.–**अहं महर्षीणां भृगुः**–मी महर्षींतील भृगु आहें–**गिराम् एकम् अक्षरम् अस्मि**–मी पदरूप वाणींतील ओंकार हें एकाक्षर आहें.–**यज्ञानां जपयज्ञः अस्मि**–मी यज्ञांतील जपयज्ञ आहें. – [**च**] **स्थावराणां हिमालयः**– व मी स्थावरांतील हिमालय आहें २५.

जो इंद्राचा सचिव व सर्वज्ञतेचें आदिपीठ, अग्रणी आहे व जो पुरोहितांमध्यें श्रेष्ठ आहे तो बृहस्पति मी; २८. बुद्धिमंत अर्जुना! जो शंकराच्या वीर्यापासून अग्नीच्या संगानें कृत्तिकांच्या उदरीं उत्पन्न झालेला असा जो त्रिभुवनांतील सेनापतींत मुख्य असा कार्तिकस्वामी तो मी आहें २९. सर्व सरोवरांत जलनिधि जो समुद्र तो मी आहे व महर्षींत तपोराशी जो भृगु तो मी आहे " २३०. वैकुंठप्रिय श्रीविष्णु म्हणाले " सर्व बोलण्यांत ज्या अक्षरांत सत्याचा उत्कर्ष आहे असें तें सत्य एक अक्षर ॐकार मी आहे ३१. या मृत्युलोकांत सर्व यज्ञांमध्यें कर्मत्याग करून ॐकारादिकांनीं उत्पन्न होणारा जो 'जपयज्ञ' तो मी आहे ३२. तो नामजपयज्ञ हा श्रेष्ठ असून ज्यास स्नानादिक कर्में बाधूं शकत नाहींत, किंवा जे नित्य कर्मांमध्यें व्यत्यय आणूं शकत नाहीं, ज्या नांवानें धर्म व अधर्म पवित्र होतात व वेदार्थांत ज्या नामाला परब्रह्म म्हणतात तो मी आहे ३३. श्रीलक्ष्मीपति म्हणाले, " स्थावर असणाऱ्या मोठ्या पर्वतांमध्यें पुण्यराशी जो हिमालय पर्वत तो मी आहे " ३४.

**अन्वयार्थ––सर्ववृक्षाणाम् अश्वत्थः**–सर्व वृक्षांतील वनस्पतींतील मी अश्वत्थ–पिंपळ आहे–**व देवर्षीणां नारदः**–आणि देवर्षींतील-मी नारद आहें–**गंधर्वाणां चित्ररथः**–गंधर्वांतील मी चित्ररथ आहें–**सिद्धानां कपिलः मुनिः**–व सिद्धांतील कपिल मुनि मी आहें–**मां**–मला–**अश्वानाम्**–अश्वांतील–**अमृतोद्भवम्**–अमृतासाठीं केलेल्या क्षीर-सागराच्या मंथनांपासून उत्पन्न झालेला–**उच्चैःश्रवसम्**–उच्चैःश्रवा अश्व–**विद्धि**–जाण–**गजेंद्राणाम् ऐरावतं**–मी गजेंद्रांतील ऐरावत आहें–**च**–व–**नराणां नराधिपं**–मनुष्यांतील राजा मी आहें असें जाण २६--२७.

" कल्पवृक्ष व पारिजातक, तसाच चंदन हे गुणांनीं मोठे प्रसिद्ध आहेत, तरी या सर्व वृक्षांत पिंपळ म्हणून जो वृक्ष आहे, तो मी आहें ३५. हे पांडवा, या सर्व देवर्षींत जो नारद ऋषि, तो मी आहे असें जाण; आणि सर्व गंधर्वांमध्यें चित्ररथ म्हणून जो गंधर्व आहे, तो मी आहे ३६. हे ज्ञानवंता अर्जुना ! या सर्वांहि सिद्धांमध्यें कपिलाचार्य मी आहें, प्रख्यात असलेल्या अशा सर्व घोड्यांमध्यें उच्चैःश्रवा नांवाचा घोडा, तो मी आहे ३७. हे अर्जुना ! राजाचें भूषण असलेल्या हत्तींमध्यें देव अमृतासाठीं क्षीरसमुद्रमंथन करीत असतां त्यांतून उत्पन्न झालेला जो ऐरावत नांवाचा हत्ती, तो मी आहे ३८. सर्व लोक आज्ञाधारक प्रजा होऊन ज्याची सेवा करितात त्या सर्व लोकांमध्यें राजा हीपण माझीच विशेष महत्त्वपूर्ण विभूति आहे " ३९.

**अन्वयार्थ––अहम् आयुधानां वज्रं**–मी आयुधांतील वज्र आहें–[**अहं**] **धेनूनां कामधुक् अस्मि**–मी धेनूंतील कामधेनु आहें–**प्रजनः कंदर्पः अस्मि**–मी प्रजोत्पादनाचें कारण कंदर्प काम आहें–**च सर्पाणां वासुकिः अस्मि**–आणि मी सर्पांतील वासुकि आहें–[**अहं**] **नागानां अनन्तः अस्मि**–मी नागांतील अनंत आहें–**च यादसां वरुणः**–व मी जलदेवतांतील वरुण आहें–**पितृणाम् अर्यमा अस्मि**–पितरांतील मी 'अर्यमा' नांवाचा पितृराज आहें–**च अहं संयमतां यमः**–आणि मी संयमन करणारांतील यम आहें २८–२९.

---

१ अग्नि. २ शिखरें आहेत अशा पर्वतांत. ३ इंद्राच्या सिंहासनाला. ४ सहाय, सचिव. ५ कार्तिकस्वामी. ६ व्यवहार. ७ विलासी. ८ ॐकारादिकांनीं. ९ पर्वतांमध्यें. १० पुण्यराशी. ११ हिमालय. १२ कल्पवृक्ष. १३ आणि.

१४ सुरतरूंच्या पांच जाति आहेत–त्या मंदार, पारिजात, संतान, कल्पवृक्ष व हरिचंदन. १५ मोठा. १६ पिंपळ. १७ ज्ञानवंता. १८ सर्व घोड्यांत. १९ इंद्राचा घोडा. २० समुद्र. २१ देवांनीं घुसळलेला क्षीरसागर.

पैं आघवेयां हातियेरां- । आंत वज्र तें मी धनुर्धरा । जें शतमखोत्तीर्णकरा । आरूढोनि असे ॥ २४० ॥ धेनूंमध्यें कामधेनु । तें मी म्हणे विष्वक्सेनु । जन्मवितयांआंत मदनु । तो मी जाणें ॥ ४१ ॥ सर्पकुळाआंत अधिष्ठाता । वासुकी गा मी कुंतीसुता । नागांमाजीं समस्तां । अनंतु तो मी ॥ ४२ ॥ अगा यादसांआंतु । जो पश्चिमे प्रमदेचा कांतु । तो वरुण मी हें अनंतु । सांगत असे ॥ ४३ ॥ आणि पितृगणां समस्तां- । माजीं अर्यमा जो पितृदेवता । तो मी हें तत्त्वता । बोलत आहें ॥ ४४ ॥ जगाचीं शुभाशुभें लिहिती । प्राणियांच्या मानसांचा झाडा घेती । मग केलियानुरूप होती । भोगनियम जे ॥ ४५ ॥ तयां नियंमितयांमाजीं यमु । जो कर्मसाक्षी धर्मु । तो मी म्हणे आत्मारामु । रमापती ॥ ४६ ॥

प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् । मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥

अगा दैत्यांचिया कुळीं । प्रल्हादु तो मी न्याहाळीं । म्हणौनि दैत्यभावादि मेळीं । लिंपेचि[11] ना ॥ ४७ ॥ पैं कळितयांमाजीं महाकाळु । तो मी म्हणे गोपाळु । श्वापदांमाजीं शार्दूळु । तो मी जाण ॥ ४८ ॥ पक्षिजातिमाझारीं । गरुड तो मी अवधारीं । यालागीं जो पाठीवरी । वाहों शके मातें ॥ ४९ ॥

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् । झषाणां मकरश्चास्मि स्त्रोतसामस्मि जान्हवी ॥ ३१ ॥

पृथ्वीचिया पैसारा- । माजीं घडीं न लगतां धनुर्धरा । एकेचि उड्डाणें सातांहि सागरां- । प्रदक्षिणा कीजे ॥ २५० ॥ तयां वहिलियेयां गतिमंतां- । आंत पवनु तो मी पंडुसुता । शस्त्रधरां समस्तां- । माजीं श्रीराम तो मी ॥ ५१ ॥ जेणें सांकडलियां धर्माचें कैवारें । आपणपयां धनुष्य करूनि दुसरें । विजयलक्ष्मिये एक मोहरें । केलें त्रेतीं ॥ ५२ ॥ पाठीं उभे ठाकूनि सुवेळीं । प्रतापलंकेश्वराचीं सिसाळीं । गगनीं उदो म्हणतया हस्तबळी । दिधलीं भूतां ॥ ५३ ॥ जेणें देवांचा मानु गिंवसिलें[22] । धर्मासि जीर्णोद्धारु केला । सूर्यवंशीं उदेला । सूर्य जो कां ॥ ५४ ॥ तो हातियेरुपरजितया आंतु । रामचंद्र मी जानकीकांतु । मकर मी पुच्छवंतु । जळचरांमाजीं ॥ ५५ ॥ पैं समस्तांही वोघां- । मध्यें जे भगीरथें आणितां गंगा । जन्हूनें गिळिली मग जंघा । फाडूनि दिधली ॥ ५६ ॥ ते त्रिभुवनैकसरिता । जान्हवी मी पंडुसुता । जळप्रवाहां समस्तां- । माझारीं जाणें ॥ ५७ ॥

"हे पहा अर्जुना ! सर्व इत्यारांमध्यें जे शंभर यज्ञ परिपूर्ण केलेल्या इंद्राच्या हातांत असणारें श्रेष्ठ असें वज्र ते मी आहे २४०. [ आसमंतात् ज्याची सेना आहे असे ] श्रीविष्णु म्हणाले, "सर्व गाईंमध्यें कामधेनु नांवाची गाय, ती मी आहे आणि उत्पन्न करणारांमध्यें मदन म्हणून जो आहे, तो मी आहे असें जाण ४१. हे कुंतीसुता ! सर्पकुलाचा मुख्य नायक जो वासुकी नामक साप तो मी आहे व सर्व नागांमध्यें श्रेष्ठ जो अनंत [ शेष ] तो मी आहे ४२. अगा अर्जुना ! "जलचरांमध्यें वा सर्व जलदेवतांत पश्चिम दिशारूप स्त्रीचा पति जो वरुण, तो मी आहे असें अनंत सांगतात ४३. सर्व पितृगणांत पितृदेवता जो अर्यमा आहे तो मी आहे, असें मी खरोखर [ तात्त्विकदृष्ट्या ] सांगतो आहे ४४. जे जगाची शुभाशुभ कर्में [ पाप-पुण्याचा हिशेब ] लिहितात, प्राण्यांच्या मनाच्या व शरिराच्या कर्मांची झडती घेतात व कर्मानुसार भोगरूप फलाचें नियमितें होतात; ४५. त्या नियमन करणारांत प्राण्यांच्या सर्व कर्मांचा साक्षिभूत जो मुख्य यमधर्म तो मी आहे" असें रमापति आत्माराम म्हणाले ४६.

**अन्वयार्थ—च** [ अहं ] **दैत्यानां प्रल्हाद: अस्मि**—व मी दैत्यांतील प्रल्हाद आहें—**अहं कलयतां काल:**—मी गणना करणारांतील काल आहे—**च अहं मृगाणां मृगेंद्र:**—आणि मी मृगांतील—पशूंतील सिंह किंवा वाघ आहें—**च पक्षिणां वैनतेय:**—व पक्ष्यांतील गरुड आहें ३०.

"अरे ! दैत्यकुलांत जन्मलेला प्रल्हाद म्हणून जो दैत्य, तो मी आहे असें समज; आणि म्हणूनच तो दैत्यांच्या स्वभावानें लिप्त झाला नाहीं" ४७. श्रीगोपालकृष्ण म्हणतात:—"नाश करणारांमध्यें जो महाकाळ, तो मी आहे व सर्व हिंस्र जनावरांत सिंह, तो मी आहे असें समज ४८. अर्जुना ! ऐक. सर्व पक्ष्यांमध्यें गरुड पक्षी, तो मी आहे, म्हणूनच तो मला आपल्या पाठीवर वाहूं शकतो" ४९.

**अन्वयार्थ—च पवतां पवन: अस्मि**—आणि पावन करणारांतील मी वायु आहे—**अहं शस्त्रभृतां राम:**—मी शस्त्र धारण-करणारांतील दाशरथी राम आहें—[ **अहं** ] **झषाणां मकर: अस्मि**—मी मासे, कासव इत्यादि जलचर प्राण्यांतील सुसर मगर आहें—**च** [ **अहं** ] **स्रोतसां जान्हवी अस्मि**—आणि मी प्रवाहांतील गंगा आहें ३१.

"हे धनुर्धरा ! या विस्तीर्ण अशा पृथ्वीच्या सभोंवतीं एक घटका न लागतां जो फिरतो व एका उडीबरोबर सातहि समुद्रांना प्रदक्षिणा करितो २५०. अशा वेगवानांमध्यें श्रेष्ठ असा वायु, तो मी आहे. अर्जुना ! सर्व शस्त्रधरांत जो श्रीराम तो मी आहे ५१. ज्या रामचंद्रप्रभूनें त्रेतायुगीं संकटांत पडलेल्या धर्माच्या कैवारानें आपल्यास साह्यकारी असें काय ते दुसरें एक धनुष्यच करून विजयश्रीला आपल्याकडे वळवून एकमार्गी करून आपल्याशिवाय दुसरा मार्गच ठेविला नाहीं ५२. नंतर सुवेलाचलावर उभें राहून लंकाधीश प्रतापवान् रावणाच्या मस्तकांच्या पंक्ति गगनांत 'उदो उदो' म्हणणाऱ्या भूतांच्या हातांत बळी म्हणून दिल्या; ५३. ज्या श्रीरामचंद्रानें देवांना त्यांचा मान परत मिळवून दिला, धर्माचा जीर्णोद्धार केला व जो सूर्यवंशांत प्रतिसूर्यच उदयास आला, ५४. असा तो शस्त्रें धारण करणाऱ्यांमध्यें सीतापति श्रीरामचंद्र तो मी आहे व जलचरांमध्यें पुच्छवंत मकर तो मी आहे ५५. सर्वहि जलप्रवाहांमध्यें गंगा कीं, ज्या गंगेला भगीरथ आणीत असतां मध्येंच जन्हूनें गिळली व मग भगीरथानें प्रार्थिल्यामुळें पुन: आपली मांडी फाडून जन्हूनें जिला परत त्याची त्यास मोकळी करून दिली ५६. ती सर्व त्रैलोक्यांतील नद्यांत एक मुख्य नदी जी जान्हवी ती सर्वजल प्रवाहांमध्यें मी आहे, असें अर्जुना !

१ शस्त्रांत. २ शंभर यज्ञ करून कृतार्थ झालेल्या इंद्राच्या हातांत. ३ आसमंतात ज्याची सेना आहे असा श्रीकृष्ण. ४ उत्पन्न करणारांत. ५ नायक. ६ शेष. ७ जळचरांत. ८ पश्चिम दिशेचा ९ शासन करणारांत. १० दैत्यस्वभाव. ११ लिप्त होत नाहीं. १२ हरण करणारांत. १३ सिंह. १४ विस्तार. १५ सर्व वेगवानांत. १६ वारा. १७ आपल्या रूपानें. १८ एकमार्गी. १९ सुवेळाचलांत. २० मस्तकपंक्ति. २१ हातामध्यें बळी. २२ शोभून दिला. २३ शस्त्र धारण करणारांत. २४ मांडी. २५ त्रैलोक्यांतील मुख्य नदी.

ऐसेनि वेगळालां सृष्टींपैकीं । विभूती नाम सूतां एकेकीं । सगळेन जन्मसहस्रें अवलोकीं । अर्ध्यां नव्हती ॥ ५८ ॥

सर्गाणमादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन । अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥
अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च । अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड उपजेल जैं जीवीं । तैं गगनाची बांधावी । लोथ जेवीं ॥ ५९ ॥ कां पृथ्वीये परमाणूंचा उगाणा घ्यावा । तरि भूगोलुचि काखे सुवावा । तैसा विस्तारु माझा पहावा । तरि जाणावें मातें ॥ २६० ॥ जैसें शाखांसी फूल फळ । एकिहेळां वेटाळूं म्हणिजे सकळ । तरी उपडूनियां मूळ । जेवीं हातीं घेपे ॥६१॥ तेवीं माझें विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजेती अशेष । तरी स्वरूप निर्दोष । जाणिजे माझें ॥ ६२ ॥ एऱ्हवीं वेगळालिया विभूती । कायिएक परिससी किती । म्हणौनि एकिहेळां महामती । सर्व मी जाण ॥ ६३ ॥ मी आघवियेचि सृष्टी । आदिमध्यांतीं किरीटी । ओतंप्रोत पटीं । तंतु जेवीं ॥६४॥ ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें । तैं विभूतिभेदें काय करावें । परि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणौनि असो ॥६५॥ कां जे तुवां पुसिलिया विभूती । म्हणौनि तिया आईक सुभद्रापती । तरी विद्यांमाजीं प्रस्तुतीं । अध्यात्म-विद्या ते मी ॥ ६६ ॥ अगा बोलतयांचिया ठायीं । वादु तो मी पाहीं । जो सकल-शास्त्रसंमतें कहीं सरेचिना ॥६७॥ जो निर्वचूं जातां वाढे । आइकतयां उत्प्रेक्षे सेंलु चढे । जयावरी बोलतयांचीं गोडें । बोलणीं होतीं ॥ ६८ ॥ ऐसा प्रतिपादनामाजीं वादु । तो मी म्हणे गोविंदु । अक्षरांमाजीं विशदु । अकारु तो मी ॥६९॥ पैं गा समासांमाझारीं । द्वंद्व तो मी अवधारीं । मशकालागोनि ब्रह्मावेरीं । ग्रासिता तो मी ॥२७०॥ मेरुमंदरादिकीं सर्वी । सहित पृथ्वीतें विरवी । जो एकार्णवातेंही जिरवी । जेथिंचा तेथ ॥७१॥ जो प्रळयतेजा देत मिठी । सगळिया पवनातें गिळी किरीटी । आकाश जयाचिया पोटीं । सामावलें ॥ ७२ ॥ ऐसा अपार जो काळु । तो मी म्हणे लक्ष्मीलीळु । मग पुढती सृष्टीचा मेळु । सृजितां तो मी ॥ ७३ ॥

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् । कीर्तिः श्रीर्वाक् च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥३४॥

आणि सृजिलिया भूतांतें मीचि धरीं । सकळां जीवनही मीचि अवधारीं । शेखीं सर्वांतें या संहारीं । तेव्हां मृत्युही मीचि ॥ ७४ ॥ आतां स्त्रीगणांच्या पैकीं ।

तूं जाण ५७. हे पहा! याप्रमाणें सृष्टींतील माझ्या वेगवेगळ्या विभूतींचेंहि एक एक नांव घेऊन वर्णन करूं लागलें तर पूर्ण आयुष्य असलेल्या हजारों जन्मांत अर्ध्या विभूतींचेंहि वर्णन होणार नाहीं!!" ५८.

**अन्वयार्थ**—**अर्जुन**–हे पार्था!–**सर्गाणां**–सृष्टींचा–**आदिः च अंतः च मध्यम् अहम् एव**–आदि, उत्पत्ति, स्थिति व लय मीच आहें–**विद्यानां**–विद्यांतील–[ **अहं**–मी ]–**अध्यात्मविद्या**–आत्मविद्या आहें–**अहं प्रवदतां वादः**–मी वाद जल्पवितंड यांतील वाद आहे. कारण वाद अर्थाच्या निर्णयाला कारण होतो. [ **अहं** ] **अक्षराणाम् अकारः अस्मि**–मी अक्षरांतील अकार हें अक्षर आहें–**च सामासिकस्य द्वंद्वः**–व समासांच्या समूहांतील द्वंद्व-समास मी आहे [ कारण त्यांतील सर्व पदें अर्थामध्यें येतात ]–**अक्षयः कालः अहम् एव**–अक्षय काल मीच आहें–**अहं विश्वतोमुखः धाता** [ **अस्मि** ]–आणि मी सर्व जगाच्या कर्मांचें फल देणारा सर्वतोमुख धाता आहें ३२-३३

"ज्याप्रमाणें! सर्वेच्या सर्व नक्षत्रें वेंचून घ्यावींत अशी मनांत इच्छा उत्पन्न झाली असतां आकाशाचीच मोट बांधलेली बरी! कारण त्यामुळेंच ती सर्व हातीं येतील ५९. किंवा पृथ्वीच्या परमाणूंचा झाडा-हिशोब घ्यावयाचा असल्यास भूगोलच काखेंत मारला पाहिजे, त्याचप्रमाणें माझा–व्याप्ति–विस्तार पहावयाचा असल्यास मलाच जाणलें पाहिजे; [ म्हणजे तें सर्व दृष्टीस पडेल ] २६०. खांद्या, फळें व फुलें हीं सर्व एकदमच गुंडाळून घ्यावींत असें जर वाटत असेल तर ज्याप्रमाणें ते झाडच मुळासकट उपटून हातांत घ्यावें लागतें ६१. त्याप्रमाणें माझ्या विशेष अशा सर्वच विभूति समजाव्या, अशी इच्छा झाल्यास माझें निर्दोष [ उपाधिरहित ] असें स्वरूप जाणून घ्यावें. [ म्हणजे त्या सहज समजतील ] ६२. एऱ्हवीं, अर्जुना! माझ्या वेगळाल्या विभूति तूं किती म्हणून ऐकशील? म्हणून बुद्धिमान् अर्जुना! एकदां सर्व ठिकाणीं मीच ओतप्रोत भरलेला आहे असें जाण ६३. हे किरीटी! मीच सर्व सृष्टीचा आदि, मध्य आणि अंत आहे, ज्याप्रमाणें वस्त्रांत एक तंतुच उभे व आडवे भरलेले असतात ६४. त्याप्रमाणें जो मी सर्वव्यापक आहे, असें जाणल्यानंतर मग माझ्या वेगवेगळ्या विभूति जाणून वा सांगून तरी काय करावयाच्या आहेत? परंतु अशी एवढी तुझी योग्यता नाहीं, म्हणून तें असूं दे ६५. हे सुभद्रापते! तूं माझ्या विभूति कोणत्या म्हणून विचारलेंस! तर त्या ऐक. सर्व विद्यांमध्यें [ आत्मज्ञान करून देणारी ] "अध्यात्मविद्या" ती मी आहे ६६. अरे! बोलणाराच्या ठिकाणीं जो सर्व शास्त्रांच्या संमतीनें कधीं संपतच नाहीं, तो 'वाद' मी आहे ६७. [ वादांतील विषयाचे बाबतींत ] विचार करूं लागले असतां जो वाढतो व ऐकणारांच्या तर्कास बळ येतें आणि त्या तर्कावर बोलणाऱ्या वक्त्यांची गोड भाषणें होतात" ६८. श्रीगोविंद म्हणाले–"अशा प्रतिपादनांत वाटाघाटीरूप जो वाद चालतो, तो मी आहें; आणि अक्षरांत व्याप्त असणारा असा स्पष्ट जो अकार, तो मी आहे ६९. तत्पुरुष आदि सर्व समासांमध्यें द्वंद्व समास तो मी आहे, असें समज आणि चिलटापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना ग्रासणारा जो काल तो मी आहे २७०. मेरुमंदरादिकांसहित जो सर्व पृथ्वीला विरावितो व प्रलयकाळीं जलमय झालेल्या जगास जो जागचे जागींच जिरवून टाकतो ७१. हे किरीटी! प्रलयकालच्या तेजाला जो ग्रासून टाकतो, त्या सर्व वाऱ्याला गिळून टाकतो व तो वारा जेथें लय पावतो ते सर्व उर्वरित असलेले आकाशहि ज्यांच्या पोटांत मावतें ७२. असा अपरिमित जो काल तो मी आहे" असें लक्ष्मीशीं विलास करणारे श्रीकृष्ण म्हणाले, मग त्यानंतर म्हणतात–" पुनः सृष्टीचा जन्म व उत्पन्नकर्ता; जो [ ब्रह्मदेव ] तो मी" आहे ७३.

**अन्वयार्थ**—**च अहं सर्वहरः मृत्युः** [ **अस्मि** ]–व मी सर्वांच्या धनादिकांचें व प्राणांचें हरण करणारा मृत्यु आहे–**च भविष्याम् उद्भवः**–व पुढें होणाऱ्या उत्कर्षाचा उत्कर्ष–पुढील अभ्युदयाचा हेतु मी आहे–**च नारीणां**:–आणि स्त्रियांतील उत्तम स्त्रिया अशा–**कीर्तिः श्रीः वाक् स्मृतिः मेधा धृतिः क्षमा**–कीर्ति, श्रीः, वाक्, स्मृति, मेधा–धारणाशक्ति, धृति व क्षमा या देवता मी आहें ३४.

"आणि उत्पन्न झालेल्या भूतमात्रांचें धारण करणारा तो मीच आहे, सर्वांचें जीवनहि मीच आहे; शेवटीं जेव्हां या सर्वांचा संहार करितों, तेव्हां मृत्युहि मीच आहे असें समज ७४. आतां स्त्रीजातीपैकीं माझ्या आणखी

१ अर्ध्याचें वर्णन होणार नाहीं. २ इच्छा. ३ मोट. ४ झाडा, हिशोब, गणना. ५ घालावा. ६ एकदम. ७ घ्यावें. ८ एकदम. ९ कालत्रयीं. १० सर्वत्र सारखा असलेला. ११ वेदान्त, ब्रह्मविद्या. १२ सकळ शास्त्रांची एकवाक्यता होऊन. १३ निश्चित करता, मर्यादित करता. १४ तर्कास. १५ बळ. १६ माशीपासून तों ब्रह्मदेवापर्यंत. १७ विरघळवी, नाशी. १८ प्रलयीं सर्व समुद्रमय झालेल्या स्थितीस. १९ लक्ष्मीशीं लीला करणारा श्रीकृष्ण. २० उत्पन्नकर्ता.

माझिया विभूती सात आणिकी । तिया ऐक कवतिकीं । सांगिजतील ॥ ७५ ॥ तरी नित्य नवी जे कीर्ति । अर्जुना ते माझी मूर्ती । आणि औदार्येंसी जे संपत्ती । तेही मीचि जाणें ॥ ७६ ॥ आणि ते गा मी वाचा । जे सुखासनीं न्यायाचा । आरूढोनि विवेकाचा । मार्गीं चाले ॥ ७७ ॥ देखिलेनि पदार्थें । जे आठवूनि दे मातें । ते स्मृतिही एथें । त्रिशुद्धी मी ॥७८॥ पैं स्वहितां अनुयायिनी । मेधा ते गा मी इये जनीं । धृती मी त्रिभुवनीं । क्षमा ते मी ॥ ७९ ॥ एवं नारींमाझारीं । या सातही शक्ति मी अवधारीं । ऐसें संसारगजकेसरी । म्हणता जाहला ॥२८०॥

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् । मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥

वेदराशीचियां सामा- । आंत बृहत्साम जें प्रियोत्तमा । तें मी म्हणे रमा- । प्राणेश्वरु ॥ ८१ ॥ गायत्रीछंद जें म्हणिजे । तें सकळां छंदांमाजीं माझें । स्वरूप हें जाणिजे । निभ्रांत तुवां ॥ ८२ ॥ मासांआंत मार्गशीरु । तो मी म्हणे शाङ्‌र्गधरु । ऋतूंमाजीं कुसुमाकरु । वसंतु तो मी ॥ ८३ ॥

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् । जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥३६॥
वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः । मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥

छळितेयां विंदाणीं- । माजीं जूं तें मी विचक्षणा । म्हणौनि चोहटां चोरी परी कवणा । निवारूं न ये ॥ ८४ ॥ अगा अशेषांही तेजेंसां- । आंत तेज तें मी भरंवसा । विजयो मी कार्योद्देशां । सकळांमाजीं ॥ ८५ ॥ जेणें चोखोळत दिसे न्याय । तो व्यवसायांत व्यवसाय । माझें स्वरूप हें राय । सुरांचा म्हणे ॥ ८६ ॥ सत्त्वाथिलियांआंतु । सत्त्व मी म्हणे अनंतु । यादवांमाजीं श्रीमंतु । तोचि तो मी ॥ ८७ ॥ जो देवकी-वसुदेवास्तव जाहला । कुमारीसाठीं गोकुळीं गेला । तो मी प्राणासकट पियाला । पूतनेतें ॥ ८८ ॥ नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मियां अदैंनवीं सृष्टि केली । करीं गिरि धरूनि उमाणिली । महेंद्रमहिमा ॥ ८९ ॥ कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें । जेणें मियां जळत गोकुळ राखिलें । वासरुवांसाठीं लाविलें । विरंचीसें पिसें ॥ २९० ॥ प्रथमदशेचिये पहांटे- । माजीं कंसाऐशीं अचाटें । महाधेंडीं अवचटें । लीळांचि नासिलीं ॥ ९१ ॥ हें काय कितीएक सांगावें । तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें । तरि यादवांमाजीं जाणावें । हेंचि स्वरूप माझें ॥ ९२ ॥ आणि सोमवंशीं तुम्हां पांडवां- । माजीं अर्जुन तो

सात विभूति आहेत, त्याहि कौतुकानें सांगितल्या जातील त्या ऐक ७५. अर्जुना! नित्य नवी **कीर्ति** ती माझीच मूर्ति आहे; औदार्ययुक्त जी **संपत्ति** तीहि मीच आहे असें जाण ७६. आणि न्यायाच्या सुखासनावर बसून विचाराच्या मार्गानें चालणारी जी **वाणी** तीहि मीच आहें ७७. कोणताहि पदार्थ पाहिल्याबरोबर जी माझी आठवण करून देते, अशी जी **स्मरणशक्ति** ती मी आहे, असें पक्कें समज ७८. इहलोकीं स्वहिताला अनुकूल असणारी अशी जी **बुद्धि** ती मी आहे व त्रिभुवनांत जी **धृति**, ती मी आहे आणि **क्षमाहि** मीच आहे ७९. संसारगजेंद्राचा नाश करण्यामध्यें केवळ सिंहच असे भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:-"याप्रमाणें स्त्रीजातींत या सातहि शक्ति आहेत, त्या सर्व मीच आहें असें समज" २८०.

**अन्वयार्थ**—**तथा साम्नां बृहत्साम** [अहम् अस्मि] -त्याचप्रमाणें सामांतील 'बृहत्साम' या नांवाचें साम मी आहें-**अहं छन्दसां गायत्री**-मी छंदांतील गायत्री छंद आहें-कारण गायत्री द्विजांच्या दुसऱ्या जन्माची जननी आहे-**अहं मासानां मार्गशीर्षः**-मी चैत्रादि बारा महिन्यांतील मार्गशीर्ष मास आहे-कारण तो महिना परिपक्क धान्यानें युक्त असतो व-**ऋतूनां कुसुमाकरः**-वसंतादि ऋतूंतील मी वसंत आहें ३५.

श्रीरमापति म्हणतातः-"हे मित्रश्रेष्ठा! वेदांमध्यें असलेल्या सामवेदांत रथंतरादि सामांमध्यें जे 'बृहत्साम' आहें तें मी आहे ८१. सर्व छंदांमध्यें गायत्री संज्ञक जो छंद आहे, ते माझें स्वरूप आहे असें तूं निःसंशय समज ८२. श्रीकृष्ण म्हणतात:-सर्व महिन्यांमध्यें मार्गशीर्ष मास तो मी आहे व सहा ऋतूंमध्यें पुष्पांची खाण असणारा जो वसंतऋतु तो मी आहें ८३.

**अन्वयार्थ**—[अहं] **छलयतां द्यूतम् अस्मि**-मी फसविणाऱ्या वस्तूंतील द्यूत-फांशांनीं खेळणें आहें-**अहं तेजस्विनः तेजः**-मीं तेजस्वी लोकांतील तेज आहे-[**अहं**] -**जयः अस्मि**-मी विजयींजनांचा जय आहे-**व्यवसायः अस्मि**-व्यवसायी जनांचा मी व्यवसाय आहे-**सत्त्ववतां सत्त्वम् अहं** [**अस्मि**]-सात्विक लोकांचें सत्व मी आहे-[अहं] **वृष्णीनां वासुदेवः अस्मि**-मी वृष्णींच्या मध्यें वासुदेव आहे-**पांडवानां धनंजयः**-पांडवांमध्यें धनंजय आहे-**अहं मुनीनाम् अपि व्यासः**-मुनीमध्यें मी व्यास आहे-**कवीनाम् उशना कविः** [**अस्मि**]-सर्वज्ञ विद्वानांतील शुक्राचार्य या नांवाचा कवि-सर्वज्ञ मी आहें ३६-३७.

हे शहाण्या अर्जुना! दुसऱ्यास फसविण्याचे, छलकारक अशा कारस्थानामध्यें जुगार म्हणून जी आहे, ती माझी विभूति आहे; म्हणूनच उघड उघड चव्हाट्यावर जुगाररूप चोरी चालली असूनहि कोणाला निवारण करतां येत नाहीं ८४. अरे! सर्व तेजस्वी पदार्थांमध्यें तेज म्हणून जी वस्तु आहे, ती मी आहे असें पक्कें समज; आणि सर्व आरंभिलेल्या कार्यांत प्राप्त होणारा जो विजय तो मी आहे ८५. देवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणालेः-सर्व उद्योगांत नीति न सोडतां असणारा जो उद्योग तें माझें स्वरूप आहे ८६. सत्वधीरांत जे सत्व ते मी आहे व यादवांमध्यें जो श्रीमंत श्रीकृष्ण तोच मी आहे, असें श्रीअनंत म्हणाले ८७. जो देवकी-वसुदेवांपासून मथुरेंत जन्म घेऊन यशोदेच्या योगमाया या मुलीच्या बदली गोकुळांत गेलेला व ज्यानें स्तनपान करण्याच्या निमित्तानें पूतना राक्षसीचें प्राणासकट शोषन केलें तो मीच आहे ८८. बाळपणाची-कळी-दशा उमलली-संपली नाहीं तोंच ज्यानें दैत्यरहित पृथ्वी केली व करांगुलीवर गोवर्धन पर्वत धारण करून इंद्राचे सामर्थ्य अजमावले-इंद्राचा गर्व हरण केला ८९. ज्यानें यमुनेच्या ह्रदयांत काट्याप्रमाणें सलणाऱ्या कालिया सर्पाचें मर्दन-नाश करून तिच्या ह्रदयांतील दुःख निवारण केलें; दावाग्नीने संपूर्ण गोकुळ जळत असतांना त्यांस जाळणारा अग्नि भक्षण करून ज्यानें त्यांचें संरक्षण केलें; आणि ब्रह्मदेवानें गोपबालकें व गाईवासरें यांचें हरण करून ब्रह्मलोकीं नेल्यावर [दुसऱ्या त्यांच्यासारख्या गाई, गोपाळ आपण बनून] त्यास ज्यानें वेड लाविलें २९०. बालदशेच्या आरंभींच कंसचाणूरादिक अचाट-मोठमोठीं धेंडे ज्यानें आकस्मात् सहज मारली ९१. अशा तुला एक एक वेगवेगळ्या किती गोष्टी सांगूं! तूं सुद्धां असल्या गोष्टी पुष्कळ ऐकिल्या व पाहिल्या आहेस, म्हणून यादवांमध्यें अशी ज्याची कृति आहे, हे तेंच माझें श्रीकृष्णस्वरूप होय असें समज ९२. आणि

---

१ कौतुकानें. २ सिंहासनीं. ३ स्मरणशक्ति. ४ अपाय न करणारीं. ५ बुद्धि, धारणाशक्ति. ६ धैर्य. ७ संसाररूप हत्तीला मारणारा सिंह-श्रीकृष्ण. ८ सर्व वेदांमधील ९ स्तोत्रयांत ईश्वराची स्तुति आहे. १० पुष्पांची खाण. ११ फसवण्याच्या. १२ प्रकारांत. १३ जुगार. १४ चव्हाट्यावर.

१५ तेजस्वी पदार्थांमध्यें. १६ निर्मळ. १७ उद्योग, व्यापार. १८ सात्त्विकांमध्यें. १९ कळी, मुद्रा. २० दैत्यरहित. २१ मोजली. २२ इंद्राची शक्ति. २३ यमुनेचें. २४ अंतःकरणांतील दुःख, कालिया सर्प. २५ ब्रह्मदेवास. २६ अगदींच बालकदशेंत. २७ सहज.

मी जाणावा । म्हणौनि एकमेकांचिया प्रेमभावा । विघडु न पडे ॥ १३ ॥ संन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनि नेली माझी भगिनी । तऱ्ही विकल्पु नुपजे मनीं । मी तूं दोन्ही स्वरूप एक ॥ १४ ॥ मुनीआंत व्यासदेवो । तो मी म्हणे यादवरावो । कवीश्वरांमाजीं धैर्या ठावो । उशनाचार्य तो मी ॥ १५ ॥

दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् । मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥

अगा दमितयांमाझारीं । अनिवार दंडु तो मी अवधारीं । जो मुंगियेलागोनि ब्रह्मांवेरीं । नियमित पावे ॥ १६ ॥ पैं सारासार निर्धारितयां । धर्मज्ञानाचा पक्षु धरितयां । सकळ शास्त्रांमाजीं ययां । नीतिशास्त्र तें मी ॥ १७ ॥ आघवियाचि गूढां– । माजीं मौन तें मी सुहाडा । म्हणौनि न बोलतयां पुढां । स्रष्टेही नेणं होय ॥ १८ ॥ अगा ज्ञानियांचिया ठायीं । ज्ञान तें मी पाहीं । आतां असो हें ययां कांहीं । पार न देखों ॥ १९ ॥

यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन । न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥
नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप । एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

पैं पर्जन्याचिया धारां । वरी लेखं करवेल धनुर्धरा । कां पृथ्वीचिया तृणांकुरां । होईल ठी" ॥२००॥ पैं महोदधीचिया तरंगां । व्यवस्था धरूं नये जेवीं गा । तेवीं माझिया विशेषलिंगां" । नाहीं मिती ॥ १ ॥ ऐशियाही सातपांच प्रधाना । विभूती सांगितलिया तुज अर्जुना । तो हा उद्देशु जो गा मना । आंहाच गमला ॥ २ ॥ येरां विभूतिविस्तारांसि कांहीं । एथ सर्वथा लेखं नाहीं । म्हणौनि परिससीं तूं काई । आम्ही सांगों किती ॥३॥ यालागीं एकिहेळां तुज । दाऊं आतां वर्म निज । तरी सर्व भूतांकुरें बीज । विरूढत असे तें मी ॥४॥ म्हणौनि सानें थोर न म्हणावें । उंच नीच भाव सांडावे । एक मीचि ऐसें मानावें । वस्तुजाताते ॥५॥ तरी यावरी साधारण । आइक पां आणिकही खूण । तरी अर्जुना तें तूं जाण । विभूति माझी ॥ ६ ॥

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

जेथ जेथ संपत्ति आणि दया । दोन्ही वसती आलिया ठाया । ते ते जाण धनंजया । विभूति माझी ॥ ७ ॥

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन । विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥१०॥

सोमवंशातील तुम्हां पांडवांमध्यें जो तूं अर्जुन, तो मीच आहें असें समज; म्हणूनच तुझ्या व माझ्या परस्परांतील प्रेमभावांत केव्हांहि अंतर पडत नाहीं ९३. तूं लोकांत [लोकदृष्ट्या] संन्यासी होऊन माझी भगिनी सुभद्रा हिला चोरून नेलेंस, तरी तुझ्याबद्दल माझ्या मनांत मुळींहि संशय उत्पन्न झाला नाहीं कारण तुझें व माझें स्वरूप एकच आहे त्यांत मी भेद मानीत नाहीं ९४. सर्व मुनींमध्यें श्रेष्ठ असे जे व्यास मुनी, ते मीं आहे व सर्व कवींत दीर्घदर्शींमध्यें श्रेष्ठ जे धैर्यवान् शुक्राचार्य ते मी आहें, असें यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणाले ९५.

**अन्वयार्थ**—[अहं] **दमयतां दण्डः अस्मि**—मी दमन करणारांतील दंड आहें—**जिगीषतां नीतिः अस्मि**—जयाची इच्छा करणारांमध्यें मी नीति आहें—**गुह्यानां च एव मौनम् अस्मि** आणि गुह्यांतील मौन मी आहें—**ज्ञानवतां ज्ञानम्**—अहं—[अस्मि] ज्ञानवानांतील ज्ञान मी आहें ३८.

अरे ! नियमन करणाऱ्यांमध्यें जी अत्यंत मोठी शिक्षा, म्हणजे जी मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांस सारखें शासन करितें असें अनिवार्य शासन मी आहें असें समज ९६. सारासार विचार करणाऱ्या व ज्या शास्त्रांत धर्मज्ञानाचें अनुकरण केलेलें असतें, अशा सकळ शास्त्रांमध्यें नीतिशास्त्र ते मी आहे ९७. हे बलवान् अर्जुना ! सर्व गुह्य गोष्टींमध्यें मौन ते मी आहे. म्हणून मौन धारण करणारापुढें ब्रह्मदेव तरी काय करणार ! तो देखील अज्ञानी ठरतो ९८. अरे ! ज्ञान्याच्या ठिकाणीं जें ज्ञान आहे तें मी आहे असें समज आतां हा विभूतिविस्तार राहूं दे; कारण कितीहि सांगत बसलो तरी या विभूतींचा अंतच दिसणार नाहीं ९९.

**अन्वयार्थ**—**अर्जुन**—हे अर्जुना !—**अपि च**—याशिवाय **यत् सर्वभूतानां बीजं**—जें सर्व भूतांचें बीज—**तत्**—तें—अहं [अस्मि]—मी आहें—**यत् चराचरं भूतं**—जें चर किंवा स्थिर भूत–प्राणी-**मया विना स्यात्**-माझ्यावांचून असेल—**तत्**—तें—**न अस्ति**—नाहींच ३९.

**अन्वयार्थ**—**परंतप**—हे अर्जुना !—**मम**—माझ्या—**दिव्यानां विभूतीनां**—दिव्य—अलौकिक विभूतींचा—विस्तारांचा—**अन्तः**—अन्त-सीमा—**न अस्ति**—नाहीं—**तु**—परंतु—**एषः**—हा—**विभूतेः विस्तरः**—विभूतींचा विस्तार—**मया**—मी—**उद्देशतः**—संक्षेपानें-थोडासा-**प्रोक्तः**—सांगितला आहे ४०.

हे पहा अर्जुना ! पावसाच्या धारांची गणना करितां येईल काय ? किंवा पृथ्वीवरील गवतांच्या काड्यांची संख्या करितां येईल काय ? ३००. समुद्राच्या लाटांचीं केव्हांहि गणती-हिशोब करितां येणार नाहीं. त्याप्रमाणें माझ्या गुणविशेष विभूतींची गणती—मोजमाप करितां येणार नाहीं १. अर्जुना ! असें असतांहि तुला माझ्या सात–पांच म्ह० पंचाहत्तर आमच्या मुख्य मुख्य विभूति सांगितल्या. परंतु ही जी माझ्या विभूति समजण्याविषयीं तुला इच्छा उत्पन्न झाली, ती सामान्य अशी मला वाटली २. तसे तत्त्वतः पाहिले तर माझ्या इतर विभूतींचा केवढा विस्तार आहे याचा पत्ताहि नाहीं. त्या असीम आहेत. म्हणून त्या तूं ऐकणार तरी किती ! आणि मी सांगणार तरी किती ! ३. याकरितां तुला एकवार आम्ही आपलें वर्म सांगतो ते असें कीं, ज्या बीजापासून भूतांचें अंकुर फुटतात, तें बीज मी आहे ४. म्हणून लहान मोठें असें कांहीं न मानतां श्रेष्ठ—कनिष्ठ हे सर्व काल्पनिक भाव टाकून त्या सर्व वस्तुमात्रांमध्यें मीच ओतप्रोत व्याप्त आहे असें समज ५. अर्जुना ! यापेक्षांहि सर्वसाधारण अशी एक खूण आहे ती तुला सांगतो ऐक. तिच्या योगानें ह्या माझ्याविभूती तुला ओळखतां येतील ६.

**अन्वयार्थ**—**यत् यत्**—जे जें—**विभूतिमत्**—ऐश्वर्ययुक्त—**श्रीमत्**—समृद्धि किंवा कांति यांनीं युक्त—**वा**—किंवा—**ऊर्जितम् एव**—बलाढ्य—**च सत्त्वम्** [अस्ति]—सत्त्व—वस्तु प्राणी आहे—**तत् तत् एव**—तें तेंच—**त्वं**—तूं—**मम तेजोंऽशसंभवं**—माझ्या तेजाच्या अंशापासून झालेलें—**अवगच्छ**—जाण ४१.

धनंजया ! ती खूण अशी कीं, ज्या ठिकाणीं संपत्ति आणि दया यांचें मिळून वास्तव्य आहे, त्या त्या ठिकाणीं माझी विभूति आहे, असें समज ७.

**अन्वयार्थ**—**अथवा**—किंवा—**अर्जुन**—हे पार्था !—**बहुना एतेन ज्ञातेन**—हें असें पुष्कळ जरी तूं जाणलेस, तरी—**तव किं**—तुला काय लाभ होणार !—**अहं**—मी—**इदं कृत्स्नं जगत्**—हें सर्व जगत्—**एकांशेन**—आपल्या एका अंशानें—**विष्टभ्य**—दृढ धारण करून—**स्थितः**—[अस्मि] राहिलों आहें ४२.

१ भेद. २ शुक्राचार्य. ३ ब्रह्मदेवापर्यंत. ४ अचुक, वेळच्या वेळीं. ५ बलवंता, अर्जुना. ६ ब्रह्मदेव. ७ अज्ञानी. ८ विभूतींना. ९ गणना. १० निश्चय, गणना. ११ मोठमोठ्या विभूतींना. १२ थोड्याशा, सातावर पांच पंचाहत्तर. १३ व्यर्थ, उगीच. १४ इतरां. १५ गणती. १६ एकदम. १७ जगदंकुर. १८ लहान.

अथवा एकलें एक बिंब गगनीं। प्रभा फांके त्रिभुवनीं। तेवीं एकाकियाची सकळ जनीं। आज्ञा पाळिजे ॥ ८ ॥ तयांतें एकलें झणीं म्हण। तो निर्धन या भाषा नेण। काय कामधेनूसवें सर्वस्व हेंन। चालत असे ? ॥ ९ ॥ तियेतें जें जेधवां जो मागे। तें ते एकसरेंचि प्रसवों लागे। तेवीं विश्वविभव तया आंगें। होऊनि असती ॥ ३१० ॥ तयातें वोळखावया हेचि संज्ञा। जे जगें नमस्कारिजे आज्ञा। ऐसें आथि तें जाण प्राज्ञा। अवतार माझे ॥ ११ ॥ आणि सामान्य विशेष। हें जाणणें एथ महादोष। कां जे मीचि एक अशेष। विश्व हें म्हणौनि ॥ १२ ॥ तरी आतां साधारण आणि चांगु। ऐसा कैसेनि पां कल्पावा विभागु। वायां आपुलिये मती वंगुं। भेदाचा लावावा ॥ १३ ॥ एऱ्हवीं तूप कासया घुसळावें। अमृत कां रांधूनि अर्धें करावें। हां गा वायूसि काय पां डावें। उजवें आंग आहे ? ॥ १४ ॥ पैं सूर्यबिंबासि पोट पाठीं। पाहतां नासेल आपुली दिठी। तेवीं माझ्या स्वरूपीं गोठी। सामान्यविशेषाची नाहीं ॥ १५ ॥ आणि सिनानां इहीं विभूतीं। मज अपारातें मविसीलें किती। म्हणौनि किंबहुना सुभद्रापती। असो हें जाणणें ॥ १६ ॥ आतां पैं माझेनि एकें अंशें। हें जग व्यापिलें असे। यालागीं भेदू सांडूनि सरिसें। साम्यें भज ॥ १७ ॥ ऐसें विबुधवनवसंतें। तेणें विरक्तांचेनि एकांतें। बोलिलें जेथ श्रीमंतें। श्रीकृष्णदेवें ॥ १८ ॥ तेथ अर्जुन म्हणे स्वामी। येतुलें हें राभॅस्य बोलिलें तुम्हीं। जे भेदु एक आणि आम्ही। सांडावा एकीं ॥ १९ ॥ हां हो सूर्य म्हणे काय जगातें। अंधारें दवडा कां परौतें। तेवीं धसाळ म्हणों देवा तूंतें। तरी अधिक हा बोलु ॥ ३२० ॥ तुझें नामचि एक कोण्ही वेळे। जयांचिये मुखासि कां कानां मिळे। तयांचिया हृदयातें सांडूनि पळे। भेदु जी साच ॥ २१ ॥ तो तूं परब्रह्मचि असकें। मज दैवें दिधलासि हस्तोदकें। तरी आतां भेदु कायसा कें। देखावा कवणें ? ॥ २२ ॥ जी चंद्रबिंबाचा गाभारां। रिगालियावरीही उबारा। परी राणेपणें शाङ्‌र्गधरा। बोला हें तुम्हीं ॥ २३ ॥ तेथ सावियेंचि परितोषोनि देवें। अर्जुनातें आलिंगिलें जीवें। मग म्हणे तुवां न कोपावें। आमुचिया बोला ॥ २४ ॥ आम्ही तुज भेदाचिया वाहोणीं। सांगितली जे

अथवा आकाशांत सूर्याचें बिंब एकच असतें; पण त्याची ज्याप्रमाणें त्रिभुवनांत प्रभा पसरते त्याप्रमाणें ज्या एकट्याची सर्व जग आज्ञा पाळतात; ८. त्या महानुभवाला एकटा किंवा निर्धन असें कदाचित् म्हणशील, पण तसें म्हणूं नकोस. हें पहा, त्याचे अंगभूत असे वस्तु सामर्थ्य आहे दुसऱ्याची इच्छा तृप्त करण्याकरितां कामधेनू आपल्याबरोबर सर्व सामग्री घेऊन चालत असते काय ? ९. तिला ज्या वेळेस जो कोणी जें कांहीं मागेल, तें ती एकदम प्रसवूं लागतें व देते. त्याप्रमाणें सर्व विश्वांतील ऐश्वर्यें त्यांच्याजवळ अंगभूतच होऊन राहतात. ३१०. त्यांना माझी विभूती म्हणून ओळखण्याची हीच खूण आहे कीं ज्यांच्या आज्ञा सर्व लोकांस शिरसावंद्य असतात. हें बुद्धिवंत अर्जुना ! असें तुझ्या दृष्टीस पडेल, त्या विभूति म्हणजे माझे अवतार आहेत असें समज ११. या विश्वांत हें सामान्य व हें विशेष असा भेद मानणें महादोष आहे. कारण या संपूर्ण विश्वांत मीच एकटा ओतप्रोत भरलेला आहें १२. तर असें असतां एक सामान्य आणि एक विशेषच असा भेद कां कल्पावा ? तसे कल्पून उगीच आपल्या बुद्धीस भेदाचा कलंक लावून कां घ्यावा ? १३. एऱ्हवीं तूप व्यर्थ कशासाठीं घुसळावें ? अमृताला आटवून शिजवून अर्धे–निम्मे कां करावयाचें ? तसेंच वायूला उजवे व डावें असें वेगवेगळे अंग आहे काय ? १४. सूर्यबिंबास पोट व पाठ आहे कां म्हणून पाहूं लागलें असतां ज्याप्रमाणें आपलीच दृष्टि मात्र नाहींशी होईल, [ तो सर्व प्रकाशमयच असल्यामुळें त्याला पुढें पोट व मागें पाठ अशा बाजू नाहींत ] त्याचप्रमाणें माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं साधारण व विशेष असा भेद तर नाहींच; पण सामान्य–विशेषभावाची केवळ वार्ताहि नाहीं १५. आणि हे सुभद्रापते ! माझ्या ज्या अनंत वेगळाल्या विभूति आहेत त्या तूं किती मोजशील ! म्हणून फार काय सांगावें ! ! माझ्या विभूति जाणण्याची तुझी इच्छा पुरे कर १६. आतां हे पहा, माझ्या एका अंशानें हें सर्व जग व्यापलेलें आहे, म्हणून भेद भावना टाकून अभेदबुद्धीनें सर्वत्र मीच समव्याप्त आहे, असें समजून या दृष्टीनें माझें भजन कर १७. ज्ञानी पुरुषरूपी वनास वसंतऋतुप्रमाणें आनंद देणारा व विरक्तांना एकांत ठिकाण असणारा असा सकलैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण परमात्मा याप्रमाणें बोलता झाला १८. तेव्हां अर्जुन म्हणाला, " प्रभो, " माझ्या विभूतीच्या ठिकाणीं भेद मानूं नको ' असे जें तुम्ही कांहींतरी सांगितलें तें आपल्या थोरपणालाच शोभते झालें ! पण मला हें पटत नाहीं. कारण, अभेदाचा उपदेश करणारे तुम्हीं भेद टाक म्हणून सांगतां त्यावरून भेद एक निराळा आणि त्याचा त्याग करणारा मी एक निराळा असें द्वैत बाळगल्यासारखेच झाले, याचे मला आश्चर्य वाटते ! १९. हें पहा ! सूर्य उगवण्याचें पूर्वी ' मला यावयाचे आहे. अंधाराला एका बाजूला घालवून द्या ' असें जगाला म्हणतो काय ? सूर्य उगवल्याबरोबर अंधःकाराचा आपोआप नाश होतोच. त्याचप्रमाणें, सर्व जगत् ईश्वरमय आहे, असें ज्ञान उत्पन्न होण्याबरोबर ईश्वरास जाणणाराहि तद्रूपच होतो. पण देवा, या बाबतींत तुम्हांला अविचारी असें तरी कसें म्हणावें ! कारण मर्यादेचें अतिक्रमण व अति प्रसंग होईल ३२०. प्रभो ! तुमचे फक्त नांव जर कोणत्या एखादेवेळीं ज्याच्या मुखांत येईल म्हणजे कोणी तोंडानें उच्चारले किंवा कानावर पडले म्हणजे–कानांनीं ऐकले तर त्यांच्या अंतःकरणाला भेद खरोखर टाकून देऊन पळेल २१. असे ते तुम्ही प्रत्यक्ष पूर्ण परब्रह्मच जर माझ्या सुदैवानें हातावर उदक सोडून दान दिल्याप्रमाणें मला लाभला आहां तर तुम्हांआम्हांत भेद म्हणतां तो कोठून असणार ! तो कोणी पाहावा ! व कोठें पहावा ? २२. हें पहा, एकाद्यानें चंद्रबिंबाच्या गाभाऱ्यांत प्रवेश केल्यावरहि त्याला उकडावयास लागलें, असें जर कोणी म्हटलें तर ते शोभेल काय ? त्यांत वेडेपणा आहे. पण श्रीकृष्णा, आपण थोर मोठे आहां तेव्हां हवें तसें बोला ! " २३. हें बोलणें ऐकतांच श्रीकृष्णास सहजच अतिशय संतोष झाला व त्यांनीं अर्जुनाला अंतःकरणपूर्वक आलिंगन देऊन म्हटलें, अर्जुना ! तुझा आक्षेप बरोबर आहे; पण " आमच्या बोलण्याचा तूं राग मानूं नकोस २४.

१. मात्र म्हणूं नको. २ सामुग्री. ३ ती कामधेनु. ४ एकदम. ५ खूण. ६ उत्तम. ७ कलंक. ८ दृष्टि. ९ विचार, गोष्ट. १० वेगळाल्या. ११ मोजशील. १२ सारिखें बरोबर. १३ ज्ञानी हेंच कोणी वन, त्यास वसंतरूप अशा श्रीकृष्णानें. १४ थोरपणा. १५ अविचारी. १६ सर्व, संपूर्ण. १७ हातावर उदक घालून. १८ प्रवेश केल्यावरहि. १९ मोठेपणानें, प्रभुत्वानें २० तात्काळ. २१ मनानें. २२ मार्गी, प्रवाही.

विभूतींची कहाणी । ते अभेदें काय अंतःकरणीं । मानिली कीं न मने ॥ २५ ॥ हेंचि पाहावयालागीं । नावेक बोलिलों बाहेरिसेवडिया भंगीं[३] । तंव विभूती तुज चांगी । आलिया बोधा ॥ २६ ॥ तेथ अर्जुन म्हणे देवें । हें आपुलें आपण जाणावें । परी देखतसें विश्व आघवें । तुवां भरलें ॥ २७ ॥ पैं राया तो पंडुसुतु । ऐसिये प्रतीतीसि जाहला वैरितु । या संजयाचिया बोला निवांतु । धृतराष्ट्र राहे ॥ २८ ॥ कीं संजयो दुखवलेनि अंतःकरणें । म्हणतसे नवल नव्हे दैव दवडणें । हा जीवें धाडसा आहे मी म्हणें । तंव आंतुही आंधळा ॥ २९ ॥ परी असो हें तो अर्जुनु । स्वहिताचा वाढवितसे मानु । कीं याहीवरी तया आनु । धिंवसा उपनला ॥ ३३० ॥ म्हणे हेचि हृदया आंतुली प्रतीती । बाहेरी अवंतरो कां डोळ्यांप्रती । इये आर्तीचियें पाउलीं मती । उठती जाहली ॥ ३१ ॥ मियां इहींच दोहीं डोळां । झोंबावें[१] विश्वरूपा सकळा । एवढी हांव तो देवा आगळा[३] । म्हणौनि करी ॥ ३२ ॥ आजि तो कल्पतरूची शाखा । म्हणौनि वांझोळें न लगती देखा । जें जें येईल तयाचि मुखा । तें तें साचचि करितसे येरु[३] ॥ ३३ ॥ जो प्रल्हादाचिया बोला । विषाहीसकट आपणचि जाहला । तो सद्गुरु असे जोडला । किरीटीसी ॥ ३४ ॥ म्हणौनि विश्वरूप पुसावयालागीं । पार्थ रिगेता होईल कवणें भंगीं" । तें सांगेन पुढिलिये प्रसंगीं । ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा ॥ ३३५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां दशमोऽध्यायः ॥ १० ॥ श्लोक ४२, ओंव्या ३३५.



कारण, भेदाचा स्वीकार करून तद्वारां आम्ही जो विभूति योग किंवा विभूतिविषयीं जे कांहीं सांगितलें, तें अभेद-रूपानें तुझ्या मनांत निश्चित ठसलें कीं, नाहीं २५. हेंच समजून घेण्याकरितां क्षणभर बाह्यात्कारी खडा टाकून पाहण्यासारखें बोललों, तों माझ्या विभूतींबद्दल तुला अभेदानें चांगला बोध झाला आहे असें दिसलें ! " त्यांत मला संतोषच आहे २६. तेव्हां अर्जुन विनयानें म्हणाला, " देवा! माझा बोध काय आहे हे आपलें आपणच काय तें पाहून घ्या; पण अनुभूतीदृष्ट्या म्हणाल तर या विश्वांत सर्वत्र तुम्हीच भरलेले आहां, अशी माझी पक्की समजूत झाली आहे २७. अशा रीतीनें अर्जुन अभेद बोधाच्या योग्यतेस आला त्या अनुभूतीस वरता झाला, असें सांगत असतां धृतराष्ट्र राजा स्तब्ध बसला होता २८. तेव्हां संजयाच्या मनांत खेद वाटून तो म्हणाला, सहज दैवानें लाभ होत असतां तो दडवणें हें नवल नव्हे कां ? धृतराष्ट्रराजाची ज्ञानदृष्टी शाबूत आहे, हा मनानें समजुतदार आहे, असें मी समजत होतों; परंतु तसा प्रकार नसून हा बाह्यदृष्टींप्रमाणें, चर्मचक्षूंप्रमाणें आंत ज्ञानदृष्टीनेंहि आंधळा आहे २९. [ श्रीज्ञानेश म्हणतात ] परंतु ही धृतराष्ट्राची गोष्ट असूं द्या. अर्जुन मात्र आपल्या स्वहिताची योग्यता वाढवीत आहे. कारण, कीं, या गोष्टींपेक्षांहि दुसऱ्या एका गोष्टींविषयीं त्याच्या मनांत तीव्र उत्कंठा उत्पन्न झाली ३३०. व तो आपल्या-शीच म्हणाला, " सर्व जग ईश्वरमय आहे, असा जो माझ्या अंतःकरणांत अनुभव आला आहे, तो माझ्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष प्रगट व्हावा" या इच्छेच्या पावलांनीं अर्जुनाचीं बुद्धि चालूं लागली ३१. तो मोठा दैववान् असल्यामुळें अशीं मोठी इच्छा करूं लागला कीं, " ह्याच दोन्हीं डोळ्यांनीं मी सकळ विश्वरूप पाहावें " ३२. आज अर्जुन म्हणजे कल्पतरूची केवळ शाखाच आहे असें समजा म्हणून त्याला वांझ फुलें व फळें कधींहि यावयाचीं नाहींत. कारण, त्याच्या तोंडून ज्या ज्या गोष्टी निघतील, त्या त्या श्रीकृष्ण परमात्मा खऱ्या करीत आहेत ३३. जो श्रीकृष्ण परमात्मा प्रल्हादाच्या बोलाप्रमाणें विषाहि सकट आपणच सर्व पदार्थ बनला, तोच श्रीकृष्ण सद्गुरु आज अर्जुनास प्राप्त झाला आहे ३४. म्हणून श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव श्रोत्यास म्हणतातः-" मला विश्वरूप दाखवा " असें विश्वरूप पुसण्याकरितां पार्थ कशा रीतीनें आरंभ करील, सरसावेल ती कथा आतां पुढील प्रसंगीं सांगेन ३३५.

१ क्षणभर. बाह्यात्कारी. ३ रीतीनें, प्रकारानें ४ सर्व. ५ अनुभवाला. ६ योग्यतेस आला. ७ डोळस. ८ उत्कंठा, धैर्य. ९ उत्पन्न झाला. १० प्रकट होवो. ११ इच्छेच्या. १२ व्हिलगावें, आलिंगन द्यावें [ पहावें ]. १३ मोठ्या दैवाचा. १४ श्रीकृष्ण. १५ पुढें सरेल, आरंभ करील. १६ रीतीनें. १७ अध्यायांत.



# अध्याय संगति व दहाव्या अध्यायाचें तात्पर्य

## जेथ विभूति प्राति विभूति । प्रस्तुत अर्जुना सांगिजेति ।। अ. १०–५१

मागील अध्यायांत '**अहं क्रतुरहं यज्ञः**' या सोळाव्या श्लोकापासून ते "**तपाम्यहं वर्षं**" या एकोणिसाव्या श्लोकापर्यंत अमुक अमुक पदार्थ मी आहे; असें जे देवांनीं सांगितले आहे, त्यांत '**सदसत्**' सर्व मीच आहे, असेंहि सांगितलें आहे; तरीपण भगवंताच्या सर्वच्या सर्व विभूति ऐकाव्यांत या इच्छेनें अर्जुनानें प्रश्न केल्यावरून व परमात्मा दुर्विज्ञेय असल्यामुळें उपासनेकरितां व अन्वयज्ञानाकरितां देवांनीं श्रेष्ठ, श्रेष्ठ विभूति पुनः या दहाव्या अध्यायांत सांगण्यास प्रारंभ केला आहे.

गीता ग्रंथांतील ' उत्तर खंडाच्या व्याख्यानास आरंभ करण्यापूर्वी श्रीज्ञानेश आपल्या श्रीगुरूंना संस्कृत प्रचुर शब्दांनीं मंगलाचरण करून त्या निमित्तानें श्रीगुरूंचे तात्त्विक–स्वरूप, त्यांचा ऐश्वर्य-महिमा अवर्णनीय, निरुपम असल्याचे सांगून " विशद बोधविद्गदा ", " विद्यारविंद प्रबोधा " पदानें श्रीगुरूंचे श्रोत्रियत्व व " पराप्रमेय प्रमदा विलासिया " या पदानें श्रीगुरूंचे ब्रह्मनिष्ठत्व प्रतिपादनद्वारां श्रीगुरूंचे लक्षणच सांगितलें आहे. या ब्रह्मविद्याराज सर्व शास्त्रांच्या विसाव्याचे स्थान जी भगवद्गीता ती मी सामान्य; पण ओवीछंदांत गावी, असें मला केले. तें श्रीगुरूंचे सामर्थ्य होय. आतांपर्यंतच्या नऊ अध्यायांतील विषय सिंहावलोकनात्मक सूत्ररूपानें सांगून त्यांत नववा अध्याय म्हणजे 'एकाध्यायी गीताच' असून तो अनिर्वाच्य असा आहे; पण मी त्याचा अनुवाद करूं शकलों म्हणजे हे श्रीगुरु निवृत्तिनाथांचेच सामर्थ्य होय. मूळ संस्कृत गीता ग्रंथावरील त्याच तोडीची असणारी माझी मराठी टीका चांगली वांचून जर उचित अभिप्राय पटला तर मूळ ग्रंथ कोणता हे कळणार नाहीं, असें श्री ज्ञानेश्वर महाराज विनम्रभाव कायम ठेवून आत्मविश्वासपूर्ण शब्दांत सांगतात [ १ ते ४९ ] व नंतर श्रीज्ञानेश श्रीकृष्ण काय बोलले त्याचा अनुवाद करतात तो असाः–भगवंत म्हणतात—अर्जुना ! तुझें पूर्ण अवधान व तुझी श्रवणाची आस्था पाहून तुला पुनः आणखी ऐकवावें असेंच वाटूं लागले आहे, हे माझें बोलणे म्हणजे साक्षात ब्रह्मच अक्षरांचा अंगरखा घालून तुला खेंव देण्यास आले, असे आहे. येथें जो मी तुझ्या पुढें उभा दिसतो एवढाच मर्यादित नसून या सर्व विश्वांत अधिष्ठानरूपानें समव्याप्त, समराभरित आहे. मी तत्त्वतः प्रमाण प्रमेयभावरहित स्वयंप्रकाश असल्याकारणें व माझ्या प्रकाशाचें साह्य घेऊन प्रकाशित झालेलीं शब्दादि प्रमाणें, प्रत्यक्ष सर्वज्ञतुल्य वेद, ऋषि, देव हीं माझ्या यथार्थ स्वरूपास जाणूं–प्रकाशित करूं शकत नाहींत. याचा अर्थ मी अभावरूप आहे, असा मात्र नाहीं, ज्याप्रमाणें आईच्या उदरांतील गर्भ आपल्या आईचें वय जाणूं–सांगूं शकत नाहीं, त्यास आईचे वय कळेल कसें ! पण त्याचा अर्थ त्याची आईच नाहीं, असा होत नाहीं. कारण, उदरांतील गर्भाचें धारण–पोषण त्या आईवरच अवलंबून असते, त्याप्रमाणें साऱ्या प्रमाणांना उपजीव्यभूत–स्वयंप्रकाश जो मी त्या माझे, तीं प्रमाणें कसे प्रकाशन करूं शकतील !

वास्तविक मी अनादि–अनंत, स्थल–कालातील सर्वांचा जनक, सर्वधारक व सर्वनियामक आहे. त्यामुळें माझे यथार्थ स्वरूप कळणें अवघड आहे, तथापि जर कोणी इंद्रिय संगतीनें बाहेर धांवणाऱ्या वृत्ति अंतर्मुख करून, तीन देहाचा व पंचमहाभूतांचा विचारानें निरास करतो त्यास मात्र अनादि, सर्व लोकमहेश्वर स्वरूप अनुभवास येते व तो संकल्पाकडून टाकला जातो. तो ज्ञानाची चालती मूर्ति आहे. त्याचे अवयव ते सुखाचे जणुं अंकुर आहेत. माणूसपणा हा मात्र लोकदृष्टीस होणारा केवळ भ्रम होय. सारांश, ज्ञानी पुरुष साक्षात्कार संपन्न असून तो प्रकृति व तन्मूलक संकल्पापासून मुक्त होतो [ ५० ते ८० ].

वेगवेगळ्या प्राण्यांमध्यें प्रकृत्यनुसार असणारीं बुद्धि, ज्ञान, सुख, सहिष्णुता या सर्वांत किंबहुना ! ! सप्तऋषि, चार मनु, लोक इत्यादि ब्रह्मदेवापासून तों थेट मुंगीपर्यंत साऱ्या विश्वांत सामान्यरूपानें मीच व्यापून राहिलो आहे,

मी माझ्या विभूति आणि ज्यांत अधिष्ठानरूपानें मी ओतप्रोत, समान व्याप्त असें सारें विश्व, हे ब्रह्मरूपच आहे; अशी अद्वयानुभूति हाच अभेद भक्तियोग व हीच तत्त्ववेत्त्याची पराभक्ति होय. अद्वय ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारी भक्त पुरुष "जे जे भेटे भूत, ते ते मानिजे भगवन्त" या रूपाच्या सर्वांभूतीं भगवत् भावास पावलेले असून स्थिर-भक्ति-योगानें, प्रेमानें त्रैलोक्यांत संचार करीत राहतात. [ सर्वत्र परमात्माच घनदाट भरला आहे, हे सर्व जगत् परमात्म-रूपच आहे, ही तत्वदर्शी पुरुषाची अन्वय बोधाची उच्चभूमिका यांत सांगितली आहे. असा देवाचा व्यापक अनुभव म्हणजे शाश्वत अवस्था, सर्व साधनांचे साध्य, अशी ब्रह्मस्थिति, सर्व प्रमाणांची फलरूप सायुज्यतामुक्ति होय. ही सिद्ध लक्षणरूप अवस्था साधकास प्रयत्नसाध्य आहे. ती अन्वयाची भूमिका साधकानें सत्-प्रयत्नानें साध्य केली पाहिजे, हे त्यांत सूचित केले आहे ].

अशा भक्तांची जर परस्परांशीं गांठ पडली तर सर्वत्र अद्वयानंद ब्रह्म पाहाणाऱ्या भक्तांचीं अन्तःकरणें प्रेमभरित होऊन जातात व पूर्वसंस्कारवशात् सहजच त्यांचे परस्परांतील बोलणें, चालणें, ऐकणें, सांगणें इत्यादि सुखसंवाद अद्वय परमात्मविषयकच होतात. त्यांच्या त्या कर्तव्यबुद्धिरहित व्यवहाराचा आविष्कार भक्ति-प्रेम-रूपांत होऊन ते संतोष पावतात, देहभान विसरून जातात, त्या प्रेमभरांत रात्र, दिवस याचेहि त्यांस भान राहत नाहीं. सर्व विश्वांत माझेच कथन करीत राहतात. त्या कथाकीर्तनानंदांत अंगानें, जीवानें विरतात. त्यांच्या या पूर्व संस्कारामुळें होणाऱ्या 'सहज कीर्तनभक्तीं'त मानव-समाजोद्धाराचें एक महान् कार्यहि सहजच घडत राहते [ ८१ ते १२९ ].

या भक्तांनीं स्वर्ग व मोक्ष इत्यादि सुखाकडे केव्हांच पाठ फिरविलेली असल्यामुळें माझ्याजवळ त्या भक्तांना देण्याजोगी अशी वस्तु म्हणजे मद्विषयक निरतिशय प्रेम, भक्तिभाव ही होय; पण तो प्रेमभाव तर त्यांनी मी देण्यापूर्वीच आपण स्वतः कमविलेला असतो. शिवाय त्यांच्या मनाचा थोरपणा असा कीं, मला मोठेपणा देण्याकरितां तो प्रेमभाव आपण कमविलेला असूनहि 'तो आम्हांस भगवंतानें करुणेनें दिला' असें जगांत प्रसिद्धहि करतात. आतां त्यांना मी काय देणार ? मग मी फक्त त्यांचा प्रेमभाव वाढीस लावतो व त्याचा शाश्वत रक्षणात्मक क्षेम करतो. कारण, माझ्या घरींहि अशा प्रेमळ भक्तांचीच उणीव आहे. स्वर्ग, मोक्ष मिळवित या हेतूनें येणाऱ्यांना त्या त्या गोष्टी देऊन वाटेला लावतो; पण माझ्याजवळ असलेले साजुक दुःखसंबंधरहित सुख मात्र प्रेमळाकरितां जतन करून ठेवतो.

माझे भक्त साक्षात्कार प्राप्त्यर्थ वाटचाल करतेवेळीं अज्ञानात्मक रात्रीमध्यें दाट काळोख आला असतां मी हातांत तत्त्वज्ञानात्मक तेजस्वी मशाल घेऊन पुढें पुढें चालतो. अर्थात् अज्ञान तमाचा नाश करून असंभावनादि प्रतिबंधरहित ज्ञानाचा नित्योदय करतो. [ दीप ज्याप्रमाणें नवीन वस्तु निर्माण करीत नसून पूर्वसिद्ध वस्तूंचें ज्ञापन करून देतो, प्रकाशित करतो. त्याप्रमाणें मी मोक्ष नवीन उत्पन्न करीत नसून पूर्व नित्य विद्यमान् असाच अर्थात् ब्रह्मस्थितिरूप मोक्ष फक्त प्रकाशित करतो ] [ १३० ते १४३ ].

या भगवन्ताच्या उपदेश श्रवणानंतर अर्जुन म्हणाला:—"देवा ! माझी मनोवृत्ति शांत झाली; आत्मज्ञानरूपी नवा जन्म मी डोळ्यांनीं पाहिला. आज माझ्या आयुष्याचें सार्थक झालें, असें वाटत आहे. स्वविषयक जीवत्व कल्पना-रूपीं आंतरिक आंधार व देह व प्रपंच सत्यत्व कल्पनारूप बाह्य अंधार नाहींसा झाला ! देवा ! तुला मी माझा सखाच समजत होतो; पण आतां तूं नित्यसिद्ध, परब्रह्म आहेस हे मला समजले. फार काय सांगावे ! आजवर मोठमोठे ऋषि, तुझ्या स्वरूपाचें वर्णन करीत असल्याचें मी ऐकले आहे. देवर्षि नारद नेहमीं आमच्याकडे येत असत. त्यांच्या व असित, देवल-व्यास या परम ज्ञान्यांच्या मुखांतूनहि असेंच तुझें स्वरूप आहे म्हणून मी ऐकलें होतें; पण त्यावेळीं अज्ञानामुळें मजकडून त्यांचे बोलणें दुर्लक्षिले गेले, त्या श्रीव्यासादिकांची बोलणीरूप ज्ञानरत्नांच्या खाणी, पण तुझ्या-विना त्या माझ्याकडून उपेक्षिल्या जात होत्या; पण आपल्यासारखें योग्य श्रीगुरु भेटून आज तुम्ही सानुकूलतेनें मजवर कृपा केलीत त्यामुळें ऋषिमुनींच्या, वाडवडिलांच्या बोलण्यांतील सत्यता खात्रीपूर्वक पटली आहे व प्रत्यक्षानु-

भूतीचा लाभ झाला आहे. [ अर्जुनास नारदादिकांकडून झालेल्या आपाततः श्रवणानें परोक्ष ज्ञान झाले तरी तें अपरोक्ष ज्ञानपर्यंतसायि होण्यासाठीं त्यांस भगवंताच्या उपदेशाची जरूरी होती. त्या भगवंताच्या उपदेशानें पूर्वज्ञात परोक्ष-ज्ञानाचें संस्कार उद्‌भूत होऊन अर्जुनास प्रत्यक्ष ज्ञान झालें. अर्थात् ज्यानें मल-विक्षेपरहित होऊन प्रथम संत संगतींत राहून आपाततः सत्‌शास्त्र श्रवण करून परोक्षज्ञान संपादिलें असेल व तो श्रीगुरूंस शरण गेला असतां श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ श्रीगुरूंनीं उच्चारण केलेल्या तत्त्वमस्यादि महावाक्यात्मक वचनाची व त्या योग्य अधिकाऱ्याच्या कानाची भेट होतांच क्षणीं त्यास महावाक्यान्तर्गत "तत्-त्वम् असि" या पदांतील वृत्ति अखंडार्थरूप परमात्मा, या अर्थामध्यें असल्याचें पूर्वींच्या आपापतः श्रवणांतच ज्ञान झालें असल्यामुळें पुनः अखंडार्थरूप परब्रह्माचें स्मरण होऊन 'अहं ब्रह्मास्मि' त्याकारक अंतःकरण वृत्ति होते. त्या अधिकाऱ्यास अज्ञाननिवृत्तिपूर्वक ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारात्मक अनुभूति लाभते. त्यानें पूर्वी केलेले आपाततः श्रवण वायां न जातां सद्‌गुरुरूपी वसंतऋतु प्राप्त होतो त्याच वेळीं श्रवणादि साधनें फलीभूत होतात. असें यांत भावार्थरूपानें सूचित होते ].

देवा ! तूंच आपल्या स्वरूपास जाणणारा आहेस. जीवास स्वबुद्धि बलावर तुझ्या स्वरूपाचें ज्ञान होणें केवळ अवघडच नव्हे तर सुतराम् अशक्य आहे. तुझ्या स्वरूपाचें ज्ञान तूंच करुणेनें सांगितलें तरच इतरांस होऊं शकेल; तुझी थोरवी पाहिली तर मी तुझ्या पायाजवळ उभा राहण्यासाहि योग्य नाहीं; पण हे कृष्णा तूंच आम्हास आश्रयाचें ठिकाण आहेस, तरी मला विभूति सांग [ १४४ ते १८४ ].

तुझ्या दिव्य शक्तीनें व्याप्त असलेल्या मुख्य मुख्य व नामांकित विभूति मला सांग. सर्व कांहीं तूंच आहेस. तुझ्याविना दुसरें कांहीं नाहींच, असें असले तरीहि चिंतनार्थ तुझ्या विभूति सांग [ कारण, मनुष्याचें मन, बुद्धि यांची ज्ञान ग्रहणाची शक्ति सीमित असल्याकारणें चिंतनासाठीं विभूतिहि परिमितच हव्यात, देव सर्वत्र समव्याप्त असूनहि तसें त्याचें ज्ञान होत नाहीं. त्या सर्वव्यापक ब्रह्मात्मैक्यानुभवाचे विभूति चिंतनहि सुलभ; महत्त्वपूर्ण उपांग होय. परमात्मा तत्त्वतः निरुपाधिक, निर्विकार, असंसारी असल्यामुळें, उत्तमाचें उत्तम,-सर्वोत्कृष्ट असल्यामुळें तोच एकमेव 'उपास्य' आहे, आणि जीव हा संसारी अंतःकरणोपाधिवान् असल्याकारणें निकृष्ट आहे. अतएव तो उपासक असणेंच उचित आहे. जोंवर जीवास उपाधि–संसार आहे, तोंवर त्यानें सर्वोत्कृष्ट परमात्म्याची उपासना करावी विभूति चिंतन करावें म्हणजे त्या चिंतनानें अद्वय, त्रिगुणातीत परमात्म्याची आत्मत्वानें अपरोक्षानुभूति लाभते व त्यामुळें जीवहि त्रिगुणात्मक उपाधि–संसार यापासून मुक्त होतो. हाच या विभूति योगाचा–विभूति चिंतनाचा अर्जुनाच्या विभूति विषयक विचारणेचा मुख्य आशय होय ].

पूर्वी सातव्या व नवव्या अध्यायांत जरी कांहीं विभूति सांगितल्या आहेत, तरी त्या मला पुनः ऐकाव्या वाटतात. महाराज ! सामान्य आवडीचें विषयहि पुनः पुनः सेवन करावेत असें वाटतें. मग पहा, हे तर जन्म मरणरूपी अनर्थ परंपरा घालविणारे परमामृत असून त्याची मला आवड आहे. त्यामुळें माझें चित्त त्यास 'पुरे' असें म्हणूं शकत नाहीं शिवाय आपल्या मुखांतून बोधाच्या गोष्टी ऐकावयास मिळाल्या म्हणजे ते मूर्तिमंत 'नादब्रह्मच' आम्हांस प्राप्त झालें आहे. या अर्जुनाच्या बोलण्यानें श्रीकृष्ण आनंदित होऊन म्हणाले; अर्जुना ! तू माझ्या विभूति विचारल्यास त्या इतक्या असंख्य आहेत कीं, ज्याप्रमाणें आपल्या अंगावर किती केस आहेत, हे ज्याचें त्यासहि मोजता येत नाहीं, त्याप्रमाणें माझ्या विभूति असून त्यांची गणना मलाहि होत नाहीं; तथापि ज्या प्रमुख विभूति समजल्या–जाणल्या असतां बाकीच्या साऱ्या विभूति जाणल्या जातील त्या तुला सांगतो. [ कारण, मुख्य विभूति चिंतनानें उत्तम अधिकार प्राप्त होऊन सर्व विभूतींचें किंबहुना ! ! ब्रह्मांडाचें अधिष्ठान असणाऱ्या परब्रह्माचें आत्मत्वानें अपरोक्षज्ञान होते. त्यामुळें त्याच्या साऱ्या विभूति सहजच जाणल्या जातात. याचें कारण म्हणजे साऱ्या विभूतींत व सर्व ब्रह्मांडांत तोच सामान्य अधिष्ठानरूपानें व्याप्त आहे, हे होय [ १८५ ते २१४ ].

अर्जुना! यच्चयावत् प्राण्यांच्या हृदयांत असणारा जो आत्मा तो मीच आहें. त्याचप्रमाणें त्यांच्या स्थितीस व प्रलयालाहि मीच कारण आहे. अर्थात् मी प्रत्यगभिन्न व या चरचरात्मक सृष्टीस अभिन्ननिमित्तोपादान कारण असल्यामुळें भूतमात्रांच्या आंत-बाहेर, प्रारंभीं, मध्यंतरीं व शेवटींहि मीच आहे. म्हणून जडाजडांत माझीच व्याप्ति आहे. किंबहुना!! हे सर्व मद्रूपच आहे. [ प्रत्यगभिन्न व जगत्कारणत्व सांगण्याचा हेतु असा कीं, सर्वत्र ब्रह्मच ओतप्रोत व्यापक रूपानें भरलें आहे. मी ब्रह्मरूप आहे, असें ज्ञान होऊन त्याची परिणति संपूर्ण जगत् ब्रह्मरूप आहे, अशा व्यापक अनुभूतींत होते. ' सर्व ब्रह्मरूप आहे ' हा श्रुतिसिद्धान्त म्हणजेच गीता शास्त्राचें सारसर्वस्व होय. हाच अद्वैत तत्त्वज्ञानाचा गाभा होय. सर्व प्रमाणाचें अन्तिम फल होय. ] [ २१९ ते २२० ].

याप्रमाणें महत्त्वाचा सिद्धान्त सांगून भगवंतांनीं अर्जुनास नामांकित अशा ७५ विभूति सांगितल्या त्याचा अनुवाद करून श्रीज्ञानेश आपल्या भाष्यांत म्हणतात " माझ्या विभूति विस्तारास मुळींहि मर्यादा अशी नाहींच. म्हणून आम्ही सांगणार किती व तूं ऐकणार किती ? एवढ्यासाठीं एक वर्मच तुला सांगतो. ते म्हणजें संपूर्ण विश्वाचें आद्यकरण मीच असल्यामुळें हे सर्व विश्व माझेंच स्वरूप आहे, ही तत्त्ववेत्त्याची अन्वय भूमिका होय. त्यांत सामान्य विशेष, एक साधारण-एक चांगला असा, माझ्या अखंड, शुद्ध स्वरूपाचें ठिकाणीं आपल्या बुद्धीचा 'भेदरूप' कलंक निष्कारण लावूं नकोस. बुद्धींतील भेदभावना काढून टाकून सर्वत्र ऐक्य बोधानें मला भज [ २२१ ते ३१७ ].

तेव्हां अर्जुन म्हणाला देवा! एखादेवेळीं तुझें 'नाम'च ज्याचे मुखांत येईल अगर कानावर पडेल तरीहि त्याच्या अन्तःकरणास टाकून 'भेद' पळून जाईल. आपण सांगितलेल्या विभूति मला समजल्या. देव म्हणाले अर्जुना! अरे! आम्ही भेदद्वारां ' विभूति-कथा ' सांगितली, पण ती तुला अभेदभावानें पटली किंवा नाहीं, हे विचारून पाहिले, तेव्हां तुला विभूति चांगल्या समजल्या, असें माझ्या आढळांत आले. यावर अर्जुन म्हणतो देवा! हे आपले आपण जाणावें; पण माझा अनुभव मात्र हे विश्व तुमच्याच स्वरूपानें घनदाट भरले आहे, असा आहे. याचा दैवहीन धृतराष्ट्रावर मुळींहि परिणाम झाला नाहीं. हा जसा बाह्य चर्मचक्षूंनीं आंधळा आहे, तसाच आन्तरज्ञानचक्षूंनीं आंधळाच आहे. भाग्य येऊनहि त्यास दडवणे हे आश्चर्य नव्हे काय ? असें संजय मनांत कींव येऊन म्हणत असल्याचें, करुणापूर्ण शब्दांत म्हणत असल्याचें सांगून श्रीज्ञानेश म्हणतात-अर्जुनास हा आपला अंतःकरणगत व्यापक अनुभव बाह्यचर्म चक्षूद्वारां दिसावा, अशी तीव्र इच्छा निर्माण झाली. तो दैवानें थोर असल्यामुळें त्यास श्रीकृष्ण परमात्माच सद्गुरु भेटला होता. त्याकारणें त्याची इच्छा पूर्ण होण्यास काय अवकाश होता! जें जें अर्जुन इच्छा करील ते ते श्रीकृष्ण परमात्मा पूर्ण खरे करीत आहे [ ३१८ ते ३३३ ].

जी जी वस्तु श्रीमत्, विभूतिमत् उर्जित, वैभव, संपति आणि दया उभय अथवा ऐश्वर्य सामर्थ्ययुक्त असेल ती ती माझी विभूति आहे, असें जाण; असें सांगून विभूतिचिंतन सांगितलें आहे. तत्त्वतः सर्व [वस्तूमात्र ब्रह्मरूपच आहे; तथापि तें ज्ञान मंदबुद्धीस एकदम होणार नाहीं; सर्वत्र परमात्मा आहे ही अन्वयात्मक बोधभूमिका श्रेष्ठ आहे; पण तो बोधहि अज्ञानी मुमुक्षूंस केल्यास त्यास एकदम त्रिगुणातीत, निर्विशेष ब्रह्मस्वरूपाची आत्मत्वानें ओळख होणार नाहीं. याकरितां त्यानें पहिल्यानूदां विभूतियोग, विभूतिचिंतन करून प्रत्येक विभूतींतील विभूतिमत्व जाणून, उपासनेनें ज्ञानयोग्यता मिळवून सर्वत्र ब्रह्मभावरूप अन्तिम साध्य मिळवावे, असें या विभूति सांगण्यांतील मुख्य तात्पर्य होय. ]

या प्रकारें 'विभूति योगाचें' अमृत-मधुर शब्दांत वर्णन करून अर्जुन "मला विश्वरूप दाखवा" असें श्रीकृष्णास विचारण्यास कोणत्या रीतीनें सरसावेल ते मी पुढील अध्यायांत सांगेन, असें श्रीनिवृत्तिनाथांचें शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात [ ३३४ ते ३३९ ].

[ या संपूर्ण अध्यायाचा नकाशा क्रमांक १२ पहावा. ]

★

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा

आतां यावरी एकादशीं । कथा आहे दोहीं रसीं । येथ पार्था विश्वरूपेंसीं होईल भेटी ॥ १ ॥ जेथ शांतांचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा । आणि येरांही रसां पांतिकेरां । जाहला मानु ॥ २ ॥ अहो वधुवरांचिये मिळणीं । जैशीं वराडियां लुगडीं लेणीं । तैसे देशियेच्या सुखासेनीं । मिरवले रस ॥ ३ ॥ परी शांताद्भुत बरवे । जे डोळियांच्या अंजुळीं घ्यावे । जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेवां ॥ ४ ॥ नातरी अंवसेच्या दिवशीं । भेटलीं बिंबें दोनी जैशीं । तेवीं एकवेळा रसीं । केला एथ ॥ ५ ॥ मीनले गंगेयमुनेचे ओघ । तैसें रसां जाहलें प्रयाग । म्हणौनि सुस्नातें होत जग । आघवें एथ ॥ ६ ॥ माजीं गीता सरस्वती गुप्त । आणि दोनी रस ते ओघ मूर्त । यालागीं त्रिवेणी हे उचित । फावली बापा ॥ ७ ॥ एथ श्रवणांचेनि द्वारें । तीर्थी रिघतां सोपारें । ज्ञानदेवो म्हणे दातारें । माझेनि केलें ॥ ८ ॥ तीरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें । रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९ ॥ म्हणौनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें । प्रयागमाधव विश्वरूप पहावें । येतुलेनि संसारासि द्यावें । तिळोदक ॥ १० ॥ हें असो ऐसें सावयव । एथ सासिन्नले आथी रसभाव । तेथ श्रवणसुखाची राणीव । जोडली जगा ॥ ११ ॥ जेथ शांताद्भुत रोकडे । आणि येरां रसां पडप जोडे । हें अल्पचि परी उघडें । कैवल्य एथ ॥ १२ ॥ तो हा अकरावा अध्यायो । जो देवाचा आपणपें विसंवता ठावो । परी अर्जुन सदैवांचा रावो । जे एथही पातला ॥ १३ ॥ एथ अर्जुनचि काय म्हणों पातला । आजि आवडतयाही सुकाळु जाहला । जे गीतार्थु हा आला । मऱ्हाठिये ॥ १४ ॥ याचिलागीं माझें । विनविलें आइकिजे । तरी अवधान दीजे । सज्जनीं तुम्ही ॥ १५ ॥ तेवींचि तुम्हां संताचिये सभे । ऐसी सलगी कीर करूं न लभे । परी मानावें जी तुम्ही लोभें । अपत्या

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा

आतां यापुढें अकराव्या अध्यायांत जो कथाभाग आहे. तो शांत व अद्‌भुत या दोन रसांनीं भरलेला आहे; आणि या अध्यायांत भगवंताचें विश्वरूप अर्जुनाच्या दृष्टीस पडणार आहे १. कल्पना करा कीं, याठिकाणीं शांतरसाच्या घरीं अद्‌भुतरस हाच कोणी एक पाहुणा आलेला आहे आणि त्याच्याबरोबर इतर रसांनाहि दोन रसांच्या पंक्तीचा लाभ मिळाला आहे २. अहो! वधु-वरांच्या लग्न समारंभांत ज्याप्रमाणें वऱ्हाड्यांनाहि वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन मिरवावयास सांपडतें, त्याप्रमाणें देशी भाषेच्या सुखासनावर इतर सर्व रसांसहि मिरवणुकीचा लाभ मिळाला आहे ३. परंतु त्या सर्वांस शांतरस व अद्‌भुत रस, हे दोन चांगले रस असे शोभले कीं, ते डोळ्यांनीं प्रत्यक्ष पहावें, अशा प्रकारें कीं जणुं काय शंकर व विष्णु हें दोन देव प्रेमभावानें एकमेकांस आलिंगन देण्याकरितां आले आहेत ४. किंवा अमावास्येच्या दिवशीं ज्याप्रमाणें सूर्यबिंब व चंद्रबिंब या दोन्हींत अंतर न राहतां एक समयीं [ एकाच दिशेस ] भेटावीं, त्याप्रमाणें शांत व अद्‌भुत यांचें ऐक्य झालें आहे ५. किंवा ज्याप्रमाणें गंगा व यमुना या दोन नद्यांचें ओघांचा प्रयागास संगम झाला आहे, त्याप्रमाणें शांत व अद्‌भुत या दोनहि रसांचा एकत्र मिळून झालेला संगम म्हणजे अकरावा अध्याय हा जणुं काय प्रयाग-क्षेत्रच बनला आहे; म्हणून हा अध्याय ऐकल्यानें जणुं येथें स्नान करून सर्व जगांतील मुमुक्षु जन पवित्र होतात ६. या दोन रसांच्या संगमांत गीतारूप तिसरी सरस्वती नदीच गुप्त आहे; शांत आणि अद्‌भुत हे दोनहि रस गंगायमुनांच्या ओघाप्रमाणें मूर्तिमंत स्पष्ट दिसत आहेत; म्हणून बाबांनो! अकरावा अध्याय हा योग्य असा त्रिवेणी संगमाचा योग सर्वांस प्राप्त झाला आहे, असें समजा ७. या ठिकाणीं श्रवणेंद्रियाच्या द्वारानें या तीर्थांत शिरणें फार सोपें केलें आहे. [ त्रिवेणी-संगमाप्रमाणें येथें बुडण्याची भीति नाहीं ] असें सांगून ज्ञानदेव म्हणतात, मला निमित्त करून हा इतका सोपा मार्ग आमचे गुरु जे श्रीनिवृत्तीनाथ त्यांनीं केला आहे ८. या गीतारूप तीर्थाचें संस्कृत भाषारूप तीर कठीण असल्यामुळें, ते किनारे तोडून व तेथें मराठी भाषेतील शब्दरूपी पायऱ्यांचें सोपे घाट करून केवळ धर्माची खाणच असलेल्या श्रीनिवृत्तिदेवांनीं ठेवले आहेत ९. म्हणून वाटेल त्यानें या त्रिवेणी संगमरूपी तीर्थांत भक्ति-भावानें स्नान करावें; व ज्याप्रमाणें प्रयाग क्षेत्रांत माधवाचें दर्शन घेतात त्याप्रमाणें येथें श्रीभगवंताच्या विश्वरूप माधवाचें दर्शन घ्यावें आणि एवढें करून जन्ममरण-रूप संसाराला तिलांजली द्यावी [ संबंध सोडावा ] १०. फार काय सांगावें ! या अकराव्या अध्यायांत सर्व रस मूर्तिमंत उत्कर्षानें उभे आहेत व त्या ठिकाणीं जगाला श्रवणसुखाची रेलचेल झालेली आहे ११. या अध्या-यांत शांत–अद्‌भुत रस हे तर प्रत्यक्ष दिसत आहेतच; तरीपण इतर रसांचीहि शोभा दृष्टीस पडत आहे; यास ही उपमाहि किंवा हे वर्णन देखील थोडेच आहे; पण या अध्यायांत उघड उघड मोक्षसुखच प्राप्त होतें; १२. तो हा अकरावा अध्याय आहे कीं; जो स्वतः देवांचें खास विश्रांतिस्थान आहे, पण अर्जुन हा भाग्यवानांचा मुकुटमणिच आहे. कारण तो या अशा ठिकाणीं देखील येऊन पोहोंचला आहे १३. या ठिकाणीं अर्जुनच एकटा आला आहे म्हणून कशाला म्हणावें ? तर गीतेचा अर्थ मराठी भाषेंत झाल्यामुळें आज वाटेल त्या मनुष्यास येथील सुखाचा सुकाळ झाला आहे १४. याच-करितां मी जी विनंती करीत आहे ती तुम्ही ऐका कीं, तुम्हीं सज्जनांनीं इकडे लक्ष द्यावें १५. तुम्हां संतांच्या सभेपुढें मी इतक्या सलगीनें बोलणें योग्य नाहीं; परंतु

१. शांत व अद्‌भुत या दोन्हीं रसांत २ शांतरसाच्या. ३ मेजवानीस, पाहुणचारास ४ इतरहि. ५ पंक्तीस आले-ल्यास. ६ लग्नसमारंभांत ७ अलंकार. ८ मराठी भाषेच्या. ९ पालखींत. १० शोभले. ११ ओंजळींत. १२ आलिंग-नास. १३ सूर्यचंद्र बिंबें. १४ एकोपा. १५ मिळाले. १६ पवित्र. १७ कर्णेंद्रियद्वारा. १८ निवृत्तिनाथानें, दात्यानें.

मज ॥ १६ ॥ अहो पुंसा आपणाचि पढविजे । मग पढे तरी माथा तुकिजे । कां करविलेनि चोजें न रिझे । बाळका माय ॥१७॥ तेवीं मी जें जें बोलें । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें । म्हणौनि अवधारिजो आपुलें । आपण देवा ॥ १८ ॥ हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड । तरी आतां अवधानामृतें वाड । सिंपोनि कीजे ॥ १९ ॥ मग हें रसभाव फुलीं फुलेल । नानार्थ फळभारें फळा येईल । तुचचेनि धर्में होईल । सुरवाडु जगा ॥ २० ॥ या बोला संत रिझले । म्हणती तोषलों गा भलें केलें । आतां सांगें जें बोलिलें । अर्जुनें तेथ ॥ २१ ॥ तंव निवृत्तिदास म्हणे । जी कृष्णार्जुनांचें बोलणें । मी प्राकृत काय सांगों जाणें । परी सांगवा तुम्ही ॥ २२ ॥ अहो रानींचिया पालेखाइरा । नेवांणें करविले लंकेश्वरा । एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा । न जिणेचि काई ? ॥ २३ ॥ म्हणौनि समर्थ जें जें करी । तें न हो नें ये चराचरीं । तुम्हीं संत तयापरी । बोलवा मातें ॥ २४ ॥ आतां बोलिजतसें आइका । हा गीताभाव निका । जो वैकुंठनायका- । मुखौनि निघाला ॥ २५ ॥ बाप बाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतिपाद्य देवता । तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथीं ॥ २६ ॥ तेथिंचें गौरव कैसें वानावें । जें श्रीशंभूचिये मती नागवे । तें आतां नमस्कारिजे जीवेंभावें । हेंचि भलें ॥ २७ ॥ मग आइका तो किरीटी । घालूनि विश्वरूपीं दिठी । पहिली कैसी गोठी । करिता जाहला ॥ २८ ॥ हें सर्वही सर्वेश्वरु । ऐसा प्रतीतिगत जो पतिकरु । तो बाहेरी होआवा गोचरु । लोचनांसी ॥ २९ ॥ हे जिवाआंतुली चाड । परी देवासि सांगतां सांकड । कां जें विश्वरूप गूढ । कैसेनि पुसावें ? ॥ ३० ॥ म्हणे मागां कवणीं कहीं । जें पढियंतेनें पुसिलें नाहीं । तें सहसा कैसें काई । सांगा म्हणों ? ॥ ३१ ॥ मी जरी सलगीचा चांगु । तरी काय आइसीहूनि अंतरंगु । परी तेही हा प्रसंगु । बिहाली पुसों ॥३२॥ माझी आवडे तैसी सेवा जाहली । तरी काय होईल गरुडाचिया येतुली ? । परी तोही हें बोली । करीचिना ॥ ३३ ॥ मी काय सनकादिकांहूनि जवळां । परी तयांहि नागवेचि हा चाळा । मी आवडेन काय प्रेमळां । गोकुळींचिया ऐसा ? ॥ ३४ ॥ तयांतेंही लेंकुरपणें झांकविलें । एकाचे गर्भवासही साहिले । परी विश्वरूप हें राहविलें । न दावीच कवणा ॥ ३५ ॥ हा ठांयवरी गुंज । याचिये अंतरींचें हें निज ।

मी जें तुमचे लेकरूं त्या मला तुम्ही प्रेमानें मानावें [ म्हणून मी सलगी करीत आहे ] १६. अहो राघूस आपणच शिकवावें आणि तोच आपण पढविल्याप्रमाणें बोलल्यावर आपणच पसंतीनें मान डोलवावी; किंवा आई आपल्या लेंकराकडून कौतुकानें एखादी गोष्ट करवून घेऊन तें पाहून मनांत रिझत–संतुष्ट होत नाहीं काय ? १७. त्याप्रमाणें प्रभो ! मी जें जें कांहीं बोलेन, तें तुम्हींच मला शिकविलेलें आहे. म्हणून देवा ! आपलें शिकविलेले बोलणें आपणच श्रवण करावें १८. महाराज ! माझें भाषण म्हणजे तुम्हींच लावलेलें गोड असें एक ज्ञानाचें झाड आहे. तर याला एकाग्र अंतःकरणपूर्वक लक्ष देणें हेंच कोणी एक अमृत ते शिंपून आपण वाढवावें १९. मग या ज्ञानाच्या झाडाला नवरसभावादि फुलें येऊन तें फुलेल; पुष्कळ प्रकारच्या अर्थरूप फलभारानें लवेल व तुमच्या या लक्ष देणेंरूप धर्मानें सर्व जगास श्रवण-सुख प्राप्त होईल २०. असें बोलल्यावर सतंजन संतुष्ट व प्रसन्न झाले व म्हणाले, "ज्ञानोबा ! आम्ही तुझ्या बोलण्यानें संतोष पावलों, फार चांगले केलेस. आतां अर्जुन काय बोलला; तेवढें सांग" २१. तेव्हां श्रीनिवृत्तीचे दास श्रीज्ञानदेव म्हणाले–महाराज ! कृष्णार्जुनांचा संवाद माझ्यासारख्या सामान्यास कसा सांगतां येईल ? पण तुम्हीं मला शक्ति देऊन माझ्याकडून सांगवून घेतले तर तेहि होईल २२. अहो ! रानावनांतील पाला खाणाऱ्या वानरांकडून लंकाधीश रावणाचाहि पराभव करविला, त्याप्रमाणें एकट्याच अर्जुनाकडून कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य जिंकविलें नाहीं काय ? २३. म्हणून जगतामध्यें समर्थ जे जे करतील वा करावयाचें मनांत आणतील ते ते चराचरांत होणार नाहीं, असें मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें आपणहि सन्त समर्थ आहांत, म्हणून आपण मनांत आणाल तर माझ्याकडून गीतार्थ बोलवाल २४. आतां साक्षात् वैकुंठनायक श्रीकृष्णाच्या मुखांतून निघालेल्या गीतेचा जो खरा भावार्थ आहे तो मी तुम्हांला सांगतों, इकडे लक्ष असूं द्या २५. धन्य धन्य तो गीताग्रंथ ! कारण वेदप्रतिपाद्य म्ह. वेद ज्या परमात्म्याचें प्रतिपादन करितात, तो स्वतः परमात्माच या गीतेचा वक्ता आहे २६. ज्या गीताशास्त्राचें महत्त्वपूर्ण तत्त्व श्रीशंकराच्या बुद्धीलाहि आकलन होत नाहीं, त्या गीताशास्त्राचें महत्त्व मी कसें वर्णन करावें ? म्हणून त्या गीताशास्त्रास जीवाभावानें वंदन करावें हेंच चांगलें ! २७. त्यानंतर पुढें त्या अर्जुनानें विश्वरूप पाहण्याची मनांतील इच्छा तृप्त करून घेण्याकरितां प्रथम विश्वरूपावर नजर ठेवून श्रीकृष्णाबरोबर चतुराईनें बोलण्याचा कसा उपक्रम केला, ते ऐका २८. हें सर्वहि जग सर्वेश्वररूप आहे, अशा प्रतीतीला पोंचलेला जो सेवक अर्जुन, त्यांस बाहेरच्या दृष्टीलाहि तशीच ईश्वरप्रतीती यावी २९. अशी त्याच्या मनांतील खरी इच्छा ! परंतु तसें स्पष्ट देवास सांगण्याचें त्यास धैर्य होईना व त्यास संकट वाटूं लागलें. कारण तें देवाचें गुह्य विश्वरूप आपण उघड करून दाखवितां कां ? असें आपण तरी एकदम कसें विचारावें ? ४०. तो अर्जुन मनांत म्हणतोः–पूर्वी कोणत्याहि आवडत्या भक्तानें जें कधीं पुसलें नाहीं, तें विश्वरूप मला दाखवा, असें एकाएकीं कसें म्हणावें ? ३१. मी जरी देवांच्या विशेष सलगींत असलों तरी आईपेक्षां जास्त अंतरंग होईन काय ? पण ती इतकी जवळची असून देखील हा विषय विचारावयास भ्याली ! ३२. मी जरी यांची हवी तेवढी सेवा केली असली, तरी त्या बाबतींत माझ्यानें गरुडाची बरोबरी करवेल काय ? पण त्या निकट सेवा करणाऱ्या गरुडानेहि या विश्वरूपाचें नांवसुद्धां काढलें नाहीं ३३. मी सनकादिकांपेक्षां जास्त देवांच्या सन्निध वास करणारा आहे काय ? पण त्यांना देखील हा विश्वरूप विचारण्याचा चाळा सुचला नाहीं. तसेंच मी गोकुळींच्या भाविक गोपगोपींपेक्षां जास्ती देवाला आवडता आहे काय ? ३४. पण त्या गोकुळांतील भाविक लोकांनाहि यांनी आपण केवळ लेंकरू आहोंत, असें दाखवून फसविलें व एका करितां म्ह. अंबऋष्यादिकांकरितां गर्भवासहि सोसले; पण आपलें गुह्य हे विश्वरूप कोणासहि न दाखविता तसेंच गुप्त राखून ठेविलें ३६.

१ राघूला. २ डोलवावा. ३ कौतुकानें. ४ संतोषत नाहीं. ५ श्रवण करावें. ६ विद्येचें. ७ एकाग्र लक्षरूपी अमृतानें. ८ मोठें. ९ अनेकविध अर्थ. १० सुख, सुकाळ. ११ प्रसन्न झालें. १२ पाला खाणाऱ्या वानरांकरवीं. १३ पराभव. १४ जिंकणारा नाहीं काय ? १५ होणार नाहीं असे नाहीं. १६ श्रीकृष्णाच्या मुखांत. १७ धन्य धन्य. १८ वर्णावें. १९ बुद्धीला आकळत नाहीं. २० अनुभवजन्य. २१ प्रकार. २२ प्रत्यक्ष, स्पष्ट. २३ अवघड, जड, संकट. २४ गुह्य. २५ आवडल्यानें. २६ चांगल्या स्नेहातला. २७ यशोदामातेपेक्षां. २८ जिवलग. २९ भ्याली. ३० गोकुळांतील प्रेमळ जनांसारखा. ३१ फसविलें. ३२ अंबरिषांचें. ३३ राखून ठेविलें. ३४ अशा तन्हेचें. ३५ गुह्य.

केवीं उरांउरी मज । पुसों ये पां ? ॥ ३६ ॥ आणि न पुसेंचि जरी म्हणे । तरी विश्वरूप देखिलियाविणें । सुख नोहेचि परी जिणें[2] । तेंही विपायें[3] ॥ ३७ ॥ म्हणौनि आतां पुसों अळुमाळसें[4] । मग करूं देवा आवडे तैसें । येणें प्रवर्तला साध्वसें । पार्थु बोलों ॥ ३८ ॥ परी तेंचि ऐसेनि भावें । जें एका दों उत्तरांसवें । दावी विश्वरूप आघवें । झाडा देउनी ॥ ३९ ॥ अहो वांसरूं देखिलियाचिसाठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी । मग स्तनामुखाचिये भेटी । काय पान्हा[6] धरे ? ॥ ४० ॥ पाहा पां तया पांडवाचेनि नांवें । जो कृष्ण रानींही प्रतिपाळूं धांवे । तयातें अर्जुनें जंव पुसावें । तंव साहील[7] काई ? ॥ ४१ ॥ तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण । आणि येरु स्नेहा घातलें आहे माजवण । ऐसिये मिळवणी वेगळेपण । उरे हेंचि बहु[8] ॥ ४२ ॥ म्हणौनि अर्जुनाचिया बोलासरिसा । देव विश्वरूप होईल आपैसा[9] । तोचि पहिला प्रसंगु ऐसा । ऐकिजे तरी ॥ ४३ ॥

अर्जुन उवाच :—

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् । यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥

मग पार्थु देवातें म्हणे । जी तुम्ही मजकारणें । वाच्य केलें जें न बोलणें । कृपानिधे ॥४४॥ जें महाभूतें ब्रह्मीं आटती[12] । जीव महदादींचे[13] ठाय फिटती । तैं जें देव होऊनि ठाकती[14] । तें विसवणें शेषींचें[15] ॥ ४५ ॥ होतें हृदयाचिये परिवेरीं[16] । रोंविलें कृपणाचिये परी । शब्दब्रह्मासही[17] चोरी । जयाची केली ॥ ४६ ॥ तें तुम्हीं आजि आपुलें । मजपुढां हियें[18] फोडिलें । जेंया[19] अध्यात्मा वोवाळिलें । ऐश्वर्य हरें ॥४७॥ ते वस्तु मज स्वामी । ऐकिहेळां[20] दिधली तुम्ही । हें बोलों तरी आम्ही । तुज पावोनि कैंचे ॥४८॥ परी साचचि महामोहाचिये पुरीं । बुडालेया देखोनि सीसंवरी[21] । तुवां आपणपें घालोनि श्रीहरी । मग काढिलें मातें ॥४९॥ एक तूंवांचूनि कांहीं । विश्वीं दुजियाची भांष[22] नाहीं । कीं आमुचें कर्म पाहीं । जे आम्हीं आर्थी[23] म्हणों ॥५०॥ मी जगीं एक अर्जुनु । ऐसा देहीं वाहे अभिमानु । आणि कौरवांतें इयां स्वजनु । आपुलें म्हणें ॥ ५१ ॥ याहीवरी यांतें मी मारीन । म्हणें तेणें पापें कें रिगेन । ऐसें देखत होतों दुःस्वप्न । तों चेवविलों[24] प्रभु ॥ ५२ ॥ देवा गंधर्वनगरीची[25] वस्ती । सोडूनि निघालों लक्ष्मीपती । होतों उदकाचिया औतीं[26] । रोहिणी[27]

एवढी ही गुप्त गोष्ट आहे, श्रीकृष्णाच्या अंतर्यामींची गुह्य राखून ठेवलेली गोष्ट आहे ती मला एकदम कशी पुसतां येईल? ३६. बरें, पुसूं नये असें म्हटलें तर विश्वरूप पाहिल्याशिवाय मी बेचैन होऊन मला सुख होणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर कदाचित् मी जिवंत राहीन किंवा नाहीं हाहि संशयच आहे ३७. म्हणून देवाच्या मनांत विश्वरूप दाखवावें असें येईल, अशा तऱ्हेनें थोडेसे विचारूं या, मग देवाच्या मर्जीस–इच्छेस येईल तसें ते–करोत, असा विचार करून अर्जुन भीत भीत बोलूं लागला ३८. परंतु तो अशा खुबीनें बोलला कीं देवांनीं एकदोन शब्दाबरोबरच आपले संपूर्ण विश्वरूपच त्यास झाडून दाखवावें ३९. असें अर्जुनाकरितां देवांनीं करावें यांत आश्चर्य ते काय? अहो! वांसराला पाहिल्याबरोबर लागलींच गाय प्रेमानें खडबडून उठते व पुढें वांसराच्या तोंडाची व तिच्या स्तनांची गांठ पडल्यावर तिच्यानें पान्हा चोरवेल काय? ४० असें पहा, बरें! ज्या पांडवांचें नांव ऐकल्याबरोबर त्यांचें संरक्षण करण्याकरितां श्रीकृष्ण भगवान् रानावनांतहि धांवलें, त्यांना अर्जुनानें विचारावें व मग आपण सांगावें एवढे तरी सहन करवेल कां! ४१. श्रीकृष्णभगवान् हे स्वभावतः, मूर्तिमंत स्नेहच होत. त्यांना अर्जुनरूपी प्रेमाचे माजवण मिळाल्यानें या दोघांच्या ऐक्यभावांत यांच्या दोन वेगळाल्या मूर्ति दिसतात हाच फार चमत्कार होय ४२. म्हणून अर्जुनानें विचारल्याबरोबर देव आपोआप विश्वरूप धारण करतील; तरी तोच आतां आरंभींचा प्रसंग ऐकावा ४३.

**अन्वयार्थ**—[ **हे भगवन्**–हे कृष्णा! ]–**मदनुग्रहाय**–माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं–**परमं गुह्यम् अध्यात्म संज्ञितम्**–अत्यंत गुह्य ‘अध्यात्म’ या नांवाचें **यत् वचः**–जें वचन–**त्वया**–तूं–**उक्तं**–सांगितलेंस–**तेन**–त्याच्या योगानें–**मम**–माझा–**अयं**–हा **मोह**–अविवेक–**विगतः**–पार निघून गेला आहे ९.

विश्वरूप पाहण्याच्या इच्छेनें मग पार्थ देवाला म्हणाला “कृपानिधे! तुम्ही माझ्याकरितां शब्दानें जे सांगता येत नाहीं तें शब्दानें बोलून दाखविलें ४४. जेव्हां पंचमहाभूतें ब्रह्मामध्यें लीन होतात आणि जीव आणि महत्तत्त्वादि कार्येंहि लय पावतात, त्या वेळेस ईश्वर जें रूप धारण करून राहतात, तें कार्याच्या दृष्टीनें शेवटचें विश्रांतीस्थान होय ४५. तें कृपणाच्या सारखें तुम्ही आपल्या हृदयांत सांठविलेलें असून वेदांनाहि चोरून ठेविलेलें होतें, ४६. ते [ स्वरूप ज्ञान ] आज माझ्यापुढें हृदय मोकळें करून स्पष्ट सांगितलें, त्या परमात्म स्वरूपाचें ऐश्वर्य काय सांगावें! ज्या अध्यात्मज्ञानासाठीं साक्षात् शंकरांनीं आपले सर्व ऐश्वर्य सोडून स्मशानवास केला ४७. तें आत्मज्ञान प्रभो! तुम्हीं मला एकदम दिलें आहे, पण असें जर म्हणावें, तर तुमच्याशीं ऐक्य झाल्यावर आम्हीं वेगळें कोठे आहोत [ ऐक्यांत देणेंघेणें कोठून उरणार! ] ४८. परंतु आपण उपदेश केला याचा अर्थ खरोखर मोहरूप पुरांत मी डोक्यापर्यंत बुडालों असें पाहून आपण स्वतः उडी घालून मला बाहेर काढले, असाच आहे ४९. खरोखर फक्त तुमच्यावांचून या जगांत दुसरी वस्तु नाहीं. परंतु आमचें कर्म कसें ओढवलें पहा–कीं, ‘देहच मी’ या भ्रमांत पडून तुमच्याहून भिन्न आहों, असें आम्ही उघड म्हणत आहों ५०. मी या जगांत कोणी एक अर्जुन आहे, असा या देहाचा अभिमान बाळगीत होतों व या कौरवांना आप्त म्हणत होतों ५१. या शिवाय आणखी त्यांना मी मारीन व त्यापासून होणाऱ्या पापाबद्दल मला काय शासन होईल? कोणती गति लाभेल? अशा प्रकारचे वाईट स्वप्न पहात होतों, तोंच प्रभो! तुम्हीं त्या मला या अध्यात्मज्ञानानें जागृत केलें ५२. देवा! हे लक्ष्मीपते! पाण्यानें पूर्ण भरलेल्या मेघावर दिसणाऱ्या–काल्पनिक नगराची वस्ती सोडून मी बाहेर निघालो आणि पाणी पिण्याच्या इच्छेनें [ ढगांत पाणी आहे हे विसरून ] मृगजळ पीत आहे ५३.

१ झटकर. २ वाचणें, जिविव. ३ क्वचित्. ४ थोडकेसें. ५ भिऊन. ६ पान्हा चोरवेल! ७ सोसवेल काय? ८ मूर्ति. ९ कैफ. १० पुष्कळ चमत्कार. ११ आपोआप, सहज. १२ लय पावतात. १३ प्रकृतीचें, अविद्येचें. १४ राहतात. १५ शेवटचें. १६ मंदिरांत, घरांत. १७ वेदांसहि. १८ अंतःकरण. १९ ज्या अध्यात्मप्राप्तीसाठीं शिवानें ऐश्वर्य सोडून स्मशानवास केला. २० एकदम. २१ डोक्यापर्यंत. २२ बोली, नांव. २३ आहे म्हणतों. २४ नागा केला. २५ आकाशांतील ढगांवर कल्पित नगरीची. २६ इच्छेनें. २७ मृगजळ.

पीत ॥५३॥ जी किरडूं तरी कापडाचें । परी लहरी येत होतिया साचें । ऐसें वायां मरतया जीवाचें । श्रेयं तुवां घेतलें ॥ ५४ ॥ आपुलें प्रतिबिंब नेणता । सिंह कुहां घालील देखोनि आतां । ऐसा धरिजे तेवीं अनंता । राखिलें मातें ॥५५॥ एऱ्हवीं माझा तरी येतुलेवरी । एथ निश्चय होता अवधारीं । जे आतांचि सातांही सागरीं । एकत्र मिळिजे ॥ ५६ ॥ हें जगचि आघवें बुडावें । वरी आकाशही तुटोनि पडावें । परी झुंजणें न घडावें । गोत्रजेशीं मज ॥ ५७ ॥ ऐसिया अहंकाराचिये वोढी । मियां आग्रहजळीं दिधली होती बुडी । चांगाचि तूं जवळां एऱ्हवीं काढी । कवणु मातें ॥ ५८ ॥ नाथिलें आपण पां एक मानिलें । आणि नव्हतया नाम गोत्र ठेविलें । थोर पिसें होतें लागलें । परि राखिलें तुम्ही ॥ ५९ ॥ मागां जळत काढिलें जोंहरीं । तैं तें देहासीच भय अवधारीं । आतां हें जोहरवाहर दुसरी । चैतन्यासकट ॥६०॥ दुराग्रह हिरण्याक्षें । माझी बुद्धि वसुंधरा सूदली काखे । मग माहार्णव गेंवाक्षें । रिघोनि ठेला ॥ ६१ ॥ तेथ तुझेनि गोसांवीपणें । एकवेळ बुद्धीचिया ठाया येणें । हें दुसरें वराह होणें । पडिलें तुज ॥ ६२ ॥ ऐसें अपार तुझें केलें । एकी वाचा काय मी बोलें । परी पांचेंही पालव मोकलिले । मजप्रती ॥६३॥ तें कांहीं न वचेचि वायां । भलें यश फांवलें देवराया । जे साद्यंत माया । निरसिली माझी ॥ ६४ ॥ आजीं आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिती ॥ ६५ ॥ हां हो तयाही आणि मोहाची भेटी । हे कायसी पावंळी गोठी ? । केउंती मृगजळाची वृष्टी । वडवानळेंसी ? ॥६६॥ आणि मी तंव दातारा । ये कृपेचिये रिघोनि गाभारां । घेत आहें चोंरा । ब्रह्मरसाचा ॥ ६७ ॥ तेणें माझा जी मोह जाये । एथ विस्मो कांहीं आहे ? । तरी उद्धरलों कीं तुझे पाये । शिवतले आहाती ॥ ६८ ॥

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया । त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥

पैं कमलायतडोळसा । सूर्यकोटितेजसा । मियां तुजपासोनि महेशा । परिसिलें आजीं ॥ ६९ ॥ इयें भूतें जयापरी होती । अथवा लया हन जैसेनि जाती । तें मजपुढां प्रकृती । विवंचिली[23] देवें ॥७०॥ आणि प्रकृती कीर उगाणा दिधला । वरि पुरुषाचाही ठावो दाविला । जयाचा महिमा पांघरोनि जाहला ।

अहो! साप कापडाचाच केलेला होता, पण तो साप खरा मानून तो मला डसला अशा भावनेनें विषाच्या लहरी मात्र खऱ्या येत होत्या, त्याप्रमाणें मी मरतो अशा भ्रमानें मरणभयाच्या दुःखांत बुडत असतांना त्यांतून वर काढण्याचें श्रेय, पुण्य आपणच घेतलें ५४. विहिरींत आपलें प्रतिबिंब पडलें आहे, हें न समजतां आतां सिंह आंत उडी घालणार इतक्यांत ते पाहून कोणी एखाद्यानें त्यास धरून रक्षण करावें, त्याप्रमाणें अनंता! मी अज्ञान-सागरांत बुडत असतां मला आंवरून आपण माझें रक्षण केलेत ५५. बाकी असें पहा कीं, अज्ञानानें माझा तर हा वेळपर्यंत असाच निश्चय झाला होता कीं, आतांच जरी सप्तसमुद्र एकत्र झाले ५६. अथवा हें सर्व जग बुडून गेलें; किंवा आकाशहि तुटून पडलें [ तरीहि चिंता नाहीं. ] पण आपल्या गोत्रजांबरोबर युद्ध करण्याचा प्रसंग माझ्यावर न येवो ५७. अशा अहंकाराच्या उत्कर्षानें मी आग्रहरूपी जलांत बुडी मारली होती; [ युद्ध करणार नाहीं, असा ठाम निश्चय केला होता ] परंतु तुम्ही जवळ होता म्हणून बरें झालें; नाहींतर त्यांतून मला कोणी बाहेर काढलें असतें? ५८. वास्तविक मी कोणी एक नसून, मी कोणी तरी आहे असें खोटेंच मानलें व तत्त्वतः कांहीं नाहींत त्यांना नांव ठेवून, गोत्रज असें म्हटलें, अशा प्रकारचें मला मोठे जबर वेड लागलें होतें; पण त्यापासून तुम्ही माझें रक्षण केलेंत ५९. ऐक! पूर्वी लाक्षागृहांत अग्नीनें आम्ही जळत असतांना त्यांतून बाहेर काढून आपण रक्षण केलें खरें, पण त्यावेळीं काय ते फक्त देहाचेंच भय वाटत होतें. आतां हें दुसरें लाक्षागृह असून यांत [ मोहात्मक ] अग्निपीडेनें माझें चैतन्यहि नाश पावत होतें, त्यांतून तुम्हीं मला बाहेर काढलेंत ६०. किंवा दुराग्रहरूपी हिरण्याक्ष दैत्यानें माझी बुद्धिरूपी पृथ्वी कांखेंत घेतली व मग तो मोहरूपी समुद्राच्या द्वारानें खोल पाण्यांत शिरून घेऊन गेला ६१. तेव्हां देवा! तुमच्या बोधाच्या सामर्थ्यानें माझी बुद्धि एकदम पुनः शुद्धीवर आली. म्हणजे जणुं काय तुम्हांला हा दुसऱ्यांदा वराहाचा अवतार घेणें भाग पडलें! ६२. याप्रमाणें तुमची अपार उपकाराची महत्कृत्यें आहेत, तीं माझ्या एकट्याचे वाणीनें कशीं वर्णन करवतील? फार काय सांगावें!! तुम्ही आपलें पंचप्राण मला अर्पण केलें आहेत ६३. त्यामुळें देवराया! तुमचे श्रम कांहींएक व्यर्थ गेलें नाहींत, चांगलीच यशप्राप्ति झाली आहे, ती ही कीं, माझ्या अज्ञानाचा समूळ नाश झाला ६४. महाराज! आनंदसरोवरांतील कमलांप्रमाणें असलेले आपले हे नेत्र, आपल्या कृपाप्रसादाचीं मंदिरें ज्याकरितां तयार करितात, [ ज्याच्यावर आपली कृपादृष्टि होते ] ६५. त्याची आणि मोहाची भेट होते ही दुबळी तुच्छ गोष्ट काय बोलावी? महाराज! मृगजळाची वृष्टि वडवानळावर काय परिणाम करणार? ६६. आणि त्यांतहि हे दातारा! मी तर त्या तुझ्या कृपामंदिराच्या गाभाऱ्यांत शिरून ब्रह्मरसाचे भोजन म्ह. ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा पूर्ण अनुभव घेत आहें ६७. त्या योगानें आतां माझा मोह नाहींसा झाला यांत आश्चर्य ते काय? भ्रांति गेली एवढेंच नव्हे तर खरोखर तुझ्याच पायाची शपथ वाहून सांगतों कीं, खचित खचित मी उद्धरलों! ६८.

**अन्वयार्थ—कमलपत्राक्ष**—हे कमलनयना!—**मया**—मी—**भूतानां भवाप्ययौ**—सर्व भूतांची उपत्ति व लय—**हि**—खरोखर तुझ्यापासून होतात हें—**त्वत्तः**—तुझ्या तोंडून—**विस्तरशः**—सविस्तर—**श्रुतौ**—ऐकलें—**च**—व—**अव्ययम्**—अव्यय—**माहात्म्यम् अपि**—माहात्म्यहि—**श्रुतम्**—ऐकिलें २.

अहो कमलनयना! कोटिसूर्यतेजसा! महेशा! आजच तुम्हांकडून मी असें ऐकलें कीं ६९. हीं सर्व भूतें जिच्यापासून उत्पन्न होतात व जिच्यांत ज्या रीतीनें पुनः लय पावतात, अशी जी मायाप्रकृति ती मला देवांनीं विस्तारपूर्वक सांगितली आहे ७०. खरोखर त्या मायेचा हिशोब-झाडा तर दिलाच, त्याशिवाय ज्याचा महिमा पांघरून वेद सवस्त्र झाले [ ज्या परमात्म्याच्या महिम्यानें वेद त्याचें यश गाण्यास समर्थ झाला. ] त्या परमात्म्याचेंहि मूळस्थान मला तुम्ही दाखविलें ७१.

१. पुण्य. २ पडछाया. ३ विहिरींत. ४ येथपावेतों. ५ आधिक्यानें. ६ नसतें, लटकें. ७ नसणाऱ्याला. ८ लाक्षागृहांतून. ९ अग्निपीडा. १० घातली. ११ गवाक्षांत, भुयारांत. १२ स्वामीपणानें, तुझ्या सामर्थ्यानें. १३ पंचप्राण. १४ स्वाधीन केलें, अर्पण केलें. १५ जोडिलें, साधिलें. १६ देवळें, मंदिरें. १७ तुच्छ. १८ कोणीकडे. १९ अनुभव. २० नवल, आश्चर्य. २१ कमलपत्राप्रमाणें विस्तीर्ण आहेत नेत्र ज्याचे अशा. २२ देवाधिदेव. २३ विचारपूर्वक सांगितली. २४ मायेचा. २५ झाडा. २६ परमात्म्याचा.

धंडौता वेदु ॥ ७१ ॥ जी शब्दराशी वाढे जिये । कां धर्माएेशिया रत्नांतें विये । ते एर्थिंचे प्रभेचे पाये । वोळगे म्हणौनि ॥ ७२ ॥ ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळमार्गैकगम्य । जें स्वात्मानुभवरम्य । तें इयापरी दाविलें ॥ ७३ ॥ जैसा केरुं फिटालिया आभाळीं । दिठी रिगे सूर्यमंडळीं । कां हातें सारूनि बाबुळीं । जळ देखिजे ॥ ७४ ॥ नातरी उकलतया सापाचे वेढे । जैसें चंदना खेंवं देणें घडे । अथवा विंवसी पळे मग चढे । निधांन हातां ॥ ७५ ॥ तैसी प्रकृती हे आड होती । ते देवेंचि सारोनि परौती । मग परतत्त्वं माझिये मती । शेजार केलें" ॥ ७६ ॥ म्हणौनि इयेविषयींचा मज देवा । भरंवसा कीर जाहला जीवा । परी आणीक एक हेवा । उपनैला असे ॥ ७७ ॥ तो भिडैां जरी म्हणों राहों । तरी आँना कवणा पुसों जावों । काय तुजवांचोनि ठावो । जाणत आहों आम्ही ? ॥ ७८ ॥ जळचरु जळाचा आभारुं धरी । बाळक स्तनपानीं उंपरोधु करी । तरी तया जिर्णया श्रीहरी । आन उपायो असे ? ॥ ७९ ॥ म्हणौनि भीडें सांकडी न धरवे । जीवा आवडे तेंही तुजपुढां बोलावें । तंव राहें म्हणितलें देवें । चांड सांगें ॥ ८० ॥

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर । द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

मग बोलिला तो किरीटी । म्हणे तुम्हीं केली जे गोठी । तिया प्रतीतीची दिठी । निवाली माझी ॥ ८१ ॥ आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपे । जया ठायातें आपणपें । मी ऐसें म्हणसी ॥ ८२ ॥ तें मुद्दल रूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें । सुरकार्याचेनि व्याजें । घेवों घेवों येसी ॥८३॥ पैं जळशयनाचिया अवेगाणिया । कां मत्स्य कूर्म इया मिरवणियैां । खेळु सरलिया तूं गुणियैां । सांठविसी जेथ ॥ ८४ ॥ उपनिषदें जें गाती । योगियें हृदयीं रिगोनि पाहाती । तयातें सनकादिक आहाती । पोटाळुनियां ॥ ८५ ॥ ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥ ८६ ॥ देवें फेडूनियां सांकडं । लोभें पुसिली जरी चाड । तरी हेंचि एकीं वाड । आर्ती जी मज ॥ ८७ ॥ तुझें विश्वरूप आघवें । माझिये दिठीसि गोचर होआवें । ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहें ॥ ८८ ॥

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो । योगेश्वर ततो मे त्वं दर्शयाऽऽत्मानमव्ययम् ॥ ४ ॥

हे प्रभो ! जे वेद वाढतो व जगतो म्ह० आस्तित्वांत राहतो किंवा ज्यापासून धर्मासारखीं रत्नें निपजतात, ह्या सर्व गोष्टी ते आपल्याच पायांच्या सामर्थ्याचा, स्वरूप सामर्थ्याचा आश्रय करितात, म्हणून घडून येतात ! ७२. त्याप्रमाणें देवा ! तुमचें हें अगाध माहात्म्य ! जें सर्व मार्गांनीं एकच जाणण्यास योग्य आहे व जे आत्मानुभवानें परिपूर्ण, नितान्त रमणीय तें तुम्हीं मला याप्रकारें दाखविलें ७३. ज्याप्रमाणें अभ्रें नाहींतशीं झाल्यावर आकाशांतील सूर्यमंडळांत दृष्टि प्रवेश करते किंवा हातानें पाण्यावरील गोंडाळ बाजूला सारल्यावर स्वच्छ उदक दृष्टीस पडतें ? ७४. किंवा चंदनाच्या झाडाला सापानें दिलेलें वेढे उकलल्यावर त्याला आलिंगन देतां येतें, अथवा पिशाच्च पार नाहींसें झाल्यावर मगच द्रव्य हातीं लागतें ७५. त्याप्रमाणें आपल्या ज्ञानस्वरूपाच्या आड जी माया होती, ती देवांनीच पलीकडे, दूर सारल्यामुळें माझ्या बुद्धीला ब्रह्मतत्त्वाचें शेजघर केलें ७६. [ मी ब्रह्मरूप झालो ] म्हणून देवा ! तुमच्या अगाध शक्तीचा माझ्या जीवाला पूर्ण भरंवसा आला आहे, परंतु मला आणखी एक तीव्र इच्छा उत्पन्न झाली आहे ७७. भीड धरून जर आम्ही ती तुम्हांला विचारावयाची राहू दिली तर आम्ही दुसऱ्या कोणास विचारावयास जावें ? कारण तुमच्यावांचून दुसरें आम्हांस विचारण्याचें ठिकाण माहीत आहे काय ? ७८. पाण्यांत राहणाऱ्या माशांनीं जळाचा आभार मानून त्यास तसदी न देतां बाहेर रहावें असें जर मनांत आणलें, किंवा बालकानें आईजवळ वरचेवर स्तनपान करण्याचें बाबतींत भीड धरली, तर हे श्रीहरी ! त्यांना वांचण्याला दुसरा उपाय आहे काय ? ७९. म्हणून भीड वा संकोच न करतां मनास येईल ती गोष्ट तुम्हांपुढें बोलून दाखवावी, तुम्हांला विचारावी इतकें अर्जुन म्हणतो आहे, तोंच देव म्हणलें कीं, तुझें हें बोलणें राहू दे, तुला कसली इच्छा निर्माण झाली आहे ती सांग. ८०.

**अन्वयार्थ**--**परमेश्वर**--हे परमेश्वरा !--**त्वं**--तूं--**आत्मानम्**--आपल्याला-**यथा**--ज्याप्रकारें-**आत्थ**-सांगतोस-**एवम् एतत्**-तसेंच तें आहे-**पुरुषोत्तम**-हे पुरुषोत्तमा ! -**ते ऐश्वरं रूपम्**-तुझें वैष्णवरूप-**द्रष्टुं**-पाहण्यास-**इच्छामि**-मी इच्छितों. ३.

मग अर्जुन म्हणतोः-" देवा ! तुम्हीं ज्या गोष्टी सांगितल्या, त्यामुळें माझी अनुभवाची दृष्टि शांत झाली, ८१. आतां ज्यांच्या संकल्पानें हें सर्व जग उत्पन्न होतें व लय पावतें आणि ज्या ठिकाणाला तुम्हीं स्वतः 'हें माझें स्वरूप वा मी आहें' असें म्हणवितां ८२. तें तुमचें मुख्य मुद्दल स्वरूप, जेथून देवांची संकटें निवारण करण्याच्या निमित्तानें, देव कार्याचेसाठीं द्विभुज, चतुर्भुज अशीं रूपें धारण करून तुम्हीं येतां; ८३. क्षीराब्धींतील शेषशयनाचे सोंगाच्या आरंभापासून तो मत्स्यकूर्मादि अवतारारूपी अलंकार घेऊन जेथें सांठवून ठेवतां, सर्व अवतारकृत्यांचा खेळ संपल्यावर हे गारोड्या श्रीकृष्णा ! ज्या ठिकाणीं तुम्हीं पुनः जातां; ८४. उपनिषदें ज्याचें गुणानुवाद वर्णन करतात, योगीजन आपल्या हृदयांत आठवून, शिरून ध्यानद्वारां साक्षात्कार संपादन करतात, व ज्याला सनकादिकसंत आलिंगन देऊन राहिलेले आहेत ८५. असें जें तुमचें अगम्य 'विश्वरूप' कीं, ज्याचा लौकिक आम्ही कानांनीं ऐकतों; तें पाहण्याकरितां देवा माझें चित्त फारच उतावळें, उत्सुक झालें आहे ८६. तुम्ही मनांतील संकोच टाकून देऊन प्रेमानें माझी इच्छा काय आहे, असें विचारले तर महाराज ! असें सांगतों कीं हीच एक माझी बलत्तर इच्छा आहे ८७. आपलें सर्व विश्वरूप माझ्या दृष्टीस दिसावें ! अशी थोर आशा मी माझ्या मनांत बाळगून राहिलो आहे ८८.

**अन्वयार्थ**--**प्रभो**-हे स्वामिन् !-**यदि**-जर-**मया तत् द्रष्टुं शक्यं**-मी तें पाहणें शक्य आहे-**इति मन्यसे**-असें तूं समजत असशील-**ततः**-तर मग-**योगेश्वर**-हे योगेश्वरा !-**त्वं**-तूं-**मे**-मला-**अव्ययम् आत्मानम्**--आपलें अव्ययस्वरूप-**दर्शय**-दाखीव ४.

---

१. वस्त्रयुक्त. २ शब्दसमूह, वेद. ३ आश्रय करिते. ४ सर्व मार्गांनीं एकच जाणण्यास योग्य. ५ कचरा, अभ्रें. ६ गोंडाळ, शेवाळ. ७ आलिंगन. ८ पिशाच्च. ९ ठेवा. १० ब्रह्मतत्त्व. ११ माझें मतीस परमतत्त्व हें शेजार, निद्रास्थान केलें, मति तत्त्वनिष्ठ केली. १२ हेतु, इच्छा. १३ उत्पन्न झाला. १४ मर्यादेनें. १५ दुसऱ्याला १६ तसदी देण्याचा १७ भीड. १८ वांचण्याला. १९ संकोच. २० इच्छा. २१ आपण स्वतः. २२ आरंभापासून. २३ अवतार. २४ गुणी, कसबी, हुन्नरवाला. २५ आठवण करून. २६ आलिंगून. २७ संकोच. २८ मोठी. २९ इच्छा.

परी आणीक एक एथ शार्ङ्गी । तुज विश्वरूपातें देखावयालागीं । पैं योग्यता माझिया आंगीं । असे कीं नाहीं ॥८९॥ हें आपलें आपण मी नेणें । तें कां नेणसी जरी देव म्हणे । तरी सरोगु काय जाणे । निदान रोगाचें ? ॥ ९० ॥ आणि जी आर्तीचेनि पडिभरें । आर्तु आपुली ठाकी पैं विसरे । जैसा तान्हेला म्हणे न पुरे । समुद्र मज ॥९१॥ ऐशा सचाडपणाचिये भुली । न सांभाळवे समस्या आपुली । यालागीं योग्यता जेवीं माउली । बालकाची जाणे ॥९२॥ तयापरी श्रीजनार्दना । विचारिजो माझी संभावना । मग विश्वरूपदर्शना । उपक्रमं कीजे ॥ ९३ ॥ तरी ऐसी ते कृपा करा । एऱ्हवीं नव्हे हें म्हणा अवधारा । वायां पंचमालापें बधिरा । सुख केउतें देणें ? ॥ ९४ ॥ एऱ्हवीं येकले बापियाचे तृषे । मेघ जगापुरतें काय न वर्षे ? । परी जहालीही वृष्टि उंपखे । जऱ्ही खडकीं होय ॥ ९५ ॥ चकोरा चंद्रामृत फांवलें । येरां आण वाहूनि काय वारिलें ? । परी डोळ्यांवीण पांहलें । वायां जाय ॥ ९६ ॥ म्हणौनि विश्वरूप तूं सहसा । दाविसी कीर हा भरंवसा । कां जे कडांडां आणि गहिंसां- । माजीं नित्य नवा तूं कीं ॥ ९७ ॥ तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्या ऐसें पवित्र । जें वैरियांही दिधलें ॥ ९८ ॥ मोक्षु दुराराध्यु कीर होय । परी तोही आराधी तुझे पाय । म्हणौनि धाडिसी तेथ जाय । पांइकु जैसा ॥ ९९ ॥ तुवां सनकादिकांचेनि मानें । सायुज्यीं सौरसु दिधला पूतने । जे विषाचेनि स्तनपानें । मारूं आली ॥ १०० ॥ हां गा राजसूय यागाचिया सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी । कैसा शतधा दुर्वाक्य शब्दीं । निस्तेजिलांसी ॥ १ ॥ ऐशिया अपराधिया शिशुपाळा । आपणपें ठावो दिधला गोपाळा । आणि उत्तानचरणाचिया बाळा । काय ध्रुवपदीं चाड ? ॥ २ ॥ तो वना आला याचिलागीं । जे बैसावें पितयाचिया उत्संगीं । कीं तो चंद्रसूर्यादिकांपरिस जगीं । श्लाघ्यु केला ॥ ३ ॥ ऐसा वनवासिया सकळां । देतां एकचि तूं धसाळा । पुत्रा आळवितां अजामिळा । आपणपें देसी ॥ ४ ॥ जेणें उरीं हाणितलासि पांपरा । तयाचा चरणु वाहासी दातारा । अझुनी वैरियांचिया कलेवरा । विसंबसीना ॥५॥ ऐसा अपकारियां तुझा उपकारु । तूं अपात्रींही परी उदारु । दे दान म्हणौनि दारवंठेकरु । जाहलासी बळीचा ॥६॥ तूंतें आराधी ना

परंतु हे शार्ङ्गधरा ! आणखी एक मला अशी शंका आहे ती ही कीं, विश्वरूप जो तूं त्या तुला पाहण्याची माझ्या अंगांत योग्यता आहे किंवा नाहीं ८९. हें माझें मला कांहीं समजत नाहीं व तें कां समजत नाहीं असें जर आपण म्हणाल, तर हें पहा ! रोग्याला आपल्या रोगाचें निदान, मूळ कारण समजतें काय ? ९०. आणखी महाराज ! इच्छेची आसक्ति प्रबळ झाली म्हणजे मग इच्छा करणारा मनुष्य जशी आपली योग्यता विसरतो किंवा ज्यास फार तहान लागली आहे, त्यास जशी समुद्रहि आपली तहान भागविण्यास पुरा पडणार नाहीं, असें वाटतें ९१. तशाच प्रबळ इच्छेनें मला भूल पडली असल्यामुळें, माझी इच्छा मला आंवरून ठेववत नसल्यामुळें मला माझ्या योग्यतेचा अंदाज कळला नाहीं. याकरितां आई ज्याप्रमाणें आपल्या मुलाची योग्यता जाणून त्याची इच्छा पुरी करिते ९२. त्याप्रमाणें हे जनार्दना ! माझ्या अधिकाराचा विचार करा व मगच तुम्ही आपलें विश्वरूप दाखविण्यास आरंभ करा ९३. तरी माझा अधिकार असेल तर ही कृपा करा. नाहीं तर असें पहा कीं, माझा अधिकार नसेल तर स्पष्ट ‘ नाहीं ’ म्हणून सांगा. कारण अहो ! पंचमस्वरांतील उत्तम गाणें ऐकवून बहिऱ्याला सुख देण्याचा व्यर्थ प्रयत्न करणें हे कोणचें ? ९४. बाकी मेघ हा एकट्या चातकांकरितांच वर्षाव करितो आणि ती वृष्टि जगापुरती होत नाहीं काय ? [ तर होय होते ] परंतु तोच पाऊस खडकावर पडला तर व्यर्थ जातो ९५. चंद्रप्रकाशापासून चकोरालाच अमृत प्राप्त होतें आणि तेंच चंद्रामृत दुसऱ्याला घेऊं नका म्हणून शपथ कां घातली आहे ? पण [ अमृत प्राशन करण्याची दृष्टि, युक्ति चकोराप्रमाणें इतरांना माहीत नसल्यामुळें त्यांना ज्याप्रमाणें त्या चंद्रोदयाचा त्या बाबतींत कांहीं उपयोग होत नाहीं त्याप्रमाणें ] किंवा डोळ्याशिवाय सूर्यप्रकाश झाला तरी व्यर्थ आहे ९६. म्हणून तुम्ही बहुतकरून मला विश्वरूप दाखवाल असा पूर्ण भरंवसा आहे. कारण [ तुमचे औदार्य ] जाणत्या व नेणत्या अशा दोघांसहि समानच नित्य नूतन आहे ९७. अहो ! तुमचें औदार्य स्वतंत्र आहे व तुमच्या मनांत एखादी गोष्ट देण्याचें आलें असतां हा पात्र आहे किंवा हा अपात्र आहे हा भेद तुम्ही मानीत नाहीं. असें पहा ! मोक्षासारखी, पवित्र वस्तु पण ती, तुम्ही आपल्या शत्रूंसहि दिली आहे ९८. खरोखर मोक्ष जरी दुष्प्राप्य, मिळण्यास अवघड आहे; तरीपण तोहि तुमच्या पायांची सेवा करितो; म्हणून तुम्हीं त्यास जिकडे जाण्याची आज्ञा करून धाडाल तिकडे जाऊन चाकराप्रमाणें तुमची आज्ञा पाळतो ९९. आपल्या स्तनांत विष घालून तुम्हांला मारण्याच्या हेतूनें स्तनपान देण्याकरितां जी पूतना राक्षसी तुझ्याकडे आली होती, तिलाहि तुम्ही सनकादिकांच्या बरोबरीनें सायुज्यमुक्ति दिली १००. महाराज ! धर्मराजाच्या राजसूय यज्ञाच्या सभासदांत त्रिभुवनांतील देव, ऋषि व राजे जमले असतां त्या ठिकाणीं ज्यानें आपणास दुर्वाक्यें बोलून आपला पाणउतारा करून अपमान केला १. त्या महदपराधी शिशुपालालाहि तुम्ही सरूपता मुक्ति दिली ; आणखी गोपालकृष्णा ! उत्तानपाद राजाचा मुलगा जो ध्रुव, त्याची अढळपदीं बसण्याची इच्छा होती काय ? २. तो आपणास बापाच्या मांडीवर बसावयास मिळावें एवढ्याचकरितां वनांत आला होता; पण त्याला या लोकीं तुम्हीं चंद्रसूर्यादिकांपेक्षाहि प्रशंसनीय अशा श्रेष्ठस्थानीं नेऊन बसविलें ! ३. याप्रमाणें साऱ्या दुःखितांना उदारपणें, सढळ हातानें देणारे एक तुम्हींच. हें पहा ! अजामिळानें मृत्युसमयीं पुत्रमिषानें ‘ नारायण ’ नामाचा उच्चार केल्यामुळें त्याला आत्मपदरूपी मुक्ति दिली ४. हे उदार प्रभो ! ज्या भृगु ऋषीनें तुमच्या हृदयावर लाथ मारली होती, त्याचें पावलाची मुद्रा–श्रीवत्सलांछन चिन्ह तुम्हीं आपल्या हृदयावर भूषण मानून बाळगिलें आहे; तुमचा वैरी जो शंखासुर त्याचें शरीर म्ह. शंख तो न विसरतां तुम्हीं हातांत धारण केला आहे ५. याप्रमाणें तुमच्यावर अपकार करणारावरहि तुम्हीं उपकार करितां आणि मनुष्यास योग्यता नसतांहि तुम्हीं अपार दान देऊन आपले औदार्य दाखविले आहे; बळीपाशीं आपण दान दे म्हणून मागावयास जाऊन त्याचेच द्वारपाळ झाला ६.

१ स्वरूप, परीक्षा. २ आसक्तीनें. ३ योग्यता, अधिकार. ४ इच्छा. ५ योग्यता, अधिकार. ६ प्रारंभ. ७ पंचमस्वरानें. ८ कसें, कोठून. ९ चातकाचे, १० व्यर्थ जाते. ११ प्राप्त झाले. १२ उजाडलें. १३ पढिकाला, जाणत्याला. १४ अनधीतांला, नेणत्याला. १५ मोक्षासारिखें. १६ खरेपणानें, निश्चयानें. १७ चाकर. १८ सायुज्यमुक्तीची गोडी. १९ जमाव. २० अपमानिला गेलास. २१ उत्तानपादाच्या. २२ अढळपदीं. २३ मांडीवर. २४ स्तुत्य, श्रेष्ठ. २५ आपन्नांला, दुःखितांना. २६ मागें पुढें न पहाणारा, आवेशी. २७ पुत्रमिषानें नारायणनामोच्चार घडलेल्या अजामिळाला. २८ मुक्ति-आत्मपद. २९ लाथेनें. ३० मत्स्यावतारांतील शत्रु शंखासुर. ३१ शरीराला, शंखाला.

आयकें। होती पुंसा बोलावित कौतुकें। तिये वैकुंठीं तुवां गणिके। सुरवाडु केला ॥७॥ ऐसीं पाहूनि वायाणीं मिषें। आपणपें देवों लागसी वानिवसें। तो तूं कां अनोंरिसें। मजलागीं करिसी ॥ ८ ॥ हां गा दुभतयाचेनि पवाडें। जे जगाचें फेडी सांकडें। तिये कामधेनूचे पाडे। काय भुकेले ठाती ? ॥ ९ ॥ म्हणौनि मियां जें विनविलें कांहीं। तें देव न दाखविती हें कीर नाहीं। परी देखावयालागीं देईं। पात्रतां मज ॥ ११० ॥ तुझें विश्वरूप आंकळे। ऐसें जरी जाणसी माझे डोळे। तरी आर्तीचे डोहळे। पुरवीं देवा ॥ ११ ॥ ऐसी ठायेंठावो विनंती। जंव करूं सरला सुभद्रापती। तंव तया षड्गुणचक्रवर्ती। साहवेचिना ॥ १२ ॥ तो कृपापीयूषसजळु। आणि येरु जवळां आला वर्षाकाळु। नाना श्रीकृष्ण कोकिळु। अर्जुन वसंतु ॥ १३ ॥ नातरी चंद्रबिंब वाटोळें। देखोनि क्षीरसागर उचंबळे। तैसा दुणेंही वरी प्रेमबळें। उल्लसितु जाहला ॥ १४ ॥ मग तिये प्रसन्नतेचेनि आंटोपें। गाजोनि म्हणितलें सक्रपें। पार्था देख देख अमुपें। स्वरूपें माझीं ॥ १५ ॥ एक विश्वरूप देखावें। ऐसा मनोरथु केला पांडवें। कीं विश्वरूपमय आघवें। करूनि घातलें ॥ १६ ॥ बाप उदार देवो अपरिमितु। याचक स्वेच्छा सदोदितु। असे सहस्रवरी देतु। सर्वस्व आपुलें ॥ १७ ॥ अहो शेषाचेहि डोळे चोरिले। वेद जयालागीं झकविले। लक्ष्मीयेही राहविलें। जिव्हार जें ॥ १८ ॥ तें आतां प्रकटुनि अनेकधा। करीत विश्वरूपदर्शनाचा धांदों। बाप भाग्या अगाधा। पार्थाचिया ॥ १९ ॥ जो जागता स्वप्नावस्थे जाये। तो जेवीं स्वप्नींचें आघवें होये। तेवीं अनंत ब्रह्मकटाह आहे। आपणचि जाहला ॥ १२० ॥ ते सहसा मुद्रा सोडिली। आणि स्थूळदृष्टीची जवनिका फेडिली। किंबहुना उघाडिली। योगऋद्धी ॥ २१ ॥ परी हा हें देखेल कीं नाहीं। ऐसी सेचि न करी कांहीं। एकसरां म्हणतसे पाहीं। स्नेहातुर ॥ २२ ॥

श्रीभगवानुवाच :--

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः। नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

अर्जुना तुवां एक दावा म्हणितलें। आणि तेंचि दावूं तरी काय दाविलें। आतां देखें आघवें भरिलें। माझ्याचि रूपीं ॥ २३ ॥ एकें कृशें एकें स्थूळें। एकें

जिनें तुम्हांला कधीं पूजिलें नाहीं व कधीं तुमचे गुणानुवादहि ऐकिले नाहींत, अशी गणिका मरतेसमयीं 'राघोबा, राघोबा' म्हणून आपल्या पाळलेल्या राघूला हांका मारीत होती, त्या गणिकेला तुम्ही वैकुंठसुखाची प्राप्ति करून दिली ७. अशा क्षुल्लक निमित्त कारणास पाहूनहि अकस्मात् तुम्ही अपात्र माणसासहि सहज स्वस्वरूप प्राप्त करून देणारे, असें जें तुम्ही ते मला वेगळी प्राप्ति कशी करून द्याल? ८. अहो! विपुल दुभत्याच्या अधिकपणानें, जी कामधेनु जगाचें संकट निवारण करिते, तिचीं वासरें उपाशीं राहातील काय? ९. म्हणून मी ज्याबद्दल कांहींशीं विनंति केली आहे, तें आपलें विश्वरूप देव मला दाखवणार नाहींत, असें खरोखर कधींहि होणार नाहीं; परंतु तें पाहण्याची मला योग्यता द्या ११०. तुमचें 'विश्वरूप' माझ्या डोळ्यांनीं पहावेल अशी जर तुमची खात्री असेल, तर देवा! माझे विश्वरूप पाहण्याच्या उत्कंठेचे हे डोहाळे पुरवावेत ११. अशी अर्जुन विनंति करितो न करितो इतक्यांत षड्गुणैश्वर्याचा सार्वभौम राजा जो श्रीकृष्ण, त्याला ती सहन झाली नाहीं. [कां सहन होईना म्हणाल तर] १२. अर्जुन हा जवळ असलेल्या वर्षाकाळाप्रमाणें होता व श्रीकृष्ण वर्षाकाळीं उत्पन्न होणाऱ्या कृपामृतयुक्त मेघाप्रमाणें होता. अथवा अर्जुन हा वसंतऋतु होता व त्यांत कृष्ण हे मंजुळ ध्वनिरूप शब्द करणारे जणुं कोकिळच होते १३. किंवा वर्तुळाकार असें पूर्ण चंद्रबिंब पाहून ज्याप्रमाणें क्षीरसागराला भरती येते, त्याप्रमाणें त्या समुद्राच्या दुपटीपेक्षांहि अधिक प्रेमबळानें श्रीकृष्ण उल्हसित झाले म्ह. उचंबळले १४. मग कृपावंत श्रीकृष्ण प्रसन्नपणाच्या आवेशपूर्ण भरांत मोठ्यानें गर्जना करून म्हणाले, "पार्था पहा! पहा हीं माझी अगणित स्वरूपें!" १५. अर्जुनाच्या मनांत देवाचें एकच 'विश्वरूप' पहावें असा हेतु होता, परंतु श्रीकृष्णानें सर्व जग विश्वरूपमय आहे, असें करून दाखविलें १६. धन्य आहे प्रभूचें औदार्य! तें अपरिमित असल्यामुळें तो नेहमीं मागणाराच्या इच्छेच्या हजारोंपट आपलें सर्वस्व देतो १७. अहो! जें आपलें गुह्य असें 'विश्वरूप' शेषाच्या दोन हजार डोळ्यांसहि दिसूं दिले नाहीं, वेदांनाहि ज्याच्याविषयीं फसविलें व लक्ष्मी पासूनहि जें जीवाचें गुह्य म्हणून गुप्त ठेवलें १८. तें विश्वरूप आतां अनेक प्रकारें प्रगट करून प्रभु दाखविण्याचा व्यवहार करीत आहेत. धन्य भाग्य त्या अर्जुनाचें! १९. कोणी एखादा जागृत अवस्थेंत असलेला मनुष्य स्वप्नावस्थेंत गेल्यावर ज्याप्रमाणें स्वप्नांत दृष्टीस पडणारे सर्व पदार्थ आपणच बनून राहतो, त्याप्रमाणें श्रीकृष्ण आपणच सर्व अनंत ब्रह्मांडें झाले आहेत! १२०. प्रभूंनीं श्रीकृष्णरूप सोडून एकदम 'विश्वरूप' प्रगट केले व ज्या अज्ञानदृष्टीच्या पडद्यानें ते लोकांस मनुष्यरूप भासत होते, तो पडदा काढून घेऊन त्यानें ते 'विश्वरूप' म्हणजे आपलें सर्व योगैश्वर्यच प्रगट केलें २१ परंतु अर्जुनाच्यानें हें रूप पहावेल किंवा नाहीं याची कांहीं आठवण सुद्धां केली नाहीं, प्रेमभरांत एकदम अर्जुनास 'माझें रूप पहा' असें भगवान् म्हणाले २२.

**अन्वयार्थ—पार्थ**–हे अर्जुना! –**मे**–माझीं–**नानाविधानि दिव्यानि**–अनेक प्रकारचीं दिव्य अलौकिक–**च**–व–**नानावर्णाकृतीनि**–नाना वर्णांचीं व नाना आकृतींचीं–**रूपाणि**–रूपें–**शतशः अथ सहस्रशः**:–शेंकडों व हजारों प्रकारें म्ह० अनेकशः–**पश्य**–पहा ५.

अर्जुना! तूं माझें एकच विश्वरूप दाखवा, असें म्हटलेंस, आणि आम्हीहि तें एकच तुला दाखविलें, तर यांत नवल तें काय? म्हणून आतां माझ्या या 'विश्वरूप' स्वरूपांतच सर्व जग भरलें आहे, असें पहा २३.

---

१ राघूला. २ सुख. ३ व्यर्थ. ४ निमित्तें. ५ स्वच्छेनें, कौतुकानें, सहज. ६ वेगळें. ७ महत्त्वानें. ८ संकट. ९ गोन्हे. १० योग्यता. ११ जाणतां येईल. १२ इच्छेचें. १३ यथायोग्य, बरोबर. १४ ज्ञान, वैराग्य, यश, श्री, ऐश्वर्य व धर्म, यांचा सार्वभौम राजा. १५ कृपामृतयुक्त. १६ अथवा. १७ पूर्ण चंद्र. १८ दुपटीपेक्षां अधिक. १९ उद्युक्त. २० आवेशानें, भरानें. २१ गर्जना करून. २२ बहुत. २३ फसविलें. २४ जिवांतलें गुह्य. २५ धंदा २६ ब्रह्मांडें. २७ त्वरेनें, एकदम. २८ स्वरूप. २९ प्रगट केली, उघडली. ३० अज्ञानदृष्टीची, मनुष्यदृष्टीची. ३१ आड येणारा पडदा. ३२ आठवणच. ३३ एकदम. ३४ प्रेमव्याप्त.

र्‍हस्वें एकें विशाळें । पृथुतरें सरळें । अप्रांतें एकें ॥२४॥ एकें अनावरें प्रांजळें । सव्यापारें एकें निश्चळें । उदासीनें स्नेहाळें । तीव्रें एके ॥२५॥ एकें घूर्णितें सावधें । असलगें एकें अगाधें । एकें उदारें अतिबद्धें । क्रुद्धें एकें ॥२६॥ एकें शांतें सन्मदें । स्तब्धें एकें सानंदें । गर्जितें निःशब्दें । सौम्यें एकें ॥२७॥ एकें साभिलाषें विरक्तें । उंन्निद्रितें एकें निद्रितें । परितुष्टें एकें आर्तें । प्रसन्नें एकें ॥ २८ ॥ एकें अशस्त्रें सशस्त्रें । एकें रौद्रें अतिमित्रें । भयानकें एकें विचित्रें । लयस्थें एकें ॥ २९ ॥ एकें जैन-लीलाविलासें । एकें पालनशीलें लालसें । एकें संहारकें सावेशें । साक्षिभूतें एकें ॥ १३० ॥ एवं नानाविधें परी बहुवसें । आणि दिव्यतेजप्रकाशें । तेवींचि एक-एकाऐसें । वर्णेंही नव्हे ॥३१॥ एकें तांतलें सांडेपंधरें । तैसीं कपिलवर्णें अपारें । एकें सर्वांगीं जैसें सेंदुरें । डेंवरलें नभ ॥ ३२ ॥ एकें सावियांचि चुंळुकीं । जैसें ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं । एकें अरुणोदयासारिखीं । कुंकुमवर्णें ॥ ३३ ॥ एकें शुद्धस्फटिकसोज्वळें । एकें इंद्रनीळसुनीळें । एकें अंजनवर्णें सकाळें । रक्तवर्णें एकें ॥ ३४ ॥ एकें लसत्कांचनसम पिंवळीं । एकें नवजलदश्यामळीं । एकें चांपेगोरीं केवळीं । हरितें एकें ॥ ३५ ॥ एकें तप्तताम्रतांबडीं । एकें श्वेतचंद्र चोखडीं । ऐसीं नानावर्णें रूपडीं । देखें माझीं ॥३६॥ हे जैसे कां आनान वर्ण । तैसें आकृतींही अनारिसेपण । लाजा कंदर्प रिघाला शरण । तैसीं सुंदरें एकें ॥ ३७ ॥ एकें अतिलावण्यसाकारें । एकें स्निग्धवपु मनोहरें । शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ॥ ३८ ॥ एकें पीनावयवमांसाळें । एकें शुष्कें अति विक्राळें । एकें दीर्घकंठें विताळें । विकटें एकें ॥३९॥ एवं नानाविधाकृती । इयां पाहतां पारु नाहीं सुभद्रापती । ययांच्या एकेकीं अंगप्रांतीं । देख पां जग ॥ १४० ॥

पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा । बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

जेथ उन्मीलन होत आहे दिठी । तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी । पुढती निमीलनीं मिठीं । देत आहाती ॥ ४१ ॥ वदनींचिया वाफेसवें । होत ज्वाळा-मय आघवें । जेथ पावकादिक पावे । समूह वसूंचा ॥ ४२ ॥ आणि भ्रूलतांचे शेवट । कोपें मिळों पाहतीं एकवट । तेथ रुद्रगणांचे संघाट । अवतरत देखें ॥ ४३ ॥ पैं सौम्यतेचा वोलावा । मिती नेणिजे अश्विनौदेवां । श्रोत्रीं होती पांडवा । अनेक वायु ॥ ४४ ॥ यापरी एकेकाचिये लीळे । जन्मती सरसिद्धांचीं

त्यांत तीं पहा, कांहीं रोडकीं, कांहीं लठ्ठ, कांहीं ठेंगणीं, कांहीं उंच, कांहीं जाड, कांहीं सडपातळ आणि कांहीं अमर्याद; २४. कांहीं न आवरणारीं, कांहीं निष्कपटी, कांहीं उद्योग करणारीं सक्रिय, कांहीं स्वस्थ बसणारी निष्क्रिय, कांहीं उदासीन, कांहीं प्रेमयुक्त आणि कांहीं कडक वा तीव्र बुद्धीचीं; २५. कांहीं धुंद–बेसावध, कांहीं सावध, कांहीं उघड, कांहीं गंभीर, कांहीं उदार, कांहीं कृपण, कांहीं रागीट; २६. कांहीं शांत, कांहीं चांगल्या मदानें युक्त, कांहीं स्तब्ध निरुपयोगी, कांहीं आनंदयुक्त, कांहीं गर्जना करणारे, कांहीं शब्दरहित, कांहीं सौम्य २७. कांहीं आशाखोर लोभी, कांहीं आशापाशरहित, कांहीं जागृत, कांहीं निजलेली, कांहीं संतोषी, कांहीं दुःखी व कांहीं प्रसन्न; २८. कांहीं निःशस्त्र व कांहीं शस्त्रधारी, कांहीं अति उग्र, व कांहीं अति स्नेहाळु, कांहीं भयंकर व कांहीं चित्रविचित्र, कांहीं समाधिस्थ, २९. कांहीं जनांच्या लीलेंत निमग्न, कांहीं प्रीतीनें पालन करण्याचा स्वभाव असलेली, कांहीं मोठ्या क्रोधानें संहार करणारी व कांहीं साक्षिभूत तटस्थ १३०. ह्याप्रमाणें नाना प्रकारची पण पुष्कळ आणि दिव्य-तेज संपन्नतेनें प्रकाशरूपीं अशी ती रूपें आहेत व त्याचप्रमाणें निरनिराळ्या वर्णांचीं आहेत ३१. कांहीं तापलेल्या सोन्याप्रमाणें, त्याचप्रमाणें शेंकडों रूपें पिंगट वर्णांची आणि शेंदरानें माखलेले आकाश जसें सुशोभित दिसते त्याचप्रमाणें कांहींकांहीं शेंदरी रंगाचीं; ३२. कांहीं लहान, पण सहजच सुन्दर जसें कांहीं सर्व ब्रह्मांड माणकांनीं जडल्यामुळें भरलेलें आहे अशीं शोभणारीं, व कांहीं अरुणोदयाप्रमाणें तांबड्या वर्णाचीं ३३. कांहीं शुद्ध स्फटिकाप्रमाणें स्वच्छ पांढरीं. कांहीं इंद्रनीलमण्याप्रमाणें चांगलीं निळीं, कांहीं काजळासारखीं अतिशय काळीं, कांहीं रक्ताप्रमाणें लाल; ३४. कांहीं ताव दिलेल्या तेजदार सोन्याप्रमाणें पिंवळीं, कांहीं नव्या मेघाप्रमाणें काळ्या–सांवळ्या वर्णाचीं, कांहीं केवळ सोनचाफ्याप्रमाणें गौर वर्णाचीं, कांहीं हिरवींगार; ३५. कांहीं तापलेल्या तांब्या-प्रमाणें तांबडी आणि कांहीं चंद्राप्रमाणें अति शुभ्र, शुद्ध अशी ही माझीं नानावर्णांचीं स्वरूपें पहा ३६. हे जसे भिन्न भिन्न रंग आहेत, त्याप्रमाणें भिन्न भिन्न आकृतीहि आहेत, कीं ज्या कांहीं आकृतींच्या सौंदर्यापुढे मदनहि लाजून शरण आला, अशी सुंदर आहेत ३७. कांहीं अति सुंदर बांध्याची रूपें आहेत, कांहीं तेजःपुंज तुळतुळीत आहेत, कांहीं इतकी मनोहर आहेत कीं जणुं काय शृंगारलक्ष्मीचें जामदारखानेच उघडले आहेत ३८. कांहीं पुष्ट अवयवांचीं गोंडस, कांहीं किडकिडीत, कांहीं अति-विक्राळ, कांहीं उंच मानेचीं आणि कांहीं मोठ्या डोक्यांचीं, भयंकर रूपाचीं ३९. हे सुभद्रापते ! याप्रमाणें माझ्या रूपाच्या अनेक प्रकारच्या आकृती आहेत व त्या पाहूं गेलें असतां त्यांचा अंत पार लागणार नाहीं. आणि या एक एक रूपाच्या एक एक अवयवावर सर्व जग भरलेलें आहे, तें पहा ! १४०.

**अन्वयार्थ**––**आदित्यान्**–बारा आदित्यांस–**वसून्**–आठ वसूंस––**रुद्रान्**––अकरा रुद्रांस––**अश्विनौ**––दोन अश्विनीकुमारांस –**तथा**–त्याप्रमाणें––**मरुतः**–एकुणपन्नास मरुतांना–**पश्य**–पहा–**भारत**–हे भारतकुलांतील श्रेष्ठ अर्जुना !–**बहूनि**–पुष्कळ–**अदृष्टपूर्वाणि आश्चर्याणि**–पूर्वीं कधीं न पाहिलेलीं आश्चर्यें–**पश्य**––पहा ६.

माझी दृष्टि उघडण्याबरोबर आदित्यादि देवांच्या सृष्टि विस्तार पावतात व पुढें तीच दृष्टि मिटल्याबरोबर सर्व देवसृष्टि लयं पावतात ४१. माझ्या मुखांतील श्वासोच्छ्-वासात्मक वाफेबरोबर सर्व ज्वालामय होते तेव्हां त्या ज्वालांपासून अष्टवसूंचा समुदाय उत्पन्न होतो ४२. आणि माझ्या भिवयांचीं टोंकें रागानें एके ठिकाणीं मिळूं पाह-तात, तेव्हां तेथें अकरा रुद्रगणाचे समुदाय उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात. पहा ! ४३. माझ्या सौम्यमुद्रेच्या ओलाव्यापासून असंख्य अश्विनीकुमार उत्पन्न होतात. आणि हे पांडवा ! कानांतून अनेक वायु उत्पन्न होतात ४४. याप्रमाणें माझ्या एकेका अवयवाच्या सहज लीले-

१ ठेंगणी. २ रुंद, पसरट. ३ अपार, अमर्याद. ४ न आवरणारीं. ५ सुलभ, सरळ. ६ उद्योग करणारीं. ७ धुंद. ८ सुगम, सोपी. ९ कृपण. १० गंभीर, चांगल्या मदानें युक्त. ११ शब्दरहित. १२ जागृत. १३ दुःखी. १४ उग्र. १५ समाधिस्थ. १६ उत्पत्तिकर्मांत निमग्न. १७ प्रीतियुक्त. १८ क्रोधयुक्त. १९ तापलेलें. २० निर्मळ सोनें. २१ पिंगट. २२ माखलें. २३ सहज. २४ सुंदर. २५ स्वच्छ. २६ काजळासारखीं. २७ दिव्य, सुवर्णवर्णसम. २८ नव्या मेघा-प्रमाणें श्यामवर्णाचीं. २९ चाफ्याच्या फुलाप्रमाणें गोरी. ३० हिरव्या रंगाचा. ३१ तापलेल्या तांब्यासारखीं लाल. ३२ शुभ्रचंद्र. ३३ भिन्नभिन्न. ३४ लाजेनें. ३५ मदन. ३६ तेजःपुंज शरीरें. ३७ गोंडस, पुष्ट. ३८ मोठ्या डोक्यांचीं. ३९ भयंकर. ४० अंगप्रदेशीं. ४१ उघडणें. ४२ मिटल्या-वर. ४३ लय. ४४ अष्टवसंचा समुदाय. ४५ भिवयाचें

कुळें । ऐसीं अपारें आणि विशाळें । रूपें इयें पाहीं ॥ ४५ ॥ जयांतें सांगावया वेद बोबडे । पहावया काळाचेंही आयुष्य थोकडें । धातयाही परी न सांपडे । ठाव जयांचा ॥ ४६ ॥ जयांतें वेदत्रयीं कधीं नायके । तियें इयें प्रत्यक्ष देख अनेकें । भोगीं आश्चर्याचीं कवतिकें । महासिद्धी ॥ ४७ ॥

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् । मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥

इया मूर्तीचिया किरीटी । रोममूळीं देखें पां सृष्टी । सुरतरूतळवटीं । तृणांकुर जैसे ॥ ४८ ॥ चंडवाताचेनि प्रकाशें । उडत परमाणु दिसती जैसे । भ्रमत ब्रह्मकटाह तैसे । अवयवसंधीं ॥ ४९ ॥ एथ एकैकाचिया प्रदेशीं । विश्व देख विस्तारेंशीं । आणि विश्वाही परौतें मानसीं । जरी देखावें वर्ते ॥ १५० ॥ तरी इयेही विषयींचें कांहीं । एथ सर्वथा सांकडें नाहीं । सुखें आवडे तें माझिया देहीं । देखसी तूं ॥ ५१ ॥ ऐसें विश्वमूर्ती तेणें । बोलिलें कारुण्यपूर्णें । तंव देखत आहे कीं नाहीं न म्हणे । निवांतुचि येरु ॥ ५२ ॥ एथ कां पां हा उगला ? । म्हणौनि श्रीकृष्णें जंव पाहिला । तंव ओर्तीचें लेणें लेइला । तैसाचि आहे ॥ ५३ ॥

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा । दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

मग म्हणे उत्कंठे वोहट न पडे । अझुनी सुखाची सोयें न सांपडे । परी दाविलें तें फुडें । नोकळेचि यया ॥ ५४ ॥ हें बोलोनि देव हांसिले । हांसोनि देखणियांतें म्हणितलें । आम्हीं विश्वरूप तरी दाविलें । परी न देखसीच तूं ॥ ५५ ॥ यया बोला येरें विचक्षणें । म्हणितलें हां जी कवणासि तें उणें ? । तुम्ही बंकाकरवीं चांदिणें । चरऊं पहा मा ! ॥ ५६ ॥ हां हो उटोनियां आरिसा । आंधळिया दाऊं बैसा । बहिरियापुढें हृषीकेशा । गाणीव करा ॥ ५७ ॥ मकरंदकणांचा चारा । जाणतां घालूनि दर्दुरा । वायां धांडा शार्ङ्गधरा । कोपा कवणा ॥ ५८ ॥ जें अतींद्रिय म्हणौनि व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा फिटलें । तें तुम्ही चर्मचक्षूंपुढें सूंदलें । मी कैसेनि देखें ॥ ५९ ॥ परी हें तुमचें उणें न बोलावें । मीचि सोंहें तेंचि बरवें । एथ ओंथि म्हणितलें देवें । मानूं बापा ॥ १६० ॥ साच विश्वरूप जरी आम्ही दावावें । तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें । परी बोलत बोलत प्रेमभावें । धसाळं गेलों ॥ ६१ ॥

पासून देव व सिद्ध यांचीं कुळें उत्पन्न होतात. अशीं अपार आणि विशाल रूपें या ठिकाणीं पहा ४५. ज्या स्वरूपाचें वर्णन करण्यास वेदाचीहि वाणी कुंठित झाली व जीं स्वरूपें पहाव्रयास काळाचेंहि आयुष्य पुरेसे नाहीं व ज्या स्वरूपांचा ब्रह्मदेवासहि अंत लागत नाहीं ४६. आणि ज्यांचीं नांवें तीन वेदांनींहि कधीं ऐकलीं नाहींत; तीं माझीं अनेक रूपें या ठिकाणीं प्रत्यक्ष पहा! व ती कौतुकानें पाहिल्यापासून आश्चर्यकारक लीलांच्या महान् ऐश्वर्याचा उपभोग घे ४७.

**अन्वयार्थ**—**अद्य**—आज—**हे गुडाकेश**—हे निद्रेला स्वाधीन ठेवणाऱ्या अर्जुना!—**इह मम देहे**—या माझ्या देहांत—**एकस्थम्**—एकाच अवयवांत असलेलें—**कृत्स्नं जगत्**—सर्व जगत्—**सचराचरं**—चराचर प्राण्यांसह—**पश्य**—पहा—**च**—आणि—**यत्**—जें—**अन्यत्**—दुसरें कांहीं—**द्रष्टुम् इच्छसि**—पाहण्यास इच्छित असशील तेंहि पहा ७.

हे किरीटी! या विश्वरूपाच्या, रोमाच्या मुळाशीं सृष्टि आहे, ती पहा! जसें कांहीं कल्पतरूच्या बुडाजवळ कोंवळें गवताचें असंख्य अंकुरच उगवलेलें आहेत ४८. ज्याप्रमाणें सोसाट्याच्या वाऱ्याच्या योगानें जसें पृथ्वीचे परमाणु प्रकाशांत उडतांना तरंगत असलेले दिसतात, त्याप्रमाणें या विश्वरूपाच्या प्रत्येक अवयवांच्या सांध्यांतून अनेक ब्रह्मांडाचे थवेच्या थवे चक्राकार भ्रमण करीत आहेत, असें दिसत आहे ते पहा! ४९. या विश्वरूपाच्या एकेका अवयवांच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांड विस्तारासह भरलेलें आहे, तें पहा! आणि जर कदाचित विश्वापलीकडेहि आणखी कांहीं पहावेसें वाटत असेल १५०. तर त्याबद्दलहि येथें कांहीं संकट उणीव पडण्याचें कारण नाहीं. या माझ्या शरीरांत जें तुला आवडेल, वाटेल तें सुखानें पाहून घे!" ५१. याप्रमाणें ते विश्वरूपधारी श्रीकृष्ण पूर्ण प्रेमानें बोलल्यावर अर्जुन आपलें रूप पहात आहे किंवा नाहीं म्हणून पाहूं लागले, तो तो कांहींएक न बोलतां स्वस्थ बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला! ५२. तेव्हां हा कां स्वस्थ बसला आहे म्हणून जों भगवान् त्याकडे पाहूं लागले, तों हा आपला विश्वरूप पाहण्याच्या तीव्रेच्छेचा अलंकार घालून उत्कंठित होता तसाच असलेला दृष्टीस पडला ५३.

**अन्वयार्थ**—**तु**—पण—[ **त्वं**—तूं ]—**मां**—मला—**अनेन एव**—याच—**स्वचक्षुषा**—आपल्या नेत्रांनीं—**द्रष्टुं**—पाहण्यास—**न शक्यसे**—समर्थ होणार नाहींस—**ते**—तुला—**दिव्यं चक्षुः**—दिव्य दृष्टि—**ददामि**—मी देतों—**मे**—माझा—**ऐश्वरं योगम्**—ईश्वरासंबंधीं योग—**पश्य**—पहा ८.

हे पाहून भगवान् मनांत म्हणतातः—याची विश्वरूप पाहण्याची उत्कंठा अजून कमी झाली नाहीं व याला [ विश्वरूपदर्शनानें ] आनंदहि झालेला दिसत नाहीं. मी तर ह्याला विश्वरूप दाखविलें, पण याला ते मुळींच आकलन होत नाहीं ५४. असें म्हणून देव हंसले आणि हंसून अर्जुनास म्हणाले, खूप पाहणारा आहेस बरें! "आम्ही तुला विश्वरूप तर दाखविलें, परंतु तूं तें पाहतच नाहींस!" ५५. हें बोलणें ऐकून तो बुद्धिमान् अर्जुन म्हणाला, "महाराज! हा उणेपणाचा दोष कोणाचा आहे? तुम्हीं मला हे विश्वरूप दाखविले म्हणजे बगळ्याकडून चंद्रामृत पिवविण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे. [ कारण, चांदण्याचे भोक्ते चकोरपक्षी असतां तुम्ही ते बगळ्यास देऊं पाहता ना! ] ५६. अहो महाराज! आरसा स्वच्छ घासून पुसून आपण तो आंधळ्यास दाखविण्याची खटपट करण्यासारखें आहे. तसेंच हे हृषीकेशा! जणुं बहिऱ्यापुढें गायन करण्यास सुरू केले आहे ५७. हे शार्ङ्गधरा! आपण जाणूनबुजून सुगंधी पुष्परागकणांचा चारा भ्रमरास न घालतां चिखल खाणाऱ्या बेडकास घालून वायां घालवित आहांत आणि मग तो वायां गेला म्हणून रागावतां कोणावर? ५८. जें विश्वरूप चर्मचक्षुरादि इन्द्रियांस अगोचर आहे, असें शास्त्रांनींहि वर्णन केलें आहे व जें केवळ ज्ञानदृष्टीलाच पाहतां येण्याजोगें आहे तें जर तुम्ही माझ्या चर्मचक्षूंपुढें ठेविलें तर ते मी कसें बरे पाहावें? ५९. परंतु तुमच्या या उणिवेचा उच्चार न करितां आपण आपलेंच प्रारब्ध म्हणून स्वस्थ बसावें, सहन करावें हेंच बरें." अर्जुनाचें हें भाषण ऐकून देव म्हणालेः—"होय बाबा अर्जुना! तुझें बोलणें मला मान्य आहे १६०. जर तुला विश्वरूप दाखवावयाचें माझ्या मनांत होते; तर खरोखरच तें पाहण्यास अगोदर आम्हींच तुला सामर्थ्य द्यावयास पाहिजे होतें, परंतु प्रेमाच्या भरांत बोलतां बोलतां तुला दृष्टि देण्याचें विसरून गेलो ६१.

---

१ अल्प. २ ब्रह्मदेवाबाहि. ३ गवाक्षांतून पडलेल्या किरणांत. ४ अवयव भागांत. ५ उणीव, संकट. ६ विश्वरूपी श्रीकृष्णानें. ७ अर्जुन. ८ स्तब्ध. ९ उत्कंठेचें. १० कमीपणा. ११ मार्ग. १२ स्पष्ट. १३ ध्यानांत येईना, घेतां येईना. १४ पहाणाऱ्या अर्जुनास. १५ बुद्धिवानानें. १६ हा दोष कोणाकडे. १७ बगळयाकडून. १८ पाहूं नका. १९ स्वच्छ पुसून, घांसून. २० गायन. २१ पुष्परसाचा, फुलांतील मधाचा. २२ बेडकांना. २३ घालवितां. २४ इंद्रियांस अगोचर. २५ शास्त्रानें सांगितलें. २६ प्राप्त झालें. २७ ठेविलें. २८ उगी, स्वस्थ राहावें. २९ होय, कबूल करूं.

काय जाहलें न वाहतां भुई पेरिजे । तरी तो वेलु विलया जाइजे । तरी आतां माझें निजरूप देखिजे । तें दृष्टी देवों तुज ॥ ६२ ॥ मग तिया दृष्टी पांडवा । आमुचा ऐश्वर्ययोगु आघवा । देखोनियां अनुभवा । माजिवंडा करीं ॥ ६३ ॥ ऐसें तेणें वेदांतवेद्यें । सकळ लोक आद्यें । बोलिलें आराध्यें । जगाचेनि ॥ ६४ ॥

संजय उवाच :—

एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः । दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

पैं कौरवकुलचक्रवर्ती । मज हाचि विस्मयो पुढतपुढती । जे श्रियेहूनि त्रिजगतीं । सदैव असे कवणी ? ॥ ६५ ॥ ना तरी खुणेचें वानावयालागीं । श्रुतीवांचूनि दावा पां जगीं । ना सेवकपण तरी आंगीं । शेषाच्याचि आथी ॥ ६६ ॥ हां हो जयाचेनि सोसें । शिणत आठही पंहार योगी जैसे । अनुसरलें गरुडाऐसें । कवण आहे ? ॥ ६७ ॥ परी तें आघवेंचि एकीकडे ठेलें । सांपें कृष्णसुख एकंदरें जाहलें । जिये दिवूनि जन्मले । पांडव हे ॥ ६८ ॥ परी पांचांही आंतु अर्जुना । श्रीकृष्ण सांवियाचि जाहला अधीना । कामुक कां जैसा अंगना । आंपैता कीजे ॥ ६९ ॥ पढविलें पांखरूं ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले । कैसें दैव एथें सुरवाडलें । तें जाणों न ये ॥ १७० ॥ आजि हें परब्रह्म सगळें । भोगावया सदैव याचेचि डोळे । कैसे वाचेनि हन लळे । पाळीत असे ॥ ७१ ॥ हा कोपे कीं निवांतु साहे । हा रुसे तरी बुझावीत जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥ ७२ ॥ एऱ्हवीं विषय जिणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले । ते विषयोचि वांनितां जाहले । भाट ययाचें ॥ ७३ ॥ हा योगियांचें समाधिधन । कीं होऊन ठेले पार्थाआधीन । यालागीं विस्मयो माझें मन । करीतसे राया ॥ ७४ ॥ तेवींचि संजय म्हणे कायसा । विस्मयो एथें कौरवेशा । श्रीकृष्णें स्वीकारिजे तया ऐसा । भाग्योदय होय ॥ ७५ ॥ म्हणौनि तो देवांचा रावो । म्हणे पार्थातें तुज दृष्टि देवों । जया विश्वरूपाचा ठावो । देखसी तूं ॥ ७६ ॥ ऐसी श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें । तंव अविद्येचे आंधारें । जावोंचि लागे ॥ ७७ ॥ तीं अक्षरें नऱ्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका । अर्जुनालागीं चित्कळिका । उजळलिया श्रीकृष्णें ॥ ७८ ॥ मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला । ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ॥ ७९ ॥ हे अवतार

जमिनीची मेहनत मशागत न करितां जमिनींत बी पेरलें किंवा वेल लावली तर त्याकरितां लागणारा वेळ, त्यास पाणी घालणें इत्यादि सर्व ज्याप्रमाणें वायां जातात त्याप्रमाणें तुला विश्वरूप दाखविण्याविषयींची माझी सारी खटपट व्यर्थ गेली; पण आतां अगोदर तुला अशी दिव्य दृष्टि देतों कीं, जिच्या योगानें तुला माझें स्वतःचें विश्वरूप पाहतां येईल ६२. मग हें पांडवा ! त्या दृष्टीनें आमचा सर्व [ अघटितघटनारूप ] ऐश्वर्ययोग पाहून तो आपल्या पूर्ण अनुभवामध्यें आणून ठेव " ६३. जो वेदांनींच जाणण्यास योग्य, वेदैकगम्य व सकळ लोकांचा आद्यकारण, असा आदिपुरुष व सर्व जगास परमपूज्य तो श्रीकृष्ण परमात्मा याप्रमाणें बोलला ६४.

**अन्वयार्थ**–**ततः**–त्यानंतर–**राजन्**–हे राजा धृतराष्ट्रा ! –**एवम् उक्त्वा**–असें बोलून–**महायोगेश्वरः हरिः**–महायोगेश्वर हरि–**पार्थाय**–पार्थाला–**परमम् ऐश्वरं रूपं**–परम ईश्वरसंबंधीं रूप–**दर्शयामास**–दाखविता झाला ९.

संजय म्हणाला, " हे कौरवकुलांतील सार्वभौम धृतराष्ट्र राजा ! मला वारंवार हेंच आश्चर्य वाटतें कीं, ह्या तिन्ही लोकांत लक्ष्मीपेक्षां अधिक दैववान् कोणी आहे का ? ६५. किंवा या जगांत श्रुतीशिवाय खुणेनें वर्णन करणारा दुसरा कोण समर्थ आहे ? दाखवा बरें ? किंवा एकनिष्ठ दास्यत्व म्हणून जें म्हणतात तें एक शेषाच्याच अंगीं आहे ६६. अहो ! महाराज ! भगवंताच्या प्राप्तीसाठीं योग्यासारखी आठहि प्रहर आपल्याला देवास वाहून घेऊन सेवा करणारा गरुडासारखा दुसरा कोणी आहे कां ? ६७. परंतु आज ती सर्व मंडळी एकीकडे राहून, ज्या दिवशीं पांडव जन्मास आले, त्या दिवसांपासून हल्लीं त्याचेंच ठिकाणीं ' कृष्णसुख ' एकवटलें आहे ६८. तरीपण ज्याप्रमाणें कामातुर पुरुषाला एखादी स्त्री आपल्या आधीन करून घेते, त्याप्रमाणें त्या पांचहि पांडवांमध्यें श्रीकृष्ण हे अर्जुनाच्या सहजच आधीन झाले आहेत ६९. ते इतके कीं, पढविलेला पोपटहि तसा बोलणार नाहीं, किंवा खेळण्याकरितां बाळगलेला हरिण इत्यादि पशुहि इतका आज्ञेंत चालणार नाहीं ! [ इतके अर्जुनाच्या स्वाधीन श्रीकृष्ण झाले ] अर्जुनाला कसें दैव अनुकूल झालें असेल तें कळतच नाहीं ! १७०. आज साऱ्या पूर्ण ब्रह्मवस्तूचा अनुभव घेण्याचे भाग्य या अर्जुनाच्याच दृष्टीला लाभले आहे, म्हणूनच पहा ! ! त्याचे बोलणें झेलून श्रीकृष्ण त्याचे लाड कसें पुरवीत आहेत ७१. अर्जुन रागावला की देव स्वस्थपणें सहन करितात आणि अर्जुन रुसला तर देव त्याची समजूत करीत असतात ! एकूण काय तर देवाला अर्जुनाचें आश्चर्यकारक वेड लागलें आहे ७२. अर्जुनाची गोष्ट सोडून देऊन विचार केला तर श्रीकृष्णाची योग्यता काय वर्णन करावी ? ज्या शुकादिक समर्थ पुरुष कीं जें जन्मतःच विषयाला जिंकूनच म्हणजे जे जितेंद्रिय होऊनच जन्माला आले ते भगवंताच्या केवळ रासक्रीडेचेंच वर्णन करून त्यांचेच ' स्तुतिपाठक ' बनले ७३. राजा ! श्रीकृष्ण परमात्मा योग्यांच्या समाधीचें धन वा अधिदैवत, तें आज पार्थ्याच स्वाधीन झालें आहे, म्हणून माझ्या मनाला मोठा चमत्कार वाटतो ! ७४. इतके बोलून संजय पुनः धृतराष्ट्राला म्हणाला, राजा ! पण यांत चमत्कार तरी कसला ? श्रीकृष्ण ज्याचा अंगीकार करतील त्याचा असा भाग्योदय व्हावयाचाच हे खास ७५. म्हणून ते देवाधिदेव, पार्थाला म्हणाले कीं, मी तुला दिव्य दृष्टि देतो, ज्या दृष्टीच्या योगानें अखंड संपूर्ण विश्वरूप तुला पाहतां येईल ७६. श्रीकृष्णाच्या मुखांतून हीं अक्षरें निघतात न निघतात तोंच एकदम अर्जुनाचे ठिकाणचा अज्ञानांधकार नाहींसा होऊं लागला ७७. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, " तुला दिव्य दृष्टि देतो " हीं अक्षरें नसून ब्रह्मसाम्राज्यास, ऐश्वर्यास आत्मत्वानें दाखविणाऱ्या ज्ञानरूपी ज्योतीच श्रीकृष्णांनी अर्जुनाकरितां लावल्या असें समज ७८. मग दिव्य दृष्टीचा उजेड प्रगट झाल्याबरोबर अर्जुनाच्या ज्ञानदृष्टीचे सामर्थ्य वाढले, याप्रमाणें आपला 'ऐश्वर्ययोग' श्रीकृष्णांनीं त्याला दाखविला ७९. भगवंताचे हे जे सर्व

१ नांगरता. २ मध्यें, अनुभवांतर्गत. ३ ब्रह्मविद्येनें जाणण्यास योग्य अशा श्रीकृष्णानें. ४ सर्वांच्या मूळ पुरुषानें. ५ पूज्य. ६ वर्णन करावयाकरितां. ७ इच्छेनें, हव्यासानें ८ प्रहर, योग्याप्रमाणें आठहि प्रहर शिणणाऱ्या [सेवा करणाऱ्या] गरुडासारखे कोण आहेत ! ९ सांप्रत. १० सहजच. ११ स्त्रियेनें. १२ स्वाधीन. १३ पक्षी. १४ अनुकूल झालें. १५ जाणतां येत नाहीं. १६ समजावीत. १७ जिंकून. १८ समर्थ. १९ रासक्रीडेचें. २० वर्णन करितां. २१ याचे स्तुतिपाठक बनले. २२ समाधीचें ध्येय, समाधीचा आवडता विषय. २३ धृतराष्ट्राच्या. २४ श्रीकृष्णाच्या मुखांतून. २५ एकदम.

जे सकळ । ते जिये समुद्रींचे कां कल्लोळ । विश्व हें मृगजळ । जया रश्मीस्तव दिसे ॥ १८० ॥ जिये अनादिभूमिके निटे[२] । चराचर हें चित्र उमटे । आपणपें[३] श्रीवैकुंठें[४] । दाविलें तया ॥८१॥ मागां बाळपणीं येणें श्रीपती । जैं एक वेळ खादली होती माती । तैं कोपोनियां हातीं । यशोदां धरिला ॥ ८२ ॥ मग भेणें[५] भेणें जैसें । मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें । चवदाही भुवनें सावकाशें । दाविलीं तिये ॥८३॥ ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें । जैसें कपोलं शंखें शिवतलें । आणि वेदांचियेही मतीं ठेलें । तें लागला बोलों ॥८४॥ तैसा अनुग्रहो पैं राया । श्रीहरी केला धनंजया । आतां कवणेकडेही माया । ऐसी भाष नेणोंचि तो ॥८५॥ एकसरें ऐश्वर्यतेजें पांहलें । तया चमत्काराचें एकार्णव जाहलें । चित्त समाजीं बुडोनि ठेलें । विस्मयाचिया ॥ ८६ ॥ जैसा आब्रह्म[१३] पूर्णोदकीं । पंव्हे[१४] मार्कंडेय एकाकीं । तैसा विश्वरूप कौतुकीं । पार्थु लोळे ॥ ८७ ॥ म्हणे केवढें गगन एथ होतें । तें कवणें नेलें पां केउतें । तीं चराचरें महाभूतें । काय जाहलीं ? ॥८८॥ दिशांचे ठावही हारपले । आधोर्ध्व काय नेणों जाहले । चेइलियां स्वप्न तैसे गेले । लोकाकार ॥ ८९ ॥ नाना[१९] सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगण जैसें लोपे । तैसीं गिळिलीं विश्वरूपें । प्रपंचरचना ॥ १९० ॥ तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे । इंद्रियांचे रश्मी माघारे हृदयवरी । भरलें ॥ ९१ ॥ तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पाडिलें । टेंकासी टक लागले । जैसें मोहनास्त्र घातलें । विचारजातां ॥ ९२ ॥ तैसा विस्मितु पाहे कोडें । तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें । तेचि नानारूप चहूंकडे । मांडोनि ठेलें ॥ ९३ ॥ जैसे वर्षाकाळींचे मेघौडे । कां महाप्रळयींचें तेज वाढे । तैसें आपणावीण कवणीकडे । नेदीचि उरों ॥ ९४ ॥ प्रथम स्वरूपसमाधान । पावोनि ठेला अर्जुन । सवेंचि उघडी लोचन । तंव विश्वरूप देखे ॥ ९५ ॥ ईंहींचि दोहीं डोळां । पाहावें विश्वरूपा सकळा । तो श्रीकृष्णें सोहळा । पुरविला ऐसा ॥ ९६ ॥

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् । अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

मग तेथ सैंघें देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें । नाना प्रगटलीं निधानें । लावण्यश्रियेचीं ॥९७॥ कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं । जैसी सौंदर्या राणीव जोडली । तैसीं मनोहरें देखिलीं । हरीचीं वक्त्रें ॥ ९८ ॥ तयांही-

अवतार आहेत ते ज्या विश्वरूपरूपी समुद्राच्या लाटा आहेत किंवा ज्याच्या तेजरूपी सूर्यकिरणांमुळें हें सर्व विश्व हे एक मृगजळच भासते; १८०. ज्याच्या अनादिसिद्ध सत्स्वरूप शुद्ध भूमिकेवर स्थावरजंगमरूप चित्रें उमटतात तें आपलें मूळ विश्वस्वरूप श्रीकृष्णांनीं अर्जुनास दाखविलें ८१. पूर्वीं लहानपणीं या श्रीकृष्णानीं जेव्हां एकदां माती खाल्ली होतीं, तेव्हां यशोदेनें त्यास रागावून हातीं धरलें ८२. नंतर त्यावेळीं भीत भीत " मी माती खाल्ली नाहीं " म्हणून तोंडाचा झाडा देण्याच्या निमित्तानें तें तोंड उघडून यशोदेला त्यांत चौदाहि भुवनें विस्तारासह दाखविली ८३. किंवा मधुवनांत ध्रुवबाळ दर्शनास गेल्यावर देवाची स्तुति करावी अशी त्याच्या मनांत उत्कट इच्छा निर्माण झाली; पण ती कशी करावी हे त्यास कळेना! म्हणून ध्रुवाला देवांनीं असें केलें कीं, त्याच्या गालास आपला शंख लावला त्याबरोबर तो जेथें वेदाचीहि बुद्धि कुंठित होतें ती स्तुति करूं लागला ८४. त्याप्रमाणें राजा! श्रीहरीनें धनंजयावर केवढा अनुग्रह केला आहे कीं, आतां त्याची माया कोणीकडे गेली, तिचा पत्ताहि तो जाणेनासा झाला ८५. एकदम ऐश्वर्यतेजाचा उजेड पडून प्रलयकालीं जलमय झाल्याप्रमाणें त्याला सर्वच चमत्कारमय दिसूं लागलें व त्याचें चित्त आश्चर्याच्या गर्दींत निमग्न झालें ८६. नदीचें कांठीं मार्कंडेय ऋषि संध्या करीत असतां भगवंतास ' आश्चर्य म्ह. विश्वरूप दाखवा ' अशी विनंती केल्यावर ज्याप्रमाणें पृथ्वीपासून ब्रह्मलोकापर्यंत सर्वत्र पाणीचपाणी होऊन त्यांत तो एकटा मार्कंडेय पोहूं लागला होता त्याप्रमाणें विश्वरूपाच्या कौतुकांत पार्थ निमग्न झाला ८७. तो म्हणाला! " या ठिकाणीं केवढें मोठे आकाश दृष्टीस पडत होतें, तें कोणी कोणीकडे नेलें, तसेंच हीं स्थावरजंगम पदार्थ व महाभूतें कोणीकडे गेली! ८८. पूर्वादि दिशांचा मागमूसहि राहिला नाहीं वर खालीं हे कोण जाणे कोणीकडे गेलीं! आणि जागृत झालेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेला पदार्थ दृष्टीस पडत नाहीं, त्याप्रमाणें एवढा वेळ दृष्टीस पडणारी लोकाकारात्मक सृष्टि नाहींशी झाली ८९. अथवा सूर्याच्या तेजाचें सामर्थ्यानें जसें चंद्रासह नक्षत्रांचा समुदाय लोपून जातो. त्याप्रमाणें ही सृष्टीची सर्व रचना या विश्वरूपानें गिळून टाकली १९०. त्यावेळेस त्याच्या मनाला मनपणच स्फुरेनासे झालें म्हणजे मन संकल्प विकल्परहित झालें, बुद्धि आपली आपणासच आवरेनाशी झाली व इंद्रियांच्या वृत्ति माघाऱ्या फिरून, अंतर्मुखतेनें हृदयांत सांठवल्या ९१. तेव्हां स्तब्धपणाला स्तब्धता प्राप्त झाली, एकाग्रतेस एकाग्रता आली, जणुं काय सर्व ज्ञानाला मोहनास्त्रच घातलें आहे, असे झाले ९२. त्याप्रमाणें तो आश्चर्ययुक्त होऊन कौतुकानें चहूंकडे पाहूं लागला. तों त्याच्यापुढें जी चतुर्भुज लहान मूर्ति होती, ती वाढून अनेक रूपें घेऊन चहूंकडे नटून राहिली आहे, असें त्यास दिसलें ९३. ज्याप्रमाणें पावसाळ्यांतील मेघ किंवा महाप्रलयकाळचें तेज एकदम वाढून चहूंकडे पसरतें, त्याप्रमाणें भगवंतानें आपल्या स्वरूपाशिवाय कोणीकडेहि दुसरें कांहीं उरूं दिलें नाहीं ९४. पहिल्या प्रथम अर्जुनास श्रीकृष्णांचे हे ' विश्वरूप ' रूपी स्वरूप पाहून त्याची इच्छावृत्ति निवृत्त झाल्यामुळें समाधान वाटले. [ डोळे मिटून समाधानांत होता ] व लागलींच डोळे उघडून पाहतो तों विश्वरूप दृष्टीस पडलें ९५. अशा रीतीनें याच दोनहि डोळ्यांनीं सर्व विश्वरूप पहावें अशीं जी त्याची इच्छा होती, त्या इच्छेचा सर्व लळा श्रीकृष्णांनीं पुरविला ९६.

**अन्वयार्थ**—**अनेकवक्त्रनयनम्**–अनेक मुखें व नेत्र ज्याला आहेत असें विश्वरूप–**अनेकाद्भुतदर्शनं**–ज्यांत अनेक विस्मयकारक दर्शनें आहेत असें–**अनेकदिव्याभरणं**–ज्यांत अनेक दिव्य आभरणें आहेत असें–**दिव्यानेकोद्यतायुधम्**–ज्यांत अनेक दिव्य आयुधें उचललेलीं आहेत १०.

मग त्या विश्वरूपांत अर्जुनानें पुष्कळ तोंडें पाहिलीं, तीं जणुं काय केवळ श्रीविष्णूच्या राजवाड्यांप्रमाणें सुशोभित दिसलीं, अथवा सौंदर्यलक्ष्मीची भांडारेंच उघडलीं आहेत की काय? ९७. किंवा आनंदरूपी वनेंच भरास आलीं आहेत की काय? ज्याप्रमाणें जणुं सौंदर्याला राज्याधिकार मिळावा, त्याप्रमाणें आल्हादकारक अशी श्रीहरीचीं मुखें अर्जुनानें पाहिलीं ९८. त्या

१ किरणाच्या योगानें. २ नीट, स्वच्छ. ३ आपलें मूळ स्वरूप. ४ श्रीकृष्णानें. ५ भीतभीत. ६ स्तुति करूं इच्छिणाऱ्या ध्रुवाला. ७ गाल. ८ स्पर्शिलें. ९ जें वेदांनाहि बोलतां येत नाहीं तें. १० उजाडलें. ११ एकवटलेला समुद्रच. १२ ब्रह्मलोकापर्यंत. १३ पोहतो. १४ कोणीकडे. १५ जागा झालेल्याला. १६ अथवा. १७ नक्षत्रसमूह. १८ किरण. १९ स्तब्धतेला. २० तटस्थतेला, एकाग्रतेला. २१ सर्व विचारांना. २२ आवडीनें. २३ मेघ. २४ याच दोन्ही डोळ्यांनीं. २५ पुष्कळ. २६ भांडारें. २७ भरास आलीं.

माजीं एकेकें । सावियेचीं भयानकें । काळरात्रीचीं कटकें । उठावलीं जैसीं ॥१९॥ कीं मृत्यूसीचि मुखें जाहलीं । हो कां जे भयाचीं ढुंगें पन्नासिलीं । कीं महाकुंडें उघडलीं । प्रळयानळाचीं ॥ २०० ॥ तैसीं अद्भुतें भयासुरें । तेथ वदनें देखिलीं वीरें । आणिकें असाधारणें साळंकारें । सौम्यें बहुतें ॥ १ ॥ पैं ज्ञानदृष्टीचेनि अवलोकें । परी वदनांचा शेवटु नं टके । मग लोचन ते कवतिकें । लागला पाहों ॥ २ ॥ तंव नानावर्णें कमळवनें । विकासिलीं तैसें अर्जुनें । नेत्र देखिले पालिंगनें । आदित्यांचीं ॥ ३ ॥ तेथेंचि कृष्णमेघांचिया दाटी । माजीं कल्पांत विजूंचिया स्फुटी । तैसिया वन्हिं पिंगळा दिठी । भ्रूभंगातळीं ॥ ४ ॥ हें एकैक आश्चर्य पाहतां । तिये एकेचि रूपीं पंडुसुता । दर्शनाची अनेकता । प्रतिफळली ॥ ५ ॥ मग म्हणे चरण ते कवणेकडे । केउते मुकुट कें दोर्दंडें । ऐसी वाढवितांहे कोडें । चाड देखावयाची ॥६॥ तेथ भाग्यनिधि पार्था । कां विफलत्व होईल मनोरथा । काय पिनाकपाणीचियें भातां । वायकांडीं आहाती ? ॥ ७ ॥ ना तरी चतुराननाचिये वाचे । काय आहाती लटिकिया अक्षरांचे साचे ? । म्हणौनि साद्यंतपण अपारांचें । देखिलें तेणें ॥ ८ ॥ जयाची सोयं वेदां नेंकळे । तयाचे सकळावयव एकेचि वेळे । अर्जुनाचे दोन्ही डोळे । भोगिते जाहले ॥ ९ ॥ चरणौनि मुकुटवरी । देखत विश्वरूपाची थोरी । जे नाना रत्न अळंकारीं । मिरवत असे ॥ २१० ॥ परब्रह्म आपुलेनि आंगें । ल्यावया आपणचि जाहला अनेगें । तिये लेणीं मी सांगें । काइसयासारिखीं ॥ ११ ॥ जियो प्रभेचिये झळाळा । उजाळु चंद्रादित्यमंडळा । जे महातेजाचा जिव्हाळा । जेणें विश्व प्रगटे ॥ १२ ॥ तो दिव्यतेज शृंगारु । कोणाचिये मतीसी होय गोचरु । देव आपणपेंचि लेइले ऐसें वीरु । देखत असे ॥ १३ ॥ मग तेथेंचि ज्ञानाचिया डोळां । पहात करपल्लवां जंव सरळा । तंव तोडित कल्पांतीं-चिया ज्वाळा । तैसीं शस्त्रें झळकत देखे ॥ १४ ॥ आपण आंग आपण अलंकार । आपण हात आपण हतियार । आपण जीव आपण शरीर । देखे चराचर कोंदलें देवें ॥ १५ ॥ जयाचिया किरणांचे निखरपणें । नक्षत्रांचे होत फुटाणे । तेजें खिरडला वन्हि म्हणे । समुद्रीं रिघों ॥ १६ ॥ मग काळकूटकल्लोळीं कवळिलें । नाना महाविजूंचें दांगें उमटले । तैसे अपार कर देखिले । उदितायुधीं ॥ १७ ॥

तोंडांतहि कांहीं मुखें सहजच भयंकर, जणुं काळरात्रीचीं सैन्येंच उठलीं आहेत अशीहि दिसलीं ९९. किंवा ही मृत्यूलाच तोंडें उत्पन्न झालेली आहेत, जणुं भयाचे किल्लेच उभारावेत अथवा प्रळयाग्नीचीं पेटलेली महाकुंडेंच उघडावीत २००. त्याप्रमाणें अद्‌भुत व भयंकर अशीं तोंडें शूर अर्जुनानें त्या ठिकाणीं पाहिलीं आणि पुष्कळ सौम्य मुखें तर कांहीं निरुपम अलंकार घातलेलीं चमत्कारिक अशीहि मुखें पाहिलीं १. तीं मुखें त्याच्या ज्ञानदृष्टीनेंच पाहिली तरीपण त्या मुखांचा अंत त्याला लागेचना म्हणून तें सोडून देऊन मग विश्वरूपाचे डोळे कोठें आहेत तें तो कौतुकानें पाहूं लागला २. तेव्हां जणुं नाना रंगांचीं कमलवनेंच विकसित झालीं आहेत, अशा विस्तृत व सूर्यतेजाप्रमाणें चमकणाऱ्या डोळ्यांच्या पंक्तिच त्या अर्जुनाच्या दृष्टीस पडल्या ३. डोळे पाहात असतांना त्यांतच काळ्या कुळकुळीत मेघांच्या गर्दींत कल्पतांचे वेळीं विजा चमकतात, त्याप्रमाणें भिवयांखालीं अग्नीप्रमाणें पिंगट झालेल्या नेत्रदृष्टी चमकत असलेल्या त्यानें पाहिल्या ४. त्या एकाच रूपावर एक एक आश्चर्य पहात असतां त्या एकाच विश्वरूपांत अनेक गोष्टी भरल्या आहेत, असें त्याच्या अनुभवास आलें ५. मग अर्जुन या विश्वरूपाचे पाय कोणीकडे आहेत, मुगुट कोणीकडे आहे? व ते बाहुदंड कोणीकडे आहेत ! हें पाहण्याचीहि कौतुकानेंच इच्छा वाढवित आहे ६. तेथें भाग्यवान् असा जो पार्थ त्याचे मनोरथ विफल कसे होतील ! हें पहा, 'पिनाक' संज्ञक, धनुष्य हातांत असणाऱ्या शंकराच्या भात्यांत कधीं वायबाण सांपडतील काय ! ७. किंवा ब्रह्मदेवाच्या वाचेंत लटक्या अक्षरांचे ठसे असूं शकतील काय ! तर नाहीं; म्हणून अपार असें जें विश्वरूप त्याचा आदि व अंत हे दोन्ही अर्जुनानें पाहिलें ८. ज्या विश्वरूपाचा थांग, मार्ग वेदांसहि लागला नाहीं, त्या विश्वरूपाचे सर्व अवयव एकावेळीं अर्जुनानें दोन्हीं डोळ्यांनीं पूर्णपणें पाहिले ९. जें विश्वरूप नानारत्नांच्या अलंकारांनीं शोभायमान होतें अशा विश्वरूपाच्या चरणापासून मुगुटापर्यंतचा सर्व महिमा पाहिला २१०. खुद्द परब्रह्मानें आपण स्वतः अलंकाराचे स्वरूप धारण करून त्याजवर परब्रह्मरूपीच अलंकार घातल्यावर ते अलंकार कशासारखे शोभत आहेत म्हणून मी सांगूं ! ११. ज्या प्रभेच्या कांतीनें चंद्र-सूर्य मंडळें प्रकाशित होतात व जी प्रभा महातेजाचे जीवन आहे व ज्या प्रभेनें हे सारे विश्व प्रकाशित होते १२. ते दिव्य तेजरूपी अलंकार घातल्यावर जाणण्याची कोणाची शक्ति होणार ! पण अर्जुनालाच त्या ब्रह्मानें आपल्याच स्वरूपाचें अलंकार आपल्या अंगावर घातले आहेत, असें दृष्टीस पडले १३. मग अर्जुन ज्ञानदृष्टीनें विश्वरूपाचे हात पाहूं लागला तों ते सरळ असून त्यांत कल्पांतींच्या ज्वालांना तोडणारी शस्त्रें चमकत आहेत, असें त्याचे दृष्टीस पडलें १४. देव आपणच अवयव आंग, आपणच त्यावर घातलेले अलंकार, आपणच हात, आपणच हत्यारें, आपणच जीव व शरीरहि आपणच झाले आहेत. फार तर काय ! चराचरात्मक सर्व विश्व परमात्म्यानेंच ओतप्रोत आहे, असें अर्जुन पाहता झाला १५. त्यांच्या किरणांच्या प्रखरपणानें नक्षत्रांचे फुटाणे होऊन त्या तेजानें मागें हटलेला अग्नीहि पोळल्यामुळें 'समुद्रांत प्रवेश करावा' म्हणूं लागला म्ह० त्यास समुद्रांत शिरण्याची इच्छा झाली १६. मग जणुं काय काळकूट विषाच्या लाटाच उसळल्या आहेत किंवा महाविजांचे अरण्यच उद्भवलें आहे अशीं आयुधें हातांत घेऊन दुसऱ्यास मारण्याकरितां उगार[illegible]रखे त्या विश्वरूपाचे अपरिमित हात अर्जुनानें पाहिले. १७

---

१ सहजच. २ सैन्यें. ३ किल्ले. ४ पसरलीं, रचलीं. ५ प्रलयाग्नींची. ६ पाहण्यानें. ७ न लागे. ८ पंक्ति, समुदाय. ९ चमकणें, चमक. १० अग्निप्रमाणें पिंगट. ११ भिवयांखालीं. १२ अनुभवास आली. १३ कोणीकडे. १४ बाहू. १५ आवडीनें. १६ महादेवाच्या भात्यांत. १७ वायबाण. १८ ब्रह्मदेवाच्या. १९ मार्ग, अंत, थांग. २० न सांपडेल, कळली नाहीं, लागली नाहीं. २१ चरणांपासून. २२ पुष्कळ, अनेक. २३ अलंकार. २४ कशासारखी. २५ प्रकाशानें. २६ तेज, प्रकाश. २७ प्रभा. २८ समजणार, कळणार. २९ हातांना. ३० तीव्रपणानें. ३१ मागें हटलेला. ३२ विषोर्मित. ३३ समुदाय, अरण्य. ३४ उचललेल्या आयुधासहित.

दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् । सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

कीं भेणें तेथूनि काढिली दिठी । मग कंठमुगुट पहातसे किरीटी । तंव सुरतरूची सृष्टी । जयांपासोनि कां जाहली ॥ १८ ॥ जिये महासिद्धींचीं मूळपीठें । शिणली कमळा जेथ वावंटे । तैसीं कुसुमें अति चोखटें । तुरंबिलीं देखिलीं ॥ १९ ॥ मुगुटावरी स्तबक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक । कंठीं रुळताति अलौकिक । माळादंड ॥ २२० ॥ स्वर्गीं सूर्यतेज वेढिलें । जैसें पंधरेनें मेरूतें मढिलें । तैसें नितंबावरी गोंढिलें । पीतांबरु झळके ॥ २१ ॥ श्रीमहादेवो कापुरें उटिला । कां कैलासु पारेंजें डवरिला । नाना क्षीरोदकें पांघरविला । क्षीरार्णवो जैसा ॥ २२ ॥ जैसी चंद्रमयाची घडी उपलविली । मग गगनाकरवीं बुंथी घेवविली । तैसीं चंदनापिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें ॥ २३ ॥ जेणें स्वप्रकाशा कांती चढे । ब्रह्मानंदाचा निदाघु मोडे । जयाचेनि सौरभ्यें जीवित जोडे । वेदवतीये ॥ २४ ॥ जयाचे निर्लेपें अनुलेपु करी । जे अनंगुही सर्वांगीं धरी । तया सुगंधाची थोरी । कवण वानी ? ॥ २५ ॥ ऐसी एकैक शृंगारशोभा । पाहतां अर्जुन जातसे क्षोभा । तेवींचि देवो बैसला कीं उभा । कीं शयालु हें नेणवें ॥ २६ ॥ बाहेर दिठी उघडोनि पाहे । तंव आघवें मूर्तिमय देखत आहे । मग आतां न पाहें म्हणौनि उगा राहे । तरी आंतुही तैसेंचि ॥ २७ ॥ अनोवरें मुखें समोर देखे । तयाभेणें पाठीमोरा जंव ठाके । तंव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसेचि ॥ २८ ॥ अहो पाहतां कीर प्रतिभासे । एथ नवलावो काय असे ? । परि न पाहतांही दिसे । चोजें आइका ॥ २९ ॥ कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें । तयाही सकट नारायणें । व्यापूनि घेतलें ॥ २३० ॥ म्हणौनि आश्चर्याच्या पुरीं एकीं । पडिला ठायेंठाव थडी ठाकी । तंव चमत्काराचिया आणिकीं । महार्णवीं पडे ॥ ३१ ॥ तैसा अर्जुनु असाधारणें । आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें । कवळूनि घेतला तेणें । अनंतरूपें ॥ ३२ ॥ तो विश्वतोमुख स्वभावें । आणि तेचि दावावयालागीं पांडवें । प्रार्थिला आतां आघवें । होऊनि ठेला ॥ ३३ ॥ आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे । तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें । दिधली आहे ॥ ३४ ॥ म्हणौनि किरीटीसि दोहीं परी । तें देखणें देखे अंधारीं ।

**अन्वयार्थ**--**दिव्यमाल्याम्बरधरं**-दिव्य पुष्पें व वस्त्रें धारण करणारें-**दिव्यगंधानुलेपनं**-दिव्य गंधाचें ज्याला अनुलेपन केलें आहे-**सर्वाश्चर्यमयं**-सर्व आश्चर्यमय-**देवं**-प्रकाशमय-**अनन्तम्**-अन्तरहित-**विश्वतोमुखं**-व सर्वतोमुख असें विश्वरूप भगवानानें त्याला दाखविलें ११.

त्या हातांतील असंख्य शस्त्रांच्या भयानें अर्जुनानें तेथून आपली दृष्टी काढून मग तो कंठ व मुकुट यांजकडे पाहूं लागला. तेव्हां त्याला असें वाटलें कीं, कल्पतरूंची उत्पत्ति याजपासूनच झाली आहे कीं काय ! १८. महासिद्धींचीं अधिष्ठानें व लक्ष्मी, ती शिणली असतां जेथें विश्रांति घेते, अशीं जीं अति उत्कृष्ट कमळें त्यांचा वास भगवान् घेत आहेत, असें पाहिलें १९. मुकुटावर अनुक्रमानें फुलांचे गुच्छ होते व एकावर एक अशा पूजा बांधिलेल्या जाळ्या असून कंठांत अवर्णनीय अशा पुष्पमाला लोळत होत्या २२०. ज्याप्रमाणें स्वर्गानें सूर्य तेज नेसावे किंवा जणुं मेरु पर्वत सोन्यानें मढविलेला आहे त्याप्रमाणें कंबरेसभोंवतीं नेसलेला पीतांबर झळकत होता २१. ज्याप्रमाणें श्रीमहादेवास कापुराची उटी लावावी किंवा कैलास पर्वतास पाऱ्यानें लिंपावे, अथवा क्षीरसमुद्राला पांढऱ्या स्वच्छ उदकानें आच्छादावे २२. ज्याप्रमाणें चंद्राची घडी उकलून मग तिचा आकाशाकडून बुरखा घेववावा त्याप्रमाणें विश्वरूपाच्या सर्वांगावर पांढरी शुभ्र चंदनाची उटी त्यास दिसली २३. ज्याच्या योगानें मूळ प्रकाशणाऱ्या वस्तूंलाहि तेज चढतें, 'ब्रह्मानंदाचाहि' [ हा जात्याच अति थंड आहे ] तरीहि त्याचा ज्यानें दाह नाहींसा होतो व ज्याच्या सुगंधानें स्वभावतःच गंधयुक्त पृथ्वीस जीवित म्ह० अस्तित्त्व प्राप्त होते किंवा २४. निर्लेप असा जो परमात्मा तोही ज्या गंधाचा अनुलेप करितो व मदनहि ज्याची उटी सर्वांगाला लावतो, त्या चंदनाच्या सुगंधाची थोरवी कोण वर्णन करील ? २५. याप्रमाणें एकएक अलंकार शृंगाराची शोभा पाहून अर्जुन भांबावला; तशांत, देव बसले आहेत किंवा उभे आहेत, किंवा निजलेले आहेत अथवा कशावर आहेत, हें त्यास समजेना २६. डोळे उघडून तो बाहेर इकडे तिकडे पाहतो; तों सर्वच विश्वरूपानें ओतप्रोत भरलें आहें असें त्यास दिसूं लागलें. म्हणून आतां मी त्याकडे मुळींहि न पाहतां डोळे झांकून स्वस्थ बसावें असा मनांत निश्चय करून डोळे झांकतो न झांकतो तोंच अंतर्यामींहि त्यास तसेंच विश्वरूप दिसूं लागलें २७. समोर अगणित भयंकर मुखें दिसतात, म्हणून त्यांच्या भीतीनें पाठीमागें जों पाहूं लागला तों तिकडेहि विश्वरूपाचीं मुखें हात, पाय हें तसेंच आहेत, असे त्यास दिसूं लागलें २८. अहो ! दृष्टि उघडून पाहिल्यावर सर्वत्र विश्वरूपाचा प्रतिभास होतो, यांत आश्चर्य तें कसलें ? परंतु डोळे मिटल्यावरहि, न पाहतांहि तें दिसतें हेंच भगवदनुग्रहाचें नवल ऐका २९. प्रभूच्या कृपेची करणी कशी अद्भुत आहे पहा ! कीं पार्थाचें पहाणें व न पाहणें हें सर्वच्या सर्वच नारायणांनीं घनदाट व्यापिले आहे ३०. म्हणून एका आश्चर्यरूपी पुरांत पडल्यावर तो तत्काळ काठावर जाऊन जों उभा राहतो तोंच पुनः दुसऱ्या चमत्काररूपी महासमुद्रांत तो पडला ३१. याप्रमाणें आपल्या असामान्य [ विश्वरूप ] दर्शनाचाचा वेध लागलेल्या अर्जुनास कौशल्यानें श्रीकृष्णांनीं अनंत रूपें दाखवून व्यापून टाकलें ३२. तो सर्वव्यापी व स्वभावतःच सर्वतोमुख आहे, त्यामुळें आणि तशांत अर्जुनानें तेंच विश्वरूप दाखवा अशी प्रार्थना केल्यामुळें आपणच सर्व रूपें घेऊन, विश्वरूपानें होऊन राहिला आहे ३३. अर्जुनाला श्रीकृष्णांनीं जी दिव्य दृष्टि दिली होती, ती दिव्याचा किंवा सूर्याचा प्रकाश असला तरच त्यामुळें दिसावें किंवा मिटले असतां तिचे पाहणेंच बंद व्हावें अशांतली नव्हती ३४. म्हणून अर्जुनास डोळे उघडे ठेवून किंवा झांकून अशा दोन्ही प्रकारांनीं

१ आश्रयस्थानें. २ लक्ष्मी. ३ विश्रांति पावे. ४ धारण केलीं. ५ घोस. ६ फुलांच्या जाळ्या, वेण्या इत्यादि. ७ लोळतात. ८ पुष्पमाळा. ९ सोन्यानें. १० कटिपश्चाद्भागावर. ११ नेसलेलें. १२ पाऱ्यानें. १३ लिंपला. १४ पांढऱ्या वस्त्रानें. १५ चांदण्याची. १६ उकलिली. १७ खोळ, बुरखा. १८ चंदनाची उटी. १९ दाह. २० सुगंधानें. २१ पृथ्वीस. २२ निर्मळ. २३ निस्तेज. २४ ब्रह्म. २५ शरीररहितहि. २६ वर्णन करी. २७ भांबावून गेला, वेडावला. २८ अगणित. २९ आश्चर्य. ३० नवल. ३१ कृपेचें. ३२ पुरांत, प्रवाहांत. ३३ तत्काळ. ३४ कांठावर, तीरावर. ३५ विलक्षण. ३६ कलेनें, कौशल्यानें. ३७ व्यापून. ३८ सर्वव्यापी ईश्वर. ३९ झांकली असतां. ४० कृष्णानें. ४१ पहावें लागतें.

हें संजयो हास्तिनापुरीं । सांगतसे राया ॥ ३५ ॥ म्हणे किंबहुना अवधारिलें । पार्थें विश्वरूप देखिलें । नाना आभरणीं भरलें । विश्वतोमुख ॥ ३६ ॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥**

तिये अंगप्रभेचा देवों । नेवलावो काइसया ऐसा सांगावा । कल्पांतीं एकुचि मेळावा । द्वादशादित्यांचा होय ॥३७॥ तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी । जरी उदयजती कां एकेचि अवसरीं । तऱ्ही तया तेजाची थोरी । उपमूं नये ॥ ३८ ॥ आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तेवींचि दशकुंही मेळविजे । महातेजांचा ॥३९॥ तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पांडें । हें तेज कांहीं कांहीं होईल थोडें । आणि तया ऐसें कीर चोखडें । त्रिशुद्धी नोहे ॥ २४० ॥ ऐसें माहात्म्य या श्रीहरीचें सहज । फांकतसे सर्वांगीचें तेज । तें मुनिकृपा जी मज । दृष्ट जाहलें ॥४१॥

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा । अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**

आणि तिये विश्वरूपीं एकीकडे । जग आघवें आपुलेनि पंवाडें । जैसे महोदधीमाजीं बुडबुडे । सिनांनें दिसती ॥ ४२ ॥ कां आकाशीं गंधर्वनगर । भूतळीं पिपीलिकां बांधे घर । नाना मेरुवरी सेंपुर । परमाणु बैसले ॥ ४३ ॥ विश्व आघवेंचि तयापरी । तया देवचक्रवर्तीचिया शरीरीं । अर्जुन तिये अवसरीं । देखता जाहला ॥ ४४ ॥

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः । प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥**

तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळुमाळ होतें जें दुजेंपण । तेही आटोनि गेलें अंतःकरण । विरालें सहसा ॥ ४५ ॥ आंतु आनंदा चेइरें जाहलें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें । आपाद पां गुंतलें । पुलकांचलें ॥ ४६ ॥ वांर्षिये प्रथमदशे । वोहळल्यां शैलांचें सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच जाहले ॥ ४७ ॥ शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिकां शरीरीं । दाटलिया ॥ ४८ ॥ माजीं सांपडलेनि अलिकुळें । जळावरी कमळकळिका जेवीं आंदोळे । तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ ४९ ॥ कर्पूरकर्दळीचीं गर्भपुटें । उकलतां कापुराचेनि कोंदाटें । पुलिकां गळती तेवीं थेंबुटें । नेत्रौनि पडती ॥ २५० ॥ उदयलेनि सुधाकरें । जैसा भरलाचि समुद्र भरे । तैसा वेळोवेळां ऊर्मिभरें । उचंबळत असे ॥ ५१ ॥ ऐसा सात्त्विकांही आठां

आणि उजेडांत नव्हे तर अंधारांतसुद्धां त्या दिव्यदृष्टीनें ते विश्वरूप दिसत होतें; असें हस्तिनापुरांत संजयानें धृतराष्ट्र राजास सांगितलें ३५. व संजय म्हणतो कीं, फार काय सांगूं ! नाना अलंकारांनीं भरलेलें व ज्याला सर्व बाजूंनीं मुखें आहेत असें विश्वरूप पार्थानें पाहिलें. हे राजा ! आपण सर्व ऐकलें कां ? ३६.

**अन्वयार्थ**—**यदि**–जर–**दिवि**–द्युलोकांत–आकाशांत –**सूर्यसहस्रस्य भाः**–सहस्र सूर्यांची प्रभा–**युगपत्**–एकाच वेळीं–**उत्थिता भवेत्**–उत्थित–उत्पन्न होईल तर–**सा**–ती प्रभा–**तस्य महात्मनः**-त्या महात्म्याच्या–**भासः सदृशी** –प्रभेच्या सारखी–**स्यात्**–होईल १२.

राजा, त्या विश्वरूपाचें तेजाची अपूर्वता कशासारखी होती म्हणून सांगूं ! प्रलयकाळीं जसें द्वादशसूर्य एकत्र मिळतात ३७. तसें ते सहस्रावधि सूर्य जरी एकाच वेळेला उदय पावले, तरी त्यांच्यानेंहि त्या विश्वरूपाच्या तेजाच्या प्रभावाची बरोबरी करवणार नसल्याने ते त्याच्या उपमेस येणार नाहींत ३८. सर्व विजा एकत्र करून व प्रळयकाळच्या अग्नींची सर्व साहित्यें जमवून व त्यांत दहाहि महातेजें जर भरीस मिळवली ३९. तर त्या विश्वरूपाच्या आंगच्या तेजाचीं कांहीं थोडीशी कदाचित् बरोबरी झाली तर होईल; परंतु त्याची अगदीं बरोबरी तर खास होणार नाहींच २४०. असा श्रीहरीचा सहज महिमा आहे. त्याच्या विश्वरूपाच्या सर्वांगाचें तेज सर्वत्र पसरलें होतें तें श्रीव्यासमुनींच्या कृपेनें माझ्याहि दृष्टीस पडलें ४१.

**अन्वयार्थ**—**तदा**–त्या वेळीं–**पांडवः**–अर्जुन–**तत्र देव-देवस्य शरीरे**–त्या देवाधिदेवाच्या शरिरांत–**एकस्थम्**–एकाच अवयवांत स्थित असलेलें–**कृत्स्नं जगत्**–सर्व जगत्–**अनेकधा**–अनेक प्रकारें–**प्रविभक्तम्**–अत्यंत विभागलेलें–**अपश्यत्**–पाहता झाला १३.

आणखी त्या विश्वरूपावर सर्व जग आपल्या विस्तारा-सह एका बाजूस दिसत होतें. ज्याप्रमाणें महासागराच्या पाण्यावर निरनिराळे बुडबुडे दृष्टीस पडतात ४२. किंवा आकाशांत ढगांवर जसें काल्पनिक गंधर्वनगर भासावें किंवा पृथ्वीवर मुंग्यांनी वारूळ बांधावें किंवा डोंगरावर बारीक मातीचे कण यथास्थित पसरलेले असतात ४३. त्याप्रमाणें त्या वेळीं त्या देवाधिदेव श्रीकृष्णाच्या विश्वरूप शरिरावर अर्जुनानें हें सर्व जग पाहिलें ४४.

**अन्वयार्थ**—**ततः**–त्यानंतर–**सः धनजंयः**–तो अर्जुन–**विस्मयाविष्टः**–विस्मयानें युक्त व–**हृष्टरोमा**–ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहिलें आहेत, असा होऊन–**शिरसा** –मस्तकानें–**देवं**–देवाला–**प्रणम्य**–प्रणाम करून–**कृतां-जलिः**–ज्यानें आपले हात जोडलें आहेत असा तो–**अभाषत**–त्याला बोलला १४.

तेव्हां एक विश्व वेगळें व त्यास पाहणारे आपण एक वेगळें, असें [ द्रष्टा-दृश्यभावाचें ] जें थोडेसें द्वैत होतें तेंहि नाहींसें झाले व अर्जुनाचें मनहि सहजच विरून गेलें ४५. अंतर्यामीं आनंद जागृत-अभिव्यक्त झाला. त्यामुळें बाहेरील गात्रें-इन्द्रियें ढिलीं पडलीं आणि पायापासून मस्तकापर्यंत सर्व शरीरावर रोमांच उभे राहिलें ४६. पाव-साळ्याच्या सुरवातीस पर्वताच्या सर्वांगावरून पाणी वाहून गेल्यावर जसें पर्वताच्या सर्वांगावर गवत उगवतें, त्याप्रमाणें अर्जुनाच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले ४७. चंद्रकिरणांनी स्पर्श केलेल्या चंद्रकांतमण्यास जसा पाझर सुटतो, त्याप्रमाणें अर्जुनाच्या सर्व शरीरावर घामाचे बिंदू दाट आले ४८. कमळाच्या कळीमध्यें मुंग्यांचा समुदाय सांपडला म्हणजे ती कळी इकडून तिकडे हेलकावते त्याप्रमाणें अंतर्यामींच्या सुखाच्या लाटांच्या बळानें बाहेर अर्जुनाचें शरीरहि कांपूं लागलें ४९. विपुल कापूर दाटल्यावर ज्याप्रमाणें कापूरकेळींची सोपटें उकलून कापुराचे एकेक कण बाहेर गळून पडूं लागतात, त्या-प्रमाणें डोळ्यावाटें आनंदाश्रूंचे थेंब पडूं लागले २५०. चंद्रदोय झाल्यावर ज्याप्रमाणें भरलेल्या समुद्रासच भरत्यांवर भरत्या येतात, त्याचप्रमाणें अंतर्यामींच्या सुखाच्या लाटांनीं वरचेवर अंतःकरण उचंबळून आल्यानें तो डोलूं लागला ५१. याप्रमाणें अष्टसात्त्विक भावांची देखील

१ हे राजन्. २ कौतुक. ३ कशासारखा. ४ दशसंख्या-रूप आवरणाग्नि, महातेजांची दसकडी. ५ योग्यतेनें. ६ व्यासांच्या कृपेनें. ७ विस्तारानें. ८ निरनिराळें. ९ मेघ-समुदायाचें कल्पित नगर. १० मुंगी. ११ यथास्थित. १२ कांहींसें. १३ उसळो आली, जागृति आली. १४ नखशि-खांत. १५ आच्छादिलें. १६ रोमांचांनीं. १७ पावसाळ्याचे. १८ पाणी वाहून गेल्यावर. १९ पर्वतांचें. २० घामाचे बिंदु. २१ भ्रमरसमुदाय. २२ हालते. २३ कापूरकेळीची. २४ केळींचीं सोपें, सोपटें. २५ दाट भरणीनें, दाटल्यानें, दाटल्यावर. २६ शिंतोडे, कण. २८ थेंब. २८ डोळ्यांवाटे. २९ चंद्रानें. ३० आनंदाच्या लहरींनीं

भावां । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीवे फावली ॥ ५२ ॥ तैसाचि तया सुखानुभवापाठीं । केला द्वैताचा सांभाळु दिठी । मग उसांसौनि[2] किरीटी । वास पाहिली[3] ॥५३॥ तैथ बैसला होता जिया सवा । तियाचिया कडे मस्तक खालविला देवा । मग जोडूनि करसंपुट बरवा । बोलतु असे ॥ ५४ ॥

अर्जुन उवाच :—

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥**

म्हणे जयजयाजी स्वामी । नवल कृपा केली तुम्हीं । जें हें विश्वरूप कीं आम्हीं । प्राकृत देखों ॥५५॥ परि साचचि भलें केलें गोसाविया । मज परितोषु जाहला सावियां । जी देखिलासि जो इया । सृष्टीसी तूं आश्रयो ॥ ५६ ॥ देवा मंदराचेनि अंगलगें । ठायीं ठायीं श्वापदांचीं दांगें । तैसीं इयें तुझ्या देहीं अनेगें देखतसें भुवनें ॥ ५७ ॥ अहो आकाशाचिये खोळे । दिसती ग्रहगणांचीं कुळें । कां महावृक्षीं अविसाळें । पक्षिजातीचीं ॥ ५८ ॥ तयापरी श्रीहरी । तुझिया विश्वात्मकीं इये शरीरीं । स्वर्गु देखतसें अवधारीं । सुरगणेंसीं ॥ ५९ ॥ प्रभु महाभूतांचें पंचक । येथ देखत आहे अनेक । आणि भूतग्राम एकेक । भूतसृष्टीचें ॥२६०॥ जी सत्यलोकु तुजमाजीं आहे । देखिला चतुराननु हा नोहे ? । आणि येरीकडे जंव पाहें । तंव कैलासुही दिसे ॥ ६१ ॥ श्रीमहादेव भवानियेशीं । तुझ्या दिसतसे एके अंशीं । आणि तूंतेंही गा हृषीकेशी । तुजमाजीं देखे ॥६२॥ पैं कश्यपादि ऋषिकुळें । इयें तुझिया स्वरूपीं सकळें । देखतसें पाताळें । पन्नगेंशीं ॥ ६३ ॥ किंबहुना त्रैलोक्यपती । तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती । इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती । अंकुरलीं जाणों ॥ ६४ ॥ आणि तेथिंचे जे जे लोक । ते चित्ररचना जी अनेक । ऐसें देखतसे अलोलिक । गांभीर्य[20] तुझें ॥ ६५ ॥

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।**
**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥**

त्या दिव्यचक्षूंचेनि पैसें । चहुंकडे[21] जंव पाहात असें । तंव दोर्दंडीं कों[22] जैसें । आकाश कोंभैलें[23] ॥६६॥ तैसें एकचि निरंतर । देवा देखत असें तुझे कर । करीत आघवेचि व्यापार । एकेचि काळीं ॥६७॥ मग महाशून्याचेनि[24] पैसारें[25] । उघडलीं

एकमेकांत चढाओढ लागली होती. त्या स्थितींत अर्जुनाच्या जीवास ब्रह्मानंदाची राज्यप्राप्ति झाली; ५२. त्याचप्रमाणें ब्रह्मानंदसुखानुभूतीच्या मागोमाग देव व भक्त अशा [ कल्पित ] द्वैताचा सांभाळ केला. त्यामुळें अर्जुन दीर्घ श्वासोच्छ्वास-उसासा टाकून सभोंवती पाहूं लागला ५३. आणि आपण ज्या बाजूला अर्थात् देवासमोर मुख करून बसला होता, त्याच बाजूला मस्तक लववून व हात जोडून चांगलीच प्रार्थना करूं लागला " ५४.

**अन्वयार्थ**—**देव**–हे श्रीकृष्णा !–[ **अहं**–मी ] **तव देहे**–तुझ्या देहांत–**सर्वान् देवान्**–सर्व देवांना–**तथा**–त्याचप्रमाणें–**भूतविशेषसंघान्**–निरनिराळ्या जातींच्या स्थावर जंगम प्राण्यांच्या समूहांस–**पश्यामि**–पहातो–**ईशं कमलासनस्थं ब्रह्माणं**–सर्व प्रजांचें नियमन करणारा, पृथ्वी–कमलाच्या मेरुकर्णिकेंत स्थित असलेला जो चतुर्मुख ब्रह्मदेव त्याला–**च**–व–**सर्वान् ऋषीन्**–वसिष्ठादि सर्व ऋषींना–**च**–आणि–**दिव्यान् उरगान्**–वासुकीप्रभृति दिव्य सर्पांना मी पाहतों १५.

अर्जुन म्हणाला, " प्रभो ! आपला जयजयकार असो, आपण आम्हांवर मोठी नवलकृपा केली. अहो ! आम्ही सामान्य जीव असूनहि विश्वरूप पहाते झालों ५५. भगवन्, आपण खरोखरच ही गोष्ट फार चांगली केली व तिच्या योगानें स्वभावतःच मला फार आनंद झाला; ती ही कीं, सर्व सृष्टीला तुम्हीच आश्रय आहात असें मी आजच आपल्या दृष्टीनें प्रत्यक्ष पाहिलें ५६. देवा ! मंदर पर्वताच्या आश्रयानें जसे जागोजाग, दऱ्यांतून श्वापदांचें समुदाय, अरण्यें असतात त्याप्रमाणें या तुमच्या शरीरावर अनंत इंद्रचंद्रादि लोक माझ्या दृष्टीस पडले ५७. अहो ! आकाशाच्या खोलेंत ज्याप्रमाणें ग्रह समुदायांचें मेळे दिसतात, किंवा भल्या मोठ्या वृक्षांवर जशीं पक्ष्यांचीं अनेक घरटीं दृष्टीस पडतात ५८. त्याप्रमाणें हे श्रीहरी, तुमच्या विश्वरूपरूपीं शरीरांत देवगणांसह मला स्वर्ग दिसत आहे ५९. हे प्रभो ! या तुमच्या विश्वरूपात्मक शरीरांत महाभूतांचीं अनेक पंचकें पहात आहे व तसेंच भूतसृष्टीचें भूतापासून उत्पन्न झालेल्या निरनिराळ्या प्राण्यांचे समुदाय मी पहातो आहें २६०. महाराज ! या तुमच्या विश्वरूपांत सत्यलोकहि आहे व पहा, पहा ! ब्रह्मदेव तो हाच नव्हे काय ? दुसरींकडे जों पहावें तों कैलासहि दिसत आहे ६१. पार्वतीसह श्रीशंकर हे तुमच्या शरीराच्या एका भागावर दिसत आहेत. हे हृषीकेशा ! आश्चर्य हे कीं तुम्हांलाहि तुमच्या या विश्वरूप शरीरावरच मीं पाहातों आहें ६२. कश्यपादि ऋषींचीं सर्व कुळें व सर्पांसह वर्तमान सप्त पाताळहि तुमच्या विश्वरूपावर दिसत आहेत ६३. किंबहुना ! हे त्रैलोक्यपते, तुमच्या या विश्वरूपांतील एक एक अवयवरूपी भिंतीवर चौदाभुवनांच्या चित्राकृतीच स्पष्ट काढल्या आहेत कीं काय, असें वाटतें; ६४. आणि त्या भुवनांतील जे जे लोक तीच अनेक प्रकारची केलेली चित्ररचना आहे, असें तुमचें अलौकिक मोठेपणे दृष्टीस पडत आहे ६५.

**अन्वयार्थ**—**विश्वेश्वर विश्वरूप**–हे विश्वेश्वरा ! हे विश्वरूप कृष्णा !–[ **अहं**–मी ] **त्वां**–तुला–**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्**–अनेक हात, उदरें, तोंडें व नेत्र यांनीं युक्त असलेला असा–**सर्वतः अनन्तरूपं**–सर्व बाजूंनीं अनन्तरूपांनीं युक्त असलेला असा–**पश्यामि**–पहातों–[ **अहं** ]–मी–**तव**–तुझा–**आदिम्**–आरंभ–**न पश्यामि**–पहात नाहीं–**मध्यं न**–[ **पश्यामि** ]–मध्य पहात नाहीं–**पुनः**–आणि पुनः–**अन्तं न**–[ **पश्यामि** ]–तुझा अंत पाहात नाहीं १६.

तुम्ही दिलेल्या त्या दिव्य चक्षूंच्या बळानें मी चहूंकडे पाहूं लागलों, तों तुमच्या बाहुदंडाचे ठिकाणीं आकाशाचे जणुं कोंबच आले आहेत कीं काय, असें वाटलें; ६६. त्याचप्रमाणें देवा, एकव्या तुमच्याच हातांनीं एकाच वेळीं सर्व व्यापार निरंतर होत आहेत, असें दृष्टीस पडत आहे ६७.

१ राज्य प्राप्त झालें. २ उच्छ्वास टाकून, उसासा टाकून. ३ भोंवतालीं नजर टाकली, पाहूं लागला. ४ सामान्य. ५ संतोष. ६ सहज. ७ अंगावर, समागमें, संबंधानें. ८ समुदाय, कळप. ९ अनेक. १० डेऱ्यांत, पोटांत. ११ समुदाय. १२ घरटीं. १३ देवांसह. १४ प्राणिसमुदाय. १५ ब्रह्मदेव. १६ पार्वतीसह. १७ सर्पांसह. १८ चितारलीं. १९ अलौकिक. २० अगाधपण, मोठेपण. २१ योगानें, बळानें. २२ बाहुदंडांनीं. २३ अंकुर फुटले. २४ अव्यक्त ब्रह्मानें. २५ विस्तारानें.

ब्रह्मकटाहाचीं भांडारें । तैसीं देखतसें अपारें । उदरें तुझीं ॥ ६८ ॥ जी सहस्रशीर्षियाचें देखिलें । कोडीवेरी होताति एकिवेळें । कीं परब्रह्माचि वदनफळें । मोडोनि आलें ॥ ६९ ॥ तैसीं वक्त्रें जेउतीं तेउतीं । तुझीं देखतसे विश्वमूर्ती । आणि तयाचिपरी नेत्रपंक्ती । अनेका सैंघ ॥ २७० ॥ हें असो स्वर्ग पाताळ । कीं भूमी दिशा अंतराळ । हे विवंक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसें ॥ ७१ ॥ हें तुजवीण एकादियाकडे । परमाणूहि एतुला कोडें । अवकाशु पाहतसें परि न सांपडे । ऐसें व्यापिलें तुवां ॥ ७२ ॥ इये नानापरी अपरिमितें । जेतुलीं सांठविलीं होतीं महाभूतें । तेतुलाही पर्वाडु तुवां अनंतें । कोंदला देखतसें ॥ ७३ ॥ ऐसा कवणें ठायाहूनि तूं आलासी । एथ बैसलासि कीं उभा आहासी । आणि कवणिये मायेचिये पोटीं होतासी । तुझें ठाण केवढें ॥ ७४ ॥ तुझें रूप वय कैसें । तुजपैलीकडे काय असे । तूं काइसयावरी आहासि ऐसें । पाहिलें मियां ॥ ७५ ॥ तंव देखिलें जी आघवेंचि । तरि आतां तुझा ठावो तूंचि । तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि । अनादि'' आयता ॥ ७६ ॥ तूं उभा ना बैठा । दिर्घंडु ना खुंजटा । तुज तळीं वरी वैकुंठा । तूंचि आहासी ॥ ७७ ॥ तूं रूपें आपणयांचि ऐसा । देवा तुझी तूंचि वयसा । पाठी पोट परेशा । तुझें तूं गा ॥ ७८ ॥ किंबहुना आतां । तुझें तूंचि आघवें अनंता । हें पुढत पुढती पाहतां । देखिलें मियां ॥ ७९ ॥ परि या तुझिया रूपाआंतु । जी उणीव एक असे देखतु । जे आदि मध्य अंतु । तिन्ही नाहीं ॥ २८० ॥ एऱ्हवीं गिंवसेलें आघवा ठायीं । परि सोय न लाहेचि कहीं । म्हणौनि त्रिशुद्धि हे नाहीं । तीन्ही एथ ॥ ८१ ॥ एवं आदिमध्यांतरहिता । तूं विश्वेश्वरा अपरिमिता । देखिलासि जी तत्त्वता । विश्वरूपा ॥ ८२ ॥ तुज महामूर्तीचिया आंगीं । उमटलिया पृथक् मूर्ती अनेगी । लेइलासी वानेपरींची आंगीं । ऐसा आवंडतु आहासी ॥ ८३ ॥ नाना पृथक् मूर्ती तिया द्रुमवल्ली । तुझिया स्वरूपमहाचळीं । दिव्यालंकार फुलीं फळीं । सासिन्नलिया ॥ ८४ ॥ हो कां जे महोदधीं तूं देवा । जाहलासि तरंगमूर्ती हेलावा । कीं तूं एक वृक्षु बरवा । मूर्तिफळीं फळलासी ॥ ८५ ॥ जी भूतीं भूतळ मांडिलें । जैसें नक्षत्रीं गगन गुंढलें । तैसें मूर्तिमय भरलें । देखतसें तुझें रूप ॥ ८६ ॥ जी एकेकीच्या अंगप्रांतीं । होय जाय

मग चिदाकाशांत अव्यक्त व निर्विशेष ब्रह्माचे आश्रयावर जशीं कांहीं ब्रह्मांडाचीं भांडारेंच उघडावीत त्याप्रमाणें तुमच्या शरीरावर अपार उदरें दिसत आहेत ६८. महाराज [ आपली हजारो मस्तकें आहेत ! असें श्रुतींत सांगितल्याप्रमाणें असून त्यांस ] कोट्यावधि मुखें हीं जणुं काय परब्रह्मरूपी वृक्ष, वदनरूपी दाट फळांनीं लवून आल्याप्रमाणें दिसत आहेत ६९. त्याचप्रमाणें हे विश्वरूपी परमेश्वरा ! तुमच्या विश्वमूर्तिवर जिकडे तिकडे तोंडें दिसत आहेत व नेत्रांच्याहि अनेक पंक्तीच्या पंक्ति पहात आहे २७०. हे असो; इतकेंच नव्हे, तर स्वर्ग, पाताळ, भूमि, दिशा किंवा हे आकाश असा निर्देश करून बोलण्याची सोय नाहीं, कारण हा सर्व भेद नाहींसा होऊन हें सर्वत्रहि विश्व मूर्तिमय दिसत आहे ७१. तुमच्याशिवाय एखाद्या बाजूसहि परमाणुइतकी तरी जागा सांपडेल म्हणून मी कौतुकानें पहात आहे; पण सांपडतच नाहीं; याप्रमाणें सर्वत्र तुम्हीं व्यापिलें आहे ७२. या नानाप्रकारच्या अपरिमित महाभूतांनीं जें सर्व जग व्यापिलें होतें, तो सर्वहि विस्तार हे अनंता ! तुम्हींच व्यापिला आहे, असें दिसतें ७३. असें एवढे मोठे व्यापक तुम्ही कोठून आलांत, या ठिकाणीं बसले आहांत किंवा उभे आहांत, एवढे स्वरूप कोणत्या आईच्या पोटांत होते, हें कांहीं कळत नाहीं. तुमची केवढी मोठी आकृति आहे ! ७४. तुमचें रूप कसे आहे ? आणि वय किती आहे ? तुमच्या पलिकडे काय आहे व तुम्ही कोणत्या अधिष्ठानावर बसला आहांत, हें जों मी पाहूं लागलों, ७५. तों महाराज ! मी सर्वच विचार करून पाहिलें आणि तुमचें अधिष्ठान तुम्हीच आहांत. तुम्ही कोणाचेंही नाही कोणापासून उत्पन्न झालेलें नाहीं, म्हणून जन्मरहित व असेंच स्वयमेव, नित्यसिद्ध आहां ७६. देवा ! तुम्ही उभे नाहीं किंवा बसलेलें नाहीं, उंच नाहीं, ओणवे नाहीं व ठेंगणेंहि नाहीं, तुमच्या वर व तुमच्या खालींहि तुम्हीच आहां ७७. देवा ! तुमचें रूप कशाप्रमाणें म्हणाल, तर तुमच्यासारखेंच आहे व तुमचें वयहि तुमच्यासारखेंच आहे. हे देवाधिदेवा ! तुमची पाठ व पोट हीहि तुमची तुम्ही आहां; ७८. आतां फार काय सांगावें ! हे अनंता ! मी जों आणखी पाहूं लागलों, तों तुमचें सर्व तुम्हीच आहां असेंच वारंवार विचार करून माझ्या दृष्टीस पडलें ७९. पण तुमच्या विश्वरूपांत मला एकच उणीव दिसत आहे ती ही की, त्याला आदि, मध्य व अंत हीं तिन्ही नाहींत २८०. वास्तविक म्हटलें तर तुमच्या विश्वरूपीं हे मीं सर्व ठिकाणीं शोधून पाहिलें, परंतु मला त्याचा पत्ता लागला नाहीं; म्हणून आदि, मध्य व अंत हीं तिन्ही तुमच्या रूपाला निश्चयेंकरून नाहींतच, यांत संशय नाहीं ८१. हे आदिमध्यांतरहिता ! हे अपरिमिता जगदीशा ! खरोखरच मी याप्रमाणें तुमचें विश्वरूप पाहिलें ८२. तुमच्या विश्वरूपात्मक शरीरावर अनेक निरनिराळ्या मूर्ति उमटलेल्या आहेत. त्यामुळें तुमच्या अंगांत जणुं नानाप्रकारच्या रंगांचा आंगरखाच घातला आहे, असे तुम्ही दिसतां आहां ८३. तुमच्या विश्वरूपी महान् पर्वतावर ज्या अशा तऱ्हेतऱ्हेच्या निरनिराळ्या मूर्ति आहेत, त्या जणुं वृक्ष व वेली याप्रमाणें शोभत असून मूर्तीवरचे जे दिव्य अलंकार आहेत, तेच जणुं फुलें व फळें भरास आलें आहेत ८४. हे देवा ! तुम्हीं महासमुद्र असून मूर्तिरूप लाटांनीं उसळलेले दिसतां किंवा तुम्ही एक उत्तम वृक्ष असून मूर्तिरूप फळांनीं भरास आलेलें दिसतां ८५. पृथ्वी जशी भूतांनीं भरलेली आहे, किंवा आकाश जसें नक्षत्रांनीं व्यापिलेलें आहे, तसेंच तुमचें विश्वरूप मूर्तीनीं भरलेलें आहे, असें मी पाहतों ८६. ज्या एकेका मूर्तीच्या अंगावर हे त्रैलोक्य उत्पन्न होतें आहे व लय पावत

१ ब्रह्मांडाचीं. २ कोट्यावधि. ३ भरभराट्रन आलें. ४ पुष्कळ. ५ बोली, विचार. ६ एवढा. ७ जागा. ८ विस्तार. ९ व्यापिला. १० स्थान, आकृति. ११ ज्याचा आदि [ मूळ प्रारंभ ] कळत नाहीं असा स्वयंभू. १२ उंच. १३ ठेंगणा. १४ देवा. १५ देवाधिदेवा. १६ सर्व ठिकाणीं शोधिलें. १७ पत्ता लागत नाहीं. १८ निःसंशय. १९ अनेक प्रकारच्या रंगांची. २० वाटतो आहेस. २१ रूपें. २२ वृक्ष व वेली. २३ पसरल्या, भरास आल्या. २४ मनुष्यांनीं. २५ पृथ्वी. २६ आच्छादिलें, व्यापिलें. २७ अंगप्रदेशांत, अंगासभोंवतीं.

हें त्रिजगती । एवढियाही तुझ्या आंगीं मूर्ती । कीं रोमा जालिया ॥ ८७ ॥ ऐसा पवाडु मांडूनि विश्वाचा । तूं कवण पां एथ कोणाचा । हें पाहिलें तंव आमुचा । सारथी तोचि तूं ॥ ८८ ॥ तरी मज पाहतां मुकुंदा । तूं ऐसाचि व्यापकु सर्वदा । मग भक्तानुग्रहें तया मुग्धा । रूपातें धरिसी ॥ ८९ ॥ कैसें चहूं भुजांचें सांवळें । पाहतां वोल्हावती मन डोळे । खेंवं देऊं जाइजे तरी आंकळे । दोहींचि बाहीं ॥ २९० ॥ ऐसी मूर्ति कोडिसवाणी कृपा । करूनि होसी ना विश्वरूपा । कीं आमुचियाचि दिठी संलेपा । जें सामान्यत्वें देखिती ॥ ९१ ॥ तरी आतां दिठीचा विटाळु गेला । तुवां सहजें दिव्यचक्षू केला । म्हणौनि यथारूपें देखवला । महिमा तुझा ॥ ९२ ॥ परी मकरतुंडामागिलेकडे । तोचि होतासि तूं एवढें । रूप जाहलासि हें फुडें । वोळखिलें मियां ॥ ९३ ॥

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

नोहे तोचि हा शिरीं ? । मुकुट लेइलासी श्रीहरी । परी आतांचें तेज आणि थोरी । नवल कीं बहु हें ॥ ९४ ॥ तेंचि हें वरिलियेचि हातीं । चक्र परिजितैया आयती । सांवरितासि विश्वमूर्ती । ते न मोडे खूण ॥ ९५ ॥ येरीकडे तेचि हे नोहे गदा । आणि तळिलिया दोनी भुजा निरायुधा । वेगोरे सांवरावया गोविंदा । संसरिलिया ॥ ९६ ॥ आणि तेणेंचि वेगें सहसा । माझिया मनोरथासरिसा । जाहलासि विश्वरूपा विश्वेशा । म्हणौनि जाणें ॥ ९७ ॥ परी कायसें बा हें चोजें । विस्मयो करावयाहि पाँडू नाहीं मज । चित्त होऊनि जातसें निर्बुजें । आश्चर्यें येणें ॥९८॥ हें एथ आथि कां येथ नाहीं । ऐसें श्वसोंही नये कांहीं । नवल अंगप्रभेची नवाई । कैसी कोंदली सैंघ ॥ ९९ ॥ एथ अग्नीचीही दिठी करपत । सूर्य खद्योतु तैसा हारपत । ऐसें तीव्रपण अद्भुत । तेजाचें यया ॥३००॥ हो कां महातेजाचिया महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टी आघवी । कीं युगांतविजूंच्या पौळवीं । झांकलें गगन ॥ १ ॥ ना तरी संहारतेजाचिया ज्वाळा । तोडोनि मांचू बांधला अंतराळां । आतां दिव्य ज्ञानाचिया डोळां । पाहवेना ॥ २ ॥ उजाळु अधिकाधिक बहुवसु । धडाडीत आहे अतिदाहसु । पडत दिव्यचक्षूंसही त्रासु । न्याहाळितां ॥ ३ ॥ हो कां जे महाप्रळयींचा भडाडु । होता काळाग्निरुद्राचिया ठायीं गूढु । तो

पावत आहे, तेवढाल्या प्रचंड मूर्ति तुमच्या अंगावरील एका रोमाच्या ठिकाणीं झाल्या आहेत ८७. असा या जगाचा विस्तार करणारे जे तुम्ही, ते तुम्ही कोण? व कोणाचे? हें जों मी विचार करून पाहूं लागलों, तों आमचे जे सारथी तेच तुम्ही आहां ८८. तर हे मुकुंदा! तुम्ही सर्वदा असेंच सर्वव्यापक स्वरूपाचे आहां, परंतु भक्तांवर अनुग्रह करण्याकरितांच सुंदर सगुण रूप धारण करितां, असें मला विचारांतीं वाटतें ८९. तुमची चतुर्भुज सांवळी सुंदर मूर्ति पाहिल्यावर मन व डोळे कसें तृप्त होतात, तिला आलिंगन देऊं लागलें तर ती दोन्ही हातांतहि कवटाळून धरतां येते! २९०. हे विश्वरूप धारण करणाऱ्या देवा! असें गोजिरवाणें रूप तुम्ही भक्तांवर कृपा करण्याकरितां घेत नाहीं कां? तर घेतां; पण आमच्याच दृष्टि दूषित आहेत. त्यामुळें तें तुमचें सगुण रूप सामान्य मनुष्याप्रमाणें आम्ही पाहतों ९१. तर आतां तुम्ही सहज दिव्यचक्षु दिल्यामुळें माझ्या दृष्टीचा तो दोष नाहींसा झाला व मला तुमचा महिमा जसा आहे तसा यथार्थ दृष्टीस पडला ९२. परंतु रथाच्या मकरतुंड असलेल्या जुंवाच्या मागल्या बाजूला जे तुम्ही बसलां होतां तेच तुम्ही एवढें विश्वरूप धारण केलें आहे, असें मी आतां पक्कें ओळखलें ९३.

**अन्वयार्थ**—[ **अहं**–मी ]– **त्वां** –तुला– **किरीटिनं**– ज्याच्या मस्तकावर किरीट आहे असा–**गदिनं**–ज्याच्या हातांत गदा आहे असा–**च**–व–**चक्रिणं**–ज्याच्या हातांत चक्र आहे असा–**तेजोराशिं**–तेजःपुंज–**सर्वतः दीप्तिमन्तं**–सर्व बाजूंनी दीप्तिमान्-प्रकाशमान् त्यामुळें–**समंतात् दुर्निरीक्ष्यं**–सर्व बाजूंनीं ज्याच्याकडे पाहतां येत नाहीं असा–**दीप्तानलार्कद्युतिं**–प्रदीप्त अग्नि व सूर्य याप्रमाणें द्युति म्ह० कांति आहे असा व–**अप्रमेयम्**–कोणत्याहि प्रमाणाचा विषय न होणारा, असा–**पश्यामि**–पहातों १७.

हे श्रीहरी! तुम्ही जो डोक्यावर मुकुट धारण केला होतां, तोच हा नव्हे काय? पण हल्लींचें त्याचें तेज व आकार विशेष आहे, हेंच मोठें आश्चर्य आहे ९४. वरच्या हातांत असलेलें तेच हे चक्र नव्हे काय? कारण हे विश्वमूर्ते, ते चक्र फिरविण्याच्या तयारीनें तुम्ही सांवरून हातांत धरीत आहां. ही खूण कांहीं नाहींशी झाली नाहीं ९५. दुसऱ्या हातांत असलेली तीच ही गदा नव्हे काय? हे गोविंदा! खालचे दोन हात निःशस्त्र असून तेहि घोड्याचे लगाम सांवरून धरण्याकरितां सरसावले नाहींत काय? ९६. आणि त्याच आवेशानें हे विश्वेशा! माझी विश्वरूप पाहण्याची इच्छा मी प्रदर्शित केल्याबरोबर ती पूर्ण करण्याच्या हेतूनेंच तुम्ही हें एकदम विश्वरूप धारण केलें, हें मी जाणतों आहें ९७. परंतु देवा! हे नवल कसले आहे, ह्या तुमच्या रूपाचें आश्चर्य मानण्याचीहि माझी योग्यता राहिली नाहीं; कारण, या आश्चर्यानें माझें मन थक्क होऊन गोंधळून गेलें आहे मग यांत नवल तें काय? ९८. हें तुमचें विश्वरूप येथें आहे किंवा नाहीं, असा विचार करण्यासहि अवकाश नाहीं. त्या रूपाच्या तेजाचा चमत्कार असा कांहीं आश्चर्यकारक आहे कीं, तें सर्वत्र घनदाट भरलेलें दिसतें [ त्या रूपाच्या तेजानें मी इतका भांबावून गेलो आहे कीं, नुसता श्वासहि घेता येत नाहीं. इतकेंच काय तुमचे हें विश्वरूप मीं पाहात आहे कीं नाहीं हेंच मला कळत नाहीं अशी ती अंगप्रभा घनदाट भरली आहे, हे आश्चर्य होय ] ९९. या विश्वरूपाच्या तेजाची अशीं अलौकिक तीव्र प्रखरता आहे कीं, त्यापुढें अग्नीचीहि दृष्टि करपून जाते व सूर्यहि या तेजांत काजव्याप्रमाणें दिपून जातो! ३००. असें वाटतें कीं, जणुं सर्व सृष्टि या महातेजाच्या मोठ्या समुद्रांत बुडून गेली आहे; किंवा कल्पांतीच्या वेळेच्या विजेच्या पदरांनी सर्व आकाश झांकून टाकलें आहे कीं काय? १. अथवा प्रळयकाळच्या तेजाच्या ज्वाला तोडून त्यांचा अंतराळीं उंच मेढीवर जणुं काय माळच म्ह. मांडवच बांधला आहे; त्यामुळें माझ्या दिव्य दृष्टीनेंहि त्याजकडे पाहावत नाहीं २. तें तेज अधिकाधिक प्रखर होऊन शरीरास अति दाहक होत आहे; म्हणून त्याजकडे पाहून माझ्या दिव्य चक्षूंलाहि त्रास होत आहे ३. अहो महाराज! महाप्रळयकाळच, अग्नीचा जो भडभडाट काळाग्नि रुद्राच्या ठिकाणीं गुप्त होता तो प्रलयरुद्राच्या तृतीय नेत्राची

१ त्रैलोक्य. २ केसांत झाल्या, त्या मूर्तीच रोम झाल्या. ३ विस्तार. ४ गोजिरवाणें, सगुण. ५ निवतात. ६ अलिंगन. ७ सांपडे. ८ सुंदर, गोजिरवाणी. ९ मलिन, दुषित. १० साधारणानें, सामान्य–साधारण मनुष्याप्रमाणें. ११ यथार्थ. १२ मगराच्या तोंडाच्या जुंवाच्या मागच्या बाजूला. १३ खरें, पक्कें, स्पष्ट. १४ फेंकण्याची तयारी. १५ घोड्यांचे वाग्दोरे, लगाम. १६ सरसावल्या, पुढें केल्या. १७ नवल, कौतुक. १८ योग्यता. १९ थक्क, मोहित. २० विचार करण्यास अवकाश. २१ चमत्कार. २२ व्यापलेली, भरलेली. २३ बहुत, सर्वत्र. २४ काजव्याप्रमाणें. २५ पदरांनीं. २६ माळा, अंतराळीं, उंच मेढीवर बांधलेले घर. २७ भडकत. २८ अत्यंत दाहक, डोळे दिपविणारा·

तृतीयनयनाचा मुद्र । फुटला जैसा ॥ ४ ॥ तैसें पसरलेनि प्रकाशें । सैंघ पांचवनिया ज्वाळांचे वळसे । पडतां ब्रह्मकटाह कोळिसे । होत आहाती ॥ ५ ॥ ऐसा अद्भुत तेजोराशी । जन्मा नवल म्यां देखिलासी । नाहीं व्याप्ति आणि कांतीसी । पारु जी तुझिये ॥ ६ ॥

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ॥
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

देवा तूं अक्षरें । औटांविये मात्रेसि पर । श्रुती जयाचें घर । गिंवसीत आहाती ॥ ७ ॥ जें आकाराचें आयतन । जें विश्वनिक्षेपैकनिधान । तें अव्यय तूं गहन । अविनाश जी ॥ ८ ॥ तूं धर्माचा वोलावा । अनादिसिद्ध तूं नित्य नवा । जाणें मी सदतिसांवा । पुरुष विशेष तूं ॥ ९ ॥

अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥ १९ ॥

तूं आदिमध्यांतरहितु । स्वसामर्थ्यें तूं अनंतु । विश्वबाहु अपरिमितु । विश्वचरण तूं ॥ ३१० ॥ पैं चंद्र चंडांशु डोळां । दावितासि कोपप्रसाद लीळा । एकां रुंससी तमाचिया डोळां । एकां पाळितोसि कृपादृष्टी ॥ ११ ॥ जी एवंविधा तूंतें । मी देखतसें हें निरुतें । पेटलें प्रळयाग्नीचें उंजितें । तैसें वक्त्र हें तुझें ॥ १२ ॥ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उंभड उठत । तैसी चाटीत दाढा दांत । जीभ लोळे ॥ १३ ॥ इये वदनींचिया उंबा । आणि जी सर्वांगकांतीचिया प्रभा । विश्व तेंतलें अति क्षोभा । जात आहे ॥ १४ ॥

द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

कां जे द्यौलोकें आणि पाताळ । पृथिवी आणि अंतराळें । अथवा दशदिशा समाकुळ । दिशाचक्र ॥ १५ ॥ हें आघवेंचि तुवां एकें । भरलें देखत आहे कौतुकें । परि गगनाहीसकट भयानकें । आप्लविजे जेवीं ॥१६॥ ना तरी अद्भुत रसाचिया कल्लोळीं । जाहली चवदाही भवनांसि कडियाळीं । तैसें आश्चर्यचि मग मी आकळीं । काय एक ? ॥ १७ ॥ नावरे व्याप्ती हे असाधारण । न साहवे रूपाचें उग्रपण । सुख दुरी गेलें परि प्राण । विपायें धरिजे ॥ १८ ॥ देवा ऐसें

जणुं कळीच उमलली आहे असें भासतें ४. तसेंच तुमच्या पसरलेल्या विश्वरूपाच्या तेजामुळें पंचाग्नीच्या ज्वाळांचें वेढे जिकडे तिकडे पडत असतां जळून ब्रह्मकटाहाचें कोळसे होत आहेत असे दिसतें ५. ज्या तुमच्या या विश्वरूपाच्या व्याप्तीला व तेजाला सीमा नाहीं, असें हें अद्भुत तेजाची जणुं रासच असलेले नवलाचें रूप मी यावज्जन्मांत आजच पाहिलें ६.

**अन्वयार्थ**—**त्वं**–तूं–**परमम् अक्षरं**–परब्रह्म आहेस असें–**वेदितव्यं**–जाणावें—**त्वं**–तूं–**अस्य विश्वस्य**–या जगाचें–**परं निधानं**–परम आश्रयस्थान आहेस–**त्वं**–तूं–**अव्ययः**–क्षय न पावणारा आहेस–**शाश्वतधर्मगोप्ता**–शाश्वत धर्मांचें रक्षण करणारा आहेस–**त्वं**–तूं–**सनातनः पुरुषः**–चिरंतन पुरुष आहेस असा तूं–**मे**–मला–**मतः**–मान्य झालेला आहेस १८.

देवा! तुम्ही परब्रह्म असून साडेतीन मात्रांचा जो ॐकार, त्याच्याहि पलीकडील आहांत व तुमचें स्थान श्रुति शोधीत आहेत त्यांस सांपडत नाहीं ७. तुम्ही त्रैलोक्याकाराचे वसतिस्थान व तुम्हीं विश्वाचे एकमेव लयस्थान असून गहन, अव्यय आणि अविनाशी असे आहांत ८. तुम्ही धर्माचें जीवन आहांत अनादिसिद्ध असूनहि नित्य नवे आहांत व छत्तीस तत्त्वांच्याहि पलीकडील सदतिसावें अलौकिक पुरुष म्हणजे या जगाचें स्वामी आहां, असें मी जाणतों ९.

**अन्वयार्थ**–**त्वां**–तुला मी–**अनादिमध्यान्तम्**–आदिमध्य अन्तरहित–**अनन्तवीर्यं**–ज्याचें वीर्य अन्तरहित अनन्त आहे–**अनन्तबाहुं**–ज्याचे बाहु अनन्त आहेत–**शशिसूर्यनेत्रं**–चंद्र व सूर्य हें ज्याचे नेत्र आहेत—**दीप्तहुताशवक्त्रं**–प्रदीप्त अग्नि हेंच ज्याचें मुख आहे, व–**स्वतेजसा इदं विश्वम्**–आपल्या तेजानें ह्या विश्वाला–**तपन्तं**–ताप देणारा असा–**पश्यामि**–पाहतों १९.

तुम्ही आदिमध्यांतरहित असून स्वतःच्या पराक्रमानें अपार आहांत तुम्हाला चहूं बाजूंनीं असंख्य हात व पाय आहेत ३१०. चंद्र व सूर्य हे तुमचें डोळे असून त्यांचेद्वारां कोपाच्या व कृपाप्रसादाच्या लीला दाखवीत आहांत तुम्ही तमोरूप कोप कटाक्षानें एकाला रागावून शासन करतां व कृपारूप नेत्र कटाक्षानें एकाचा सांभाळ करतां ११. महाराज! खरोखर अशा अनेक प्रकारांनीं मी तुम्हाला पहात आहे. ज्याप्रमाणें प्रळयाग्नि पेटल्यावर चहूंकडे उजेड पडतो, त्याप्रमाणें हे तुमचें तोंड अति तेजस्वी दिसत आहे १२. वणव्यानें चोहोकडून पर्वत पेटल्यावर ज्याप्रमाणें ज्वालांचा भडका उठून पर्वतावरील सर्व पदार्थ पेटून जळून जातात त्याप्रमाणें तुमची जीभ, दांत व दाढा चाटीत लोळत आहे, अशी दिसते १३. तुमच्या तोंडातील अग्नीच्या उष्णतेनें आणि तुमच्या विश्वरूपाच्या सर्वांग तेजानें संतप्त झालेलें सर्व विश्व अतिशय भांबावून गेलें आहे, असें दिसतें १४.

**अन्वयार्थ**—**त्वया एकेन**–तूं एकट्यानें–**द्यावापृथिव्योः इदम् अन्तरं हि**–आकाश व पृथ्वी यांच्यामधील हें अंतर–**व्याप्त**–व्यापिलें आहेस–**च**–व–**सर्वाः दिशः**–सर्व दिशा–[**व्याप्ताः**–व्यापिल्या आहेस]–**महात्मन्**–हे महात्म्या! –**तव**–तुझें–**इदम् अद्भुतम् उग्रं रूपं**–हें अद्भुत उग्र रूप–**दृष्ट्वा**–पाहून –**लोकत्रयं**–त्रिभुवन –**प्रव्यथितं**–व्यथित–भयभीत झालें आहे २०.

किंवा स्वर्ग पाताळ, पृथ्वी आणि अंतरिक्ष तशाच दहा दिशा व सर्वदिशाचक्र, क्षीतिज १५. हें सर्व तुमच्या एका विश्वरूपानें व्यापून गेलेले आहे, असें कौतुकानें मी पहातो आहें. परंतु आकाशासकट तुमच्या भेसूर रूपांत जणुं काय सर्व जग बुडत आहे असें म्हणा १६. किंवा तुमच्या अद्भुत रूपाच्या रसाच्या लाटांनीं घातलेल्या वेढ्यांत चौदाहि भुवनें सांपडलीं आहेत असें म्हणा इतकें तुमचे रूप आश्चर्यकारक आहे, मग मी एकट्यानें कशा कशाचे आकलन करावें? १७. तुमच्या विश्वरूपाची व्याप्ति असामान्य असल्यामुळें त्याचे आकलन होत नाहीं, तुमच्या विश्वरूपाचे प्रखर तेज सहन करवत नाहीं व या रूपाच्या उग्रपणामुळें तुमच्या दर्शनापासून जगाला सुख प्राप्त होण्याचें एकीकडेच राहून गेलें, उलट जग मोठ्या कष्टानें प्राण धरून राहिले आहे १८. देवा! असें तुमचें अद्भुत रूप पाहून मला भीतीचें

१ कलिका, कळी. २ फुलला, उमलला. ३ पंचाग्नि—प्रलयानल, विद्युन्नल, वडवानल व द्वादशादित्यानल. ४ वेढे. ५ ब्रह्मांड. ६ अविनाशी, नाशरहित, अभंग. ७ साडेतीन मात्रांच्या (ओंकाराच्या) पलीकडे. ८ शोधितात. ९ घर, स्थान. १० जग सांठविण्याचें. स्थान–जागा, विश्व ठेवण्याची एक जागा. ११ छत्तीस तत्वांच्या पलीकडचा, सदतिसावा पुरुष. १२ सूर्य. १३ शासन करितोस. १४ या प्रकारांनीं. १५ खरें, खरोखर. १६ लखलखाट उजेड. १७ उमाळे. १८ उबाऱ्यानें. १९ पोळलेलें, तापलेले. २० नाशास. २१ स्वर्ग. २२ अंतरिक्ष. २३ सर्व, सगळें. २४ भेसुररूप. २५ बुडवावें. २६ लाटांत. २७ वेष्टन, माळ, जाळी. २८ पाहातो. २९ कष्टानें.

देखोनि तूंतें । नेणों कैसें आलें भयाचें भरितें । आतां दुःखकल्लोळीं झंळंबतें । तिन्हीं भुवनें ॥ १९ ॥ एऱ्हवीं तुज महात्मयाचें देखणें । तरि भयदुःखासि कां मेळवणें ? । परि हें सुख नव्हेचि जेणें गुणें । तें जाणवतें आहे मज ॥३२०॥ जंव तुझें रूप नोहे दिठें । तंव जगासि संसारिकं गोमटें । आतां देखिलासि तरी विषयविटें । उपनला त्रासु ॥ २१ ॥ तेवींचि तुज देखिलियासाठीं । काय सहसा तुज देवों येईल मिठी । आणि नेदीं तरी शोकसंकटीं । राहों केवीं ? ॥ २२ ॥ म्हणौनि मागां सरों तंव संसारु । आडवीत येतसे अनिवारु । आणि पुढां तूं तंव अनावरु । न येसि घेवों ॥ २३ ॥ ऐसा मांझारलिया सांकडां । बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडां । ऐसा हा ध्वनि जी फुंडा । चोजवला मज ॥ २४ ॥ जैसा आंरंबळला आगीं । तो समुद्रा ये निवावयालागीं । तंव कल्लोळपाणियाचिया तरंगीं । आगळौं बिहे ॥ २५ ॥ तैसें या जगासि जाहलें । तूंतें देखोनि तळमळित ठेलें । यामाजीं पैलें भले । ज्ञानशूरांचे मेळावे ॥ २६ ॥

अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवन्ति त्वाम् स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥

हे तुझेनि आंगिकें तेजें । जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें । मिळत तुज आंतु सहजें । सद्भावेंसीं ॥ २७ ॥ आणिक एक सावियांचि भयभीरु । सर्वस्वें धरूनि तुझी मोहरु । तुज प्रार्थिताति करु । जोडोनियां ॥ २८ ॥ देवा अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवांगुरें आंतुडलों । स्वर्गसंसाराचिया सांकडलों । दोहीं भागीं ॥ २९ ॥ ऐसें आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें ? । तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणत देवा ॥ ३३० ॥ आणि महर्षी अथवा सिद्ध । विद्याधरसमूह विविध । हे बोलत तुज स्वस्तिवाद । करिती स्तवन ॥ ३१ ॥

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

हे रुद्रादित्यांचे मेळावे । वसु हन साध्य आघवे । अश्विनौ देव विश्वेदेव विभवें । वायुही हे जी ॥३२॥ अवधारा पितर हन गंधर्व । पैल यक्षरक्षोगण सर्व । जी महेंद्र-मुख्य देव । कां सिद्धादिक ॥ ३३ ॥ हे आघवेचि आपुलालिया लोकीं । सोत्कंठित अवलोकीं । हे महामूर्ती दैविकी । पाहात आहाती ॥ ३४ ॥ मग पाहात पाहात

भरतें कसें आलें हें समजत नाहीं. कारण त्या भीतीनें आतां दुःखाच्या लाटांत हे सर्व त्रैलोक्य गटांगळ्या खात बुडत आहे १९. सहज खरे विचार करून पाहतां, तुम्हा महात्म्यांच्या दर्शनापासून जगाला भय व दुःख यांची कां प्राप्ति व्हावी ? परंतु ज्या कारणामुळें या तुमच्या विश्वरूप दर्शनापासून कोणालाहि सुख होणारच नाहीं ते कारण मला कळून आले आहे ३२०. जोंपर्यंत तुमचें रूप दृष्टीस पडलें नव्हतें, तोंपर्यंत जगाला संसारसुखच उत्तम वाटत होतें; परंतु तुमचें रूप पाहिल्यामुळें विषयांचा वीट आला आहे, त्यामुळें विषयांचा कंटाळा उत्पन्न झाला २१. तसेंच तुमच्या ह्या भयंकर रूपास पाहून त्याला एकाएकीं प्रेमानें मिठी मारतां येईल काय ? बरें ! मिठी न मारली तर ह्या तुमच्या भयंकर विश्वरूपदर्शनाच्या दुःखांत कसें राहावें ? हीहि अडचणच २२. म्हणून आलिंगन न देतां मागें सरावें तर हा अनिवार जन्ममरण-रूप संसार प्रतिबंध करतो [ दुःख देतो ] आणि पुढें सरावें तर हें प्रचंड विश्वरूप धारण केल्यामुळें तुम्हांला आलिंगन देतां येत नाहीं, आकळतां येत नाहीं २३. अशा रीतीनें मधल्यामधें दोन संकटाच्या कचाटींत सांपडून बिचाऱ्या त्रैलोक्याचा होरपळा होत आहे, अशी तुमचे विश्वरूप पाहण्याची माझी हौस होती खरी; परंतु तिचा परिणाम आज भीति उत्पन्न होण्यांत झाला. असा माझा निश्चय झाला आहे २४. जसा एखादा मनुष्य अग्नीत पोळल्यामुळें आपला दाह शमन होण्या-करितां समुद्राकडे धांव घेतो, तो समुद्राच्या लाटा खवळ-लेल्या पाहून त्याला जास्तच भीति वाटते २५.

**अन्वयार्थ**—**अमी हि सुरसंघाः**–हे भूलोकीं अवतीर्ण झालेलें देवांचे संघ–**त्वां** --तुला–तुझ्यामध्यें–**विशन्ति**–प्रवेश करीत आहेत–**केचित् भीताः**–त्यांतील कांहीं भ्यालेले–**प्राञ्जलयः**–हात जोडलेलें असे होऊन–हात जोडून–**गृणन्ति**–तुझी स्तुति करितात–**महर्षिसिद्धसंघाः**–मोठमोठे ऋषि व सिद्ध यांचें संघ–**स्वस्ति इति उक्त्वा**–'स्वस्ति असो' असें बोलून–**त्वां**–तुला–**पुष्कलाभिः स्तुतिभिः**–पुष्कळ स्तुतींनीं–**स्तुवन्ति**-स्तवीत आहेत २१.

त्याप्रमाणें या जगाची स्थिति झाली आहे. तुम्हांला पाहून ते तळमळत राहिले आहेत. आतां त्या पलिकडे गेलेल्या चांगल्या ज्ञानसंपन्न पुरुषांच्या समुदायाची काय स्थिति झाली आहे पहा २६. तुमच्या अंगच्या तेजानें हे [ ज्ञानी ] पुरुष सर्व कर्मांची बीजें [ अज्ञान–राग-द्वेषादि ] जाळून सद्भावानें सहजच तुमच्या स्वरूपाशी ऐक्यतेनें मिळत आहेत २७. आणखी कांहीं तर सहजच तुमच्या रूपास पाहून भयभीत झालेलें आहेत; तथापि तुमच्याच ठिकाणीं सर्वस्व विश्वास ठेवून तुमच्यासमोर उभे राहून हात जोडून तुमची प्रार्थना करीत आहेत. ती अशी कीं, २८. देवा, आम्ही अज्ञानसमुद्रांत पडलो आहोंत व महाराज ! विषयांच्या जाळ्यांत आम्ही गुंतलों आहोंत व स्वर्ग आणि संसार या दोहोंच्या कचाट्यांत सांपडलों आहोत २९. अशा आमची या संकटांतून सोडवून तुमच्यावांचून कोण मुक्तता करील ? म्हणून देवा आम्ही सर्वभावानें तुला शरण आलों आहोंत. असें म्हणत आहेत; तें पहा ! ३३०. आणखी कश्यपादि महर्षि, कपिलादि सिद्ध व विद्याधर आदिकरून गंधर्वांचे मेळे हे "तुमचा जयजयकार असो" असें कल्याणकारक बोलत असून तुमची स्तुति–प्रार्थना करीत आहेत ३१.

**अन्वयार्थ**—**रुद्रादित्याः**–अकरा रुद्र व बारा आदित्य **वसवः**–आठ वसु–**ये च साध्याः**–व हे साध्य–**विश्वे**–विश्वेदेव–**अश्विनौ**–अश्विनीकुमार–**मरुतः**–मरुद्गण–**च**–व **ऊष्मपाः**-पितर–**च**–व–**गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघाः**-गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध–यांचें संघ–**सर्वे**–हे सर्व–**विस्मिताः च एव**–विस्मित होऊनच–**त्वां**–तुला–**वीक्षन्ते**–पाहतात २२.

हे अकरा रुद्र, बारा आदित्य यांचे समुदाय, आठ वसु, व साध्य संज्ञक–देव हे सर्व अश्विनीकुमार, आपल्या वैभवानें युक्त विश्वेदेव आणि वायुदेवता देखील हे महाराज! ३२. ऐका, तसेंच पितर, गंधर्व, पलिकडे असलेलें यक्ष व सर्व राक्षसगण, इंद्रादिक मुख्य मुख्य देव व सिद्ध आदि करून ३३. हे सर्व आपापल्या लोकांतून मोठ्या उत्कं-ठेनें तुमचें दिव्य विश्वरूप पाहात आहेत, ते पहा ३४.

---

१ बुडतात, विरघळतात. २ भासतें. ३ दृष्टिगोचर. ४ सांसारिक सुख. ५ जन्ममरण. ६ मधल्या कचाटींत, दोन संकटांमध्यें. ७ भाजणी, होरपळणी. ८ संक्षेप, मुग्धार्थ. ९ स्पष्ट. १० वाटला. ११ पोळला. १२ उसळणाऱ्या पाण्याच्या लाटांनीं. १३ जास्ती भितो. १४ पलीकडे. १५ समुदाय.

१६ आंगच्या. १७ सहजच. १८ भयभीत. १९ मार्ग, बाजू, दिशा. २० अज्ञानसमुद्रांत. २१ विषयरूपी जाळ्यांत. २२ सांपडलों. २३ पेंचांत पडलों. २४ कल्याणकारक भाषण. २५ स्तुति. २६ वैभवानें. २७ राक्षस. २८ इंद्र ज्यांत प्रमुख आहे असे. २९ प्रभूची महामूर्ति.

प्रतिक्षणीं । विस्मित होऊनि अंतःकरणीं । करित निजमुकुटीं वोवाळणी । प्रभुजी तुज ॥ ३५ ॥ ते जयजय घोष कलरवें । स्वर्ग गाजविताती आघवे । ठेवित ललाटावरी बरवे । करसंपुट ॥ ३६ ॥ तिये विनयद्रुमाचिये आरवीं । सुरवाडली सात्त्विकांची माधवी । म्हणौनि करसंपुटपल्लवीं । तूं होतासि फळ ॥ ३७ ॥

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥ २३ ॥

जी लोचनां भाग्य उदेलें । मना सुखाचें सुयाणें पांहलें । जे अगाध तुझें देखिलें । विश्वरूप इहीं ॥ ३८ ॥ हें लोकत्रयव्यापक रूपडें । पाहतां देवांही वचक पडे । याचें सन्मुखपण जोडे । भलतयाकडुनी ॥ ३९ ॥ ऐसें एकचि परी विचित्रें । आणि भयानकें वक्त्रें । बहुलोचन हे सशस्त्रें । अनंतभुजा ॥ ३४० ॥ अनंत चौरु बाहु चरण । बहूदर आणि नानावर्ण । कैसें प्रतिवदनीं मातलेपण । आवेशाचें ॥ ४१ ॥ हो कां महाकल्पाचिया अंतीं । तवकेंलेनि यमें जेउततेउतीं । प्रळयाग्नीचीं उजितीं । आंबुखिलीं जैसीं ॥ ४२ ॥ ना तरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें । कीं प्रळयभैरवाचीं क्षेत्रें । नाना युगांतशक्तीचीं पात्रें । भूतखिचा वोढविलीं ॥ ४३ ॥ तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न समाती दरीमाजीं सिंव्हाडे । तैसे दशन दिसती रागीट ॥ ४४ ॥ जैसें काळरात्रीचेनि अंधारें । उल्हासत निघतीं संहारखेचरें । तैसिया वदनीं प्रळयरुधिरें । कांटलिया दाढा ॥ ४५ ॥ हें असो काळें अवंतिलें रण । कां सर्व संहारें मातलें मरण । तैसें अतिभिंगुळवाणेंपण । वदनीं तुझिये ॥ ४६ ॥ हे बापुडी लोकसृष्टी । मोटकीये विपाइली दिठी । आणि दुःखकालिंदीचिया तटीं । झाड होऊनि ठेली ॥ ४७ ॥ तुज महामृत्यूचिया सागरीं । आतां हे त्रैलोक्य जीविताची तरी । शोकदुर्वातलहरी । आंदोळत असे ॥ ४८ ॥ एथ कोपोनि जरी वैकुंठें । ऐसें हन म्हणिपैल अवचटें । जे तुज लोकांचें काई वाटे ? । तूं ध्यानसुख हें भोगीं ॥ ४९ ॥ तरी जी लोकांचें कीर साधारण । वायां आड सूतसे वोडण । केवीं सहसा म्हणे प्राण । माझेचि कांपती ॥ ३५० ॥ ज्या मज संहाररुद्र वासिपे । ज्या मजभेणें मृत्यु लपे । तो मी एथें अहाळबाहळीं कांपें । ऐसें तुवां केलें ॥ ५१ ॥ परि नवल बापा हे महामारी । इया नाम विश्वरूप जरी । हे भ्यासुरपणें हारी । भयासि आणी ॥ ५२ ॥

मग प्रभो! तुम्हांला पाहतां पाहतां क्षणोक्षणीं मनांत आश्चर्यचकित होऊन तुमच्यापुढें आपलीं मस्तकें लववून मुगुटानें ओवाळींत आहेत ३५. ते सर्व 'जयजय' अशा मंजुळ घोषाच्या शब्दानें व संपूर्ण स्वर्ग तुमच्या गजरानें दुमदुमून सोडला आहे व आपले चांगले जोडलेलें हात मस्तकावर ठेवून तुम्हांस नमस्कार करीत आहेत ३६. त्या देवांच्या नम्रतारूपी वृक्षांच्या बागेंत अष्टसात्त्विक भावरूप वसंतऋतु प्राप्त होऊन त्या वृक्षास करसंपुटरूपी पालवी फुटून तुमची प्राप्ति त्यांना 'फल' स्थानीं झाली ३७.

**अन्वयार्थ--महाबाहो**–हे महापराक्रमी कृष्णा!–**ते**–तुझें–**रूपं**–हें रूप–**महत्**–फार मोठें–[**अस्ति**–आहे]–**बहुवक्त्रनेत्रं**–याला पुष्कळ मुखें व नेत्र आहेत–**बहुबाहूरुपादं**–पुष्कळ बाहु, मांड्या व पाय आहेत–**बहूदरं**–याला पुष्कळ उदरें आहेत–**बहुदंष्ट्राकरालं**–हे अनेक दाढांनीं विक्राल झालें आहे. अशा या रूपाला–**दृष्ट्वा**–पाहून–**लोकाः**–हे सर्व लोक–**प्रव्यथिताः**–अतिशय व्यथा पावले आहेत–**तथा**–त्याचप्रमाणें–**अहं**–मी [**प्रव्यथितः**–अतिशय व्यथित झालों आहें] २३.

महाराज! जणुं काय त्यांच्या नेत्रांचें भाग्यच उदयास आलें म्हणा. कारण, त्यांनीं तुमचें हें अगाध विश्वरूप पाहिलें किंवा त्यांच्या मनाला आज सुखाचा सुकाळ होऊन सुदिनच उगवला ३८. ते तीन लोक व्यापणारें तुमचें स्वरूप पाहून देवांनाहि धाक पडतो. कारण, हें स्वरूप वाटेल तिकडून पाहिलें असतां प्रत्येक पाहाणाराला हे आपल्यासमोर आहे असें दिसतें ३९. याप्रमाणें हें एकच आहे; पण विचित्र व भेसूर अशी याला पुष्कळ मुखें, पुष्कळ नेत्र आहेत व शस्त्रें धारण केलेलें असे अनंत हात आहेत ३४०. असेंच अनंत उत्तम बाहु, अनंत पाय, अनेक उदरें आणि नानावर्ण आहेत; शिवाय प्रत्येक मुख आवेशानें खावयाला उठलें आहे. ते कसे दिसत आहे पहा ४१. ज्याप्रमाणें महाकल्पाच्या अंतीं रागावलेल्या यमाने जणुं कांहीं जिकडे तिकडे प्रळयाग्नीच्या होळ्या पसरविल्या आहेत ४२. किंवा श्रीशंकराचीं संहार करण्याचीं यंत्रेंच अथवा पात्रें; प्रळयकाळच्या भैरवांचे जमाव निर्माण व्हावेत किंवा अंत करणाऱ्या जगदंबेची विभूति भूतांचा संहार करण्याकरितां सरसावून आली आहेत कीं काय ४३. त्याप्रमाणें जिकडे तिकडे तुमचीं प्रचंड तोंडें दिसतात, आणि दरीमध्यें ज्याप्रमाणें सिंह मावत नाहींत, त्याप्रमाणें तुमचे दांत तोंडांत न मावतां भयंकर उग्र दिसतात ४४. प्रळयरात्रींच्या गडद अंधारामध्यें जशीं नाश करणारीं पिशाच्चें उत्साहाने संचारार्थ निघतात, त्याप्रमाणें प्रलयकाळच्या संहाराच्या रक्तानें तुमच्या तोंडांतील दाढा लिप्त झालेल्या आहेत; असें दिसते ४५. फार काय सांगावें!! कालानें जसें युद्धाला आमंत्रण द्यावें, किंवा सर्वांच्या संहारकालीं जसें जीवाचे मरण माजून राहतें, त्याप्रमाणें तुमच्या मुखांमध्यें अत्यंत भयंकरपणा दिसत आहे ४६. काय सांगूं!! हें सर्व जग अत्यंत दीन दिसतें. कारण बिचाऱ्या जगाकडे किंचित् नजर टाकून पाहील, त्याला तें दुःखरूप यमुनानदीच्या कांठच्या झाडांप्रमाणें उभें राहिलेलें आहे, असें दिसेल ४७. तुमच्या या महामृत्युरूपी सागरांत त्रैलोक्याचे आयुष्य हीच कोणीं एक नांव असून ती शोकरूपी प्रतिकूल तुफानानें निर्माण झालेल्या लाटांमुळें हेलकावे खात आहे ४८. देवा! कदाचित् रागावून तुम्हीं असें म्हणाल कीं, "तुला या लोकांच्या भीतीबद्दल वाटाघाट करण्याचें काय कारण आहे? तर तसें न करतां, जें हलीं विश्वरूप पाहिलें आहेस. त्याचें मनांत ध्यान करून सुखाचा उपभोग घे" म्हणजे झाले ४९. तर महाराज! भीतीनें माझ्याच जीवास–प्राणास कंप सुटला; पण तसें आपणास एकदम कसें म्हणावें? म्हणून सर्व सामान्य लोकांच्या भीतीचें उगीच आडपडद्यासारखें केवळ निमित्त केलें आहे; खरें पाहिलें तर भीतीनें माझीच पांचावर धारण बसली आहे ३५०. माझें धैर्य काय सांगावें! ज्या मला प्रलयकाळचा रुद्र भितो व ज्या माझ्या भीतीनें मृत्यु लपतो, तोच मी अंतर्बाह्य तुमचे स्वरूप पाहून थरथर कांपत आहे, अशी तुम्हीं माझी अवस्था करून टाकिली आहे ५१. परंतु हे प्रभो! ह्या तुमच्या अति भयंकर रूपाला, जें आपल्या उग्र तेजानें भयालाहि जिंकून माघारी फिरवितें त्याला–'विश्वरूप' म्हणणें हें नवल नव्हे का? तर बापा! ही माहामारी आपल्या संहारक रूपानें प्रत्यक्ष भयालाहि मागे हटविणारी आहे ५२.

१ मस्तक लवविणें. २ मंजुळ शब्दानें. ३ बद्धहस्तें जोडलेले हात. ४ नम्रतारूप वृक्षाच्या. ५ बागेंत, अरण्यांत. ६ प्राप्त झाली. ७ वसंतकाळ. ८ दोन हातांनीं. ९ सुकाळ. १० उजाडलें. ११ धाक. १२ मांड्या. १३ रागावलेल्या. १४ होळ्या पसरल्या. १५ शंकर. १६ जमाव. १७ भोंदीं. १८ भूतरूपी खिचडीकरितां. १९ प्राप्त झाली. २० सिंह. २१ दांत. २२ नाश करणारीं पिशाच्चें. २३ लिप्त झाल्या. किटल्या. २४ आमंत्रिलें. २५ आलें. २६ अति भयंकरपणा. २७ नौका. २८ शोकरूपी वादळांतील लाटांनीं. २९ हेलकावे खात. ३० कृष्णानें. ३१ कदाचित्.

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विदामि शमं च विष्णो ॥ २४ ॥

ठेलीं महाकाळेंसि हेटेंतटें । तैसी कितीएकें मुखें रागिटें । इहीं वाढोनियां धाकुटें । आकाश केलें ॥ ५३ ॥ गगनाचेंनि वाडपणें[२] नाकळे[३] । त्रिभुवनींचियाही वारिया न वेंटाळे । ययाचेनि वाफा[४] आंगी जळे । कैसें धडाडीत असे ॥ ५४ ॥ तेवींचि एकासारिखें एक नोहे । एथ वर्णावर्णाचा भेदु आहे । हो कां जें प्रळयीं सावावो लाहे । वन्ही ययाचा ॥ ५५ ॥ जयाचिये आंगींची दीप्ती[१०] येवढी । जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडें आणि तोंडीं । दांत दाढा ॥ ५६ ॥ कैसा वारया धनुर्वात चढला । समुद्र कीं महापुरीं पडिला । विषाग्नि मारा प्रवर्तला । वडवानळासी ॥ ५७ ॥ हळाहळ आगी पियालें । नवल मरण मारा प्रवर्तलें । तैसें संहारतेजा या जाहलें । वदन देखा ॥ ५८ ॥ परी कोणें मानें विशाळ । जैसें तुटलिया अंतराळ । आकाशासि कव्हेंळ[११] । पडोनि ठेलें ॥ ५९ ॥ नातरी काखे सूनि[१२] वसुंधरी[१३] । जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं[१४] । तै उघडलें हाटकेश्वरीं[१५] । जेवीं पाताळकुहर[१६] ॥ ३६० ॥ तैसा वक्त्रांचा विकाशु[१७] । माजीं जिव्हांचा आगळाचि आवेशु । विश्व न पुरे म्हणौनि घांसु । न भरीचि कोडें ॥ ६१ ॥ आणि पाताळव्याळांचिया फूत्कारीं[२०] । गरळज्वाळा[२१] लागती अंबरीं[२२] । तैसी पसरलिये वदनदरी- । माजीं हे जिव्हा ॥ ६२ ॥ काढूनि प्रळयविजूंचीं जुंबाडें[२३] । जैसें पन्नासिलें[२४] गगनाचे हुडे[२५] । तैसे आवाळुवांवरी[२६] आंकडे । धगधगीत[२७] दाढांचे ॥ ६३ ॥ आणि ललाटपटाचिये[२८] खोळे । कैसें भयातें भेडविताती डोळे । हो कां जे महामृत्यूचे उमाळे[२९] । कडवसां[३०] राहिले ॥ ६४ ॥ ऐसें वाऊनि[३१] भयाचें भोजें[३२] । एथ काय निपजवूं पाहातोसि काज । तें नेणों परी मज । मरणभय आलें ॥ ६५ ॥ देवा विश्वरूप पहावयाचे डोहळे । केले तिये पावलों प्रतिफळें । बापा देखिलासि आतां डोळे । निवावे तैसे निवाले ॥ ६६ ॥ अहो देहो पार्थिव[३३] कीर जाये । ययाची काकुळती[३४] कवणा आहे । परि आतां चैतन्य[३५] माझें विपायें[३६] । वांचे कीं न वांचे ! ॥ ६७ ॥ एऱ्हवीं भयास्तव आंग कांपे । नावेक[३७] आगळें तरी मन तापे । अथवा बुद्धीही वासिपे[३८] । अभिमानु विसरिजे ॥ ६८ ॥ परी येतुलियाही वेगळा । जो केवळ आनंदैककळा[३९] । तया अंतरात्मयाही निश्चळा । शियारी[४०] आली ॥ ६९ ॥ बाप[४१] साक्षात्काराचा वेधु[४२] । कैसा देशधडी केला

**अन्वयार्थ**-**विष्णो**-हे व्यापक देवा !-**नभःस्पृशम्**-आकाशाला स्पर्श करणाऱ्या-**दीप्तं**-प्रदीप्त झालेल्या-**अनेकवर्णं**-ज्यांत नाना प्रकारचे वर्ण-रंग आहेत अशा-**व्यात्ताननं**-ज्यांत उघडलेलीं-पसरलेलीं तोंडें अनेक आहेत अशा-**दीप्तविशालनेत्रम्**-आणि ज्यांचें नेत्र दीप्त प्रदीप्त व विशाल आहेत अशा भयंकर स्वरूपानें युक्त असलेल्या-**त्वां**-तुला-**दृष्ट्वा हि**-पाहूनच-**प्रव्यथितान्तरात्मा**-ज्याचा अन्तरात्मा-अंतःकरण अतिशय पीडित झालें आहे, ज्याचें मन भ्यालें आहे असा मी-**धृतिं**-धैर्याला-**च**-व-**शमं**-मनःसमाधानाला-**न विंदामि**-प्राप्त होत नाहीं २४.

कित्येक रागीट मुखें जणुं काय महाकाळाबरोबर पैजेनें लढताहेत व त्यांनीं आपल्या मोठेपणानें आकाशास लहान केलें आहे ९३. तीं आकाशाच्याहि मोठेपणानें आकळलीं जात नाहींत, व त्रिभुवनाच्या वाऱ्यानेंहि जी मुखें वेष्टिलीं जात नाहींत उलट तीं आपल्या वाफांनीं अग्नीला जाळीत आहेत व सर्वत्र कसा भडका करीत आहेत ! ९४. त्याचप्रमाणें तीं एकसारखीं एक [मुखें] नसून प्रत्येकांत रंगारंगाचा व रंगरूपाचा भेद आहे व प्रलयकाळाचा अग्निसुद्धां त्यावेळीं या मुखाचेंच साह्य घेतो कीं काय कोण जाणे ? ९५. यांच्या अंगचेंच एवढें तेज आहे कीं जे त्रैलोक्याची राखुंडी करील, त्यांतहि त्यास जी तोंडें आहेत आणि तोंडांत दांत व दाढा आहेत ! ९६. त्या पाहून असें वाटतें कीं, काय वाऱ्याला धनुर्वात झाला ! किंवा समुद्राला महापूर येऊन तो मर्यादा सोडून वाहूं लागला ! अथवा वडवानळाच्या साहाय्यानें विषरूप अग्निच मारण्यास प्रवर्तला आहे कीं काय ? ९७. किंवा काळकूट विष अग्नीनें घ्यावें अथवा मरण हेंच मारण्यास उद्युक्त व्हावें, हे आश्चर्यच आहे. त्याचप्रमाणें या विश्वरूपाचें 'संहारक' तेज प्रखर असून त्याला आणखी तोंडेंहि आहेत ९८. परंतु ती तोंडें केवढीं मोठी आहेत म्हणून म्हणाल, तर आकाश मध्यें तुटून पडल्यामुळें त्याला जशी खिंड पडावी त्याप्रमाणें; ९९. किंवा, हिरण्याक्ष राक्षस पृथ्वी काखेंत मारून, ज्यावेळेस पाताळास जावयास निघाला त्यावेळेस हाटकेश्वरानें [सप्तपाताळाखालील महादेवाच्या अवतारानें] जसें पाताळरूपी विवराचें, गुहेचें द्वार उघडलें ३६०. त्याप्रमाणें हीं तुमचीं तोंडें पसरलेलीं असून, त्यांत जिव्हा विशेष आवेशानें लडबडताहेत; आपल्या एका घासासहि विश्व पुरणार नाहीं. म्हणून हे 'विश्वरूप' कौतुकानें देखील त्या विश्वाचा घास खाऊन टाकीत नाहीं ६१. आणि पाताळांतील नागांच्या फूत्कारानें जशा त्यांच्या विषाच्या ज्वाळा आकाशास लागाव्यात त्या ज्वालांप्रमाणें ह्या तोंडांच्या दरींत जिव्हा भासतात ! ६२. प्रळयकाळाच्या विजांचे समुदाय एकत्र करून जसे गगनाचे बुरुज शृंगारावेत, त्याप्रमाणें ओंठाच्या दोन्ही बाजूंस तीक्ष्ण दाढांचें आंकडे-टोके प्रखर रूपाची दिसतात; ६३. आणि कपाळरूपी वस्त्राच्या खोळींत म्ह० खळग्यांत भयालाच भिवविणारे असें कांहीं डोळे दिसत आहेत व ते डोळे महामृत्यूचे प्रवाहच असून [भिवयांच्या] अंधारांत दडून बसल्यासारखे दिसताहेत ६४. याप्रमाणें भीतीचें कौतुक धारण करून या ठिकाणी तुम्ही कसल्या प्रकारचें कार्य निर्मिती करूं पाहतां आहांत, हेंच मला समजत नाहीं; परंतु मला मात्र मरणाची भीति उत्पन्न झाली आहे ६५. देवा ! मला जें विश्वरूप पाहाण्याविषयीं डोहाळे झाले होते, ते माझे मला चांगलेंच फळले म्हणावयाचे व ते रूप पाहून जशा रीतीनें डोळ्यांची शांति व्हायला पाहिजे होती, त्याप्रमाणें झाली म्हणावयाची [ शांति कसची ? आलें आहे मरण भयच; पण बापा ! शांति लाभली असें म्हणावयाची मात्र पाळी आली आहे ] ६६. देवा ! पृथिव्यादि भूतकार्यस्थूल शरीर जर नाहींसें झाले तर त्याची कोण पर्वा करील ? परंतु प्रस्तुत माझें चैतन्यच कदाचित् जीवंत राहील कीं नाहीं याचाच भरंवसा नाहीं ६७. आणखी विश्वरूपदर्शनाच्या भीतीनें शरीर थरथर कांपत आहे, क्षणभर तेंच भय कांहींसे वाढलेंच तर मात्र थोडाबहुत मनालाहि ताप उत्पन्न होत आहे व बुद्धीला भीति उत्पन्न होऊन अभिमानाचाहि विसर पडला आहे ६८. इतकेंच नव्हे, तर या सर्वांहून निराळा असा जो आनंदरूपी निश्चळ आत्मा त्यालाहि शहारे म्ह० मरण भय-शिसारी आली आहे ६९. देवा, बापा काय हा विश्वरूपाचा साक्षात्काराचा छंद-प्रताप सांगावा !

१ लढताहेत. २ मोठेपणानें. ३ आकळेना. ४ वाफेनें. ५ अग्नि. ६ साहाय्य. ७ तेज. ८ मारण्याला. ९ वडवानळाच्या साह्यानें. १० विष. ११ वेढा, ग्रास. १२ घालून. १३ पृथ्वी. १४ बिळांत, पाताळांत. १५ पाताळांतील महादेवानें. १६ विवर. १७ पसरणें. १८ अधिक, विशेष. १९ नागांच्या. २० फूत्कारानें. २१ विष. २२ आकाशीं. २३ समुदाय. २४ शृंगारिलें. २५ बुरुज. २६ ओंठाबाहेर. २७ प्रखर. २८ कपाळाचे भागांतील खळग्यांत. २९ प्रवाह, लोट. ३० अंधारांत. ३१ स्वीकारुन, घेऊन. ३२ रूप, सोंग. ३३ पृथ्वीचा, मातीचा. ३४ पर्वा. ३५ जीव. ३६ कदाचित्. ३७ क्षणभर. ३८ भिते, भय पावते. ३९ स्वरूप. ४० कांटा, कंप, शिसारी. ४१ मोठें बल, थोर प्रताप.

बोधु । हा गुरुशिष्यसंबंधु । विपायें नांदे ॥ ३७० ॥ देवा तुझ्या ये दर्शनीं । जें वैकल्य उपजलें आहे अंतःकरणीं । तें सांवरावयालागीं गंवसणी । धैर्याची करितसें ॥७१॥ तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहलें । हें असो परि मज भलें अतुडविलें । उपदेशा इया ॥ ७२ ॥ जीव विसंवावयाचिया चाडा । सैंघ धांवाधांवी करितसे बापुडा । परि सोयेंही कवणेंकडां । न लभे एथ ॥ ७३ ॥ ऐसें विश्वरूपाचिया महामारी । जीवित्व गेलें आहे चराचरीं । जी न बोले तरि काय करीं । कैसेनि राहें ? ॥ ७४ ॥

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

पैं अखंड डोळ्यांपुढें । फुटलें जैसें महाभयाचें भांडें । तैसीं तुझीं मुखें वितंडें । पसरलीं देखें ॥ ७५ ॥ असो दांत दाढांची दाटी । न झांकवे मां दों दों वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा ॥ ७६ ॥ जैसें तक्षका विष भरलें । हो कां जे काळरात्रीं भूत संचरलें । कीं आग्नेयास्त्र पैरजिलें । वज्राग्नि जैसें ॥७७॥ तैशीं तुझीं वक्त्रें प्रचंडें । वरि आवेश हा बाहेरी वोसंडे । आले मरण-रसाचे लोंढे । आम्हांवरी ॥७८॥ संहारसमयींचा चंडानिळु । आणि महाकल्पांत प्रलयानळु । या दोहीं जैं होय मेळु । तैं काय एक न जळे ? ॥ ७९ ॥ तैसीं संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीरु कां आम्हां पारुखे ? । आतां भुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें ॥ ३८० ॥ मोटकें विश्वरूप डोळां देखिलें । आणि सुखाचें अवर्षण पडिलें । आतां जापाणीं जापाणीं आपुलें । अस्ताव्यस्त हें ॥८१॥ ऐसें करिसी म्हणौनि जरी जाणें । तरी हे गोष्टी सांगावीं कां मी म्हणें । आतां एक वेळ वांचवी जी प्राणें । या स्वरूपप्रळयापासोनि ॥ ८२ ॥ जरी तूं गोसांवी आमुचा अनंता । तरी सुंई वोडणें माझिया जीविता । सांटवीं पसारा हा मागुता । महामारीचा ॥८३॥ आइकें सकळ देवांचिया परदेवते । तुवां चैतन्यें गा विश्व वसतें । तें विसरलासि हें उपरतें । संहारू आदरिलें ॥ ८४ ॥ म्हणौनि वेगीं प्रसन्न होईं देवराया । संहरीं संहरीं आपुली माया । काढीं मातें महाभया-। पासोनियां ॥ ८५ ॥ हा ठांयवरी पुढतपुढतीं । तूंतें म्हणिजे बहुवा काकुळती । ऐसा मी विश्वमूर्ती । भेडका जाहलों ॥८६॥ जैं अमरावतीये आला धाडा । तैं म्यां एकलेनि

कीं, ज्याच्या दर्शनानें माझें ज्ञानच देशोधडीस लागलें आणि माझा व तुमचा असा हा जो गुरुशिष्याचा संबंध तो या जगांत उरेल कीं नाहीं, याचाहि मला संशयच आहे ३७०. देवा, तुमच्या विश्वरूपाच्या दर्शनानें माझें व्याकुळ अंतःकरणांत जी व्याकुळता, विकलता उत्पन्न झाली आहे ती सांवरून धरण्याकरितां मी अंतःकरणांस धीर देण्याची खटपट करीत आहें; ७१. अगोदर माझें नांवानें धैर्याचें वांकडेंच पडलें होतें; [ माझें नांव ऐकतांच धैर्य मला सोडून गेलें होतें ] त्यांतूनहि मला विश्वरूप दर्शन झालें मग काय विचारता ? हें असो, परंतु धन्य आहे तुमची ! तुम्ही आपल्या उपदेशानें मला चांगलेंच घोटाळ्यांत पाडलें ७२. माझा जीवात्मा विसांवा घेण्याच्या निमित्तानें बिचारा चहूंकडे धांवाधांव करीत आहे; परंतु त्याला कोठेंहि थारा मिळत नाहीं ७३. याप्रमाणें तुमच्या या विश्वरूपी महामारीच्या दर्शनानें स्थावरजंगमादि सृष्टींतील सर्वांचें जीवित्व नाहींसें झालें आहे. पण महाराज ! हे न बोलावें तर काय करावें ? कसें रहावें ? म्ह० जर तुम्हांला शरण न आलों तर मी जिवंत तरी कसा राहीन ? ७४.

**अन्वयार्थ**—**च**-आणि-**ते**-तुझा-**दंष्ट्राकरालानि**-दाढांनीं विकराल झालेलीं-**कालानलसंनिभानि**-प्रलयकालच्या अग्नीसारखीं-**मुखानि**-मुखें-**दृष्ट्वा एव**-पाहूनच-**दिशः**-दिशांना-**न जाने**-मी जाणत नाहीं-**च**-व-[ मला ]-**शर्म**-सुख-**न लभे**-होत नाहीं-**देवेश**-**हे** देवांच्या ईश्वरा !-**जगन्निवास**-हे जगाच्या आश्रयभूत देवा !-**प्रसीद**-प्रसन्न हो २५.

अहो ! विश्वरूप मला असें दिसतें कीं, जसें एखादे महाभयाचें सबंध भांडें फुटून आपल्या डोळ्यांपुढें उघड दिसावें, त्याप्रमाणें तुमची अक्राळविक्राळ मोठीं तोंडें डोळ्यापुढें पसरलेली दिसतात; ७५. हे असो, आंतील दांत व दाढा यांची इतकी गर्दी झालेली आहे कीं, त्या दोन दोन ओठांच्या आंत झांकल्या जात नाहींत त्या योगानें चहूंकडे प्रलयकालच्या शस्त्रांचें दाट कुंपण लावलें आहे कीं काय, असें वाटतें ७६. तक्षक हा मूळचाच पूर्ण विषारी सर्प असून त्याच्या तोंडांत जशी आणखी विषाचीच भर घालावी, किंवा अमावस्येची रात्र पूर्ण काळोखामुळें मूळचीच भयकारक असून तींत आणखी भूतांचा संचार व्हावा; अथवा मूळच्याच दाहक असणाऱ्या प्रळयाग्नीनें आग्नेयास्त्र परजावें, ७७. त्याप्रमाणें तुमचीं तोंडें मूळांतच विशाल भयंकर असून त्याचा आवेश आंत न मावतां बाहेर उचंबळत आहे व त्या योगानें आमच्यावर मरणरूपी पाण्याचे लोंढेंच आले आहेत कीं काय ? असें वाटतें ७८. सर्व ब्रह्मांडाचा नाश करणारा महाप्रळयाग्नि उद्भवला व त्याला प्रलयकाळचा प्रचंड वारा सहाय्य मिळून ते एकत्र झाले तर तो काय एक जाळणार नाहीं ? ७९. त्याप्रमाणें संहार करणारीं अशी ही तुमचीं तोंडें पाहून माझा धीर अगदीं खचला व मी वेडावून जाऊन मला दिशांचीहि भूल पडली एवढेंच नव्हे तर माझा मलाच विसर पडला ! ३८०. तुमचें विश्वरूप मी थोडेसे डोळ्यांनीं पाहिलें नाहीं, तोंच त्यापासून होणाऱ्या सुखाचा दुष्काळ पडला म्हणून हे तुमचें अवाढव्य स्वरूप आतां आवरा ! झांका ! झांका महाराज ! ८१. तुम्हीं अशा रीतीनें मला विश्वरूप दाखवून इतक्या भयंकर दुःखांत लोटाल असें जर मला पूर्वींच माहीत असतें, तर "मला तुमचे विश्वरूप दाखवा" असें तुम्हांला म्हटलें असतें कशाला ? पण म्हणून तर चुकलो, आतां ह्या आपल्या विश्वरूप प्रळयाग्नीपासून एक वेळ माझे प्राण वाचवा. म्हणजे मिळवली ८२. हे अनंता, तुम्ही जर आमचे खरोखर सत्ताधारी धनी आहांत तर माझ्या जीविताच्या मरणाच्या आड कांहींतरी ढाल घालून म्हणजे हा महामारीरूपी तुमच्या विश्वरूपाचा पसारा पुनः आपल्या स्वरूपीं आवरा ८३. हे सकळ देवश्रेष्ट, देवाधिदेवा, सर्व विश्वाचें अधिष्ठान चैतन्य म्हणजे वसतिस्थान असे जे तुम्ही, ते सर्व जगाचें पालन करण्याचें विसरून त्यांचा उलट संहार करूं पाहतां आहां ८४. म्हणून हे देवराया, लवकर प्रसन्न होऊन आपली माया आवरा, आवरा ! ! आणि मला या मोठ्या भयापासून सोडवा ८५. एवढा वेळपर्यंत पुष्कळ काकुळतीस येऊन तुमची जी वारंवार विनवणी करीत आहे, त्याचें कारण या विश्वरूपाला पाहूनच इतका मी भिवा झालों ! ८६. माझें सामर्थ्य केवढे आहे हें पहा ! ज्या वेळेस अमरावतीवर राक्षसांचा हल्ला,

१ ज्ञान. २ संकटानें, क्वचित्च. ३ विकलता, व्याकुलता. ४ खटपट. ५ गुरफटिलें, गुंतविलें. ६ विसांवा घेण्याकरिता. ७ पुष्कळ. ८ थारा. ९ मोठीं. १० मग. ११ कांट्यांचें कुंपण. १२ पेरिलें, पूट दिले, पूट चढविलें. १३ प्रळयाग्नि, विजेनें. १४ वाहवतो. १५ प्रळयकाळचा. १६ प्रचंड वारा, झंझवात. १७ प्रलयाग्नि. १८ नष्ट होतो, खचतो, पारखा होतो. १९ थोडकें. २० आटप आटप. २१ धनी. २२ आड घाल. २३ ढाल, आडोसा. २४ आवर. २५ उलटें. २६ आवरुन घे. २७ येथपर्यंत, एवढा वेळपर्यंत. २८ पुनः पुनः. २९ विश्वमूर्तीमुळें. ३० भिवा.

केला उवेंडा । जो मी काळाचियाही तोंडा । वोसिपु न धरीं ॥८७॥ परी तैंया आंतुल नव्हे हें देवा । एथ मृत्यूसही करूनि चढावा । तुवां आमुचाचि घोट भरावा । या सकळ विश्वेंसीं ॥८८॥ कैसा नव्हता प्रळयाचा वेळु । गोखां तूंचि मिनलासि काळु । बापुडा हा त्रिभुवन गोळु । अल्पायु जाहला ॥ ८९ ॥ अहा भाग्या विपरीता । विघ्न उठिलें शांत करितां । कटकटां विश्व गेलें आतां । तूं लागलासि ग्रासूं ॥ ३९० ॥ हें नव्हे मां रोकडें । सैंध पसरूनियां तोंडें । कवळितासि चहूंकडे । सैन्यें इयें ॥ ९१ ॥

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः ॥
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

नोहेति ? हे कौरवकुळींचे वीर । आंधळिया धृतराष्ट्राचे कुमर । हे गेले गेले सहपरिवार । तुझिया वदनीं ॥९२॥ आणि जे जे यांचेनि सांवायें । आले देशोदेशींचे राये । तयांचें सांगावया जावों न लाहे । ऐसें सरकैंटित आहासी ॥९३॥ मदमुखाचियें संघटा । घेत आहासि घटघटां । आरंणीं हन थाटा । देतासि मिठी ॥ ९४ ॥ जंत्रीवरिचील मार । पैंदातींचे मोगरे । मुखाआंत भोंर । हारपैंताति मा ॥ ९५ ॥ कृतांताचिया जावेंळी । जें एकचि विश्वातें गिळी । तियें कोटीवरी सगळीं । गिळितासि शस्त्रें ॥ ९६ ॥ चतुरंगी परिवारा । संजोडियां रहंवेरां । दांत न लाविसी मा परमेश्वरा । कैसा तुष्टलासि बरवा ॥ ९७ ॥ हां गा भीष्माऐसा कवणु । सत्यशौर्यनिपुणु । तोही आणि ब्राह्मण द्रोणु । ग्रासिलासि कटकटां ॥९८॥ अहा सहस्रकराचा कुमरु । एथ गेला गेला कर्णवीरु । आणि आमुचिया आघवयांचा केरु । फेडिला देखें ॥ ९९ ॥ कटकटा धातेया । कैसें जाहलें अनुग्रहा यया । मियां प्रार्थूनि जगा बापुडिया । आणिलें मरण ॥ ४०० ॥ मागां थोडिया बहुवा उपपत्ती । येणें सांगितलिया विभूति । तैसा नसोंचि मा पुढती । बैसलों पुसों ॥१॥ म्हणौनि भोग्य तें त्रिशुद्धी न चुके । आणि बुद्धीही होणारासारिखी ठाके । माझ्या कपाळीं पिटावें लोकें । तें लोटेल कांह्यां ॥२॥ पूर्वीं अमृतही हातां आलें । परी देव नसतीचि उगले । मग काळकूट उठविलें । शेवटीं जैसें ॥ ३ ॥ परी तें एकबगीं थोडें । केलिया प्रतिकारामाजिवडें । आणि तिये अवसरीचें तें सांकडें । निस्तरविलें शंभू ॥४॥ आतां हा जळतां वारा कें वेटाळें ? । कोणा हे विषा भरलें गगन गिळे ? । महाकाळेंसि कें खेळें ? । आंगवत असे ॥५॥ ऐसा अर्जुन दुःखें शिणतु ।

छापा पडला होता, त्यावेळेस त्यांचा पराभव मी एकट्यानें केला. मी साक्षात् काळ तोंडासमोर आला तरी त्यास भिणारा नव्हे ८७. परंतु देवा! हें आपलें विश्वरूप या गोष्टींपैकीं नव्हे; या ठिकाणीं मृत्युवरहि ताण करून सकल विश्वसहित आमचाहि घोट घ्यावा, या हेतूनें तुम्ही प्राप्त झाला आहां ८८. हें पहा, हा प्रलयकालचा समय नसून प्रस्तुत तुम्ही स्थितिकालीच कसें कालरूपानें प्राप्त झाला पण या बिचाऱ्या त्रिभुवनगोलाचीं शंभर वर्षे आजच भरली व ते अल्पायु झाले, असें वाटतें ८९. अहारे दैवा! तुझी गति किती विपरीत आहे? विश्वरूपाच्या दर्शनापासून शांति होईल अशा समजुतीनें मी देवास 'विश्वरूप दाखवा' म्हणून म्हटलें, तर तें सुख न होतां उलट विघ्नच ओढवलें. अरेरे! देवा, आतां मात्र हें विश्व बुडालें; कारण तूंच त्या विश्वाला ग्रासूं लागलास! ३९०. देवा! अहो! आपण अनेक मुखें पसरून या सर्व सैन्याला चहूंकडून भक्षण करीत आहांत, हें प्रत्यक्ष माझ्या दृष्टीस पडत नाहीं काय? ९१.

**अन्वयार्थ—अवनिपालसंघैः सह एव**—पृथ्वीपालांच्या संघासहवर्तमानच—**अमी सर्वे**—हे सर्व—**धृतराष्ट्रस्य पुत्राः**—धृतराष्ट्राचे पुत्र—**च भीष्मः**—व पितामह भीष्माचार्य—**द्रोणः**—आचार्य द्रोणाचार्य—**तथा**—त्याचप्रमाणें—**अस्मदीयः अपि**—आमच्याहि—**योधमुख्यः सह**—धृष्टद्युम्नादि मुख्य यौद्ध्यांसह—**असौ सूतपुत्रः**—हा सूतपुत्र कर्ण इत्यादि सर्व **त्वां**—तुला तुझ्यामध्यें—[**विशन्ति**—प्रवेश करीत आहेत] २६

अहो! कौरवकुलांतील वीर म्हणजे आंधळ्या धृतराष्ट्राचें मुलगे हेच नव्हेत का! अहाहा! हे गेले, गेले! सहपरिवार तुमच्या मुखांत पूर्णपणे गेले ९२. आणखी जे देशोदेशींचे राजे यांना साह्य करण्याकरितां आले होते, त्यांचा निरोप माघारा सांगण्याकरितां देखील तुमच्या तोंडांतून कोणी मनुष्य उरला नाहीं. अशा रीतीनें तुम्हीं सर्वांना सरसकट गिळीत आहांत ९३. या रणांत मोठ्या थाटानें मदोन्मत्त हत्तींच्या समुदायांचें देखील घटाघटा घांस गिळीत आहांत ९४. बंदुकी, तोफा यांचा मारा करणारे आणि पायदळांचे समुदाय यांच्या झुंडींच्या झुंडी तुमच्या मुखांत नाहींतशा होत आहेत! नाही कां? ९५. जुळ्या भावंडासारखी कृतांताच्या तोडीचीं शस्त्रें कीं, ज्यांपैकीं एक देखील सर्व विश्वाला गिळून नाश करील अशी कोट्यावधि शस्त्रें तुम्ही गिळून टाकीत आहांत ९६. चतुरंग सेना परिवार, तसें घोडें जोडलेले रथ या सर्वांना दांत न लावतां एकदम गट्ट गिळून टाकीत आहांत. तर देवा! यापासून तुम्हाला चांगला संतोष तरी कसा वाटतो! ९७. अहो! भीष्मासारखा सत्यवादी व शौर्यनिपुण असा दुसरा कोण आहे? याला देखील आणि हा द्रोण ब्राह्मण असून त्याला देखील अरेरे आपण ग्रासून टाकलें! ९८. अहाहा! सूर्यपुत्र जो महावीर कर्ण तोहि आपल्या मुखांत गेला हो गेला. आणि आतां आमच्याकडील योद्ध्यांना तर केरासारखें नाहींसें केलें, हे मी पहात आहे! ९९. हायरे ब्रह्मदेवा! मी या प्रभूच्या प्रसादापासून ही काय विपरीत गोष्ट आहे? या बिपरित अनुग्रहानें असें झाले कीं, मी "मला विश्वरूप दाखवा" अशी प्रभूंची प्रार्थना करून बिचाऱ्या दीन जगाला स्थितिकाळींच मारण्यास मात्र कारण झालो ४००. देवाने पूर्वी थोड्याबहुत युक्तिसह आपल्या विभूति सांगितल्या; त्यावर समाधान मानावें कीं नाहीं, पण त्याप्रमाणें समाधान न मानता 'विश्वरूप दाखवा' म्हणून विनंति करून मी हट्ट धरून बसलों, त्याचाच हा परिणाम १. म्हणून भोक्तव्य ते कधीहि चुकत नाहीं म्हणून जे म्हणतात ती गोष्ट अगदी खरी आहे. आणि बुद्धीहि त्या भोगाला अनुरूप म्हणजे जसे होणार असेल त्यासारखीच होत असते. लोकांनी आपल्या मरणाचे खापर माझ्या डोक्यावर फोडावे. मला दोष द्यावा. असें माझ्या कपाळी म्ह. प्रारब्धांत लिहिले होते. ती गोष्ट चुकणार तरी कशी? २. पूर्वी समुद्रमंथनाच्या वेळीं प्रथम अमृत हाताला आलें ते घेऊन उगीच स्वस्थ बसावें कीं नाहीं; पण नाहीं; देवांनीं समुद्रमंथन बंद न करितां जास्तीच इच्छा केली, तेव्हां शेवटी त्यांच्या हातीं काळकूट विष आलें! ३. परंतु तेंहि एका प्रकारें कमीच होते, कारण त्याचें निराकरण करण्यासारखें तरी होतें; आणि त्याप्रमाणें त्या वेळचें तें संकट शंकरांनीं दूरहि केलें ४. पण हल्लीचा जो हा विश्वरूपाचा प्रकार हा प्रत्यक्ष पेटलेला वाराच आहे. तर त्याला कोण आवरील? विषानें भरलेले आकाश कोणास गिळता येईल? व महाकाळाबरोबर खेळता येईल असें कोणाचें सामर्थ्य आहे? ५. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, याप्रमाणें अर्जुन दुःखानें

१ उलगडा. २ भय. ३ त्यांपैकीं. ४ चढाई, ताण. ५ मध्येच. ६ प्राप्त झालास. ७ अरे अरे. ८ काय. ९ प्रत्यक्ष. १० हे नव्हेत काय? ११ साहाय्यार्थ. १२ रहात. १३ गिळीत. १४ हत्तींचा समुदाय. १५ महातांच्या समुदायास. १६ तोफा, बंदुकी वगैरेंची. १७ पायदळाचे. १८ निवडक लोक. १९ झुंडीच्या झुंडी. २० नाहींशा होतात. २१ भावंडें. २२ हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांस. २३ घोडे जोडलेल्या रथांस. २४ हायहाय. २५ सूर्याचा. २६ हे ब्रम्हदेवा.

शोचिंत असे जीवाआंतु । परी न देखें तो प्रस्तुतु । अभिप्राय देवाचा ॥ ६ ॥ जे मी मारिता हे कौरव मरते । ऐसेंनि वेंटाळिला होता मोहें बहुतें । तो फेडावयालागीं अनंतें । हें दाखविलें निज ॥ ७ ॥ अरे कोण्ही कोणातें न मारी । एथ मीचि हो सर्व संहारीं । हें विश्वरूपव्याजें हरी । प्रकटित असे ॥ ८ ॥ परी वायांचि व्याकुलता । तो नें चोजवेचि पंडुसुता । मग अहा कंपु नव्हता । वाढवित असे ॥ ९ ॥

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥ २७ ॥

तेथ म्हणे पाहा हो एके वेळे । सासिकेंवचेंसि दोन्ही दळें । वदनीं गेलीं आभाळें । गगनीं कां जैसीं ॥ ४१० ॥ कां महाकल्पाचिया शेवटीं । जैं कृतांतु कोपला होय सृष्टी । तैं एकविसांही स्वर्गां मिठी । पाताळासकट दे ॥ ११ ॥ नातरी उदासीनें दैवें । संचकाचीं वैभवें । जेथींचीं तेथ स्वभावें । विलया जाती ॥ १२ ॥ तैसीं सासिन्नलीं सैन्यें एकवटें । इयें मुखीं जाहलीं प्रविष्टें । परी एकही तोंडौनि न सुटे । कैसें कर्म देखा ॥ १३ ॥ अशोकाचे अंगवसे । चघळिले कंन्हेनि जैसे । लोक वक्त्रांमाजीं तैसे । वायां गेले ॥ १४ ॥ परि सिसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दाढांचे सांडसीं । पीठ होत कैसीं । दिसत आहाती ॥ १५ ॥ तियें रत्नें दांतांचिये सवडीं । कूट लागलें जिभेच्या बुडीं । कांहीं कांहीं आगरडीं । दंष्ट्रांचीं माखलीं ॥ १६ ॥ हो कां जे विश्वरूपें काळें । ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें । परि जीवित्व देहींचीं सिसाळें । अवश्य कीं राखिलीं ॥ १७ ॥ तैसी शरीरामाजीं चोखंडीं । इयें उत्तमांगें होतीं फुडीं । म्हणौनि महाकाळाचियाही तोंडीं । परि उरलीं शेखीं ॥ १८ ॥ मग म्हणे हें काई । जन्मलयां आन मोहराचि नाहीं । जग आपैसेंचि वदनडोहीं । संचारताहे ॥ १९ ॥ यया आपेंआप आघविया सृष्टी । लागलिया आहाति वदनाचिया वाटीं । आणि हा जेथिंचिया तेथ मिठी । देतसे उगला ॥ ४२० ॥ ब्रह्मादिक समस्त । उंचा मुखांमाजीं धांवत । येर सामान्य हे भरत । ऐलीच वदनीं ॥ २१ ॥ आणिकही भूतजात । तें उपजलेचि ठायीं ग्रासित । परि याचिया मुखा निभ्रांत । न सुटेचि कांहीं ॥ २२ ॥

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥

व्यापून कष्टी होऊन मनांतल्या मनांत शोक करूं लागला, परंतु असें विश्वरूप दाखविण्यांतील देवाचा आशय काय आहे याचा विचार तो जाणत नव्हता ६. कारण, मी अर्जुन मारणारा व हे कौरव मरणारे, अशा ज्या उलट मोठ्या मोहानें तो व्यापून गेला होता, तो त्याचा मोह नाहींसा करण्याकरितांच श्रीअनंतानें आपलें हें विश्वरूप दाखविलें ७. यांत देवाचा अभिप्राय हा कीं अरे वास्तविक कोणी कोणास मारीत नाहीं; तर येथें सर्वांचा संहार करणारा मीच स्वतः आहें, हे तत्त्व श्रीहरी विश्वरूपाच्या निमित्तानें व्यक्त करीत होते ८. परंतु अर्जुनास हें न समजल्यामुळें तो व्यर्थ व्याकुळ झाला व उगीच मनांत नसलेली भीति वाढवित होता ९.

**अन्वयार्थ**—**त्वरमाणाः**—त्वरा करणारे असे होत्साते मोठ्या त्वरेनें—**ते**—तुझ्या—**दंष्ट्राकरालानि**—दाढांनीं विक्राळ दिसणाऱ्या—**भयानकानि**—भयानक—**वक्त्राणि**—मुखांत—**विशन्ति**—प्रवेश करितात—**च**—आणि—**केचित्**—त्यांतील कांहीं—**चूर्णितैः उत्तमाङ्गैः**—चूर्ण झालेल्या मस्तकांनीं—**दशनान्तरेषु विलग्नाः**—दातांच्या फटींत अडकून राहिलेले—**संदृश्यन्ते**—दिसतात २७.

त्या वेळेस तो अर्जुन पुनः म्हणाला, "अहो हें पहा! ज्याप्रमाणें अभ्रें आकाशांत नाहींतशीं होतात त्याप्रमाणें शिरस्त्राणें व कवचें यांसकट हीं दोहींकडचीं सैन्यें एकाच वेळीं तुमच्या तोडांत नाहींतशीं झालीं आहेत ४१०. किंवा महाप्रळयाच्या अखेरीस यम विश्वावर कोपल्यावर जसा एकवीस स्वर्गांना पाताळासह तो गिळून टाकतो ११. अथवा दैव प्रतिकूल झाल्यावर संग्रह करणाराचें ऐश्वर्य जेथच्या तेथेंच आपल्या आपणच नाहींसें होतें १२. त्याप्रमाणें ही कर्माची गति कशी विलक्षण, विपरीत आहे ते पहा! हीं एकत्र जमलेलीं सैन्यें एकदम या मुखांत शिरून त्या तोंडाच्या सपाट्यांतून सुटून एकहि बाहेर पडत नाहीं! १३. उंटाच्या तोंडांत अशोक वृक्षाचे डहाळे जसे चघळतांना दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें हे सर्व लोक तोंडांत व्यर्थ लयास गेलेलें आहेत! १४. परंतु मुकुटांसह मस्तकें दाढांच्या चिमट्यांत सांपडून त्यांचें कसे पीठ होत असतांना दिसतें आहे १५. त्या मुकुटांवरील कांहीं रत्नें दातांच्या फटींत अडकून राहिली आहेत, तर कांहीं रत्नांचा चुरा जिभेच्या तळाशीं सांचला आहे. कांहीं कांहीं दाढांचीं अग्रें [टोकें] ठोकळ ठोकळ होतीं ती त्यांच्या रक्तानें माखलीं आहेत १६. या विश्वरूपरूपी काळानें ज्या लोकांचीं शरीरें जरी बळेंच ग्रासलीं आहेत, तरी त्या जीवाच्या देहांतील उत्तमांगरूप मस्तकें मुद्दाम राखून ठेविलीं आहेत १७. त्याप्रमाणें शरीरांतील उत्तम भाग जी मस्तकें; ती जरी निश्चयेंकरून विश्वरूपात्मक महाकाळाच्या तोंडांत सांपडलीं होती, तरी तीं शेवटीं नाश न पावतां उर्वरित राहिली आहेत! १८. मग अर्जुन पुनः म्हणतो, हा काय चमत्कार आहे! या जगांत जन्माला आलेल्यास मृत्युमुखांत जाऊन पडावें याशिवाय दुसरी गतिच नाहीं. म्हणून सर्व जग या विश्वरूपाच्या वदनरूपी डोहांत आपोआपच जाऊन बुडत आहे १९. ही सर्व सृष्टि आपोआप या मुखाच्या वाटेला लागली आहे आणि हा विश्वरूपात्मक परमात्मा जागच्या जागीं स्वस्थ राहून सर्व जगाला सहजच गिळीत आहे ४२०. ब्रह्मदेवासारखी मोठमोठाली सर्वांच्या सर्व मंडळी या विश्वरूपाचे सर्वांत अति उंच असलेले जें तोंड त्यांत वेगानें धांव घेत आहेत. बाकीची इतर साधारण प्रतीची जी मंडळी ती अलीकडच्याच मुखांत शिरताहेत; २१. व इतर जे प्राणिमात्र ते उपजलेल्या ठिकाणींच नाहींतसे होत आहेत; परंतु या विश्वरूपाच्या मुखाच्या सपाट्यांतून, निःसंशय कांहींच सुटत नाहीं २२.

**अन्वयार्थ**—**यथा**—ज्याप्रमाणें—**नदीनां**—नद्यांचे—**बहवः**—पुष्कळ—**अम्बुवेगाः**—जलप्रवाह—**समुद्रम् एव अभिमुखाः**—समुद्राच्या बाजूलाच वहात जाऊन त्यांतच—**द्रवन्ति**—शिरतात—**तथा**—त्याचप्रमाणें—**अमी**—हे—**नरलोकवीराः**—मनुष्यलोकांतील वीर—**तव**—तुझ्या—**अभिविज्वलन्ति वक्त्राणि**—सर्व बाजूंनीं प्रकाशमान होणाऱ्या मुखांत—**विशन्ति**—प्रवेश करितात २८.

---

१ शोक करीत. २ ग्रासिला. ३ निमित्तानें. ४ न समजे. ५ उगाच, व्यर्थ. ६ तरवारी व कवचासकट. ७ यम. ८ एकवीस. ९ प्रतिकूल. १० संग्रह करणारांची. ११ ऐश्वर्य. १२ लयास. १३ पसरलीं, तयार झालेलीं. १४ तोंडांतून. १५ अग्रभाग, कोंबारे, टाहळे. १६ उंटानें. १७ मस्तकें. १८ चिमट्यांत. १९ पूड, चुरा, पीठ. २० टोंकें, अग्रें. २१ दाढांची. २२ सांगाडे. २३ चांगली, उत्तम. २४ मस्तक. २५ जन्मलेल्या प्राण्याला. २६ दुसरा मार्गच. २७ निरिच्छ, उगा राहून, स्वस्थ राहून. २८ प्राणिमात्र.

जैसे महानदीचे वोघ । वहिले ठाकिती समुद्राचें आंग। तैसें आघवाचिकडूनि जग । प्रवेशत मुखीं ॥ २३ ॥ आयुष्यपंथें प्राणिगणी । करोनि अहोरात्रांची मोवणी । वेगें वक्त्रामिळणीं । साधिजत आहाती ॥ २४ ॥

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

जळतया गिरीच्यां गवखां- । माजीं घापती पतंगाचिया झांका । तैसे समग्र लोक देखा । इये वदनीं पडती ॥ २५ ॥ परि जेतुलें येथ प्रवेशलें । तें तातलिंया लोहें पाणीचि पां गिळिलें । वहिंवटींहि पुसिलें । नामरूप तयांचें ॥ २६ ॥

लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनेर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥

आणि येतुलाही आरोगण । करितां भुके नाहीं उणेपण। कैसें दीपन असाधारण। उदयलें यया ॥ २७ ॥ जैसा रोगिया ज्वराहूनि उठिला । कां भणगा दुकाळु पाहला । तैसा जिभांचा लळलळाटु देखिला । आवोंळुवें चाटितां ॥ २८ ॥ तैसें आहाराचे नांवें कांहीं । तोंडापासूनि उरलेंचि नाहीं। कैसी समसमीत नवाई । भुकेलेपणाची ॥ २९ ॥ काय सागराचा घोंटु भरावा ? । कीं पर्वताचा घांसु करावा ? । ब्रह्मकटाहो घालावा । आघवाचि दाढे ॥ ४३० ॥ दिशा सगळियाचि गिळाविया । चांदिणिया चाटूनि घ्याविया । ऐसें वर्तत आहे सावियां । लोलुप्य बा तुझें ॥ ३१ ॥ जैसा भोगीं कामु वाढे । कां इंधनें आगीसि हाकांक चढे । तैसीं खातखातांचि तोंडें । खांखांतें ठेलीं ॥ ३२ ॥ कैसें एकचि केवढें पसरलें । त्रिभुवन जिव्हाग्रीं आहे टेकलें । जैसें कां कंवीठ घातलें । वडवानळीं ॥ ३३ ॥ ऐसीं अपार वदनें । आतां येतुलीं कैंचीं त्रिभुवनें । कां आहारु न मिळतां येणें मानें । वाढविलीं सैंघ ॥ ३४ ॥ अगा हा लोकु बापुडा । जाहला वदनज्वाळां वरपडा । जैसी वणवेयाचिया वेढां । सांपडती मृगें ॥ ३५ ॥ आतां तैसें या विश्वा जाहालें । देव नव्हे हें कर्म आलें । कां जग चळचळां पांगिलें [२४] । काळजाळें ॥ ३६ ॥ आतां इये अंगप्रभेचिये वांगुरे । कोणीकडूनि निगिजैल चराचरें । हीं वक्त्रें नोहेति जोहारें । वोडवलीं जगा ॥ ३७ ॥ आगी आपुले दाहकपणें । कैसेनि पोळिजे ते नेणें । परी जया लागे तया प्राणें ।

ज्याप्रमाणें महानद्यांचे प्रवाह सहज सत्वर समुद्रास येऊन मिळतात, त्याप्रमाणें सर्व जग चोहोंकडून वेगानें येऊन तुमच्या मुखांत प्रवेश करीत आहे २३. तसेंच सर्व प्राणी समुदाय आयुष्यरूपी मार्गांत दिवसरात्रीच्या सोपानाच्या मापानें त्वरेनें तुमच्या मुखांत येऊन मिळण्याचा योग साधीत आहेत २४.

**अन्वयार्थ**-**यथा**-ज्याप्रमाणें-**पतङ्गः**-पतंग-**समृद्ध-वेगाः**-ज्यांच्यामध्यें मोठा वेग उत्पन्न झाला आहे असे होत्साते-**प्रदीप्तंज्वलनं**-प्रदीप्त अग्नींत-**नाशाय**-नाशासाठीं-**विशन्ति**-प्रवेश करितात-**तथा एव**-त्याचप्रमाणें **लोकाः अपि समृद्धवेगाः** [ **सन्तः** ] हे सर्व लोकहि ज्यांचा वेग अतिशय वाढला आहे असे होत्साते-**तव वक्त्राणि**-तुझ्या मुखामध्यें-**नाशाय**-नाश पावण्यासाठीं **विशन्ति**-प्रवेश करितात २९.

ज्याप्रमाणें वणवा लागलेल्या डोंगराच्या दरींमध्यें पतंग समुदाय उड्या घालतात त्याप्रमाणें हे पहा ! सर्व लोक तुमच्या मुखांत येऊन पडत आहे २५. परंतु ज्याप्रमाणें तापलेल्या लोखंडावर पाणी पडलें असतां जळून खाक होतें, त्याप्रमाणें जेवढ्या म्हणून प्राण्यांनी तुमच्या मुखांत प्रवेश केला. त्यांचें नांवरूप वहिवाटींतून देखील अजीबात पुसून टाकलें [ त्यांच्या नांवरूपांचा पत्ता देखील नाहीसा झाला ] २६.

**अन्वयार्थ**-**हे विष्णो**-हे व्यापक देवा !-**त्वं**-तूं-**समन्तात्**-सर्व बाजूंनीं-**समग्रान् लोकान्**-सर्व लोकांना **ज्वलद्भिः वदनैः**-जळत असलेल्या तोंडांनीं-**ग्रसमानः**-ग्रासणारा गिळणारा असा होत्साता-**लेलिह्यसे**-त्याचा स्वाद घेतोस-**तव**-तुझ्या-**उग्राः भासः**-उग्र कांति-**समग्रं जगत्**-समग्र जगाला-**तेजोभिः**-तेजांनीं-**आपूर्य**-भरून सोडून-**प्रतपन्ति**-अतिशय ताप देतात ३०.

आणि याप्रमाणें इतक्या सर्व जगाचें भक्षण करूनहि तुमची भूक मुळींच कमी होत नाहीं, ती नाहींच; उलट तुमचा जठराग्नि इतका विशेष रूपानें प्रदीप्त तरी झाला कसा ? २७. ज्याप्रमाणें एखादा रोगी तापांतून बरा झाल्यावर त्याला खा, खा सुटते किंवा एखादा भिकारी दुष्काळांतून सुकाळांत आला म्हणजे त्यास खा, खा सुटते त्याप्रमाणें सर्व जगाचा लय करूनहि अजून तुम्हीं जिभल्यांनी ओठ चाटीत असतां त्या जिभल्यांची गडबड दिसते. २८. त्याचप्रमाणें या तुमच्या तोंडापासून जेवढें म्हणून खाण्याचें जिन्नस आहेत. त्यापैकीं एकहि जिन्नस वेगळा उरला नाहीं. तेव्हां आपल्या या खरमरीत भुकेचा अपूर्व महिमा काय वर्णन करावा ! २९. संपूर्ण समुद्राचाच एक घोंट करून तो पिऊन टाकावा काय, पर्वताचा एक घांस करावा कीं काय ? हा सर्व ब्रह्मगोलच दाढेखालीं घालून चिरडावा कीं काय ? ४३०. सर्व दिशाच गिळून टाकाव्या, साऱ्या चांदण्या चाटून पुसून घ्याव्यात, अशा प्रकारचा तुमचा हावरेपणा सहजच नजरेस येत आहे ३१. ज्याप्रमाणें विषय भोग भोगूं लागलें असतां भोग विषयक काम अधिकच वाढतो, किंवा विस्तवाला जों जों सरपणाची लांकडे लावावी तों तों तो जास्तीच भडकतो, त्याप्रमाणें सर्व जगाला खात असतांहि पुनः पुनः तुमचीं तोंडें खा, खा करीतच राहिलीं आहेत ३२. ज्याप्रमाणें वडवानळांत एखादे कवठ टाकलें असतां तें त्याला पुरत नाहीं, त्याप्रमाणें आपलें हें एकच तोंड कसे व केवढें पसरलें आहे ! पहा कीं, त्याच्या जिभेच्या फक्त टोकावरच हें सर्व त्रिभुवन मोहरीसारखें राहिलें आहे ३३. तेव्हां एका तोंडाची जर ही वाट, झाली तर तुमच्या या विश्वरूपांत असलेल्या अशा अगणित तोंडांना इतकीं त्रिभुवनें कोठून आणावीं ? तेव्हां त्यांना पुरेसा आहार मिळत नसून त्यानें हीं तोंडे इतकीं पुष्कळ कां निर्माण केलीं आहेत ३४, अहो ! ज्याप्रमाणें चोहोंकडून वणवा लागून मध्यें हरणें सांपडावींत त्याप्रमाणें बिचारे सर्व जग तुमच्या या वदनरूपी ज्वाळांच्या भडक्यामध्यें सांपडलें आहे ३५. आतां या विश्वाची तशीच स्थिति झाली आहे कीं, तुम्हीं देव नसून या विश्वरूपानें त्या सर्वांचे अनिष्ट कर्मच ओढवलें आहे किंवा जगत्‌रूपी जळचरांना तुमचें वदनरूपी काळजाळेंच पसरलें आहे ३६. मग आतां तुमच्या या विश्वरूपाच्या तेजरूपी जाळ्यांतून स्थावरजंगम वस्तूंनीं कोणीकडून बाहेर पडावें ? हीं तुमचीं तोंडें नसून जगाला पेटलेली लाक्षागृहेंच ओढवलीं आहेत ! असे वाटते ३७. आपल्या प्रखर तेजाने आपण प्राणिमात्रांच्या अंगास कसे पोळतो हें अग्नीला

१ सत्वर. २ प्राणिसमुदायांनीं. ३ सोपान, पायऱ्या. ४ डोंगराच्या. ५ छिद्रांमध्यें, गुहेंत, दरींत. ६ पडतात, घातल्या जातात. ७ उड्या. ८ तापलेल्या लोखंडावर. ९ वहिवाटींतून. १० भोजन. ११ तीव्र क्षुधा, जठराग्नीचें प्रदीप्तपण. १२ ओष्ठाग्रें. १३ चमचमीत, खरोखर. १४ महिमा. १५ सर्वथा. १६ हावरेपणा, उत्कंठा. १७ सर्पणानें. १८ भंडका. १९ खाखावलेली. २० कवठीचें फळ. २१ पुष्कळ. २२ सांपडला. २३ वेष्टला गेला, स्वाधीन झालास. २४ पसरलें, लावलें. २५ जाळ्यांतून. २६ बाहेर पडवेल. २७ लाक्षागृहें.

सुटिकाची नाहीं ॥ ३८ ॥ नातरी माझेनि तिखटपणें । कैसें निवटे हें शस्त्र कायि जाणें । कां आपुलियां मारा नेणें । विष जैसें ॥३९॥ तैसी तुज कांहीं । आपुलिया उग्रपणाची सेचि नाहीं । परी ऐलीकडिले मुखीं खाई । हो सरली जगाची ॥४४०॥ अगा आत्मा तूं एकु । सकळ विश्वव्यापकु । तरी कां आम्हां अंतकु । तैसा वोडवलासी ? ॥ ४१ ॥ तरी मियां सांडिली जीवित्वाची चाड । आणि तुवांही न धरावी भीड । मनीं आहे तें उघड । बोल पां सुखें ॥४२॥ किती वाढविसी या उग्ररूपा । आंगींचें भगवंतपण आठवीं बापा । नाहीं तरी कृपा । मजपुरती पाही ॥ ४३ ॥

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

तरी एक वेळ वेदवेद्या । जी त्रिभुवनैक आद्या । विनवणी विश्ववंद्या । आइकें माझी ॥४४॥ ऐसें बोलोनि वीरें । चरण नमस्कारिलें शिरें । मग म्हणे तरी सर्वेश्वरें । अवधारिजो ॥ ४५ ॥ मियां होआवया समाधान । जी पुसिलें विश्वरूपध्यान । आणि एकेंचि काळें त्रिभुवन । गिळितुचि उठिलासि ॥ ४६ ॥ तरी तूं कोण कां येतुली । इयें भ्यासुरें मुखें कां मेळविलीं । अवघियाचि करीं परिजिलीं । शस्त्रें कांह्यां ॥ ४७ ॥ जी जंव तंव रागीटपणें । वाढोनि गगना आणितोसि उणें । कां डोळे करूनि भिंगुळवाणे । भेडसावीत आहासी ॥ ४८ ॥ एथ कृतांतेंसि देवा । कासया किजतसे हेवा । हा आपुला तुवां सांगावा । अभिप्राय मज ॥ ४९ ॥ या बोला म्हणे अनंतु । मी कोण हें आहासी पुसतु । आणि कायिसयालागीं असे वाढतु । उग्रतेसी ॥ ४५० ॥

श्रीभगवानुवाच :—

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥

तरी मी काळु गा हें फुडें । लोक संहारावयालागीं वाढें । सैंघें पसरिलीं आहातीं तोंडें । आतां ग्रासीन हें आघवें ॥ ५१ ॥ एथ अर्जुन म्हणे कटकटा । उबगिलों मागिल्या संकटा । म्हणौनि ओळविला तंव वोखटा । उवाइला हा ॥ ५२ ॥ तेवींचि कठिण बोलें आसंतुटी । अर्जुन होईल हिंपुटी । म्हणौनि सवेंचि म्हणे किरीटी । परि आन एक असे ॥ ५३ ॥ तरी आतांचिये संहारवोंहरे ।

समजत नाहीं; परंतु ज्याला त्याचा स्पर्श होतो, त्याचा मात्र प्राण गेल्याशिवाय रहात नाहीं ३८. किंवा आपल्या तीक्ष्ण धारेनें दुसऱ्याला कसें बरे मरण येतें, हें त्या शस्त्राला काय माहीती? अथवा आपण आपल्या सेवनानें लोकांचें प्राणघातक कसे आहोत हें जसें विषाला समजत नाहीं ३९. त्याप्रमाणें तुमच्या मुखांच्या प्रखरपणाची तुम्हांला अजिबात आठवणच नाहीं; परंतु तुमच्या या अलीकडील मुखांतच सर्व जगाची होळी होऊन राहिली आहे ४४०. देवा! आत्मा म्हणून ज्याला म्हणतात, तो जर तुम्ही एकच असून सर्व विश्वांत ओतप्रोत व्यापकहि आहांत तर मग प्राणघातक यमाप्रमाणें आमचा नाश करण्यास कां प्रवृत्त झालां आहांत? ४१. मी तर आपल्या जीवित्वाविषयींची आशाच सोडली आहे; आणि तुम्हीही भीड-भाड न धरतां तुमच्या मनांत जें काय करावयाचे असेल तें खुशाल उघडपणें सांगा पाहूं ४२. तुम्ही आपल्या या विश्वरूपाचें उग्रपण किती वाढवित आहांत? देवा! तुमच्या अंगीं जे भगवंतपण म्हणजे जगाचा पालनकर्तेंपणा आहे, त्याची कांहीं तरीं आठवण करा हो! नाहींतर निदानपक्षीं माझ्यापुरती तरी कृपा करा! ४३.

**अन्वयार्थ**—**उग्ररूपः भवान् कः**–भयंकर रूप घेतलेले आपण कोण आहां तें–**मे**–मला–**आख्याहि**–सांगा–**ते नमः अस्तु**–[ हे देवा ] तुला नमस्कार असो–**हे देववर**-हे देवांतील श्रेष्ठ देवा!–**प्रसीद**–मजवर प्रसन्न व्हा–**भगवन्तम् आद्यम्**–आपण जें जगाचें आदिकारण त्या तुम्हांला–**विज्ञातुम् इच्छामि**–मी जाणण्याची इच्छा करतो–**हि**–कारण–**तव प्रवृत्तिं**–तुझ्या या चेष्टेला–**न प्रजानामि**–मी जाणूं शकत नाहीं! ३१.

अहो! वेदवंद्य, वेदैकवेद्य असणाऱ्या त्रिभुवनैक आद्य म्ह० मूळ कारणा विश्ववंद्य महाराज! माझी एवढी एक वेळ विनंती ऐकावी ४४. याप्रमाणें बोलून शूर अर्जुनानें भगवंताच्या चरणास आपल्या मस्तकानें नमस्कार केला आणि म्हटलें, "हे सर्वेश्वरा आतां माझी विनंती ऐकावी ४५. मला समाधान व्हावें म्हणून 'विश्वरूपाचे ध्यान दाखवा' असें मी विचारलें तो लगेंच तुम्ही एकदम सर्व त्रिभुवनाचा संहार करण्याच्या हेतूनें मोठें भयंकर रूप धारण करून सर्वांस गिळीतच सुटला आहांत ४६. तेव्हां तुम्ही आहांत तरी कोण? अशी ही इतकीं भयंकर तोंडें कां धारण केली आणि त्याचप्रमाणें ह्या सर्वच हातांत शस्त्रें कशाकरितां धारण केली आहेत? ४७. वारंवार रागाच्या आवेशामुळें अधिकाधिक विशाल होऊन गगनासहि कमीपणा आणीत आहांत व डोळे भयंकर लाल करून, वटारून आम्हांला भीति काय म्हणून दाखवित आहांत? ४८. देवा! या ठिकाणीं सर्व संहारक यमाशीं स्पर्धा काय म्हणून करीत आहांत? असें उग्र रूप धारण करण्याचा तुमचा काय हेतु आहे, तो तरी आपण मला सांगा!" ४९. अर्जुनाचें हें बोलणें ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, "मी कोण आहे व कशाकरितां एवढी उग्र रूपें धारण करून एवढा मोठा झालों आहें, हेच ना तूं विचारीत आहेस!" ४५०.

**अन्वयार्थ**—[ **अहं**–मी ] **लोकक्षयकृत् कालः**—लोकांचा क्षय करणारा काल–**प्रवृद्धः अस्मि**–अतिशय वृद्धि पावलों आहें–**इह**–यावेळीं–**लोकान्**–लोकांना–**समाहर्तुं**–मारण्यास त्याचा संहार करण्यास–**प्रवृत्तः**–प्रवृत्त झालों आहें–**प्रत्यनीकेषु ये योधाः अवस्थिताः**–शत्रूंच्या प्रत्येक सैन्यांत जे योद्धे स्थित आहेत–[**ते**] **सर्वे**–ते सर्व–**त्वाम् ऋते अपि**–तुझ्यावांचूनहि–**न भविष्यन्ति**–नाहींसे होतील ३२.

"ऐक तर, अरे! खरोखर मी काळ आहे व लोकांचा संहार करण्याकरितां मोठा वाढून चहूंकडे माझी तोंडें पसरलीं आहेत आणि आतां मी या सर्व विश्वाला गिळून टाकीन" ५१. असें ऐकून अर्जुन म्हणतो, "अरेरे! मागल्या संकटाला त्रासून या देवाची प्रार्थना केली, तों त्यावर हा परमात्मा हें उलट जास्तच भयंकर रीतीनें उसळून प्रगट झाला आहे" ५२. आपल्या अशा कठोर भाषणानें अर्जुन निराश होऊन कष्टी होईल, म्हणून श्रीकृष्ण अर्जुनास पुनः लगेच म्हणाले, पण यांत आणखी एक सवड आहे ५३.

१ मरे. २ पेटलेला खंदक, चर. ३ होऊं लागली, झाली. ४ प्रवृत्त झालास. ५ एवढी. ६ भयंकर. ७ धारण केलीं ८ कशाकरितां. ९ भयंकर, झालास. १० मत्सर, स्पर्धा. ११ खरें. १२ बहुत. १३ अरे अरे. १४ कंटाळलों. १५ प्रार्थिला. १६ वाईट. १७ प्रगट झाला. १८ निराशा. १९ खिन्न, कष्टी. २० लाक्षागृहें संहाररूपी संकटांतून, बागेतून.

तुम्ही पांडव असा बाहिरे । तेथ जातजातां धनुर्धरें । सांवरिले प्राण ॥ ५४ ॥ होतां मरणमहामारीं गेला । तो मागुता सावधु जाहला । मग लागला बोला । चित्त देऊं ॥ ५५ ॥ ऐसें म्हणिजत आहे देवें । अर्जुना तुम्ही माझें हें जाणावें । येर जाण मी आघवें । सरेलों ग्रासूं ॥ ५६ ॥ वज्रानळीं प्रचंडीं । जैसी घांपे लोणियाची उंडी । तैसें जग हें माझिया तोंडीं । तुवां देखिलें जें ॥ ५७ ॥ तरी तयामाझारीं कांहीं । भरंवसेनि उणें नाहीं । इये वायांचि सैन्यें पाहीं । बरवंतें आहाती ॥ ५८ ॥ ऐसा चतुरंगाचिया संपदा । करित महाकाळेंसीं स्पर्धा । वांटिवेंचियो मदां । वळंघले जे ॥ ५९ ॥ हे जे मिळोनियां मेळे । कुंथती वीरवृत्तींचेनि बळें । यमावरी गजदळें । वाखाणिजताती ॥ ४६० ॥ म्हणती सृष्टीवरी सृष्टी करूं । आण वाहूनि मृत्यूतें मारूं । आणि जगाचा भरूं । घोंटु यया ॥ ६१ ॥ पृथ्वी सगळीचि गिळूं । आकाश वरिच्यावरी जाळूं । कां बाणवरी खिळूं । वारयातें ॥ ६२ ॥ बोल हतियेरांहूनि तिखट । दिसती अग्निपरिस दासट । मारकपणें काळकूट । मैहुर म्हणत ॥ ६३ ॥ तरी हे गंधर्वनगरींचे उभाळे । जाण पोकळीचे पेंडवळें । अगा चित्रींव फळें । वीर हे देखें ॥ ६४ ॥ हां गा मृगजळाचा पूर आला । दळ नव्हे कापडाचा साप केला । इया शृंगारूनियां खोला । मांडिलिया पैं ॥ ६५ ॥

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

येर चेष्टविते जें बळ । तें मागांचि मियां ग्रासिलें सकळ । आतां कोल्हारिचे वेताळ । तैसे निर्जीव हे आहाती ॥ ६६ ॥ हालविती दोरी तुटली । तरी तियें खांबावरील बाहुलीं । भलतेणें लोटिलीं । उलथोनि पडती ॥ ६७ ॥ तैसा सैन्याचा यया बगा । मोडतां वेळ न लगेल पैं गा । म्हणौनि उठीं उठीं वेगां । शाहाणा होईं ॥ ६८ ॥ तुवां गोग्रहणाचेनि अवसरें । घातलें मोहनास्त्र एकसरें । मग विराटाचेनि मैहामेडें उत्तरें । आंसडूनि नागविलें ॥ ६९ ॥ आतां हें त्याहूनि निपटौरें जहालें । निवटीं आयितें रण पडिलें । घेईं यश रिपु जिंतिलें । एकलेनि अर्जुनें ॥ ४७० ॥ आणि कोरडें यशाचि नोहे । समग्र राज्यही आलें आहे । तूं निमित्तमात्रचि होयें । सव्यसाची ॥ ७१ ॥

ती ही कीं, "तुम्ही फक्त पांडव आतांच्या या संहार-रूपी संकटांतून बाहेर आहांत" एवढें ऐकतांच अर्जुनाच्या जीवांत जीव आला व जाणाऱ्या बेतातले आपले प्राण, सांवरून धरले ५४. तो मृत्युरूप महामारीच्या तडाक्यांत सांपडला होता, पण हे देवाचें शब्द ऐकतांच पुनः सावध होऊन श्रीकृष्णाचे बोल लक्षपूर्वक ऐकूं लागला ५५. तेव्हां देव असें म्हणाले कीं, "अर्जुना! अरे तुम्ही पांडव तेवढें माझे आहांत, म्हणून तुमच्याशिवाय इतर सर्वांना मी गिळण्याकरितां प्रवृत्त झालों आहे, हें पक्कें लक्षांत ठेवावें ५६. प्रळयकाळच्या प्रचंड अग्नींत लोण्याचा गोळा घातल्यावर जसा तो नाश पावतो, त्याप्रमाणें माझ्या तोंडांत हे सर्व जग गेलेले असे तूं पाहिले आहेसच ५७. तर त्यामध्यें सर्वांचा नाश होऊन कांहींच उरणार नाहीं! हें तूं निःसंशय समज, हें सर्व सैन्य घमेंडीनें व्यर्थ बरळत व मिरवत आहे ५८. अशा चतुरंग सैन्यरूपी संपत्तीच्या सहाय्याच्या बळावर कृतांताबरोबरहि जे स्पर्धा करितात व पराक्रमाच्या मदावर स्वार होऊन म्हणजे गर्वानें जे चढून गेले आहेत ५९. हे जे सर्व या ठिकाणीं सैन्यसमुदाय एकत्र मिळून वीरवृत्तीच्या बळावर घमेंडपूर्ण मोठ्या डौलानें वल्गना करीत आहेत कीं, यमहि आमच्या गजदळादि सैन्यापुढें तुच्छ आहे, असें त्याचे वर्णन करतात ४६०. ते म्हणतात कीं, आम्ही सृष्टीवर प्रतिसृष्टि निर्माण करूं, शपथ वाहून मृत्यूला मारूं व या जगाचा घोट घेऊन संहार करूं ६१. आम्ही ही सर्वच पृथ्वी गिळून टाकूं, हे आकाश तर वरच्यावरच जाळून भस्म करून टाकूं व आपल्या बाणानें वाऱ्याला सुद्धां जागच्या जागीं जखडून हलूं देणार नाहीं ६२. शस्त्रापेक्षां ज्याचे बोल अति तिखट आहेत. जे अग्निपेक्षां अतिदाहक आहेत, असें दिसून येते व मारण्याच्या कामांत काळकूट विषाशीं तुलना केली तर या शब्दापेक्षां काळकूट विषाला मधुर असें म्हणावे लागेल. [ अशी ते व्यर्थ वल्गना करीत आहेत ] ६३. तर हे वीर म्हणजे जणुं गंधर्वनगरीचे लोट असावेत किंवा पोकळीचें मेंडोळें असावें अथवा चित्रांतील रंगीत दिखाऊ फळें असावीत, त्याप्रमाणें हे निर्जीव आहेत, असें समज ६४. अरे! जसा मृगजलाचा पूर यावा तद्वत् हें सैन्य आहे; अथवा हें सैन्य नव्हे, तर जणुं कापडाचा साप करावा किंवा अलंकार घालून सजवून बाहुली उभी करावी तशीं हीं निर्जीव सैन्यें होत ६५.

**अन्वयार्थ—तस्मात्**–म्हणून–**त्वं**–तूं–**उत्तिष्ठ**–ऊठ **यशः लभस्व**–यश संपादन कर–**शत्रून् जित्वा**–शत्रूंना जिंकून–**समृद्धं राज्यं**–संपन्न राज्य–**भुंक्ष्व**–भोग–**एते**–हे भीष्मादिक–**मया एव**–मीच–**पूर्वं**–पूर्वीं–**निहताः एव**–मारले आहेत व त्यासाठीं–**सव्यसाचिन्**–हें अर्जुना!–**निमित्तमात्रं भव**–तूं नुसता निमित्त हो ३३.

एऱ्हवीं, ज्या बळावर शरीराच्या चेष्टा-क्रिया चालतात, तें सर्व बळ मी पूर्वींच ग्रासून टाकलें आहे. आतां हें सर्व सैन्य कुंभाराच्या मातीच्या चित्रांतील बाहुल्यांप्रमाणें किंवा चित्रीव घोडेस्वारांप्रमाणें निर्जीव आहे ६६. त्या कळसूत्री खांबावरील बाहुल्यांना हलविणारी दोरी तुटली म्हणजे मग वाटेल त्यानें त्या बाहुल्यास लोटलीं तरी त्या जशी उलथून पडतात ६७. त्याप्रमाणें या सर्व सैन्याचा आकार मोडून टाकण्यास अजिबात वेळ लागणार नाहीं. म्हणून अर्जुना, उठ! उठ! लवकर शहाणा हो!! ६८. विराट राजाच्या गाई हरण करण्यासाठीं [ कौरव मत्स्य देशांत ] आले होते, त्यावेळीं तूं सरसकट सर्वांवरच मोहनास्त्र घातलेस व विराट राजाच्या अतिशय भित्र्या अशा उत्तर-संज्ञक मुलाकरवीं सर्व कौरवांचीं वस्त्रें हिसकाऊन घेऊन त्यांस नग्न करून सोडलेस ६९. तेंच हें सैन्य आतां त्या वेळेपेक्षां निस्तेज–निकृष्ट झालेलें आहे व आयता युद्धप्रसंगहि आलेला आहे, तेव्हां त्यांचा संहार कर व 'एकट्या अर्जुनानें शत्रूंस जिंकलें' असें यश मिळीव ४७०. आणि ते कोरडे निष्फल यशाच मिळणार आहे असे नव्हे, तर त्याच्या बरोबर संपूर्ण राज्यहि त्यांत सहजीं आलेले आहे. हे सव्यसाचिन्! तूं केवळ नांवाला निमित्त मात्र कारण हो ७१.

१ बाहेर आहां. २ प्रवर्तलों. ३ प्रलयाग्नींत. ४ सांपडे. ५ बडबडत. ६ पराक्रमाच्या. ७ अहंकाराला. ८ यश झालें, वेधलें. ९ शूर वृत्तीच्या. १० शस्त्रापेक्षां. ११ दाहक. १२ मधुर. १३ उसळी, उद्भव. १४ मेंडोळें. १५ सोय. १६ खेळणीं. १७ कुंभाराच्या घरचे. १८ पुतळे. १९ आकार. २० अति भितऱ्या. २१ [ वस्त्रें ] हिसकावून.

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान्।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युद्धयस्व जेतासि रणे सपत्नान् ॥३४॥

द्रोणाचा पाडु न करीं । भीष्माचें भय न धरीं । कैसेनि कर्णावरी । परंजूं हें न म्हण ॥ ७२ ॥ कोण उपायो जयद्रथा कीजे । हें न चिंतूं चित्त तुझें । आणिकही आथि जे जे । नांवाणिगे वीर ॥७३॥ तेही एक एक आघवें । चित्रींचे सिंहाडे मानावे । जैसे वोलेनि हातें घ्यावें । पुसोनियां ॥ ७४ ॥ यावरी पांडवा । काइसा युद्धाचा मेळावा ? । हा आंभासु गा आघवा । येर ग्रासिलें मियां ॥ ७५ ॥ जेव्हां तुवां देखिलें । हे माझिया वदनीं पडिले । तेव्हांचि यांचें आयुष्य सरलें । आतां रितीं सोपें ॥ ७६ ॥ म्हणौनि वहिलां उठीं । मियां मारिले तूं निवटीं । न रिगे शोकसंकटीं । नाथिलियां ॥ ७७ ॥ आपणचि आंडखिळा कीजे । तो कौतुकें जैसा विंधोनि पाडिजे । तैसें देखें गा तुझें । निमित्त आहे ॥ ७८ ॥ बापा विरुद्ध जें जाहलें । तें उपजतांचि वाघें नेलें । आतां राज्येंशीं संचलें । यश तूं भोगीं ॥ ७९ ॥ सावियांचि उंतत होते दायाद । आणि बळिये जगीं दुर्मद । ते वधिले विशद । सायासु न लागतां ॥ ४८० ॥ ऐसिया इया गोष्टी । विश्वाच्या वाक्पेटीं । लिहूनि घाली किरीटी । जगामाजीं ॥ ८१ ॥

संजय उवाच :—

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥

ऐसी आघवीचि हे कथा । तया अपूर्ण मनोरथा । संजयो सांगे कुरुनाथा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ८२ ॥ मग सत्यलोकौनि गंगाजळ । सुटलिया वाजत खळाळें । तैशी वाचा विशाळ । बोलतां तया ॥ ८३ ॥ नातरी महामेघांचे उमाळे । घडघडीत एके वेळे । कां घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धी जैसा ॥ ८४ ॥ तैसें गंभीरें महानादें । हें वाक्य विश्वकंदें । बोलिलें अगाधें । अनंतरूपें ॥ ८५ ॥ तें अर्जुनें मोटकें ऐकिलें । आणि सुख कीं भय दुणावलें । हें नेणों परि कांपिन्नलें सर्वांग तयाचें ॥ ८६ ॥ सखोलपणें वळली मोट । आणि तैसेचि जोडले करसंपुट । आणि वेळोवेळां ललाट । चरणीं ठेवी ॥ ८७ ॥ तेवींचि कांहीं बोलों जाये । तंव गळा बुजालाचि ठाये । हें सुख कीं भय होये । हें विचारा तुम्हीं ॥ ८८ ॥ परि तेव्हां देवाचेनि बोलें । अर्जुना हें ऐसें जाहलें । मियां पदांवरूनि

**अन्वयार्थ–द्रोणं**–द्रोणाला–**च भीष्मं**–व भीष्माला–**च जयद्रथं**–व जयद्रथाला–**च कर्णं**–व कर्णाला–**तथा**–तसेंच–**अन्यान् अपि**–दुसऱ्याहि–**मया हतान्**–मी मारलेल्या–**योधवीरान्**–वीर योद्ध्यांस–**त्वं**–तूं–**जहि**–मार–**मा व्यथिष्ठः**–अशी व्यथा पावूं नकोस–त्यांना भिऊं नकोस– **युद्धचस्व** –युद्ध कर–**रणे** –रणांत–**सपत्नान्**–शत्रूंना–**जेतासि**–तूं जिंकशील ३४.

तूं द्रोणाची पर्वा करूं नकोस, भीष्माचें भय बाळगूं नकोस व कर्णावर शस्त्र करें चालवूं असें म्हणूं नकोस ७२. आणि जयद्रथाला मारण्याकरितां कोणत्या उपायाची योजना करावी, याजविषयीं चित्तानें-चिंतन वा विचार मुळींच करूं नकोस. आणखीहि इतर जे जे नामांकित वीर आहेत ७३. ते एक एक पाहिले तर सर्वेहि भिंतीवर काढलेल्या चित्रांतल्या सिंहाप्रमाणें निर्जीव आहेत असें समज. त्यांना काय ओल्या फडक्यानें पुसून टाकावयाचे एवढेंच ७४. असें वास्तविक असतां अर्जुना! या युद्धाकरितां जमलेल्या वीरांची काय कथा आहे? हा सर्व मिथ्या भास मात्र आहे. बाकी त्यांचे तेज, बल इत्यादि सर्व खरोखर मी पूर्वीं ग्रासून टाकलेलेच आहे! ७५. जेव्हां तूं हे सगळे माझ्या तोंडांत गेल्याचे पाहिलेस, तेव्हांच या सर्वांचें आयुष्य संपलें! हे आतां रिकाम्या [ अघळ-पघळ पण पोकळ ] सोंपटाप्रमाणें राहिलेले आहेत ७६. म्हणून लवकर ऊठ आणि मी ज्यांना मारलेलेंच आहे, त्यांचा आतां तूं संहार कर. नसत्या [मिथ्या अशा] शोकसंकटांत पडूं नकोस! ७७. आपणच एखादें निशाण उभे करावें आणि ते जसें कौतुकानें आपणच बाण मारून भेदून पाडावें, त्याप्रमाणें [ सर्वांचा उत्पन्न कर्ता व संहारकर्ता मीच आहे तरीपण] या सर्वांचा नाश करण्याकरितां तुला केवळ निमित्त केले आहे ७८. अरे, बाबा! जे तुझ्याशीं वैर करीत होते, त्यांना उपजतांक्षणींच या विश्वरूपरूपी वाघानें नेलें आहे, तर आतां तूं राज्यासहवर्तमान यश संपादन करून त्याचा खुशाल उपभोग घे ७९. स्वभावतः मदोन्मत्त, सर्व जगांत बलवान् व दुष्ट आणि तुम्हांस विष घालणारे, असें जे तुझे भाऊबंद, ते वेळ न लागतां अर्जुनानें संपूर्ण सहजीं मारलें ४८०. अशा प्रकारच्या या गोष्टी अर्जुना, जगांतील लोकांच्या वाक्पटावर लिहून ठेव. अर्थात् विश्वाच्या इतिहासपटावर ही गोष्ट सदाचीच लिहिली जाईल असा प्रचंड विजय मिळव ८१.

**अन्वयार्थ**—**केशवस्य** – केशवाचें–श्रीकृष्णाचें–**एतत् वचनं**–हें वचन–**श्रुत्वा**–ऐकून–**कृतांजलिः**–ज्यानें हात जोडले आहेत असा–**वेपमानः**–कांपणारा – **किरीटी** – अर्जुन–**नमस्कृत्वा**–कृष्णाला नमस्कार करून–**भीतभीतः** –अतिशय भ्यालेला तो–**प्रणम्य**–अत्यंत नम्र होऊन **भूयः एव**–पुनरपि–**कृष्णं**–कृष्णाला– **सगद्गदं** –कांपऱ्या आवाजानें-कंठ दाटल्यामुळें अडखळत-**आह**-म्हणाला ३३.

श्रीज्ञानदेव म्हणतातः–याप्रमाणें ही सर्व हकीगत संजयानें अपूर्णमनोरथ अशा राजा धृतराष्ट्राला सांगितली ८२. मग जसा सत्यलोकांतून गंगेचा ओघ निघाल्यावर खळखळ वाजत चालतो, त्याप्रमाणें आपल्या गंभीर वाणीनें श्रीकृष्ण बोलत असतां वाणीची गर्जना होत होती ८३. किंवा जलपूर्ण प्रचंड मेघांचे लोट उठले असतां जसे एकदम गडगडाट करीत सुटतात अथवा समुद्रमंथनाच्या वेळीं क्षीराब्धि जसा मंदराचलाच्या रवीनें दणाणत असून मंथनाचा आवाज घुमत होता ८४. त्याप्रमाणें अगाध व अनंतरूपधारी विश्वाचे मूळ कारण असलेल्या श्रीकृष्णांनी आपल्या गंभीर वाणीनें मोठ्या आवाजांत हे वाक्य उच्चारण केले ८५. तें अर्जुनानें ओझरते थोडेसें ऐकलें न ऐकलें तोंच त्याचें दुप्पटीने सुख वाढलें किंवा दुःख वाढलें हें कांहीं कळलें नाहीं; परंतु त्यामुळें त्याचें सर्वांग थरथरा कांपूं लागले एवढें मात्र खरें! ८६. [ ते दुणावलेले सुख वा भय ] सखोल हृदयांत भिडल्यामुळें त्याची अगदीं मोट वळली जाऊन अति नम्रपणाने [illegible] त्या बरोबरच आपले दोन्ही हात जोडले व तो आपले मस्तक भगवंताच्या चरणावर पुनः पुनः ठेवूं लागला ८७. आणि कांहीं बोलण्याचा प्रयत्न करी तोंच त्याचा कंठ भरून येई. श्रोतेहो! ही स्थिति सुखामुळें झाली किंवा दुःखामुळें झाली, याचा विचार वा निर्णय तुम्हीच आपले मनांत करावा ८८. परंतु त्यावेळीं देवाचे बोलणें ऐकून अर्जुनाची ही अशी स्थिति

१ शस्त्र धारण करूं. २ नामांकित, प्रख्यात. ३ पोतेऱ्यानें. ४ मिथ्याभास. ५ रिकामी. ६ सोंपटें. ७ लवकर. ८ मार. ९ लटक्या. १० लगोरी, निशाण. ११ छेदून. १२ स्वभावतः १३ माजले होते. १४ भाऊबंद. १५ स्पष्ट. १६ वाणीरूपी वस्त्रावर. १७ खळबळ. १८ लोट. १९ दणाणला. २० अमळसें. २१ भरून आला.

देखिलें । श्लोकींचिया ॥ ८९ ॥ मग तैसाचि भेणंभेण । पुढती जोहारूनि चरण । मग म्हणे जी आपण । ऐसें बोलिलेती ॥ ४९० ॥

अर्जुन उवाच :—

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥

ना तरी अर्जुना मी काळु । आणि ग्रासिजे तो माझा खेळु । हा बोलु तुझा कीर अढळु । मानूं आम्ही ॥ ९१ ॥ परि तुवां जी काळें । आजि स्थितीचिये वेळे । ग्रासिजे हें नँ मिळे । विचारासी ॥ ९२ ॥ कैसेनि आंगींचें तारुण्य काढावें ? । कैंचें नव्हे तें वार्धक्य आणावें ? । म्हणौनि करूं म्हणसी तें नव्हे । बहुतकरुनी ॥ ९३ ॥ हां जी चौपाहारीं न भरतां । कोणेही वेळे श्रीअनंता । काय माध्यान्हीं सविता । मावळतु आहे ? ॥ ९४ ॥ पैं तुज अखंडिता काळा । तिन्ही आहाती जी वेळा । त्या तिन्ही परी सबळा । आपुलालिया समयीं ॥ ९५ ॥ जे वेळीं हों लागे उत्पत्ती । ते वेळीं स्थिति प्रळयो हारपती । आणि स्थितिकाळीं न मिरविती । उत्पत्ति प्रळयो ॥ ९६ ॥ पाठीं प्रळयाचिये वेळे । उत्पत्ति स्थिति मावळे । हें कायसेनही न ढळे । अनादि ऐसें ॥ ९७ ॥ म्हणौनि आजि तंव भरें भोगें । स्थिति वर्तिजत आहे जगें । एथ ग्रासिसी तूं हें न लगे । माझ्या जीवीं ॥ ९८ ॥ तंव संकेतें देव बोले । अगा या दोन्ही सैन्यांसीचि मरण पुरलें । तें प्रत्यक्षाचि तुज दाविलें । येर यथाकाळें जाण ॥ ९९ ॥ हा संकेतु जंव अनंता । वेळु लागला बोलतां । तंव अर्जुनें लोकु मागुता । देखिला यथास्थिति ॥ ५०० ॥ मग म्हणतसे देवा । तूं सूत्री विश्वलाघवा । जग आला मा आघवा । पूर्वस्थिति पुढती ॥ १ ॥ परी पडिलिया दुःखसागरीं । तूं काढिसी कां जयापरी । ते कीर्ति तुझी श्रीहरी । आठवित असे ॥ २ ॥ कीर्ति आठवितां वेळोवेळां । भोगीतसें महासुखाचा सोहळा । तेथ हर्षामृतकल्लोळा । वरी लोळत आहें ॥ ३ ॥ देवा जियालेपणें जग । धरी तुझ्या ठायीं अनुराग । आणि दुष्टां तयां भंग । अधिकाधिक ॥ ४ ॥ पैं त्रिभुवनींचिया राक्षसां । महाभय तूं हृषीकेशा । म्हणौनि पळताती दाही दिशां । पैलीकडे ॥ ५ ॥ एथ सुर नर सिद्ध किन्नर । किंबहुना चराचर । ते तुज देखोनि हर्षनिर्भर । नमस्कारित असती ॥ ६ ॥

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।
अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥

झाली हें वरील श्लोकांतील 'भीत भीतः प्रणम्य' पदांवरून हा अर्थ मी जाणला, असें श्रीज्ञानदेव म्हणतात ८९. मग भीत भीत अर्जुनानें भगवंताच्या चरणांवर पुनः मस्तक ठेविलें आणि तो म्हणाला, "महाराज! आपण असेंच ना बोलला!" ४९०.

**अन्वयार्थ**— **हे हृषीकेश**–हे हृशीकेषा! –इंद्रियांच्या ईश्वरा–इंद्रियप्रेरका! –**तव प्रकीर्त्या**–तुझें महात्म्य ऐकून –**जगत्**–सर्व जगत्–**प्रहृष्यति**–अत्यंत हृष्ट होतें–**च**–व–**अनुरज्यते**–अनुरक्त होते, तुझ्यावर प्रीति करते–**तत् स्थाने**–तें योग्यच आहे–**रक्षांसि भीतानि**–राक्षस भयभीत होऊन–**दिशः द्रवन्ति**–दशदिशांकडे पळतात–**च**–व–**सर्वे सिद्धसंघाः**–सर्व सिद्धांचें संघ–**नमस्यंति**–नमस्कार करितात–[ **तत् अपि**–तेंहि–**स्थाने**–योग्य आहे ] ३६.

कीं, 'अर्जुना! मी सर्वभक्षक काळ आहे व ह्या सर्वांना जें ग्रासून टाकणें हा तर केवळ माझा लीलात्मक खेळ आहे.' आम्ही हें तुमचें बोलणें निश्चयेंकरून खरें मानलें असतें; ९१. परंतु हे परमेश्वरा! तुम्ही काळरूपानें [प्रलयकालाविना ] आज जगताच्या पालनात्मक स्थितिकालांतच जगताचा संहार करीन, हे आपले बोलणें माझ्या विचाराशीं बरोबर जुळत नाहीं ९२. एखाद्याच्या अंगांत असलेले तारुण्य कसें काढतां येईल व एकाएकी नसलेले म्हातारपण कसें आणतां येईल ? या गोष्टी जशा अशक्य आहेत तसेच तुम्ही जे स्थितिकालीं जगत् संहार करूं म्हणतां, तरीपण ते बहुत करून होणार नाहीं ९३. हें पहा! श्रीअनंता, दिवसाचें चार प्रहर न भरतांच कधींतरी भर दुपारींच सूर्य मावळला आहे काय ? ९४. इतकेंच नव्हें, तर हें पहा तुम्ही अखंडित असे जे काल त्या आपल्यालाहि तीन [उत्पत्ति, स्थिति व प्रलय] स्थिति आहेत आणि त्या प्रत्येक आपापल्या काळीं पूर्ण बलवान् आहेत ९५. त्या अशा कीं ज्या वेळेस उत्पत्ति होऊं लागते, त्या वेळीं स्थिति व प्रळय ह्या दोन्ही अवस्था नाहींतशा होतात, आणि स्थितीच्या वेळेस उत्पत्ति व प्रळय या दोन अवस्थांचें कांहींहि चालत नाहीं; ९६. आणि उत्पत्ति स्थितीचें मागाहून येणाऱ्या प्रलयाच्या वेळीं उत्पत्ति व स्थिति ह्या दोन अवस्था आपोआप मावळतात. ह्या अवस्थांचा असा क्रम अनादि कालापासूनच असून ती व्यवस्थिति कशानेंहि ढळत नाहीं ९७. म्हणून आज तर हें जग स्थितिकालांतील उपभोग घेण्याच्या भरांत वावरत आहे असें असतां त्याचा आपण कालरूपानें संहार करीन असें म्हणतां ही गोष्ट माझ्या मनाला पटत नाहीं" ९८. तेव्हां खुणेनें देव म्हणाले, "अरे! फक्त ह्या दोन्ही सैन्यांचेंच आयुष्य संपलें आहे, हें तर मी प्रत्यक्ष तुला तत्त्वतः दाखविलेंच आहे; परंतु यांच्याशिवाय इतर सर्व लोक यथाकालींच मरण पावतील असें समज" ९९. इतकी संकेतानें ही गोष्ट भगवंतास सांगण्यास जेवढा वेळ लागला तेवढ्याच वेळांत अर्जुनानें सर्व लोक पूर्ववत् जागच्या जागीं आहेत असें पुनः पाहिलें ५००. मग तो म्हणतो, "देवा! आपण विश्वाचें चलन करणारे सूत्रधार आहांत. अहो देवा! हें जग पुनः पूर्वस्थितीला आले आहे कीं!! १. परंतु हे श्रीहरी! दुःखसागरांत पडलेल्या जीवांना तुम्ही ज्या प्रकाराने बाहेर काढतां अशी जी तुमची कीर्ति आहे, ती मी आजहि पूर्ण आठवित आहे २. त्या तुमच्या कीर्तीची वारंवार आठवण झाली म्हणजे महासुखाचा सोहळा भोगीत असतो. व त्या आनंदरूपी अमृत समुद्राच्या लाटांवर मी लोळतो आहे ३. देवा, हें जग जिवंत राहिल्यामुळें तुमच्या ठिकाणीं प्रीति धरीत आहे व सुखानें राहात आहे व जें दुष्ट आहेत त्यांना मात्र आपणापासून नाशाचें अधिकाधिक भय उत्पन्न झालें आहे ४. हे हृषिकेशा! त्रिभुवनांतल्या राक्षसांना आपण महाभय, साक्षात् काळच आहांत. म्हणून तुमच्यापासून ते दाही दिशांच्या पलिकडे दूर पळून जातात ५. जे देव, मनुष्य, सिद्ध व किन्नर किंबहुना!! सर्व स्थावरजंगमात्मक हे विश्व तुम्हांला हर्षयुक्त होऊन नमस्कार करीत आहे ६.

**अन्वयार्थ**—**हे महात्मन्**–हे महात्म्या!–**गरीयसे**–अतिशय गुरु व–**ब्रह्मणः अपि आदिकर्त्रे**–ब्रह्मदेवाचाहि आदिकर्ता अशा–**ते**–तुला–**कस्मात् च**–कां बरें ते सिद्धादिक–**न नमेरन्**–नमस्कार करणार नाहींत ?–**हे अनंत देवेश जगन्निवास**–हे अनंता! हे देवाधिदेवा! हे जगन्निवासा!–**यत् सदसत्तत्परं**–जें सत्, असत् व यांहून परविलक्षण असलेलें – **अक्षरम्** –अक्षर–ब्रह्म–[ **तत्** –तें– ] **त्वं**–[ **एव** ]–तूंच आहेस ३७.

१ भीतभीत. २ नमस्कार करून. ३ स्वास्थ्याचे, पालनाचे. ४ जुळत नाहीं. ५ दिवसाचे चार प्रहर. ६ सूर्य. ७ बळयुक्त. ८ स्वास्थ्य, पालन. ९ कशानेंहि. १० संक्षेपानें, खुणेनें. ११ मरण. १२ पूर्ववत्. १३ सूत्रधार. १४ विश्वाचे हालचालीस. १५ आनंदसमूह. १६ जिवंतपणें, जगलेपणानें, जीवदान दिल्यानें. १७ प्रीति. १८ आनंदित.

एथ गा कवणा कारणा । राक्षस हे नारायणा । न लगतीचि चरणा । पळते जाहले ॥७॥ आणि हें काय तूंतें पुसावें । येतुलें आम्हांसिही जाणवे । तरी सूर्योदयीं राहावें । कैसेनि तमें ? ॥ ८ ॥ जी तूं प्रकाशाचा आगरू । आणि जाहला आम्हांसि गोचरू । म्हणौनियां निशाचरां केरु । फिटला सहजें ॥९॥ हें येतुले दिवस आम्हां । कांहीं नेणवेचि श्रीरामा । आतां देखतसों महिमा । गंभीर तुझा ॥ ५१०॥ जेथूनि नाना सृष्टींचिया वोळी । पसरती भूतग्रामाचिया वेली । तया महद्ब्रह्मातें व्याली । दैविकी इच्छा ॥ ११ ॥ देवो निःसीम तत्त्व सदोदितु । देवो निःसीम गुण अनंतु । देवो निःसीम साम्य सततु । नरेंद्र देवांचा ॥ १२ ॥ जी तूं त्रिजगतिये वोलावा । अक्षर तूं सदाशिवा । तूंचि सदसत् देवा । तयाही अतीत तें तू ॥१३॥

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥ ३८ ॥

तूं प्रकृतिपुरुषांचिया आदी । जी महत्तत्त्वां तूंचि अवधी । स्वयें तूं अनादि । पुरातनु ॥ १४ ॥ तूं सकळ विश्वजीवन । जीवांसि तूंचि निधान । भूतभविष्याचें ज्ञान । तुझ्याचि हातीं ॥ १५ ॥ जी श्रुतीचियां लोचनां । स्वरूपसुख तूंचि अभिन्ना । त्रिभुवनाचिया आयतना । आयतन तूं ॥१६॥ म्हणौनि जी परम । तूंतें म्हणिजे महाधाम । कल्पांतीं महद्ब्रह्म । तुजमाजीं रिगे ॥ १७ ॥ किंबहुना तुवां देवें । विश्व विस्तारिलें आहे आघवें । तरि अनंतरूपा वानावें । कवणें तूंतें ॥१८॥

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

जी काय एक तूं नव्हसी । कवणे ठायीं नससी । हें असो जैसा आहासी । तैसिया नमो ॥ १९ ॥ वायु तूं अनंता । यम तूं नियमिता । प्राणिगणीं वसता । अग्नि तो तूं ॥ ५२० ॥ वरुण तूं सोम । स्रष्टा तूं ब्रह्म । पितामहाचाही परम । आदि जनक तूं ॥ २१ ॥ आणीकही जें जें कांहीं । रूप आथि अथवा नाहीं । तया नमो तुज तैसयाही । जगन्नाथा ॥ २२ ॥ ऐसें सानुरागें चित्तें । नमन

हे नारायणा! येथें कोणत्या कारणास्तव राक्षस तुमच्या चरणास नमस्कार न करतां दूर पळत गेले आहेत? ७. हें काय तुम्हालाच विचारले पाहिजे असें नाहीं; कारण, एवढे तर आम्हांलाहि कळावयाजोगे आहे. हें पहा! सूर्योदय झाल्यावर अंधार कसा राहील? [ त्याप्रमाणें, तुमच्यापुढें राक्षस कसे उभे राहतील? ] ८. तुम्ही स्वप्रकाशाचे मुख्य भांडारच आहांत आणि आमच्या प्रत्यक्ष दृष्टीस पडल्यामुळें राक्षसांची सहजच दुर्दशा होऊन ते नाहींतसे झाले ९. हे श्रीरामा! इतके दिवस ही गोष्ट आम्हांला कांहींच समजली नव्हती; परंतु आतां मात्र तुमचा हा अलौकिक महिमा आमच्या दृष्टीस पडत आहे ५१०. ज्या महद्ब्रह्मापासून अनेक सृष्टीच्या पंक्ति उत्पन्न होतात आणि प्राणिमात्राच्या समुदायरूपी वेली सर्वत्र पसरतात त्या मायेला, देवा! तुमचीच इच्छा प्रसवली आहे ११. देवा! आपण अमर्याद तत्त्वस्वरूप असून त्रिकालाबाधित सत्य आहांत, आपण असीम, अगणित गुणयुक्त आहांत, आपण देश-काल-वस्तुरूप त्रिविध परिच्छेदरहित आहांत, आपण अखंड सर्वत्र समव्याप्त आहांत, तसे सतत असीम समदृष्टिसंपन्न आहांत व आपण देवांचे राजे आहांत १२. महाराज हे सदाशिवा! तुम्ही या सकल त्रैलोक्याचें आश्रयस्थान आहांत, आपण अविनाशी आहांत. आणि देवा! तुम्हीच सत् व असत् आहांत आणि त्या पलिकडील जे तत्त्व तेहि तुम्हीच आहांत. [ आपण सत् म्हणजे प्रमाणगोचर जे कार्यरूप व्यक्त विश्व तें आहांत व असत् म्हणजे विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लयास कारणीभूत असें मायाविशिष्ट चैतन्यरूप अव्यक्त कारण ते आपणच आहांत. व व्यक्त सापेक्ष अव्यक्त कार्य कारण, सत्-असत् या सापेक्ष भावांहून अतीत निरपेक्ष सत्सामान्य परब्रह्म चैतन्य तेहि आपणच आहांत. असें सांगून 'सर्वं ह्येतद् ब्रह्म' या श्रुतिसिद्धांताचा खुलासा केला आहे ] १३.

**अन्वयार्थ**—**त्वं**—तूं—**आदिदेवः**—आद्यदेव—**पुराणः पुरुषः**—पुराण पुरुष आहेस—**त्वं**—तूं—**अस्य विश्वस्य**—या विश्वाचें—**परं निधानं**—परम निधान—आधार आहेस—[ **त्वं**—तूं—] **वेत्ता वेद्यं च परं च धाम असि**—सर्वांना जाणणारा, जाणावयाची वस्तु व परम पद आहेस—**हे अनंतरूप**—हे अनंतरूपा!—**त्वया**—तूं—**विश्वं**—विश्वाला—**ततं**—व्यापिलें आहेस. ३८.

देवा! आपण प्रकृति व पुरुष याचे मूळ [ अधिष्ठान आहांत] माया व महत्तत्त्वादिकांचे शेवटहि [निषेधावधीभूत लयस्थानहि] आपणच आहांत. आपण स्वतः सिद्ध, अनादि व पुरातनहि आहांत १४. तुम्ही सर्व विश्वाचे चालक व सर्व जीवांचें लयस्थानरूप अधिष्ठान असून सर्वज्ञ म्ह. भूत व भविष्याचे ज्ञानहि तुमच्याच हातीं आहे १५. श्रुतीच्या नेत्रास [ म्ह. ज्ञानाला गोचर ] होणारें असें जें स्वरूपभूत सुख, तें भेदरहित असें जें तुम्ही त्या तुमचेच स्वरूप होय. व या त्रैलोक्यास आधार असणारी जी माया त्या मायेलाहि आधारभूत, अधिष्ठान तुम्हीच आहांत १६. म्हणून तुम्हांस सर्व सृष्टीचें श्रेष्ठ असें आश्रयस्थान म्हणतात. आपण परमश्रेष्ठ असून ब्रह्मांडाच्या अंतकाळीं मायाहि तुमच्याच स्वरूपीं लय पावते १७. किंबहुना! देवा! हें सर्व जग तुम्हींच विस्तारलें आहे. तेव्हां अनंत रूप असणारें असें जें तुम्ही त्या तुमचें वर्णन कोण करूं शकेल? १८.

**अन्वयार्थ**—**त्वं**—तूं—**वायुः**—वायु—**यमः**—यम—**अग्निः** अग्नि—**वरुणः**—वरुण—**शशांकः**—चंद्र—**प्रजापतिः**-कश्यपादिक—**च**—व—**प्रपितामहः**—ब्रह्मदेवाचाहि पिता आहेस—**ते**—तुला—**सहस्रकृत्वः**—हजार वेळां—**नमः नमः अस्तु**—नमस्कार असो—**पुनः च**—आणि पुनरपि—**भूयः अपि**—आणखीहि—**ते**—तुला—**नमः नमः**—हजारों नमस्कार—**अस्तु**—असोत—**ते**—तुला—**पुरस्तात्**—पूर्व दिशेनें—**नमः**—नमस्कार असो—**अथ**—त्यानंतर **पृष्ठतः नमः**—पश्चिम दिशेस नमस्कार असो—**हे सर्व सर्वतः एव ते**—हे सर्व! सर्व दिशांमध्यें स्थित असलेल्या तुला—**नमः अस्तु**—नमस्कार असो—**अनंतवीर्यामितविक्रमः**—ज्याचें सामर्थ्य अनंत व पराक्रम अमर्याद आहे असा—**त्वं**—तूं—**सर्वं**—सर्व जगाला—**समाप्नोषि**—व्यापतोस—**ततः**—यामुळें तूं—**सर्वः**—सर्व—**असि**—आहेस ३९-४०.

तुम्ही ज्यांत नाहीं अशी या जगांत तरी वस्तु आहे कां? व आपण कोणत्या ठिकाणीं नाहीं? हे असो तुम्ही जसे असाल, तशा त्या तुम्हांला माझा नमस्कार असो १९. श्रीअनंता! तुम्ही वायु आहांत, शासन करणारा जो यम तो तुम्ही आहांत. प्राणिमात्रांच्या ठिकाणीं वास करणारा जो जठराग्नि तोहि तुम्हीच आहांत ५२०. तुम्ही वरुण, चंद्र व सृष्टि निर्माण करणारे ब्रह्मदेव आहांत व ब्रह्मदेवाचाहि आदि जनक जो ईश्वर तोहि तुम्हीच आहां २१. श्रीजगन्नाथा! त्याशिवाय इतर जे जे म्हणून कांहीं आहे ते सर्व आपणच आहांत, मग त्यांना आकार असो वा नसो, तशा त्या आपणास माझा नमस्कार असो!" २२. ह्याप्रमाणें अर्जुनानें

केलें पंडुसुतें । मग पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २३ ॥ पाठीं तिये साद्यंतें । न्याहाळी श्रीमूर्तीतें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥२४॥ पाहतां पाहतां प्रीतें । समाधान पावे चित्तें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २५ ॥ इयें चराचरीं जीं भूतें । सर्वत्र देखे तयातें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २६ ॥ ऐसीं रूपें तियें अद्भुतें । आश्चर्यें स्फुरती अनंतें । तंव तंव नमस्ते । नमस्तेचि म्हणे ॥ २७ ॥ आणिक स्तुतिही नाठवे । आणि निवांतुही न बैसवे । नेणें कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे ॥ २८ ॥ किंबहुना इयापरी । नमन केलें सहस्रवेंरीं । कीं पुढती म्हणे श्रीहरी । तुज सन्मुखा नमो ॥ २९ ॥ देवासि पाठी पोट आथि कीं नाहीं । येणें उपयोगु आम्हां काई । तरि तुज पाठिमोरेयाही । नमो स्वामी ॥ ५३० ॥ उभा माझिये पाठीसीं । म्हणौनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी । सन्मुख विमुख जगेंसीं । न घडे तुज ॥३१॥ आतां वेगळालिया अवयवां । नेणें रूपें करूं देवा । म्हणौनि नमो तुज सर्वां । सर्वात्मका ॥ ३२ ॥ जी अनंतबळसंभ्रमा । तुज नमो अमित विक्रमा । सकळकाळीं समा । सर्वरूपा ॥ ३३ ॥ आघविया आकाशीं जैसें । अवकाशचि होऊनि आकाश असे । तूं सर्वपणें तैसें । पातलासि सर्व ॥ ३४ ॥ किंबहुना केवळ । सर्व हें तूंचि निखिळ । परी क्षीरार्णवीं कल्लोळ । पयाचे जैसे ॥ ३५॥ म्हणौनियां देवा । तूं वेगळा नव्हसी सर्वां । हें आलें मज सद्भावों । आतां तूंचि सर्व ॥३६॥

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥

परि ऐसिया तूंतें स्वामी । कहींच नेणों जी आम्ही । म्हणौनि सोयरे संबंधधर्मीं । राहाटलों तुजसीं ॥ ३७ ॥ अहा थोर वांउर जाहलें । अमृतें संमार्जन म्यां केलें । वांरिकें घेऊनि दिधलें । कामधेनूतें ॥ ३८ ॥ परिसाचा खडवाचि जोडला । कीं फोडोनि आम्ही गाडोरां घातला । कल्पतरू तोडोनि केला । कूंपं शेता ॥ ३९ ॥ चिंतामणीची खाणी लागली । तेणें करें वोढाळें वोल्हांडिली । तैसी तुझी जेंवळिक धाडिली । सांगातीपणें ॥ ५४० ॥ हें आजिचोंचि पाहें पां रोकडें । कवण झुंज हें केवढें । एथ परब्रह्म तूं उघडें । सारथी केलासी ॥ ४१ ॥ ययां कौरवांचिया घरा । शिष्टाई धाडिलासि दातारा । ऐसा वणिजेसाठीं जागेश्वरा ।

सप्रेम चित्तानें स्तुतिपूर्वक नमस्कार केला व पुनः "हे प्रभो! तुम्हाला नमस्कार असो, नमस्कार असो " असें तों म्हणूं लागला २३. नंतर श्रीकृष्णाच्या मूर्तीकडे नीट साद्यन्त न्याहाळून पाहिले आणि पुनः "हे प्रभो! तुम्हांला नमस्कार असो, नमस्कार असो " असें दोन दोनदां म्हणूं लागला २४. त्या मूर्तीच्या एकेकं अवयवाकडे पाहून चित्ताने समाधान पावला, व पुनः "हे प्रभो! तुम्हांला नमस्कार असो, नमस्कार असो " दोनदां म्हणूं लागला २५. या स्थावर जंगमात्मक विश्वांत व प्राणीमात्रांत सर्वत्रसमव्याप्त असणाऱ्या देवास पाहून पुनः "हे प्रभो! तुम्हांस नमस्कार असो, नमस्कार असो " असेच दोनदां म्हणूं लागला २६. याप्रमाणें अनन्त व अद्भुत अशीं रूपें श्रीअनंताचे ठिकाणीं आश्चर्यात्मकरीत्या प्रगट होत असलेली पाहून, तों तों "अर्जुन पुनः हे प्रभो! नमस्कार असो, नमस्कार असो " असें म्हणूं लागला २७. 'नमस्ते नमस्ते प्रभो ' यापेक्षां जास्त दुसरी स्तुति करावयासहि त्यास कांहीं आठवेना! आणि स्वस्थहि बसवेना, अशी अर्जुनाची स्थिति होऊन तो कशा प्रेमभावानें 'नमस्ते नमस्ते प्रभो ' अशी गर्जना करीत होता. हे मात्र कांहीं कळत नाहीं २८. याप्रमाणें अर्जुनानें हजारों वेळां नमस्कार केले व तो पुनः श्रीहरीस म्हणाला, की हे माझ्यासमोर जे आपणच दिसत आहां, त्या तुम्हांला नमस्कार असो २९. देवाला पाठपोट आहे कीं नाहीं याचा विचार-चौकशी करून आम्हांला काय उपयोग आहे? तथापि हे स्वामी, माझ्या पाठीमागें असणारे जे तुम्ही त्या तुम्हांला माझा नमस्कार असो ५३०. तुम्ही माझ्या पाठीशी उभे आहां म्हणून तुम्हास "पाठीमोरे " असें म्हणतां येईल; परंतु हे देवा! खरोखर तुम्ही जगाशी-समोर किंवा पाठीमोरे आहांत असें कांहींच म्हणतां येत नाही. [ कारण, आपण विश्वांत सर्वत्र ओतप्रोत व्याप्त आहांत ] ३१. आतां तुमच्या निरनिराळ्या अवयवांचे वर्णन करण्याचे मला कळत नाहीं; म्हणून सर्वस्वरूपी व सर्वांतर्यामी आत्मस्वरूपच असे जे तुम्ही त्या तुम्हांला नमस्कार असो ३२. देवा! जे तुम्ही अनंत बळाच्या आवेशाचा सांठा आहां, तुम्ही अगणित पराक्रमी व सर्वकालीं सम म्ह. एकरूपाने असणारे व सर्वस्वरूप असे आहांत त्या तुम्हांला नमस्कार असो ३३. ज्याप्रमाणें सर्व अकाशांत अवकाशच म्ह. पोकळीच आकाशमय होऊन असतें त्याप्रमाणें सर्व ठिकाणीं अधिष्ठानरूपानें तुमचीं समानव्याप्ति असल्यामुळें तुम्हीच एकमेव सर्वरूपाने आहांत; ३४. किंबहुना!! सर्वत्र तुम्हीच केवळ ओतप्रोत भरलेले आहांत, पण ज्याप्रमाणें क्षीर-समुद्रांत लाटाहि दुधाच्याच येतात [ त्याप्रमाणें हे विशाल विश्व तुमच्याच अधिष्ठान स्वरूपावर भासत आहे ] ३५. म्हणून देवा! तुम्ही या सर्व पदार्थांपासून वेगळे नाहीं. हें माझ्या प्रत्ययास आलें आहे; आतां सर्वत्र तुम्हीच घनदाट भरलेले आहांत ३६.

**अन्वयार्थ**—**तव**–तुझ्या –**महिमानं**–महात्म्यास–**इदं** या विश्वरूपास–**अजानता मया**–न जाणणाऱ्या मी–**प्रमादात्**–अनवधानामुळें–**अपि वा प्रणयेन**–किंवा प्रेमामुळें–**सखा इति मत्वा**–तूं माझ्या बरोबरीचा मित्र आहेस, असे जाणून--**हे कृष्ण, हे यादव हे सखे इति** हे कृष्ण! हे यादव! हे सख्या! असें--**प्रसभम्**--अनादरानें--**यत् उक्तं**--जें म्हटलें ४१.

परंतु प्रभो! अशा सर्वव्यापकतेच्या ऐश्वर्यानें संपन्न असणाऱ्या तुम्हांस मी यापूर्वी मुळींच जाणत नव्हतो, म्हणून आम्ही सोयरेपणाच्या संबंधाचे नाते लक्षांत घेऊनच तुमच्याशी आजपर्यंत वागलों ३७. अरेरे! माझ्या हातून हा फार मोठा प्रमाद घडला कसा तो दृष्टान्तपूर्वक सांगतो. म्यां अमृताचा उपयोग सडासंमार्जनाकडे केला व कामधेनु देऊन तिच्या मोबदल्यांत एक लहानसे शिंगरूं घेतले! ३८. परिसाचा डोंगरच मिळाला होता; पण तो फोडून त्याचा गडगा रचला किंवा त्याची आम्हीं घराच्या भिंतीच्या पायांत भर घातली; तसेंच कल्पतरू तोडून त्यांचें शेतास संरक्षण म्हणून कुंपण केलें ३९. चिंतामणीची खाण लागली; पण त्यास दगड समजून गोफणीने मारून ओढाळ गुरे हांकून लावली. त्याप्रमाणें तुमचे सान्निध्य लाभले असूनहि अतिस्नेहामुळें आपणास मित्र समजून ते व्यर्थ घालविले ५४०. लांब कशाला हे आजचेच उघड उघड उदाहरण पहा कीं, हें युद्ध केवढें क्षुल्लक व काय किंमतीचे आहे, पण मूर्तिमंत परब्रह्म जे तुम्ही त्या तुम्हांला मी युद्धांत आपले सारथी केलें आहे ४१. हे कृपासागरा! दुष्ट अशा कौरवांच्या घरीं तुम्हांला शिष्टाई म्ह. तडजोड

१ पुनः. २ बाजूनें. ३ गर्जना. करूं लागला, स्तुति करूं लागला. ४ हजारों वेळां. ५ गणती. ६ सर्व स्वरूप. ७ अपरंपार बळाची समृद्धि ज्याच्या ठिकाणीं आहे अशा. ८ अगणित पराक्रमी. ९ पोकळी. १० निष्कलंक, शुद्ध. ११ लाटा, तरंग. १२ प्रत्ययास. १३ सोयरेपणाच्या नात्यानें. १४ वागलों. १५ वाईट. १६ सडासारवण. १७ शिंगरूं, घोडें, कोंकरूं. १८ खडक, पर्वत. १९ गडग्यांत, पायाभरणींत. २० कुंपण. २१ सांनिध्य.

विकलासि आम्हीं ॥ ४२ ॥ तूं योगियांचें समाधिसुख । कैसा जाणेचिना मी मूर्ख । उपरोधु जी सन्मुख । तुजसीं करूं ॥ ४३ ॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

तूं या विश्वाची अनादि आदी । बैससी जिये सभासदीं । तेथें सोयरीकीचिया संबंधीं । रेळीं बोलों ॥ ४४ ॥ विपायें राउळा येवों । तरि तुझेनि अंगें मानु पावों । न मानिसी तरी जावों । रुसोनि सलगी ॥ ४५ ॥ पायां लागोनि बुझावणी । तुझ्या ठायीं शाङ्र्गपाणी । पाहिजे ऐशी करणी । बहु केली आम्हीं ॥ ४६ ॥ सजणपणाचिया वाटा । तुजपुढें बैसें उफराटां । हा पाडु काय वैकुंठा ? । परि चुकलों आम्हीं ॥ ४७ ॥ देवेंसि कोलकांठी धरूं । आखाडा झोंबीलोंबी करूं । सारी खेळतां आविष्करूं । निकरेंही भांडों ॥४८॥ चांग तें उराउँरी मागों । देवासि कीं बुद्धि सांगों । तेवींचि म्हणों काय लागों । तुझें आम्हीं ॥ ४९ ॥ ऐसा अपराधु हा आहे । जो त्रिभुवनीं न समाये । जी नेणतांचि कीं पाये । शिवतिले तुझे ॥ ५५० ॥ देवो बोनयांच्या अवसरीं । लोभें कीर आठवण करी । परी माझा निसुंग गर्व अवधारीं । जे फुगूनाचि बैसें ॥ ५१ ॥ देवाचिया भोगायतनीं । खेळतां आशंकेना मनीं । जी रिगोनियां शयनीं । सरिसा पहुडें ॥ ५२ ॥ कृष्ण म्हणौनि हाकारिजे । यादवपणें तूंतें लेखिजे । आपली आण घालिजे । जातां तुज ॥ ५३ ॥ मज एकासनीं बैसणें । कां तुझा बोलु न मानणें । हें वोतटीचेनि दाटपणें । बहुत घडलें ॥ ५४ ॥ म्हणौनि काय काय आतां । निवेदिजेल अनंता । मी राशि आहें समस्तां । अपराधांचि ॥ ५५ ॥ यालागीं पुढां अथवा पाठीं । जियें राहटलों बहुवें वोखटीं । तियें मायेचिया परी पोटीं । सामावीं प्रभो ॥५६॥ जी कोण्ही एके वेळे । सरिता घेऊन येती खेंडुळें । तिये सामाविजेति सिंधुजळें । आन उपायो नाहीं ॥ ५७ ॥ तैसी प्रीती कां प्रमादें । देवेंसीं मज विरुद्धें । बोलविलीं तियें मुकुंदें । उपसाहावीं जी ॥ ५८ ॥ आणि देवाचेनि क्षमत्वें क्षेमा । आधारु जाली आहे या भूतग्रामा । म्हणौनि जी पुरुषोत्तमा । विनवूं तें थोडें ॥ ५९ ॥ तरी आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया । क्षमा कीजो जी यया । अपराधांसि ॥ ५६० ॥

करण्याकरितांहि आम्हीं धाडलें, याप्रमाणें, हे जगदीश्वरा ! आम्ही आपल्या सामान्य व्यवहारार्थ आपणास विकून खर्ची घातले. [ असे करणे उचित आहे काय ? तर नाही ] ४२. तुम्ही योग्यांचे समाधिसुख असून, मी मूर्ख कसा कीं म्यां तुम्हाला अशा यथार्थपणें जाणले नाहीं. उलट तुमच्या तोंडावर तुम्हास वर्मीं लागेल अशी भाषणेंहि मी बोलत होतों ४३.

**अन्वयार्थ**—**च**–आणि–**हे अच्युत**–अच्युता !–**यत्**–जें कायतरी-**अवहासार्थं**–थट्टा करण्यासाठीं-**विहारशय्यासनभोजनेषु**–विहार करतांना, शय्येवर निजतांना, आसनावर बसतांना व जेवतांना–**एकः**–एकटा असतांना-**अथवा**–किंवा–**तत्समक्षं**–लोकांच्या देखत–**असत्कृतः असि**–असत्कार केला गेला आहे–**तत्**–तें सर्व–**त्वाम् अप्रमेयं**-तुज अप्रमेय देवाला–**अहं**–मी–**क्षामये**--क्षमा करण्याची प्रार्थना करतो ४२.

तुम्ही विश्वाचे अनादिमूळ आहां, ते तुम्ही ज्या सभेंत बसत होतां, तेथें तुम्ही आमचे नातेवाईक या संबंधानें मी तुमच्याशी विनोदानें बोलत होतों ४४. कदाचित् तुमच्या घरीं आलों, तर तुमच्या बरोबरीनें मान घेत होतों आणि तो तुम्ही न दिला, त्यांत कांहीं कमी पडेल तर अति सलगीमुळें आम्ही आपल्यावर रुसूनहि जात होतों ४५. हें शार्ङ्गपाणे, ! तुम्ही माझे पाय धरून समजूत करीत असां. याप्रमाणें व ह्या त्या प्रकारानें आम्ही तुमचा उपमर्द होईल अशा अनेक गोष्टी केल्या ४६. शहाणपणाच्या घमेंडीवर आम्ही तुमच्यापुढें पाठ करून देखील बसलों आहों. तर हें श्रीकृष्णा ! अशी ही आमची योग्यता आहे काय ? परंतु महाराज आम्ही चुकलों ४७. देवा ! तुमच्याबरोबर दांडपट्टा वगैरे खेळहि खेळलों, आखाड्यांत आपल्याशी कुस्ती केलीं व सोंगट्या खेळतांना तुमचा तिरस्कार करून बोललों व तुमच्याशीं हातघाईवर येऊन भांडलों ४८. जी उत्तम वस्तु असेल, ती अगोदर आम्हांला द्या म्हणून प्रत्यक्ष मागत होतो, सर्वज्ञ असें जें तुम्ही त्या तुम्हालाहि युक्तीच्या, शहाणपणाच्या गोष्टी सांगत होतो. त्याप्रमाणें 'तुमचें आम्हीं काय लागत आहों.' असेंहि मी आपणास म्हटलें ४९. हा अपराध असा आहे कीं, जो त्रिभुवनांतहि मावणार नाहीं. परंतु देवा ! तुमच्याच पायाची शपथ वाहून सांगतों कीं, हे अपराध अज्ञानामुळें, आपलें महत्त्व न ओळखल्यामुळें आमचे हातून घडलें ५५० अहो ! देवांनीं जेवण्याच्या वेळेस खरोखर मोठ्या प्रेमानें माझी आठवण करावी; परंतु काय माझा निर्लज्ज गर्व पहा कीं, मी फुगुन रुसूनच बसत होतों ५१. देवाच्या अंतःपुरातहि खेळतांना माझ्या मनांत शंकाहि उत्पन्न होत नसे, इतकेंच काय पण आपल्या अंथरुणावर जाऊन मी शेजारी निजत होतो ५२. मी तुम्हांला 'कृष्णा !' म्हणून हांक मारीत होतो, इतर यादवांप्रमाणें तुम्हांलाहि एक यादव मानीत होतों आणि आपण जाऊं लागला म्हणजे मी आपणास आपली शपथ घालीत होतों ५३. माझें तुमच्याबरोबरीनें एका आसनावर बसणें, किंवा तुमचा शब्द मोडणें हें वा अशा गोष्टी अति परिचयामुळें पुष्कळ वेळां घडल्या आहेत ५४. म्हणून, हें अनंता ! आतां अशा अमर्यादेच्या माझ्या हातून घडलेल्या किती म्हणून गोष्टीं सांगूं ? तर मी सर्व अपराधांची रासच आहें ५५. म्हणून हें प्रभो ! तुमच्या समक्ष किंवा पश्चात् जितक्या म्हणून माझ्या हातून वाईट गोष्टी घडल्या असतील तितक्य आपण आईप्रमाणें पोटांत घालाव्यात ५६. महाराज ! एखादे वेळेस नद्या गढूळ पाणी घेऊन समुद्रास मिळण्यास येतात. तेव्हां त्या गढूळ पाण्याला समुद्रास आपल्या पोटांत समाविष्ट करून घेतले पाहिजे. त्यास त्याविना दुसरा उपाय नसतो ५७. त्याप्रमाणें प्रीतीनें म्हणा अथवा चुकीनें म्हणा, देवा ! माझ्याकडून तुम्हांला विरुद्ध अशीं जीं जीं भाषणें बोललीं गेलीं तीं तीं, हें मुकुंदा ! सहन करून पोटांत घाला. तुमच्याशिवाय कोण पोटांत घालील ५८. देवा ! तुमच्या सहनशीलतेमुळें, क्षमत्वामुळें ही क्षमा-पृथ्वी, प्राणिमात्राचा भार सहन करण्यास समर्थ झाली आहे. म्हणून हे पुरुषोत्तमा ! जितकी तुमची विनंती करावी तितकी थोडीच आहे ५९. तर आतां हे अतर्क्या श्रीकृष्णा, तुमचा दास म्हणविलेला मी तुम्हांला शरण आलों आहें. तर मला माझ्या या सर्व अपराधांची क्षमा करावी ५६०.

---

१ चेष्टा, उपमर्द. २ विनोदानें. ३ कधीं तुमच्या मंदिरीं [ घरीं ] आलों. ४ तुझ्या स्वतःकडून. ५ स्नेहाच्या नात्यानें. ६ समजूत. ७ पाठमोरा. ८ योग्यता. ९ श्रीकृष्णा. १० दांडपट्टा. ११ कुस्ती. १२ सोंगट्या. १३ तिरस्कार करूं. १४ निर्भीडपणें, ताबडतोब. १५ जेवणाच्या. १६ रिकामा. १७ विलासगृहांत. १८ शेजारी निजे. १९ हांक मारावी. २० वहिवाटीच्या; घसणीच्या. २१ वाईटपणें, खोडसाळपणें. २२ नद्या. २३ गढूळ उदकें. २४ गाफिलपणानें, दुर्लक्षानें, चुकीनें. २५ सहनशीलतेनें. २६ पृथ्वी. २७ अपरिमित.

पिताऽसि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥

जी जाणितलें मियां साचें । महिमान आतां देवाचें । जे देवो होय चराचराचें । जन्मस्थान ॥ ६१ ॥ हरिहरादि समस्तां । देवा तूं परम देवता । वेदातेंही पढविता । आदिगुरु तूं ॥ ६२ ॥ गंभीर तूं श्रीरामा । नाना भूतैकसमा । सकळगुणीं अप्रतिमा । अद्वितीया ॥६३॥ तुजसी नाहीं सरिसें । हें प्रतिपादनचि कायसें ? । तुवां जालेनि आकाशें । सामाविलें जग ॥६४॥ तया तुझेनि पाडें दुजें । ऐसें बोलतांचि लाजिजे । तेथ अधिकाची कीजे । गोठी केवीं ॥ ६५ ॥ म्हणौनि त्रिभुवनीं तूं एकु । तुजसारिखा ना अधिकु । तुझा महिमा अलौकिकु । नेणिजे वानूं ॥ ६६ ॥

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

ऐसें अर्जुनें म्हणितलें । मग पुढती दंडवत घातलें । तेथें सात्त्विकाचें आलें । भरतें तया ॥ ६८ ॥ मग म्हणतसे प्रसीद प्रसीद । वाचा होतसे सद्गद । काढी जी अपरांध- । समुद्रौनि मातें ॥ ६८ ॥ तुज विश्वसुहृदातें कहीं । सोयरेपणें न मनूंचि पाहीं । तुज विश्वेश्वराचिया ठायीं । ऐश्वर्य केलें ॥ ६९ ॥ तूं वर्णनीय परी लोभें । मातें वर्णिसी पां सभे । तरि मियां वलिंगजें क्षोभें । अधिकाधिक ॥५७०॥ आतां ऐसिया अपराधां । मर्यादा नाहीं मुकुंदा । म्हणौनि रक्ष रक्ष प्रमादां- । पासोनियां ॥७१॥ जी हेंचि विनवावयालागीं । कैंची योग्यता माझिया आंगीं । परी अपत्य जैसें सलगी । बापेंसीं बोले ॥ ७२ ॥ पुत्राचे अपराध । जरी जाहले अगाध । तरी पिता साहे निर्द्वंद्वें । तैसें साहिजो जी ॥ ७३ ॥ सख्याचें उद्धत । सखा साहे निवांत । तैसें तुवां समस्त । साहिजो जी ॥ ७४ ॥ प्रियाचिया ठायीं सन्मान । प्रिय नें पाहें सर्वथा जाण । तेवीं उच्छिष्ट काढिलें आपण । ते क्षमा कीजो जी ॥ ७५॥ नातरी प्राणाचें सोयरें भेटे । मग जीवें भूतेंलीं जियें संकटें । तियें निवेदितां न वाटे । संकोचु कांहीं ॥७६॥ कां उंखितें आंगें जीवें । आपणपें दिधलें जिया मनोभावें । तिया कोंतु मिनलियां न राहवे । हृदय जेवीं ॥७७॥ तयापरी जी मियां । हें विनविलें तुमतें गोसाविया । आणीक कांहीं एक म्हणावया । कारण असे ॥ ७८ ॥

**अन्वयार्थ**——**त्वं**–तूं–**अस्य चराचरस्य लोकस्य**–या चराचर लोकांचा–**पिता**–जनक–**च**– व – **पूज्यः**–पूज्य–**गरीयान्**–फार मोठा–**गुरुः**–गुरु– **असि**–आहेस–**अप्रतिमप्रभावः**–ज्याचा प्रभाव अप्रतिम आहे अशा हे कृष्णा ! –**लोकत्रये अपि**–या तिन्ही लोकांत–**त्वत्समः अन्यः**–तुझ्यासारखा दुसरा–**न अस्ति**–कोणी नाहीं. मग–**अभ्यधिकः कुतः**–तुझ्यापेक्षां अधिक कोठून असणार ? ४३.

हे श्रीकृष्णा, ! तुमचा महिमा मी आतां यथार्थ जाणला आहे. देवा, तुम्हीं या चराचरात्मक विश्वाचें उत्पत्तिस्थान आहांत ६१. देवा ! तुम्हीं विष्णु, शंकर आदिकरून सर्व देवांचें परमदैवत आहांत आणि वेदांनाहि पढविणारें मूळ गुरु तुम्हींच आहांत ६२. हे श्रीरामा! तुम्हीं गंभीर असून सर्व भूतांच्या ठिकाणीं तुमचीं समदृष्टि किंवा समव्याप्ति आहे. तुम्हीं सर्व गुणांत अप्रतिम असून तत्त्वतः अद्वितीय आहांत ६३. तुमच्या बरोबरीचा दुसरा कोणीं नाहीं. हे सांगावयासच कशाला पाहिजे ? तुमच्यापासून निर्माण झालेले जें आकाश आहे, त्यांतच सर्व जग सामावलें आहे ६४. त्या तुमच्या बरोबरीचें दुसरें कोणी आहे, असें म्हणणेंच लज्जास्पद होय. तुमच्यापेक्षां दुसरा कोणी अधिक आहे, हीं तर गोष्टच बोलावयास नको ! ६५. म्हणून सर्व त्रिभुवनांत तुम्हीं एकच असून तुमच्या सदृश, बरोबरीचा किंवा तुमच्याहून अधिक दुसरा कोणीहि नाहीं व तुमचा महिमा अगाध आहे तो वर्णन करण्यास आम्हीं सर्वथा असमर्थ असल्यामुळें ते कसें वानावें, हे कळत नाहीं ६६.

**अन्वयार्थ**——**तस्मात्** – म्हणून–**कायं प्रणिधाय**–शरीर भूमीवर दंडाप्रमाणें ठेवून–**प्रणम्य**–प्रणाम करून–**अहं**–मी–**ईशम् ईड्यं त्वां**–सर्वांचा ईश्वर व स्तुतीला पात्र अशा तुला–**प्रसादये**–प्रसन्न करतों–**देव**–देवा !––**पुत्रस्य पिता इव**–पुत्राचा अपराध पिता जसा सहन करतो–**सख्युः सखा इव**–मित्राचा अपराध मित्र जसा सहन करतों– **प्रियायाः प्रियः** [ **इव** ]–प्रियेचा–पत्नीचा अपराध प्रिय–पति जसा सहन करतो, तसा–[ **त्वं**–तूं–माझा अपराध ]–**सोढुं**–सहन करण्यास–**अर्हसि**–योग्य आहेस ४४.

याप्रमाणें बोलून अर्जुनानें भगवंतास साष्टांग नमस्कार केला. त्या वेळीं त्याला अष्टसात्विक भावांचें भरतें आलें ६७. मग गहिंवरून म्हणूं लागला, प्रसन्न व्हा! प्रसन्न व्हा देवा ! मला अपराधरूपी समुद्रांतून बाहेर काढा ६८. तुम्हीं आमचें नातेवाईक आहां, अशा समजुतीनें तुम्हां विश्वसुहृदाला मी कधींच मान दिला नाहीं व तुम्हीं सर्व विश्वाचें ईश्वर आहां, असें कोणी म्हटलें तर उलट आम्हीं त्याचें आश्चर्य करून आपल्याच ऐश्वर्याची घमड केली ६९. वास्तविक आम्हींच तुमचें वर्णन करणें योग्य असताहि, सभेमध्यें जों जों तुम्हीं प्रेमानें माझें वर्णन करावें तों तों गर्वानें चढून जाऊन मी अधिक अधिकच बडबड करीत होतों ५७०. हे मुकुंदा, ! असें जें माझे हातून एक ना अनेक अपराध झाले आहेत, त्यास सीमा अशी नाहींच म्हणून त्या साऱ्या अपराधांपासून माझें रक्षण करा ७१. अहो ! अशी तुमची प्रार्थना करण्याची देखील योग्यता माझ्या अंगीं नाहीं; पण लहान मूल जसें बापाशीं लडिवाळपणानें बोलतें ७२. त्याप्रमाणें मी म्हणतों. प्रभो ! पुत्राच्या हातून पुष्कळ अपराध घडले असलें तरी पिता दुजाभाव सोडून जसें ते सर्व सहन करितो तसें महाराज ! माझे सर्व अपराध तुम्हीं सहन करा. ७३. देवा ! मित्राचा उद्धटपणा जसा बरोबरीचा मित्र निवांतपणें सहन करितो तसें माझे हातून घडलेले सर्व अपराध तुम्ही सहन करा ७४. ज्याप्रमाणें आपल्या आवडत्या मित्राकडून आपला सन्मान व्हावा अशी कधीं कोणी मुळींहि अपेक्षा करीत नाहीं त्याप्रमाणें [ राजसूय यज्ञांत ] तुम्हीं उष्टीं कीं हो काढलींत याला काय म्हणावें पण आतां त्याची क्षमा करावी ७५. किंवा आपला एखादा जिवलग स्नेही भेटल्यावर, आपण जितकीं संकटें मागें अनुभविलेलीं असतील, तितकीं त्याला सांगण्यास कधींहि कांहीं संकोच वाटत नाहीं ७६. अथवा जिनें आपलें तन, मन इत्यादि सर्वस्व मनोभावानें आपल्या पतीस अर्पण केले आहे, अशा पतिव्रता स्त्रीची व पतीची भेट झाल्यावर जशी तिच्या मनांतील गोष्ट पतीला सांगितल्याशिवाय तिच्यानें राहावत नाहीं ७७. त्याप्रमाणें प्रभो ! माझे अपराध क्षमा करण्याबद्दल मी तुम्हांस विनंती केली; परंतु मला कांहीं आणखी एक गोष्ट विचारावीशी वाटत आहे कारण, ७८.

---

१ पूर्ण, खरें. २ उपमारहिता. ३ बरोबरीचें, तुल्य. ४ आकाशानें, पोकळीनें, सामावण्याच्या स्थानानें. ६ सांठविलें. ६ बरोबरीनें. ७ तुझ्यापेक्षा थोर. ८ अपूर्व. ९ कृपा कर. १० अपराधरूपी समुद्रांतून. ११ जगन्मित्राला. १२ बडबड करावी. १३ चुकीपासून. १४ लडिवाळपणानें. १५ दुजाभाव सोडून. १६ दांडगेपणा. १७ अपेक्षा करीत नाहीं. १८ उष्टीं. १९ अनुभवलेलीं, भोगलेलीं. २० सर्वस्व. २१ अर्पण केलें. २२ नवरा. २३ भेटल्यावर.

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

तरी देवेंसी सलगी केली । जे विश्वरूपाची आळी घेतली । ते मायबापें पुरविली । स्नेहाळांचेनि ॥ ७९ ॥ सुरतरूंची झाडें । आंगणीं लावावीं कोडें । देयावें कामधेनूचें पाडें । खेळावया ॥ ८० ॥ मियां नक्षत्रीं डावे पाडावा । चंद्र चेंडुवालागीं आणावा । हा छंदु सिद्धी नेला आघवा । माउलीये तुवां ॥ ८१ ॥ जिया अमृतलेशालागीं सायास । तयाचा पाऊस केला चारी मास । पृथ्वी वाहून चासेंचास । चिंतामणी पेरिले ॥ ८२ ॥ ऐसा कृतकृत्य केला स्वामी । बहुवे लळा पाळिला तुम्हीं । दाविलें जें हरब्रह्मीं । नायकिजे कानीं ॥ ८३ ॥ मां देखावयाची केउंती गोठी । जयाची उपनिषदां नाहीं भेटी । ते जिव्हारींची गांठी । मजलागीं सोडिली ॥ ८४ ॥ जी कल्पादीलागोनि । आजिची घडी धरुनी । माझीं जेतुलीं होउनी । गेलीं जन्में ॥ ८५ ॥ तयां आघवियांचि आंतु । घँरडोळी घेऊनि असें पाहतु । परि ही देखिली ऐकिली मातु । आतुडेचिना ॥ ८६ ॥ बुद्धीचें जाणणें । कहीं नें वचेचि याचेनि आंगणें । हें सादही अंतःकरणें । करवेचिना ॥ ८७ ॥ तेथ डोळ्यां देखी होआवी । ही गोठीचि कायसया करावी । किंबहुना पूर्वीं । दृष्ट ना श्रुत ॥ ८८ ॥ तें हें विश्वरूप आपुलें । तुम्हीं मज डोळां दाविलें । तरी माझें मन झालें । हृष्ट देवा ॥ ८९ ॥ परि आतां ऐसी चाड जीवीं । जे तुजसीं गोठी करावी । जवळीक हे भोगावी । आलिंगावासी ॥ ५९० ॥ ते याचि रूपीं करूं म्हणिजे । तरि कोणे एके मुखेंसि चावळिजे । आणि कवणा खेंवें देईजे । तुज लेखें नाहीं ॥ ९१ ॥ म्हणौनि वारियासवें धांवणें । नें ठके गगना खेंव देणें । जळकेली खेळणें । समुद्रीं केउतें ? ॥ ९२ ॥ यालागीं जी देवा । एथिंचें भय उपजतसे जीवा । म्हणौनि येतुला लळा पाळावा । जे पुरे हें आतां ॥ ९३ ॥ पैं चराचर विनोदें पाहिजे । मग तेणें सुखें घरीं राहिजे । तैसें चतुर्भुज रूप तुझें । तो विसांवा आम्हां ॥ ९४ ॥ आम्हीं योगजात अभ्यासावें । तेणें याचि अनुभवा यावें । शास्त्रातें आलोडावें । परि सिद्धांतु तो हाचि ॥ ९५ ॥ आम्हीं यजनें किजती सकळें । परि तियें फळावीं येणेंचि फळें । तीर्थें होतु सकळें । याचिलागीं ॥ ९६ ॥ आणिकही कांहीं जें जें । दान पुण्य आम्हीं कीजे । तया फळीं फळ तुझें । चतुर्भुज

**अन्वयार्थ—अदृष्टपूर्वं**—यापूर्वी मी किंवा दुसऱ्या कोणी न पाहिलेलें **हें—रूपं दृष्ट्वा**—विश्वरूप पाहून—**हृषितः अस्मि**—मी हृष्ट झालों आहे—**च**—व—**भयेन**—भयानें—**मे**— माझें — **मनः**— मन — **प्रव्यथितम्** — अतिशय व्यथित झालें आहे—**जगन्निवास**—हे जगन्निवासा !—**देव**—हे देवा !—**देवेश**—हे देवेशा !—**प्रसीद**—प्रसन्न हो—**तत् एव**—तेंच रूप—**मे**—मला—**दर्शय**—दाखीव ४५.

श्रीकृष्णा, तुमच्याशीं सलगी करून ‘विश्वरूप दाखवा’ म्हणून जो छंद घेतला, तो आपण अत्यंत दयावंत मायबापांनीं पुरविला ७९. कौतुकानें अंगणांत कल्पतरू लावण्याची व कामधेनूचें वांसरूं खेळावयास देण्यासारखी माझी हौस आपण पुरविली ५८०. तसेंच मी साध्या फाशांच्या ऐवजीं नक्षत्रांच्या फाशांनीं डाव खेळावा व चेंडूच्या ऐवजीं चंद्रच मला आणून द्यावा अशापैकींच ही माझी सर्व हौस होती, तरीहि तुम्हीं मातेप्रमाणें तो छंद पूर्ण केला ८१. जें अमृत थोडकें मिळविण्यासहि अतीव परिश्रम पडतात, त्याचा चार महिने पाऊसच पाडलात आणि सर्व जमीन पेरण्यासाठीं उत्तम रीतीनें तयार करून तिच्या प्रत्येक वाफ्या-वाफ्यांतून चिंतामणीचीच पेरणी केलीत ! ८२. याप्रमाणें प्रभो ! सर्व गोष्टी मला दिल्या व माझे पुष्कळ लाड पूर्ण करून मला कृतकृत्य केलेंत; आणि जें तुम्हीं मला प्रत्यक्ष दाखविलेंत, त्या विश्वरूपाची गोष्ट शंकर, ब्रह्मदेव यांनीं कानांनीं देखील ऐकिली नाहीं ८३. मग तें त्यांच्या दृष्टीस कोठून पडणार ? हें पहा ! उपनिषदांसहि ज्याची भेट झाली नाहीं तें आपलें अंतरंगांतील गुह्य विश्वरूप तुम्ही माझ्याकरितां उघड करून दाखविलेंत ८४. कल्पाच्या आरंभापासून आजच्याच घटकेपर्यंत जितके माझे जन्म होऊन गेले ८५. त्या सर्व जन्मांत प्रत्येक जन्माचा मी झाडा घेऊन पहातों आहे, परंतु या विश्वरूपाची गोष्ट मी कधीं ऐकिली आहे किंवा हें पाहिलें आहे, असें आढळांतच येत नाहीं ८६. अहो ! या विश्वरूपाच्या नुसत्या अंगणांत देखील बुद्धी व वृत्तीचें ज्ञान पोहचत नाहीं, व अंतःकरणानें तर त्याची केवळ कल्पनाहि करतां येत नाहीं ८७. अशा स्थितींत तें विश्वरूप डोळ्यांनीं पाहावयास मिळावें याजबद्दल गोष्ट बोलावयालाच नको. किंबहुना ! असें पूर्वी कधीं कोणी ऐकिलें नाहीं व पाहिलेंहि नाहीं ८८. देवा ! तें हें तुमचें विश्वरूप तुम्हीं मला प्रत्यक्ष डोळ्यांना दाखविल्यानें माझें मन आनंदित झालें ८९. परंतु आतां अशी एक मनांत इच्छा उत्पन्न झाली आहे कीं, तुमच्याशीं गोष्टी कराव्यात व तुमच्या स्नेह सान्निध्याचा उपभोग घ्यावा व तुम्हांला आलिंगन द्यावें ५९०. तेव्हां तें सर्वहि या अशा स्थितींतच करूं म्हटलें, तर तुमच्या अनंतमुखांपैकीं कोणत्या एका तोंडाबरोबर बोलावें ? व कोणाला आलिंगन द्यावें ? कारण, तुमच्या या विश्वरूपाला पार असा नाहींच ९१. म्हणून वाऱ्याबरोबर धांवणें जुळणार नाहीं, अगर गगनाला आलिंगन देणें हेंहि घडावयाचें नाहीं, तसेंच समुद्रांत जलक्रीडा कशी करितां येईल ? ९२. याकरितां देवा ! या विश्वरूपाविषयीं माझ्या मनांत भय उत्पन्न झालें आहे म्हणून हें पुरे झालें प्रगट केलेले विश्वरूप आटोपून घ्यावें, एवढाच माझा हट्ट पुरवावा ९३. हें पहा ! या चराचरांचें सहज कौतुकानें हिंडून अवलोकन करावें-त्यानंतर जसें घरींच विसाव्यासाठीं सुखानें रहावें त्याप्रमाणें तुमचें चतुर्भुज रूपच आमच्या विश्रांतीचें स्थान होय ९४. आम्हीं सर्व योगांचा अभ्यास केला तरी त्या योगानें पहावयास मिळणार तें हेंच, आणि सर्व शास्त्रांचा जरी विचारपूर्वक अभ्यास केला तरी मुख्य शास्त्र सिद्धांत तो हाच आहे ९५. आम्ही सर्व यज्ञ केले तरी त्यांचे फळ म्हणजे हेंच रूप पाहणे, हें होय व याच रूपाकरितां सर्व तीर्थयात्रा कराव्या लागतात ९६. आणखीहि जें जें कांहीं पुण्य अथवा दान आम्ही करूं त्याचे

१ लडिवाळपणा, लाडीगोडी. २ छंद. ३ अत्यंत दयाळूपणानें. ४ आवडीनें. ५ वांसरूं. ६ खेळावयास मागावी. ७ चेंडूच्या ऐवजीं—साठीं. ८ वाफ्या—वाफ्यानें. ९ मग. १० कोणीकडे, कोठून. ११ हृदयांतल्याची गांठ, गूढस्वरूप. १२ कल्पाच्या प्रारंभापासून. १३ जितकी. १४ प्रत्येक घराचा झाडा. १५ सांपडेना. १६ पोंहचत नाहीं. १७ कल्पना. १८ दृष्टिगोचर, प्रत्यक्ष. १८ पाहिलें नाहीं किंवा ऐकिलें नाहीं. २० आनंदित. २१ बोलावें. २२ आलिंगन. २३ गणना. २४ घडत नाहीं, टिकत नाहीं. २५ जलक्रीडा. २६ हौस. २७ यमनियमादि सर्व योग. २८ शिकावे.

रूप ॥ ९७ ॥ ऐसी तेथिंची जीवा आवडी । म्हणौनि तेंचि देखावया लवंड-
सवडी । वर्तत असे ते सांकडी । फेडिजे वेगीं ॥ ९८ ॥ अगा जीवींचें जाणतेया।
सकळ विश्ववसवितेया । प्रसन्न होईं पूजितया । देवांचिया देवा ॥ ९९ ॥

किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

कैसें नीलोत्पलातें रांविते । आकाशाही रंगु लावित । तेजाची वोज दावित । इंद्रनीळा ॥ ६०० ॥ जैसा परिमळ जाहला मरगजा । कां आनंदासि निघालिया भुजां । ज्याचे जानूंवरी मकरध्वजा । जोडली बैरव ॥ १ ॥ मस्तकीं मुगुटातें ठेविलें । कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें । शृंगारा लेणें लाधलें । आंगाचेनि जया ॥ २ ॥ इंद्रधनुष्याचिये आडणी- । माजीं मेघ गगनरंगणीं । तैसें ओवरिलें शार्ङ्गपाणी । वैजयंतिया ॥ ३ ॥ आतां कवणी ते उदार गदा । असुरां देत कैवल्य-पदा । कैसें चक्र हन गोविंदा । सौम्यतेजें मिरवे ॥ ४ ॥ किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठित पां मी । म्हणौनि आतां तुम्हीं । तैसया होआवें ॥ ५ ॥ हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आंधले । कृष्ण-मूर्तीलागीं ॥ ६ ॥ तें साकार कृष्णरूपडें । वांचूनि पाहों नावडे । तें न देखतां थोडें । मानिताती हे ॥ ७ ॥ आम्हां भोगमोक्षाचिया ठायीं । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं । म्हणौनि तैसाचि साकारु होईं । हें सांवरी आतां ॥ ८ ॥

श्रीभगवानुवाच :—

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला । म्हणे ऐसा नाहीं देखिला । धसाळ कोणी ॥९॥ कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु न घेसी । मा भेणें काय नेणों बोलसी । हेकाडु ऐसा ॥ ६१० ॥ आम्हीं सावियाचि जें प्रसन्न होणें । तें आंगचिवरी म्हणें देणें । वांचोनि जीव असे वेंचणें । कवणासि गा ॥ ११ ॥ तें हें तुझिये चाडे । आजि जिवाचेंचि दळवाडें । कामऊनियां येवढें । रचिलें ध्यान ॥ १२ ॥ ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहली प्रसन्नता आमुची वेडी । म्हणौनि गौप्याचीही गुढी । उभविली जगीं ॥१३॥ तें हें अपारां अपार । स्वरूप माझें परात्पर । एथूनि ते अवतार । कृष्णादिक ॥ १४ ॥ हें ज्ञानतेजाचें

त्याचे फलस्थानीं तुमचें चतुर्भुज रूपच हे फक्त होय ९७. याप्रमाणें त्या चतुर्भुज रूपाची जीवास आवड उत्पन्न होऊन, ते पाहण्याकरितां माझ्या चित्तांत लगबग उडाली आहे; तर हीं माझीं तळमळीचीं अडचण आपण लवकर दूर करा ९८. अहो! दुसऱ्याच्या मनांतील सर्व गोष्टी जाणणाऱ्या जगन्निवासा! परमपूज्य देवाधिदेवा, मला प्रसन्न व्हावें! ९९.

**अन्वयार्थ**—**अहं**—मी—**किरीटीनं गदिनं चक्रहस्तं**—मस्तकास मुगुट घातलेल्या; गदा घेतलेल्या व हातांत चक्र असलेल्या—**त्वां**—तुला—**तथा एव**—पूर्वीप्रमाणेंच—**द्रष्टुं**—पाहण्यास—**इच्छामि**—इच्छितों—**सहस्रबाहो विश्वमूर्ते**—ज्याला सहस्रबाहु आहेत व सर्व विश्व हीच ज्याची मूर्ति आहे, अशा देवा!—**तेन एव**—त्याच पूर्वीच्या—**चतुर्भुजेन रूपेण**—चतुर्भुज रूपानें—**भव**—तूं—प्रकट हो ४६.

"देवा! तुमच्या अंगकांतीचें कोठवर वर्णन करावें! ज्या नीळवर्णाच्या योगानें नीलकमलास व आकाशासहि निळेपणा येतो व इंद्रनील मण्यासहि तेजाची झांक-शोभा लाभली आहे ६००. ज्याप्रमाणें पांचेच्या रत्नास सुगंध सुटावा किंवा आनंदालाच हात फुटावेत; [ असेंच भगवंतांचें शरीर शोभत होतें] त्याप्रमाणें प्रभूचें गुढग्याच्या आश्रयापासून [ मुलगा होऊन मांडीवर खेळल्यामुळें ] मदनाला शोभा प्राप्त झाली १. प्रभूंनीं मस्तकावर धारण केलेल्या मुगुटास मस्तकाच्या सौंदर्यानें जास्तच शोभा आली व देवाच्या अंगाच्या प्रभेनें शृंगारास शोभा लाभली २. आकाशांत इंद्रधनुष्याच्या बर्तुळामध्यें आवरून वेष्टिलेला मेघ जसा दिसतो त्याप्रमाणें गळ्यांत घातलेल्या वैजयंती माळेनें श्रीकृष्ण आवरलेले, वेष्टिलेलें, असें दिसत होते ३. आतां राक्षसांनाहि सदा मोक्षपद देणारी कोण ती प्रभूंच्या हातांतील उदार गदा व तसेंच हातांतील सुदर्शन चक्र किती सौम्य तेजानें शोभत आहे ४ किंबहुना!! प्रभो! अशी तुमची नितांत सुंदर चतुर्भुज मूर्ति पहावयास मी उत्सुक झालो आहें, तर आपण ते श्यामसुंदर रूप लवकर धारण करावें ५. महाराज! हे विश्वरूप पाहाण्याचे सोहळे भोगून माझे डोळे शांत झाले आहेत व ते डोळे आतां कृष्णमूर्ति पाहण्यास भुकेले आहेत ६. तुमचें गोजिरवाणें सगुण, साकार कृष्णरूप पाहण्याशिवाय दुसरी इतर कोणतीहि वस्तु पाहण्याची मला इच्छा नाहीं. तें सगुणरूप जर पहावयास मिळालें नाहीं तर त्याच्यापेक्षां या विश्वरूपाची माझ्या डोळ्यांना कमी किंमत वाटते ७. आम्हांला तुमच्या मूर्तीवांचून ऐहिक ऐश्वर्यरूप भुक्ति व मुक्ति देणारें कांहीं नाहीं. [ या सगुणरूपाशिवाय विश्रांत भोग मोक्ष म्हणून कांहीं आहे, असें आम्हीं मुळींहि जाणत नाहीं ]. म्हणून हें विश्वरूप आतां आवरून चतुर्भुज श्यामसुंदर गोजिरवाणें रूप धारण करा" ८.

**अन्वयार्थ**—**अर्जुन**—हे अर्जुना!—**प्रसन्नेन मया**—प्रसन्न झालेल्या मी—**आत्मयोगात्**—माझ्या योगसामर्थ्यामुळें—**तव**—तुला—**इदं**—हें—**मे**—माझें—**परं तेजोमयं**—श्रेष्ठ तेजोमय—**विश्वं**—समस्त—**अनन्तम्**—अमर्याद—**आद्यम्**—अगदीं आरंभीचें—**रूपं**—विश्वरूप—**दर्शितं**—दाखविलें—**यत्**—कीं जें—**त्वदन्येन**—तुझ्यावांचून दुसऱ्या कोणी—**न दृष्टपूर्वं**—पूर्वीं पाहिलेलें नाहीं ४७.

याप्रमाणें अर्जुनाचें बोलणें ऐकून श्रीकृष्णाला मोठें आश्चर्य वाटलें व ते म्हणाले, "तुझ्यासारखा असा अविचारी मनुष्य मी पाहिला नाहीं ९. अरे! तुला हा विश्वरूप दर्शनाचा केवढा मोठा लाभ झाला आहे. याचा संतोष मानीत नाहींस उलट भीतीनें एकदम, अडाण्यासारखा [ मला तुमचें चतुर्भुजरूप दाखवा असें ] काय बोलतोस? हे कळत नाहीं ६१०. आम्ही कोणासहि प्रसन्न झालों तरी बाह्यात्कारीच होतो; व शरीरापर्यंत त्यास देतो. परंतु मनापासून प्रसन्न होऊन आपला जीव अर्पण करणें, असें कोणाला केलें आहे काय? तर नाहीं ११. तें आमचें मनापासून प्रसन्न होणें तुझ्याकरितां असून अंतःकरणांतील गुह्य कमावून एवढें मोठें विश्वरूप ध्यान तुझ्याकरितांच तयार केलें आहे १२. माझी प्रसन्नताहि तुझ्या प्रेमभक्तीनें कशी काय वेडावली, हें माझें मलाच कळत नाहीं, म्हणून आमचें जें परम गुह्य विश्वरूप, त्याचा जगांत ध्वज उभविला आहे १३. तें हें माझें अनंत, अविनाशी व अनादि मायेपलीकडील स्वरूप असून याच्यापासूनच कृष्णादिक सर्व अवतार होत असतात १४. हें माझें स्वरूप केवळ ज्ञानतेजानें ओतप्रोत भरलेलें, विश्वव्यापक, अनंत व अढळ असून सर्वांच्या आरंभींचें ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे १५. अर्जुना! तुझ्यावांचून हें दुसऱ्या कोणी पूर्वीं ऐकिलेलें व पाहिलेलें नाहीं. कारण हें कोणत्याहि साधनानें सहजा सहजीं प्राप्त होणारें असें नव्हें १६.

१ लगबग. २ अडचण. ३ काढा, दूर करा. ४ जग वसविणाऱ्या. ५ नीलकमलास. ६ रंगाचा मासला दाखवीत. ७ प्रभा, झांक. ८ सुगंध. ९ पाचूस, मरकतमण्यास.

१० हात. ११ गुडघ्यावर. १२ मदनांस. १३ शोभा. १४ शोभा. १५ आली. १६ धारण केलें. १७ मोक्षास. १८ अधीरे, हावरे, हपापलेलें, भुकेलेलें.

निखिळें । विश्वात्मक केवळ । अनंत हें अढळ । आद्य सकळां ॥१५॥ हें तुजवांचोनि अर्जुना । पूर्वीं श्रुत दृष्ट नाहीं आना । जे जोगें नव्हे साधनां । म्हणौनियां ॥ १६ ॥

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवं रूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

याची सोयें पातले । आणि वेदीं मौनचि घेतलें । याज्ञिकी मागौते आले । स्वर्गौनियां ॥ १७ ॥ साधकीं देखिला आयासु । म्हणौनि वोळिला योगाभ्यासु । आणि अध्ययनें सौरसु । नाहीं एथ ॥१८॥ सीगेचीं सत्कर्में । धाविन्नलीं संभ्रमें । तिहीं बहुतेकीं श्रमें । सत्यलोकु ठाकिला ॥ १९ ॥ तपीं ऐश्वर्य देखिलें । आणि उग्रपण उभयांचि सांडिलें । एक तपसाधन जें ठेलें । अपारांतरें ॥६२०॥ तें हें तुवां अनायासें । विश्वरूप देखिलें जैसें । इये मनुष्यलोकीं तैसें । न फवेचि कवणा ॥ २१ ॥ आजि ध्यानसंपत्तीलागीं । तूंचि एकु आथिला जगीं । हें परम भाग्य आंगीं । विरंचीही नाहीं ॥२२॥

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपतेभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

म्हणौनि विश्वरूपलाभें श्लाघ । एथिंचें भय नेघ नेघ । हें वांचूनि अन्य चांग । न मनीं कांहीं ॥२३॥ हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत वरपडां जाहला । मग कोणीही आथि वोसंडिला । बुडिजैल म्हणौनि? ॥ २४ ॥ नातरी सोनयाचा डोंगरु । येसणा नें चले हा थोरु । ऐसें म्हणौनि अव्हेरु । करणें घडे? ॥ २५ ॥ दैवें चिंतामणी लेईजे । कीं हें ओझें म्हणौनि सांडिजे? । कामधेनु दवडिजे । न पोसवे म्हणौनि? ॥ २६ ॥ चंद्रमा आलिया घरा । म्हणे निगे करितोसि उबारा । पडिसायि पाडितोसि दिनकरा । परता सर ॥ २७ ॥ तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज । कीं एथ तुज गजबज । होआवी कां? ॥ २८ ॥ परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा? ॥ २९ ॥ हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनियां कांचें । प्रेम धरिसी अवगौणियेचें । चतुर्भुज जें ॥ ६३० ॥ तरि अझुनिवरी पार्था । सांडीं सांडीं हे व्यवस्था । इयेविषयीं आस्था । करिसी झणें ॥३१॥ हें रूप जरी घोर । विकृती आणि थोर । तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ॥ ३२ ॥ कृपण चित्तवृत्ति जैसी । रोंवोनि घालीं ठेवयापांसीं । मग नुसधेनि देहेंसीं । आपण असे ॥ ३३ ॥ कां अजातपक्षिया जवळा ।

**अन्वयार्थ—कुरुप्रवीर**—हे अर्जुना! **नृलोके**—या मनुष्यलोकीं—**त्वदन्येन**—तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाकडून—**अहं**—मी—**एवं रूपः**—अशा रूपाचा—**द्रष्टुं**—पाहाण्यास—**वेदयज्ञाध्ययनैः**—वेद व यज्ञ यांच्या अध्ययनांनीं—**न शक्यः**—शक्य नाहीं—**दानैः न**—दानांनीं नाहीं—**क्रियाभिः न**—कर्मांनीं नाहीं—**च**—व—**उग्रैः तपोभिः**—न [ **शक्यः** ]—उग्र तपांनीं शक्य नाहीं ४८.

स्वरूपाच्या ठिकाणापर्यंत येतांच वेदांनीं मौन धारण केलें; यज्ञ करणारे स्वर्गापर्यंतच जाऊन माघारी परत आले; १७. साधकांनीं योगाभ्यासाचें श्रम करूनहि याची प्राप्ति होणें अवघड आहे, असें पाहून योगाभ्यासच सोडला आणि अध्ययन करणारांसहि ह्या स्वरूपापर्यंत येणें सुलभ झाले नाहीं १८. पूर्णत्वास आलेल्या नित्य-नैमित्तिक कर्मांनीं, आपल्या मोठेपणाच्या भ्रमानें उत्सुक होऊन धांव घेतली, ती कर्मेंहि मोठ्या श्रमानें फार झाले तर सत्यलोकापर्यंत येतात; १९. तपस्व्यांनीं या विश्वरूपाचें ऐश्वर्य पाहिले व उभ्याउभ्याच आपला उग्रपणा टाकला. याप्रमाणें तपःसाधन करणारेहि यापासून फारच फार दूर राहिले; ६२०. तें हें विश्वरूप सहजासहजीं जसें तुझ्या दृष्टीस पडलें तसें या मनुष्यलोकांत कोणाच्याहि दृष्टीस पडलें नाहीं २१. आज या जगांत ध्यानसंपत्तीला योग्यतासंपन्न असा तूंच एकटा आहेस. ब्रह्मदेवाच्या अंगींहि या विश्वरूपदर्शनाचे असले थोर भाग्य नाहीं २२.

**अन्वयार्थ—मम**—माझें—**इदम् ईदृक् घोरं रूपं**—हे अशा प्रकारचें घोर रूप—**दृष्ट्वा**—पाहून—**ते**—तुला—**व्यथा**—पीडा—**मा**—[ **भूत्** ] न होवो—**च**—आणि—**विमूढभावः**—तुझ्या चित्ताचा अत्यंत मूढभाव—**मा**—[ **भूत्** ] न होवो—**त्वं**—तूं—**पुनः**—पुनरपि—**व्यपेतभीः**—निर्भय व—**प्रीतमनाः**—संतुष्ट चित्त होऊन—**तत् एव**—तेंच—**इदं मे रूपं**—हें माझें रूप—**प्रपश्य**—पहा ४९.

म्हणून सर्वव्यापक विश्वरूपदर्शनाच्या लाभानें तूं आज स्वतःला धन्य मान. बाबारे! याचें भय मानूं नकोस आणि त्यावांचून दुसरें कांहीं चांगलें आहे असें मनांत देखील आणूं नकोस २३. अरे! अमृतानें तुडुंब भरलेला समुद्र जर अकस्मात् प्राप्त झाला, तर मग आपण त्यांत बुडून मरून जाऊ अशा भीतीनें तो कोणी टाकून देईल काय? २४. किंवा सोन्याचा डोंगर दृष्टीस पडल्यावर "हा एवढा मोठा सोन्याचा डोंगर कसा नेतां येईल, तर नाहीं" असें म्हणून कोणी त्याचा अव्हेर करून जाईल का? २५. दैवयोगानें चिंतामणी संज्ञक रत्न प्राप्त झाल्यावर ते अंगावर धारण करावें. ते सोडून त्याचे ओझें होतें म्हणून कोणी टाकून देईल का? किंवा कामधेनु आपल्यास पोसवत नाहीं म्हणून हाकून द्यावी. २६. शीत उत्पन्न करणारा चंद्र घरीं आला, असतां तुझ्यापासून उष्मा होतो,' असें म्हणून त्याला 'बाहेर जा,' असें कोणी म्हणेल काय? 'तूं सांवली पाडतोस म्हणून पलीकडे जा' असें कोणी सूर्याला म्हणेल काय? २७. त्याचप्रमाणें, या तेजस्वी विश्वरूपाचें ऐश्वर्य आज तुझ्या हातीं सहजीं लाभले असून तुझ्या मनांत गडबड वा गोंधळ कां उत्पन्न व्हावा? २८. पण अर्जुना! तूं अगदीं गांवढळ असून तुला कांहीं समजत नाहीं. आतां तुझ्यावर काय रागावावयाचे? अरे! तूं अंग सोडून पडछायेला आलिंगन देतो आहेस नव्हे काय? तूं आपलें मन अधीर करून अलीकडील साकार चतुर्भुज रूपावर प्रीति करतोस; हें बरे नाहीं, कारण, तें माझें खरें स्वरूप नव्हे ६३०. म्हणून पार्था! अजून तरी चतुर्भुज रूपाची आस्था सोड व माझ्या विश्वरूपाची कदाचित् अनास्था करशील पण करूं नकोस ३१. हे व्यापक विश्वरूप जरी भयंकर अवाढव्य आहे, तरी तेंच माझें खरें स्वरूप आहे, असा तूं आपल्या मनाचा पूर्ण निश्चय कर ३२. ज्याप्रमाणें कृपण मनुष्य आपलें मन द्रव्याच्या ठेव्याजवळ ठेवून फक्त शरीरानें जगांत इतर सर्व व्यापार करीत असतो ३३. किंवा पंख फुटले नाहींत अशा पिलांजवळ घरव्यांत आपला

१ शुद्ध. २ ठिकाण, मार्ग. ३ स्वर्गाहून. ४ श्रम. ५ त्यागिला. ६ किंमत, गोडी, योग्यता. ७ पूर्णत्वास आलेली, अत्युत्तम पूर्ण. ८ आपल्या मोठेपणानें. ९ प्राप्त करून घेतला. १० उभ्याउभ्याच. ११ दूर राहिलें. १२ फार दूर. १३ संपन्न थोर, योग्य. १४ ब्रह्मदेवालाहि. १५ धन्यता, मान व आनंद मानून घे. १६ अकस्मात्. १७ स्वाधीन झाला, प्राप्त झाला. १८ ओढून टाकून दिला. १९ एवढा. २० नेतां येत नाहीं. २१ नीघ, दूर हो. २२ उष्मा, तलखी. २३ पडच्छाया, सांवली. २४ गडबड. २५ अधीर, भ्याड. २६ सोंगाचें, मिथ्या वस्तूचें. २७ करूं नको. २८ विकाळ. २९ द्रव्याच्या ठेव्याजवळ. ३० केवळ. ३१ पंख फुटले नाहींत अशा पिलाजवळ.

जीव बैसवूनि अविसाळां । पक्षिणी अंतराळीं- । माजीं जाय ॥ ३४ ॥ नांना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधिलें वत्सें घरीं । प्रेम एथिंचे करीं । स्थानपती ॥३५॥ येरें वरिचिलेनि चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें । भोगिजो कां श्रीमूर्तींतें । चतुर्भुज ॥३६॥ परि पुढतपुढती पांडवा । हा एक बोलु न विसरावा । जे इये रूपींहूनि सद्भावा । नेदावें निघों ॥३७॥ हें कहीं नव्हतेंचि देखिलें । म्हणौनि भय जें तुज उपजलें । तें सांडीं एथ संचलें । असों दे प्रेम ॥ ३८ ॥ आतां करूं तुजयासारखें । ऐसें म्हणितलें विश्वतोमुखें । तरि मागील रूप सुखें । न्याहाळीं पां तूं ॥ ३९ ॥

संजय उवाच :—

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

ऐसें वाक्य बोलंतखेंवो । मागुता मनुष्य जाहला देवो । हें ना परि नवलावो । आवडीचा तिये ॥६४०॥ श्रीकृष्णाचि कैवल्य उघडें । वरि सर्वस्व विश्वरूपायेवढें । हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासि ॥४१॥ वस्तु घेऊनि वांळिजे । जैसें रत्नासि दूषण ठेविजे । नातरी कन्या पाहूनियां म्हणिजे । मना न ये हे ॥४२॥ तया विश्वरूपायेवढी दशा । करितां प्रीतीचा वाढू कैसा । सेलें दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ॥ ४३ ॥ मोडोनि भांगाराचा रवां । लेणें घाडिलें आपलिया सवां । मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥४४॥ तैसें शिष्याचिये प्रीति जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें । तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ॥ ४५ ॥ हा ठाववरी शिष्याची निकैसी । संहातें गुरु आहाती कवणे देशीं ? । परि नेणिजे आवडी कैशी । संजयो म्हणे ॥ ४६ ॥ मग विश्व व्यापूनि भोंवतें । जें दिव्य तेज प्रगटलें होतें । तेंचि सामावलें मागुतें । कृष्णरूपीं तये ॥ ४७ ॥ जैसें त्वंपद हें आघवें । तत्पदीं सामावे । अथवा द्रुमाकारु सांठवे । बीजकणिके जेवीं ॥ ४८ ॥ नातरी स्वप्नसंभ्रमु जैसा । गिळी चेइली जीवदशा । श्रीकृष्णें योगु हा तैसा । संहारिला तो ॥४९॥ जैसी प्रभा हारपली बिंबीं । कीं जळदसंपत्ती नभीं । नानैा भरतें सिंधुगर्भीं । रिगालें राया ॥ ६५०॥ हो कां जे कृष्णाकृतीचिये मोडी । होती विश्वरूपपटाची घडी । ते अर्जुनाचिये आवडी । उकलूनि दाविली ॥ ५१ ॥ तंव परिमाणां रंगु । तेणें देखिलें साविया चांगु । तेथ ग्राहकीये नव्हेचि लागु ।

आपला सर्व जीव ठेवून पक्षीण आकाशांत संचार करण्यास जाते ३४. अथवा गाय जरी डोंगरावर चरत असली तरीहि तिचें चित्त घरीं बांधलेल्या वांसरावर अडकलेलें असतें. तसें तुझें प्रेम या माझ्या विश्वरूपाच्या ठिकाणीं कायमचें ठेव ३५. बाकी सख्यभक्तिसुखानें मनाच्या समाधानाकरितां वरकांति माझ्या चतुर्भुज मूर्तीचें पाहिजे तर ध्यान कर ३६. परंतु हे पांडवा ! वारंवार एवढें हें एक माझें वाक्य विसरूं नकोस आणि या माझ्या व्यापक स्वरूपापासून तूं आपला सद्भाव दुसरीकडे कोठेहि जाऊं देऊं नकोस ३७. हें तूं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतेस, म्हणून तुला भीती उत्पन्न झाली आहे, ती सोडून दे व या विश्वरूपाच्या ठिकाणीं तुझें प्रेम कायम सांठवलेले राहूं दे " ३८. नंतर विश्वरूप धारण करणारे श्रीकृष्ण भगवान् म्हणाले, " अर्जुना ! आतां तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी आपलें पूर्वीचें चतुर्भुज रूप धारण करितों, तें सगुणरूप तूं सुखानें, खुशाल पहा " ३९.

**अन्वयार्थ**—**इति**—याप्रमाणें—**वासुदेवः**—वासुदेव—**अर्जुनम्**—अर्जुनाला—**तथा**—तसें वचन—**उक्त्वा**—बोलून—**भूयः**—पुनः—**स्वकं रूपम्**—आपलें रूप—**दर्शयामास**—दाखविता झाला—**च**—आणि तो—**महात्मा**—महात्मा—**पुनः**—पुनरपि—**सौम्यवपुः**—सौम्य रूपाचा—**भूत्वा**—होऊन—**भीतम् एनं**—भ्यालेल्या त्याला-अर्जुनाला—**आश्वासयामास**—धीर देऊन त्याचें समाधान करिता झाला ५०.

एवढें वाक्य बोलून देवांनीं पुनः लागलीच मनुष्यरूप धारण केलें. महाराज म्हणतातः—पुनः मनुष्यरूप धारण केलें, यांत कांहीं विशेष नवल नाहीं; पण हा देवभक्तांच्या आवडीचा मात्र मोठा चमत्कार आहे ! ६४०. श्रीकृष्ण हे केवळ प्रत्यक्ष परब्रह्मच होते आणि त्यांनीं विश्वरूपासारखें आपलें सर्वस्व अर्जुनाच्या हातीं दिलें, असें असूनहि तें त्याला आवडलें नाहीं ४१. आपणास एकादी वस्तु पाहिजे म्हणून मागून घेऊन मग ती नको म्हणून टाकावी अथवा रत्नाला दूषण ठेवावें किंवा एखाद्या मुलीची चांगली विचारपूस करून पाहून ' मला ती पसंत नाहीं ' असें म्हणावें, तसा हा अर्जुनाच्या म्हणण्याचा प्रकार झाला ४२. श्रीकृष्णांनीं अर्जुनास उपदेशाचा शेलका वांटा जें विश्वरूप तें दाखविलें, यावरून अर्जुनावर किती पराकाष्ठेचें प्रेम होतें, हे स्पष्ट दिसून येते ४३. सोन्याची लगड मोडून त्याचा आपल्या हौसेप्रमाणें दागिना घडल्यावर तो जर आपल्या मनास आवडला नाहीं, तर तो पुनः आटवून जशी त्याची लगड करावी ४४. त्याप्रमाणें शिष्याच्या प्रीतीकरितां हा प्रकार झाला. प्रथम कृष्णरूप होतें त्याचे अर्जुनाच्या आवडीकरितां विश्वरूप केलें, तें त्याच्या मनाला आवडलें नाहीं, म्हणून पुनः सगुण असें कृष्णरूप आणलें ४५. अशा प्रकारची शिष्याचीं जिकीर सहन करणारे श्रीगुरु कोणत्या तरी देशांत आहेत काय ? परंतु ह्यावरून भक्तराज अर्जुनाविषयीं देवाचे किती प्रेम आहे हें सांगतां येत नाहीं, असें संजय म्हणाला ४६. भगवंतांनीं विश्व व्यापून आपल्या सभोंवती विश्वरूपाचें जें दिव्य तेज प्रगट केलें होतें, तेच त्यानें पुनः त्याच सगुण कृष्णरूपांत समाविष्ट करून सांठविलें ४७. ज्याप्रमाणें ' तत्त्वमसि ' महावाक्यांतील ' त्वम् ' हे सर्व पद [ अल्पज्ञ, अल्पशक्तिमान् जीवांचें लक्ष्यार्थभूत जें कूटस्थ चैतन्य ] ते ' तत् ' पदामध्यें [ सर्वज्ञ सर्व शक्तिमान् ईश्वराचे लक्ष्यार्थभूत जें ब्रह्मचैतन्य ] त्यांत सामावतें, [ स्वरूपतः अधिष्ठानभूत दोन्ही चैतन्यें एकच आहेत ]. अथवा बीजकणांत सर्व वृक्षाकार सांठवला जातो ४८. किंवा स्वप्नांतील सर्व विस्तारास जीवाची जागृत अवस्था, ही जशी गिळते. त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं चतुर्भुजमूर्ति धारण करून तो विश्वरूपाचा योग-विश्वरूप विस्तार आपल्यांत सामावून घेतला ४९. जशी सूर्याची प्रभा सूर्यांतच लय पावते, अथवा मेघ आकाशांत लय पावतात, किंवा समुद्राची भरती समुद्राच्याच पोटांत जिरते ६५०. त्याचप्रमाणें अर्जुनाच्या आवडीकरितां कृष्णरूप आकृतींत जी विश्वरूपवस्त्रांची घडी घातली होती ती उघडून, उकलून दाखविली ५१. तेव्हां त्या विश्वरूपरूपी वस्त्राची लांबी, रुंदी व रंग सर्व नीट पाहिल्यावर, गिऱ्हाईक जो अर्जुन त्यास तें वस्त्र घेण्याची आवड व शक्यता दिसत नसल्यामुळें पुनः त्याची चतुर्भुज मूर्तिरूपी घडी

---

१ घरट्यांत. २ आकाशांत. ३ अथवा. ४ वारंवार. ५ देऊं नये. ६ विश्वरूपी श्रीकृष्णानें. ७ बोलतांक्षणींच. ८ आश्चर्य. ९ परब्रह्म. १० टाकावीं. ११ उत्तम वाटा. १२ सोन्याची लगड. १३ हौसेप्रमाणें. १४ किरकिर. १५ सहन करणारे. १६ जीवदशा, जगद्रूप. १७ ब्रह्मरूपी. १८ वृक्ष. १९ बीजांत. २० स्वप्नाचा विस्तार, घोंटाळा. २१ जागृत झालेली. २२ मेघ. २३ अथवा. २४ समुद्रांत. २५ जिरतें. २६ वळणांत, घोलांत. २७ लांबी, रुंदी व पोत.

म्हणौनि घडी केली पुढती ॥ ५२ ॥ तैसें वाढीचेनि बहुवसपणें । रूपें विश्व जिंतिलें जेणें । तें सौम्य कोडिसवाणें । साकार जाहलें ॥५३॥ किंबहुना अनंतें । धरिलें धाकुटपण मागुतें । परि आश्वासिलें पार्थातें । बिहालियासी ॥ ५४ ॥ जो स्वप्नीं स्वर्गा गेला । तो अवसांत जैसा चेइला । तैसा विस्मयो जाहला । किरीटीसी ॥ ५५ ॥ नातरी गुरुकृपेसवें । वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें । स्फुरे तत्त्व तेवीं पांडवें । श्रीमूर्ति देखिली ॥ ५६ ॥ तया पांडवा ऐसें चित्तीं । आड विश्वरूपाची जेवनिका होती । ते फिटोनि गेली परौती । हें भलें जाहलें ॥ ५७ ॥ काय काळातें जिणोनि आला । कीं महावातु मागां सांडिला । आपुलिया बांही उतरला । सातही सिंधु ॥ ५८ ॥ ऐसा संतोष बहु चित्तें । घेइजत असे पंडुसुतें । विश्वरूपापाठीं कृष्णातें । देखोनियां ॥ ५९ ॥ मग सूर्याचिया अस्तमानीं । मागुती तारा उगवती गगनीं । तैसा देखों लागला अवनीं । लोकांसहित ॥ ६६० ॥ पाहे तंव तेंचि कुरुक्षेत्र । तैसेंचि देखे दोहीं भागीं गोत्र । वीर वर्षताति शस्त्रास्त्रें । संघाटवेरी ॥ ६१ ॥ तया बाणांचिया मांडवाआंतु । तैसाची रथु देखे निवांतु । धुरे बैसला लक्ष्मीकांतु । आपण तळीं ॥ ६२ ॥

अर्जुन उवाच :—

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन । इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥**

एवं मागील जैसें तैसें । तेणें देखिलें वीरविलासें । मग म्हणे जियालों ऐसें । जाहलें आतां ॥ ६३ ॥ बुद्धीतें सांडोनि ज्ञान । भेणें वळघलें रान । अहंकारेंसीं मन । देशोधडी जाहलें ॥ ६४ ॥ इंद्रियें प्रवृत्ती भुललीं । वाचा प्राणा चुकली । ऐसें औपांपरी होती जाली । शरीरग्रामीं ॥ ६५ ॥ तियें आघवींचि मागुतीं । जिवंत भेटलीं प्रकृती । आतां जितांणें श्रीमूर्ती । जाहलें मियां ॥ ६६ ॥ ऐसें सुख जीवीं घेतलें । मग श्रीकृष्णातें म्हणितलें । मियां तुमचें रूप देखिलें । मानुष हें ॥ ६७ ॥ हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपत्या चुकलिया । बुझांवोनि तुवां माया । स्तनपान दिधलें ॥ ६८ ॥ जी विश्वरूपाचिया सागरीं । होतों तरंग मवितें वांवेवरी । तो इये निजमूर्तीच्या तीरीं । निगालों आतां ॥६९॥ आइकें द्वारकापुरसुहाडा । मज सुकतिया जी झाडा । हे भेटी नव्हे वेंहुडा । मेघाचा केला ॥६७०॥ जी सावियांची तृषा फुटला । तया मज अमृतसिंधु हा भेटला ।

घातली ५२. याप्रमाणें ज्या विश्वरूपाच्या अति वाढण्यानें सर्व जग व्यापून टाकलें होतें, तेंच रूप चतर्मुज पुनः शांत व गोजिरवाणें असें झालें ५३. किंबहुना ! ! अनंतानेंच पुनः लहान स्वरूप धारण केलें; पण अर्जुन जो अगदीं भिऊन गलितधैर्य झाला होता त्याला आश्वासन दिल्यामुळें धीर आला ५४. एखादा स्वप्नांत स्वर्गास गेलेला मनुष्य जसा अकस्मात् जागा व्हावा म्हणजे तो जसा आश्चर्यचकित होतो. तसा अर्जुन आश्चर्यचकित झाला ५५. किंवा श्रीगुरुकृपा होतांक्षणींच सर्व प्रपंचज्ञान ओसरल्यावर-बाधित झाल्यावर आत्मतत्त्वानें परब्रह्मतत्व-साक्षात्कार होतो, त्याप्रमाणें विश्वरूप ओसरल्यावर श्रीकृष्णास पाहून अर्जुनाची स्थिती झाली ५६. अर्जुनाच्या मनांत असें वाटलें कीं, चतुर्भुज मूर्तीच्या आड जो विश्वरूपाचा पडदा होता, तो नाहींसा झाला; फार उत्तम झाले ५७. जणुं काय काळाला जिंकून आला किंवा भयंकर वाऱ्यास मागे हाटवून आला अथवा सातहि समुद्र आपल्या बाहूंनीं पोहून उतरून आला ५८. वरील संकटांतून पार पडल्यावर जसा आनंद होतो, त्याप्रमाणें विश्वरूप दर्शनानंतर श्रीकृष्णरूप पाहिल्यावर अर्जुनाच्या चित्तांत फार आनंद झाला ५९. मग सूर्य अस्तास गेल्यावर जशा आकाशांत चांदण्या पुनः प्रगट होऊन चमकूं लागतात, त्याप्रमाणें विश्वरूप नाहींसें झाल्यावर अर्जुन सर्व लोकसमुदायासह पृथ्वी पाहूं लागला ६६०. आणि पाहतो तों तेंच कुरुक्षेत्र जसेच्या तसेच होतें आपल्या व शत्रूंच्या सैन्यांत सर्व गोत्रजहि जसेच्या तसेच आहेत व एकमेकांवर शस्त्रास्त्रांचे समुदायच्या समुदाय वर्षाव करीत आहेत ६१. त्यांनीं टाकलेल्या त्या बाणांच्या मांडवाखालीं आपला रथ जागच्या जागीं पूर्वीप्रमाणें तसाच स्थिर उभा आहे व भगवान् लक्ष्मीपती पुढे धुऱ्यावर बसलेले असून आपण रथाखालीं आहोंत ६२.

**अन्वयार्थ**—**हे जनार्दन**—हे जनार्दना !—**तव**—तुझें **इदं मानुषं सौम्यं रूपं**—हें मनुष्याकार सौम्य रूप—**दृष्ट्वा**—पाहून [ मी ]— **इदानीम्**—आतां – **सचेताः**—प्रसन्नचित्त व—**प्रकृतिं गतः**—स्वभावास प्राप्त—**संवृत्तः**—झालों—**अस्मि**—आहे ५१.

याप्रमाणें वीरश्रेष्ठ अर्जुनानें पूर्वीचे जसें मागितलें होते तसें प्रभूचें पूर्ववत् स्वरूप पाहिल्यावर तो मग म्हणाला —"महाराज ! खरोखर मी आतां वांचलों, असें मला वाटतें ६३. माझें ज्ञान हें बुद्धिला सोडून भीतीनें रानोमाळ झालें होतें, व अहंकारासह वर्तमान मन हें देशोधडीस लागलें होतें; ६४. इंद्रियें आपापल्या विषय प्रवृत्तीस विसरली होती. वाचाहि प्राणास मुकली—बंद पडली होती आणि याप्रमाणें शरीररूपीं गांवात दुर्दशा, अव्यवस्था झाली होती ६५. ही सर्व अव्यवस्था मोडून मन, बुद्धि व इंद्रियें पूर्वीं प्रमाणेंच टवटवीत समाधानानें आपापला व्यापार करूं लागलीं; म्हणून श्रीकृष्णमूर्तीच्या दर्शनानें मीं आतां खास वांचलों" अशीं अर्जुनाची खात्री पटलीं ६६. याप्रमाणें अंतर्यामीं मनांत सुख पावून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला कीं, "देवा ! आपण हें जें मनुष्यरूप—श्रीकृष्णरूप धारण केलें तें मीं डोळे भरून पाहिलें ६७. देवराया! आपण या श्रीकृष्णरूपाचें दर्शन मला दिलें म्हणजें हें मज चुकलेल्या लेंकराची समजूत घालून त्वां मातेनें मला स्तनपानच घावे असें झालें ६८. विश्वरूप समुद्रांत जो मी हातांनीं लाटांचें पाणी तोडीत, आक्रमित होतों, तो मी आतां या तुमच्या चतुर्भुज मूर्तिरूप तीराला येऊन लागलों ६९. हे द्वारकावासी वीर-श्रेष्ठा ! आपण मला हें चतुर्भुजरूप दर्शन दिलें असें नाहीं, तर मजसारख्या सुकून चाललेल्या वृक्षावर जणुं मेघवर्षावच केला ! असें झाले ६७०. महाराज! प्रस्तुत तहानेने व्याकुळ झालेला जो

१ गोजिरवाणें, सुंदर. २ भ्यालेल्यास. ३ अकस्मात्. ४ लय पावल्यावर. ५ ब्रह्म. ६ पडदा. ७ बाहूंनीं. ८ पृथ्वी. ९ शस्त्रास्त्रांचा. १० समुदाय. ११ स्थिर, जागच्या जागीं. १२ अर्जुनानें. १३ वांचलों. १४ वेधलें, शिरलें. १५ बोलणें.

१६ दुर्दशा, अव्यवस्था. १७ सांप्रत, हल्ली. १८ जीवन. १९ मुलाला. २० समजावून. २१ मोजीत. २२ द्वारकेंतील, सुहड–सुहृद-मित्र. २३ वृष्टि, बहुडाबहूदक. २४ सहज.

आतां जिणयाचा जाहला । भरंवसा मज ॥ ७१ ॥ माझिया हृदयरंगणीं । होताहे हरिखलतांची लावणी । सुखेंसि बुझावणी । जाहली मज ॥ ७२ ॥

श्रीभगवानुवाच :--

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम । देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः ॥ ५२ ॥

यया पार्थाचिया बोलासवें । हें काय म्हणितलें देवें । तुवां प्रेम ठेवूनि यावें । विश्वरूपीं कीं ॥ ७३ ॥ मग इये श्रीमूर्ती । भेटावें सडिया आयती । ते शिकवण सुभद्रापती । विसरलासि मा ॥ ७४ ॥ अगा आंधळिया अर्जुना । हाता आलिया मेरुही होय सानां । ऐसा आथी मना । चुकीचा भावो ॥ ७५ ॥ तरी विश्वात्मक रूपडें । जें दाविलें आम्ही तुजपुढें । तें शंभूही परि न जोडे । तपें करितां ॥ ७६ ॥ आणि अष्टांगादिसंकटीं । योगी शिणताति किरीटी । परि अवसरु नाहीं भेटी । जयाचिये ॥ ७७ ॥ तें विश्वरूप एकादे वेळ । कैसेनि देखों अळुमाळ । ऐसें स्मरतां काळ । जातसे देवां ॥ ७८ ॥ आशेचिये अंजुळी । ठेऊनि हृदयाचिया निडळीं । चातक निरांळीं । लागले जैसे ॥ ७९ ॥ तैसे उत्कंठा निर्भर । होऊनियां सुरवर । घोकीत आठही पाहार । भेटी जयाची ॥६८०॥ परि विश्वरूपासारिखें । स्वप्नींही कोण्ही न देखे । तें प्रत्यक्ष तुवां सुखें । देखिलें हें ॥८१॥

नाहं वेदैर्न तपसा न दानेन चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

पैं उपायांसि वाटा । न वाहती एथ सुभटा । साहीसहितं वोहटा । वाहिला वेदीं ॥ ८२ ॥ मज विश्वरूपाचिया मोहरां । चालावया धनुर्धरा । तपांचियाही संभारा । नव्हेचि लागु ॥ ८३ ॥ आणि दानादि कीर कोनडें । मी यज्ञींही तैसा न सांपडे । जैसेनि कां सुखाडें । देखिला तुवां ॥ ८४ ॥ तैसा मी एकीचि परि । आतुडें गा अवधारीं । जरी भक्ति येऊनि वरी । चित्तातें गा ॥ ८५ ॥

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन । ज्ञातुं दृष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गतीचि नेणें ॥ ८६ ॥ कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसिती । गंगा जैसी अनन्यगती । मिळालीचि मिळे ॥ ८७ ॥ तैसें सर्वभावसंभारें । न धरतं प्रेम एकसरें । मजमाजीं संचरें । मीचि होऊनि ॥ ८८ ॥ आणि तेवींचि मी ऐसा । थेंडिये माझारीं सरिसा । क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ॥ ८९ ॥ तैसें मजलागुनी मुंगी-वरी । किंबहुना चराचरीं । भजनासि कां दुसरी । परीचि नाहीं ॥ ६९० ॥ तयाचि

मी त्या मला हा चतुर्भुज मूर्तिरूप अमृतसिंधूच अवचित भेटला म्हणून माझ्या जगण्याचा मला भरंवसा आला ७१. माझ्या हृदयरूप अंगणांत हर्षरूप वेलीची लावणी झाली आहे आणि आतां सहजींच माझी व सुखाची समजूत झाली आहे, म्हणजे मला आनंद झाला आहे " ७२.

**अन्वयार्थ**--**यत् मम रूपं**-जें माझें रूप-**दृष्टवान् असि**-तूं पाहिलें आहेस-**इदं सुदुर्दर्शं**-[ **अस्ति** ]-तें हें रूप दिसणें अतिशयच कठीण आहे-**देवाः अपि**-देवसुद्धां-**नित्यं**-नेहमीं-**अस्य रूपस्य**-या रूपाच्या-**दर्शनकांक्षिणः** [ **सन्ति** ] दर्शनाची आकांक्षा करणारे आहेत ५२.

हें अर्जुनाचें भाषण ऐकल्याबरोबर श्रीकृष्ण म्हणाले:- " अरे, हें काय, खरोखर तूं विश्वरूपावरच प्रेम ठेवून मग [सगुण रूपास] येऊन मिळावेंस ! ७३. अर्थात मग या चतुर्भुज मूर्तीला भेटण्याकरितां फक्त शरीरानें ये; ही जीं मीं तुला पूर्वीं शिकवण दिली होती ती विसरलास काय ? ७४. अरे आंधळ्या अर्जुना ! एवढा मोठा [ सोन्याचा ] मेरु पर्वत तो एकदां कां हातीं लागला म्हणजे सामान्यास त्याचे महत्त्व ज्ञात नसल्यामुळें त्याचें कौतुक न वाटून लहानच आहे अशी मनाची समजूत होते. ही मनाच्या भावनेची चूक आहे ७५. तर बाबा ! आम्ही जें विश्वव्यापकरूप तुला दाखविलें तें अनेक तपें करून शंकरासहि प्राप्त होत नाहीं ७६. आणि किरीटी ! अष्टांगयोग साधनासारखी संकटें आचरण करून योगी शिणतात तरी त्यांनाहि जें विश्वरूप पाहण्यास अवकाश सांपडत नाहीं ७७. तें विश्वरूप एकदां तरीं थोडेंसें पाहावयास मिळेल काय ! असें घोकतां घोकतां त्या चिंतनांत देवांचीहि आयुष्यवेळ निघून जाते; ७८. आशारूप ओंजळ हृदयरूप कपाळावर ठेवून [ अतिशय आशाबद्ध होऊन ] चातक पक्षी जसा मेघाची वाट पहात आकाशाकडे बघत बसतो ७९. त्याप्रमाणें विश्वरूप दर्शनाच्या अत्यंत उत्सुकतेनें आतुर होऊन देवहि व मनुष्येंहि आठहि प्रहर आम्हाला विश्वरूपाची भेट होईल काय ! म्हणून घोकीत बसतात ६८०. पण त्यांपैकी कोणी स्वप्नांत देखील जें पाहिलें नाहीं, असें हें विश्वरूप आज प्रत्यक्ष मोठ्या आनंदानें तूं पाहिलेंस ८१.

**अन्वयार्थ**-**यथा**-ज्याप्रमाणें तूं-**मां**-मला-**दृष्टवान् असि**-पाहिलें आहेस-**एवंविधः अहं**-अशा प्रकारचा मी-**वेदैः**-वेदांनीं-**न द्रष्टुं शक्यः**-पहाणें शक्य नाहीं-**तपसा न**-तपानें नाहीं-**दानेन न**-दानानें नाहीं-**च ईज्यया न**-व यज्ञानें किंवा पूजेनेंहि दिसण्यासारखा नाहीं ५३.

हें बघ अर्जुना ! या विश्वरूपाचें दर्शन होण्यास कोणत्याहि साधनांचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून चारी वेदांनीं सहा शास्त्रांसह माघार घेतली ८२. हे धनुर्धरा ! माझ्या या विश्वरूपासमोर चालत येण्यास पुष्कळ तपसमुदायहि समर्थ नाहींत ८३. ज्याप्रमाणें तूं अनायासें माझें संपूर्ण विश्वरूप पाहिलेंस त्याप्रमाणें तें दानें व यज्ञ करणाऱ्यांच्याहि दृष्टीस पडणें कठीण आहे ८४. असा जो मीं तो एकाच उपायानें निश्चितपणें सांपडतो तो उपाय हाच कीं, जर अंतःकरणास भक्ति आपण होऊन येऊन वरील तरच माझ्या या विश्वरूपाचें दर्शन होईल हे लक्षांत ठेव ८५.

**अन्वयार्थ**-**हे परंतप अर्जुन**-हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना !-**तु**-पण-**एवंविधः अहम्**-अशा प्रकारचा मी-**अनन्यया भक्त्या**-अनन्य भक्तीनें-**तत्त्वेन** -तत्त्वतः-**ज्ञातुं**-जाणण्यास-**च**-व - **द्रष्टुं** - पाहण्यास-**च** -व - **प्रवेष्टुं**-प्रवेश करण्यास-**शक्यः**-शक्य आहें ५४.

परंतु तीच भक्ति, अशी की, पावसाच्या धारा आकाशांतून सुटल्यावर त्यांना जशी पृथ्वीवर येऊन पडल्याशिवाय दुसरी गतिच ठाऊक नाहीं. त्याप्रमाणें जर एकनिष्ठ असेल ८६. किंवा ज्याप्रमाणें गंगा आपल्यांत मिळालेली पाण्याची सर्व ओघसंपत्ति घेऊन समुद्रास मिळण्याकरितां त्याचा शोध घेत घेत जाते व एकनिष्ठेनें समुद्रास मिळते व समुद्रांत मिळून पुनः एकसारखी मिळतच असते ८७. त्याप्रमाणें मजविषयीं सर्वभावांनी भरलेले असें जो अनावर एकसारखे प्रेम धरतो तो माझ्यामध्यें प्रवेश करून मद्रूपच होतो ८८. आणि ज्याप्रमाणें क्षीरसमुद्र हा कांठांशीं व मध्यभागीं एकसारखाच दूधमय वा गोड असतो, त्याप्रमाणें मी सर्वत्र सारखाच व्याप्त आहें ८९. त्याचप्रमाणें माझ्यापासून तों थेट मुंगीपर्यन्त किंबहुना ! ! स्थावर-जंगम प्राणिमात्राचे ठिकाणीं ज्यांना भजन करण्यास माझ्यावांचून निराळा द्वैतभावच उरत नाहीं ६९०. अशी ज्या वेळेस चित्त-

१ आयुष्याचा, जगण्याचा. २ ज्ञान. ३ सड्या मार्गानें, निःसंगपणानें. ४ लहान. ५ समय, वेळ. ६ किंचित्. ७ कपाळीं. ८ आकाशाकडे. ९ आशायुक्त, उत्सुक. १० चार वेदांनीं सहा शास्त्रांसह, वोहटा-माघार घेतली. ११ पुढें, समोर, मार्गानें. १२ कठीण, दुर्बोध. १३ सुकाळपणानें, सुखानें. १४ सांपडतें. १५ धार, वृष्टि. १६ पृथ्वीशिवाय. १७ अन्य. १८ खंड न पडतां. १९ समुदाय. २० प्रेम न सांवरतां. २१ कांठांशीं आणि मध्यें सारखा.

क्षणासवें । एवंविध मी जाणवें । जाणितला तरी स्वभावें । दृष्टेंही होय ॥ ९१ ॥ मग इंधनीं अग्नि उँद्दीपें । आणि इंधन हें भाष हारपे । तें अग्नीचि होऊनि आँरोपें । मूर्त जेवीं ॥ ९२ ॥ कां उदय न कीजे तेजोंकारें । तंव गगनाचि होऊनि असे आंधारें । मग उदईलिया एकसरें । प्रकाशु होय ॥ ९३ ॥ तैसें माझिये साक्षात्कारीं । सरे अहंकाराची वोरी । अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥ ९४ ॥ मग मी तो हें आघवें । एक मीचि आथी स्वभावें । किंबहुना सामावे । समरसें तो ॥ ९५ ॥

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः । निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगोनाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

जो मजचि एकालागीं । कर्में वाहातसे आंगीं । जया मजवांचोनि जगीं । गोमटें नाहीं ॥ ९६ ॥ दृष्टादृष्ट सकळ । जयाचें मीचि केवळ । जेणें जिणँयाचें फळ । मजाचि नाम ठेविलें ॥ ९७ ॥ मग भूतें हें भाष विसरला । जे दिठी मीचि आहें सूदला । म्हणौनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ॥ ९८ ॥ ऐसा जो भक्तु होये । तयाचें त्रिधांतुक हें जैं जाये । तैं मीचि होऊनि ठायें । पांडवा गा ॥ ९९ ॥ ऐसें जगदुदरदोंदिलें । तेणें करुणोरसरसाळें । संजयो म्हणे बोलिलें । श्रीकृष्णदेवें ॥ ७०० ॥ ययावरी तो पंडुकुमरु । जाहला आँनंद-संपदा थोरु । आणि कृष्णचँरणचतुरु । एक तो जगीं ॥ १ ॥ तेणें देवाचिया दोनही मूर्ती । निकिया न्याहाळिलिया चित्तीं । तंव विश्वरूपाहूनि कृष्णाकृतीं । देखिला लाभु ॥ २ ॥ परि तयाचिये जाणिवे । मानु न कीजेचि देवें । जे व्यापकाहूनि नव्हे । एकदेशी ॥ ३ ॥ हेंचि समर्थावयालागीं । एक दोन चांगीं । उपपत्ती शाङ्र्गी । दाविता जाहला ॥ ४ ॥ तिया ऐकोनि सुभद्राकांतु । चित्तीं आहे म्हणंतु । तरि होय बरवें दोन्ही आंतु । तें पुढतीं पुसों ॥ ५ ॥ ऐसा आलोचु करूनि जीवीं । आतां पुसती वोजें बरवी । आदरील ते परिसावी । पुढें कथा ॥ ६ ॥ प्रांजळ ओंवीप्रबंधें । गोष्टी सांगिजेल विनोदें । तें परिसा आनंदें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७ ॥ भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोंवियाफुलें मोकळीं । अर्पिलीं अंघ्रियुगेलीं । विश्वरूपाच्या ॥ ७०८ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ श्लोक ५५, ओंव्या ७०८.

★

वृत्ति होते, त्याच वेळेस माझ्या सर्व व्यापक विश्वरूपाचें ज्ञान होतें आणि असे ज्ञान झालें म्हणजे अर्थात् दर्शनहि होतें ९१. मग जसें घर्षणानें लांकडांपासून अग्नि उत्पन्न होऊन लांकूड पेटल्यावर लांकूड हें नांव नाहींसें होऊन तेंच मूर्तिमन्त अग्निरूप बनतें ९२. किंवा जोपर्यंत सूर्य उगवला नाहीं तोंपर्यंत गगन अंधकारानें भरलेलें असतें, मग तोंच सूर्य उगवल्यावर जसे ते आकाश सर्वत्र प्रकाशमय होऊन जाते ९३. त्याप्रमाणें माझा साक्षात्कार झाला म्हणजे अहंकाराची येरझारहि अविलंबेंकरून सदाचीच संपते व अहंकार नाहीसा झाल्यावर [ मी सर्वत्र श्रीहरिच पहात आहे असें दृश्य-द्रष्टाभावात्मक ] द्वैतहि निःशेषतया जाते ९४. मग [ विश्वासहित देहाहंकार नाहीसा झाल्यावर ] मी व तो व हे सर्व विश्व असा भेद निरंतरचा जाऊन केवळ सर्वत्र मीच म्ह. एकमेवाद्वितीय परमात्मतत्त्वच स्वभावतः उर्वरित राहते. किंबहुना ! ! तो जीव ऐक्यबोधानें माझ्याशीं समरस होतो ९५.

**अन्वयार्थ**–**पांडव**–हे अर्जुना !–**यः**–जो–**मत्कर्मकृत्** माझ्यासाठीं कर्म करणारा–**मत्परमः**–मीच ज्याची परम गति आहे असा–**मद्भक्तः**–माझा भक्त–**संगवर्जितः**–कोणामध्येंहि आसक्ति न ठेवणारा–**सर्वभूतेषु**–सर्व भूतामध्यें–**निर्वैरः**– वैररहित असतो–**सः**–तो–**मां**–मला **एति**–प्राप्त होतो ५५.

जो मलाच एकट्याला स्वतः केलेलीं सर्व कर्तव्यकर्में अर्पण करितो व ज्याला जगांत माझ्यावांचून दुसरें कांहीं आवडत नाहीं; ९६. ज्याचे ऐहिक व पारलौकिक हे सर्व केवळ मीच होऊन राहिलो आहे. ज्यानें मलाच म्ह. मत्प्राप्तीलाच जीवनाचें फल असें मानले आहे ९७. जो प्राणीमात्र हे नांवच विसरला कारण, मलाच सर्वत्र पाहतो म्हणून भूतें माझ्यापासून वेगळी आहेत, हीं भाषाहि तो जाणत नाहीं त्यामुळें सर्वांशीं निर्वैर होऊन, निर्मत्सर होऊन जगांतील जी जी वस्तु दृष्टीस पडेल तींत व्याप्त असणाऱ्या सर्वेश्वरास भजतो ९८. हे पांडवा ! याप्रमाणें ज्या भक्ताची वृत्ति बनते आणि ज्या वेळेस त्याचें कफपित्तवातात्मक हे शरीर पडते. त्या वेळेस तो मद्रूपच होऊन रहातो ९९. संजय म्हणतो–हे धृतराष्ट्रा, ! ज्याच्या उदरांत हे सर्व जग भरून राहील्यानें उदर मोठें झालें आहे अशा त्या श्रीकृष्ण भगवानानें करुणारसयुक्त म्ह. रसाळवाणीनें असें भाषण केलें ७००. त्यानंतर आनंदरूप संपत्तीनें श्रीमान् व या सर्व जगतांत कृष्ण स्वरूपाची भक्ति करण्यांत चतुर असा जो अर्जुन १. त्यानें देवांच्या दोन्ही मूर्ति चित्तांत विचारदृष्ट्या नीट न्याहाळून पाहिल्या; परंतु त्यांत विश्वरूपापेक्षां एकदेशी सगुण कृष्णमूर्तींत विशेष लाभ आहे असें मानलें २. पण अर्जुनाच्या या समजुतीस श्रीकृष्णानें मान दिलाच नाहीं. कारण, व्यापकरूपापेक्षां एकदेशी रूप श्रेष्ठ वा खरें नव्हे असे देव म्हणाले ३. हेंच सिद्ध करण्याकरितां श्रीकृष्णांनीं एक दोन.चांगले दाखले देऊन दृष्टांतासह युक्तिवादहि केले ४. ते युक्तिवाद ऐकून अर्जुन आपल्या मनांत असें म्हणूं लागला कीं, या दोन्ही रूपांत चांगलें रूप कोणतें आहे ते देवालाच या पुढें विचारावें ५. याप्रमाणें मनांत विचार करून आतां या पुढे तो कशा चांगल्या रीतीनें श्रीकृष्णास प्रश्न करील ती कथा पुढे आहे, ती ऐका ६. श्री निवृत्तिनाथांचे शिष्य श्री ज्ञानदेव म्हणतात–जी गोष्ट सुलभ अशा ओंवीप्रबंधांत विनोदानें सांगितली जाईल ती आनंदयुक्त अंतःकरणानें ऐका ७. सर्वेश्वर विषयक असलेल्या सद्भावाची ओंजळ करून त्यांत ओंवीरूपीं मोकळी फुलें भरून घाढून विश्वरूपाच्या दोन्हीं पायावर मी समर्पण केली आहेत ८.

१ दृष्टीस पडतो. २ जळणांत, काष्ठांत. ३ उत्पन्न होतो. ४ राहतें. ५ सूर्य व चंद्र यांनीं. ६ यात्रा, फेरी. ७ इहपर. ८ ज्यानें जीविताचें साफल्य माझेंच प्राप्तीवर ठेविलें आहे. ९ भरलेला. १० कफवातपित्तात्मक शरीर. ११ ज्याचे उदरांत सर्व जग भरून उदर मोठें झाले आहे त्यानें. १२ करुणारसयुक्त वाणीनें. १३ आनंदरूप संपत्तीनें श्रीमान्. १४ कृष्णाची भक्ति करण्यांत चतुर. १५ समजुतींत. १६ सिद्ध करण्यास. १७ दाखले, उदाहरणें. १८ विचार करीत. १९ विचार. २० ठेवण, पद्धत. २१ स्पष्ट, सुलभ. २२ दोन्ही पायांवर.

★

# अध्याय संगति व अकराव्या अध्यायाचें तात्पर्य

म्हणोनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें । प्रयागमाधव विश्वरूप पाहावें ।
येतुलेनि संसारासि द्यावें । तिलोदक ॥ अ. ११–१०

हा अध्याय 'विश्वरूपदर्शना'चा आहे. अर्थात् तत्त्वतः निर्गुण निरूपाधिक देव एकमेवाद्वितीय आहे; तरीपण नानाविधशक्तिसंपन्न, त्रिगुणात्मक कल्पित मायोपाधीमुळें देव या वैचित्र्यपूर्ण जगाचा कर्ता व कारणहि होऊं शकतो, त्या जगत्कारण ईश्वरासच 'अव्याकृत' म्हणतात, सूक्ष्मभूताभिमानी ईश्वरासच 'हिरण्यगर्भ' म्हणतात, आणि स्थूल भूताभिमानी ईश्वरासच 'विराट्' किंवा वैश्वानर म्हणतात. अशी ही एकाच ईश्वरास उपाधिभेदानें वेगवेगळीं नांवें आहेत. मत्स्य–कूर्मादि, किंवा रामकृष्णादि सर्व अवतारांचे मूळ मुद्दल हा मायाविशिष्ट–ईश्वरच असून तो 'विराट्रूप' ईश्वरच जेव्हां भक्तानुग्रहार्थ 'प्रत्यक्ष गोचररूप' धारण करतो, तेव्हां त्यास 'विश्वरूप' म्हणतात; तथापि हें 'विश्वरूप' आपल्या चर्मचक्षूंना विषय होणारे असें नाहीं. म्हणूनच तर देवांनीं अर्जुनासारख्या भक्तासही विश्वरूप पाहण्याकरितां 'दिव्य दृष्टि' देऊन 'विश्वरूप दर्शन' दिले आहे.

यांतील रहस्य म्हणजे अर्जुनास व वाचकास 'सर्वत्र परमात्माच ओतप्रोत घनदाट–भरला आहे' अशी व्यापकानुभूति प्राप्त व्हावी. परिच्छिन्न, संकोचित आकारवान् देहाला किंवा मूर्तीलाच कोणीहि खरा देव मानून न बसतां–परमेश्वराचे सर्वगत, सर्वात्मक, पारमार्थिक खरें व्यापक स्वरूप त्यांचे चित्तांत ठसावें हे होय. हाच वेद–तात्पर्य–विषयीभूत सिद्धान्त या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे. तो विषय श्रीज्ञानेशांनीं अलंकारपूर्ण व अर्थ गांभीर्यपूर्ण शब्दांत–सांगितल्यामुळें या अध्यायाचें सौंदर्यहि अधिकच वाढले आहे. श्रीज्ञानेशांनीं मानलेल्या चार ते अकरा या आठ अध्यायात्मक 'देवताकांडाचा' जवळ, जवळ शेवटचा समारोपात्मक असा हा अध्याय आहे.

श्रीज्ञानेशांनीं विश्वरूपदर्शनाचे असें कांहीं शब्दचित्र रेखाटले आहे कीं, जणुं अर्जुनाबरोबर श्रीज्ञानेशहि स्वतः 'विश्वव्यापक सर्वेश्वराचें प्रत्यक्षगोचर विराट्रूप पाहात आहेत आणि वाचकांस वा श्रोत्यांसहि दाखवित–आहेत. श्रीज्ञानेशांच्या वाङ्मयाचा 'स्थायीभाव म्हणजे सर्व रसाचा आधारभूत असणारा, सर्व–रसांचा प्राण असणारा, सर्व रसाचा गाभा असणारा ब्रह्मरस, महारस किंवा "शांतरस" होय.' या अध्यायांत अनुभूति संपन्न, संतकवि, संतसम्राट् श्रीज्ञानेशांच्या रसवृत्तीच्या स्फूर्तीला भरती आल्यामुळें नवरसांचा व त्यांच्या दिव्य प्रातिभेचा अलौकिक आविष्कार झाला आहे :—

या अध्यायांत शांतरसाच्या घरीं अद्भुत–रसरूपी पाहुणा, पाहुणचारास आला आहे. त्याशिवाय इतर रसांसहि मराठी भाषेंत उपर्युक्त उभय रसांच्या पंक्तीला यथोचित तो मान मिळाला आहे. जणुं अकरावा अध्याय हाच प्रयाग क्षेत्र बनला आहे, व तेथें शांत–अद्भुत रसांचे–दोन ओघ गंगायमुनेप्रमाणें एकमेकांस मिळाले–आहेत, आणि गीतारूपी सरस्वति त्या संगमांत गुप्त आहे. अशा त्रिवेणीसंगमात्मक श्रवणमार्गानें सुलभ रीतीनें नेण्याचे सामर्थ्य मला श्रीगुरु निवृत्तिनाथांनीं दिले आहे. किंबहुना ! ! या तीर्थाला येण्याकरितां श्रीनिवृत्तिदेवांनीं संस्कृत भाषेचें गहन किनारे फोडून, अरण्य तोडून, मराठी शब्दांच्या पायऱ्या रचिल्या आहेत. त्यामुळें या त्रिवेणी संगमावर कोणीहि किंबहुना ! ! आघव्या जगानें येऊन येथें सुस्नांत व्हावे आणि विश्वरूपरूपी–प्रयाग माधवाचे दर्शन घ्यावे व संसारास तिलांजली द्यावी.

हा अकरावा अध्याय म्हणजे देवाचे स्वतःचे विश्रांतिस्थान आहे ! पण अर्जुन दैववान् असा कीं, तो येथेंहि आला. अहो ! अर्जुनच काय पण आतां येथें कोणासहि येतां येईल. कारण, आतां 'गीतार्थु' हा मराठींत आला आहे.

या गीतातत्त्वाचे शिवाच्या बुद्धिसहि आकलन होत नाहीं. मग त्याचे वर्णन मी कसें करूं शकेन ? तरीपण आपण मजवर कृपा करून मजकडून बोलवाल तर शक्य आहे. अशा शब्दांत श्रीगुरु निवृत्तिनाथांना वंदन करून श्रीज्ञानेश्वर

महाराजांनींच अध्याय संगति सांगितली आहे; ती अशी—दहाव्या अध्यायांत सांगितलेल्या देवाच्या 'विभूति' ऐकून अर्जुन म्हणाला कीं, 'देखतसें विश्व आघवे, तुवां भरले," पण हे देवाच्या व्याप्तीचें अर्जुनास बुद्धीला पटलेले, सर्व व्यापकतेचे झालेलें ज्ञान म्हणजे 'परोक्षज्ञान' होय. परोक्ष विभूति ज्ञानानें एकसमयावच्छेदेंकरून सर्वव्यापक परमेश्वर स्वरूपाचें अपरोक्ष-प्रत्यक्षज्ञान, व्हावे, अशी अर्जुनास उत्कण्ठा, तीव्र इच्छा निर्माण झाली.

[हे जसें दहाव्या अध्यायाचे शेवटीं दिग्दर्शित केलें आहे. तसेंच या अध्यायाच्या आरंभींहि अर्जुनाची प्रत्यक्षानुभूतिविषयक तीव्र उत्कंठा श्रीज्ञानेशांनीं सांगितली आहे. त्यावरून अंतरंग अधिकाऱ्यास एकदेशीं केवळ बौद्धिक अशा परोक्षज्ञानानें किंवा अपूर्णज्ञानानें, केवळ पुस्तकीज्ञानानें कधीच पूर्ण समाधान किंवा रम्य समाधानरूपवृत्ति होत नसते. याचा अर्थ तत्त्वज्ञानोपदेश श्रवणाचा, कीर्तनादिकांच्या आपाततः श्रवणाचा कांहींच उपयोग नाहीं, असा मात्र नाहीं. कारण, तत्त्वज्ञानोपदेशाच्या आपाततः श्रवणादिकांमुळेंच चित्तावर परोक्षज्ञान संस्कार होऊन परब्रह्मविषयक असत्त्वापादक आवरण निवृत्तिपूर्वक अपरोक्षानुभूतीची तीव्र इच्छा, उत्कट जिज्ञासा, विविदिषा, निर्माण होत असते. ही खऱ्या साधकाची एक अतीव मननीय दशा सूचित होते. पुढे त्यास हरि-गुरु कृपेनें महावाक्योपदेशपूर्वक अपरोक्ष ज्ञान झालें तर परब्रह्मविषयक अभानापादक व अनानंदापादक अशा उभय आवरणांची निवृत्ति होऊन तो साधक चिरशांतिमय जीवन लाभानें कृतार्थ होतो.]

हे सर्वहि सर्वेश्वररूप आहे. परमेश्वर सर्वात्मक आहे, हें जें बौद्धिक केवळ परोक्षज्ञानात्मक आंत बुद्धीला आलेली प्रतीति, बाहेरहि प्रत्यक्ष डोळ्यांना दिसावे अशी अर्जुनास 'विश्वरूप दर्शना'ची तीव्र उत्कंठा लागून राहिली होती; पण ही जीवाची साच-चाड देवाला सांगणें अवघड आहे. कारण, अत्यंत गूढ असें हें 'विश्वरूप' प्रत्यक्ष मला दाखवा, असें देवास एकदम आपण कसें पुसावे ? असा विचार अर्जुनाच्या मनांत आला. कारण, ते 'विश्वरूप' निकटवर्ति अनन्य भक्तांनींहि-देवास विचारले नाहीं. बरे ! संकोचानें देवास न पुसावे तर विश्वरूप दर्शनाविना त्यास जगणेहि अशक्यप्राय वाटूं लागले. सरतेशेवटीं देव त्यांच्या मर्जीनुसार विश्वरूप दाखवोत अगर न दाखवोत, आपण आरंभीं थोडेसे विचारूं या, असा निश्चय करून अर्जुनानें 'देवा ! विश्वरूप दाखवा' अशी भीत भीत विनंती करण्याचा धीर केलाच. ते विनवणीचे बोलणें युक्तिपूर्ण, अशा खुबीदारपणाचें होते कीं, अर्जुनाच्या प्रास्ताविक एक दोन शब्दाबरोबरच प्रेममूर्ति देवांनीं आपले 'विश्वरूप' दाखविले. [१ ते ४३] तो प्रसंग असा--

अर्जुन म्हणाला देवा ! गूढ, मन बुद्धीस अनाकलनीय, असें जें अध्यात्मज्ञान तें तुम्ही मला सांगितलें. ते अर्जुनाच्या बुद्धीस पटूनहि प्रत्यक्ष ज्ञानाच्या अभावीं अर्जुन म्हणतो, साऱ्या विश्वांत एका ईश्वराविना दुसरें कांहींएक नाहीं; पण आमचेच दुर्दैव पहा की, परमेश्वराहून नामरूपात्मक विश्व भिन्न आहे, असें आम्ही समजतो. तसा देहतादात्म्य भ्रांतीनें जीवासहि ईश्वराहून भिन्न समजतो. अर्थात् अर्जुन नामक 'मी' ईश्वराहून भिन्न असून कौरव हे 'माझे' आत्मस्वकीय आहेत. त्यांना मारले तर मात्र पाप लागेल, अशा अहं-ममाध्यासाच्या भेदभ्रांतीचें दुःस्वप्न मला पडले होते, देवा ! त्या दुःस्वप्नांतून मला तूं जागे केलेस. अज्ञानजन्य देहतादात्म्यभ्रांतीच्या आग्रहात्मक डोहांत बुडतच होतो; पण तूं जवळ होतास म्हणून वाचलों. कारण, तूं माझी माया साद्यंत निरसिली आहे. त्यामुळें आतां मी उद्धरलों आहे [४४ ते ६८].

आतां तूं प्रसंगविशेषीं देवकार्यासाठीं व जगत्कार्यासाठीं द्विभुज किंवा चतुर्भुज अशी रूपें धारण करून पुनः पुनः येतोस. सर्व अवतारांचें ते 'तुझें मुद्दलरूप पहावे' अशी माझी तीव्र इच्छा आहे. ते विश्वरूप पाहण्याची माझी योग्यता असेल तरच दाखवा; नाहींतर आपले सरळ 'नाहीं' म्हणा. तुझें औदार्य स्वतंत्र असल्याचे सर्वांस ज्ञात आहे. तुला मारण्याच्या बुद्धीनें आलेल्या पुतना-शिशुपालादिकांस, पात्रापात्र न पाहतांहि मोक्षासारखें पवित्र दान दिलेस मी तर तुझाच आहे. म्हणून मला विश्वरूप दाखवशील यांत मुळींहि शंका नाहीं. त्यांत अडचण एवढींच कीं, माझ्या अंगीं विश्वरूप पाहण्याची योग्यता नसल्यानें ते मी पाहूं शकलो नाहीं तर आपण विश्वरूप दाखविले तरी ते वाया जाईल. तेव्हां अर्जुन प्राप्त असलेल्या डोळ्यांनीं विश्वरूप पाहूं शकेल कां नाहीं, याचा विचार न करतां अर्जुनाने 'विश्वरूप दाखवा' असें म्हटल्याबरोबर देवांनीं चतुर्भुजरूप सोडून विश्वरूप प्रगट केलें व म्हणाले, "अरे अर्जुना !

हे पहा माझें विश्वरूप " या विश्वरूपाच्या प्रत्येक केसाच्या बुडाशी सृष्टि पहा! पण दिव्यदृष्टीच्या अभावीं अर्जुन ते पाहूं शकत नव्हता. तो तसाच उत्कंठित अवस्थेंत स्तब्धच बसला होता, तेव्हां विश्वरूप दाखविण्याच्या घाईगर्दीत त्यास दिव्यदृष्टि देण्याचे विसरून गेलो हे जेव्हां देवाला समजले तेव्हां ज्ञानचक्षूंस विषय होणारे विश्वरूप पाहण्यासाठीं अर्जुनाला दिव्यदृष्टि दिली [ ६९ ते १७७ ].

सामान्य चर्मचक्षूला अविषय असणारे 'विश्वरूप' दिव्यप्रकाश प्रगटल्यानें ज्ञानदृष्टीवरील पडदा पार नाहींसा झाला, असें भगवंतांनीं आपले मूळचें खरें ऐश्वर्य त्याला दाखविलें, रामकृष्णादि, मत्स्यकूर्मादि अवतार, हे ज्या चैतन्य-सागरावरील जणुं लाटा आहेत व ज्याच्या किरणांवर या नामरूपात्मक विश्वरूपी मृगजळ कांहीं वेळ भासते व लागलींच नाहींसें होते, हे चराचरात्मक विशाल विश्वाचें चित्र ज्या अनादि तत्त्वात्मक भूमिकेवर उमटले आहे. ते देवाचे विश्वरूप अर्जुन पाहूं लागला. तो त्यास ते सर्वच आश्चर्यमय असें दिसलें. पाहण्याची तो जी जी इच्छा करीत होता ती ती फलद्रूप होत होती. संपूर्ण विश्वरूपानें परब्रह्मच ओतप्रोत भरून गेले होते. केवढी ती पंचमहाभूतें, पूर्वादिक दिशा पण त्यांचा मागमूसहि उर्वरित राहिला नाहीं. किंबहुना!! अनादि, अनंत, अखिल विश्वाचे मूळ व सर्व अवतारांचें मूळ मुद्दल ऐश्वर्यसंपन्न, भव्योदात्त स्वरूप दाखविल्यावर संपूर्ण विश्वरचना व तत्कारण 'माया' ती कोणीकडे आहे, याची भाषाहि तो जाणेनासा झाला. कारण, जागे झाल्यावर जसें स्वप्न नाहींसें होतें. तसा सृष्टीचा आकारहि नाहींसा झाला. सूर्यप्रकाशापुढें चंद्र, तारांगण जसे लुप्त होतात. त्याचप्रमाणें विश्वरूपांत नामरूपात्मक सर्व प्रपंचरचना लोप पावली त्याच्या मनाचें मनपणहि नाहींसें झालें. त्यास स्वरूपसमाधान लाभले. कारण, "विश्वरूप पहावे" असा जो इच्छेचा लळा होता तो असा श्रीकृष्णांनीं पुरविला होता [ १७८ ते १९६ ].

पण भव्योदात्त अशा त्या विश्वरूपांतील अपूर्वसुंदर आल्हाददायक, तेजोमय, आश्चर्यमय स्वरूपाबरोबर महा-मृत्युसारखी भयकारक अकाळ-विकाळ रूपेंहि जेव्हां अर्जुनानें पाहिली, तेव्हां भयभीत होऊन त्यानें डोळें मिटून घेतले; पण दिव्यदृष्टि प्रभावामुळें डोळे मिटले तरीहि अर्जुनास ते विश्वरूप दिसतच होते. तसेंच त्या श्रीव्यासमुनींच्या कृपेमुळें संजयासहि ते दिसत होते. त्यामुळें तोहि आनंदित झाला होता. त्या तेजोमय विश्वरूपाच्या तेजापुढें हजारों सूर्यांचें तेज फिके पडत होते. देवाधिदेव असणाऱ्या परमेश्वराचे स्वरूप इतके व्यापक आहे कीं, त्याच्या मानानें नामरूपांनीं भिन्न व विशाल भासणारें सारे जग महासागरावर अनेक बुडबुडे यावेत त्याप्रमाणें विश्वरूपाच्या एका बाजूस कोपऱ्यांत दिसत होते. अशी अनेक जगें, आकाशांतील गंधर्वनगराप्रमाणें, किंवा मुंग्याच्या वारुळाप्रमाणें किंवा मेरूपर्वतावरील परमाणूंप्रमाणें त्या देवाचाहि देव असणाऱ्या परमेश्वराच्या शरीरामध्यें दिसत होती. ते पाहिल्यावर द्रष्टा व दृश्य अर्थात् दृश्य विश्वापेक्षां द्रष्टा असलेलें आपण भिन्न आहोत, अशी उर्वरित राहिलेली कांहींशीं द्वैताची कल्पना व ती करणारें अंतःकरण, ही दोन्ही विरून गेली. त्यामुळें आपणासह अखिल विश्व हे परमेश्वर रूपच आहे, हे त्यास पटले. अष्टसात्त्विक भावसंपन्न होऊन तो ब्रह्मानंदाधिष्ठित झाला. मग तो अर्जुन देवापुढें 'मस्तक खालवून करसंपुट जोडून' म्हणाला' [ १९७ ते २५४ ].

देवा! मी अधिकारदरिद्री असतां मला विश्वरूप दाखविलें, ही खरोखरी आपण मजवर एक 'नवल कृपा' केली. हे देवा! तुझ्या विश्वरूपात्मक शरीरांत सत्यलोक, ब्रह्मदेव, कैलास, भवानीसह महादेव एवढेंच काय पण तूं सुद्धां संपूर्ण सृष्टीसह मला दिसत आहेस. किंबहुना!! तुझ्या शरीराच्या एक एक अवयवरूपीं भिंतीवर चौदा भुवनात्मक चित्रांच्या आकृतिच काढल्या आहेत, असें वाटतें. तुझ्या या रूपाला आदि-मध्य-अंत नाहींत. आकाराचे पैलतीर असें स्वरूप पाहावयास मिळालें. तूं असा सदाचाच निरपेक्ष व्यापक आहेस; पण अनन्य भक्तांवर अनुग्रह करण्यासाटीं लहान नामरूपात्मक अवतार धारण करतोस. मला दिव्यदृष्टि दिल्यामुळें तूं सर्व व्यापक, अपरिच्छिन्न असतांना तुला लहान, संकुचित चतुर्भुजरूपाएवढा, मर्यादित परिच्छिन्न साकार म्हणून पाहण्याचा माझा "दिठीचा विटाळु गेला". दृष्टीवर आलेले अज्ञानाचें पडळ गेले. निरंतरचे व्यापक स्वरूप पाहावयास मिळाले. तुझ्या तेजाची तीव्रताहि अद्भुत आहे. त्या तेजांत अग्नीचीहि दृष्टि करपते आहे. सूर्यतेजहि काजव्याप्रमाणें वाटत आहे. तुझ्या महातेजाच्या महासागरांत सर्व सृष्टि बुडाली आहे. जणुं प्रलयकालच्या विजांच्या पदरांत हे संपूर्ण आकाश झांकले गेले आहे. कालाग्निनामक रुद्राच्या ठिकाणीं गुप्त असलेला प्रलयकालीन प्रदीप्त झालेला अग्नि आज जणुं शंकराच्या तृतीय नेत्रांतून

बाहेर पडत आहे, असें तुझे हे तेज पाहून वाटत आहे. तेजोमय, सर्वसंहारक विश्वरूपास आलिंगनहि देतां येत नाहीं व माघारीहि फिरता येत नाहीं. असा मधल्यामध्यें बापुड्या त्रैलोक्याचा जणुं हुरडा होत आहे. देवा! महाभयानक व सर्व संहारक, दंष्ट्राकराल हे मुखाचें रूप पाहून सारी सृष्टि व मीहि घाबरून गेलों आहोंत. अतीव शोकाकुल झालों आहोंत. कोठून विश्वरूप पाहण्याचे डोहाळे झाले कोणास ठाऊक!! न कळे!! असें आतां वाटूं लागलें आहे. कृपा करून ही कोपदृष्टि, उग्र, सर्वभक्षक आणि सर्वसंहारकरूप आवर. हे कौरव त्यांचे प्रचंड सैन्य, पूज्य भीष्म, द्रोणाचार्य हे सर्व तुझ्या ज्वलन्त मुखांत पार नाहींसें होत असल्याचें मला दिसत आहे.

मी मारणारा, व हे कौरव मरणारे, अशा अहंममाध्यासानें अर्जुन ग्रासला गेला होता. तो अहंकार व भ्रम दूर करावा. सर्वांचा नाश करणारी अकुंठित सत्ता, भगवत् शक्ति वेगळी आहे असें निश्चयात्मक रीतीनें अर्जुनास पटवून द्यावे. म्हणून भगवंतांनी विश्वरूप दर्शनाचे निमित्त मात्र केले; परंतु देवाचा हा अभिप्राय अर्जुनाच्या लक्षांत आला नाहीं. त्यामुळें तो प्रलयाग्निसारखे विश्वरूप पाहून भयभीत व दुःखित झाला, धैर्यविगलित झाला, अतीव शोकाकुल झाला तेव्हां त्याचा काय अभिप्राय आहे ते त्यानें 'विश्वरूपरूपी' भगवंतासच विचारला [ २९९ ते ४९० ].

तेव्हां त्याचा शोक दूर करण्यासाठीं त्यास भगवंत म्हणाले 'मी सर्व लोकांचा संहार करणारा काळ आहे तरीपण तुम्ही पांडव मात्र त्या संहारांतून वाचणार आहांत. त्याशिवाय इतर या सर्व चतुरंग सैन्याचा मी ग्रास करणार आहे. या सर्व योध्यांचे बळ मी आधींच नष्ट करून केवळ मातीच्या चित्राप्रमाणें निर्जीव केले आहे. तुला अनुकूल काल आला कीं, तूं यशस्वी होणार आहेस. म्हणून तूं उठ व केवळ निमित्तमात्र हो. शत्रूंना जिंकून केवळ यशच नव्हे तर समग्र निःशात्रव राज्यहि मिळव. जेव्हां हे शत्रू माझ्या तोंडात गेले असल्याचें पाहिलेस तेव्हांच त्यांचे आयुष्य संपले आहे.

बलवान्, दुष्ट, तुम्हास विष घालणारे अर्थातच आततायी हे उन्मत्त झालेले 'दायाद तूं सहज मारलेस' हे जगांत प्रसिद्ध होऊन विश्वाच्या इतिहास पटावर लिहिले जाईल, असा विजय मिळविण्याचें कार्य तूं कर.

असें विश्वरूप श्रीकृष्णाचें गंगेच्या ओघाप्रमाणें गंभीर, भाषण चालू होते व अर्जुन अनन्य शरणागत होऊन ते श्रवण करीत होता. वारंवार नमस्कार करीत होता. त्या अर्जुनाच्या विनवणीतील "नमस्ते नमस्ते प्रभो" या सुमधुर पालुपदानें प्रेमलक्षणात्मक भक्तीचा झालेला आविष्कार अपूर्व सुन्दर आहे. अर्जुनास वाटत होते कीं, प्रस्तुतचा काळ हा "स्थितीकाल" असतांना भगवंत प्रलयकाळचे हे संहारकरूप कां दाखवीत आहेत. त्याचे समाधान सांगतांना देव म्हणाले. हे सर्व संहारक दिसणारे रूप केवळ या दोन्ही सैन्यापुरतेच सीमित आहे. इतर सर्व लोक आपापल्या योग्यवेळी मरणास प्राप्त होतील [ ४९१ ते ४९९ ].

[ सर्वज्ञ, सर्व शक्तिमान् ईश्वराच्या सत्यसंकल्पानुसार भविष्यकाळीं देखील काय काय घडावयाचे ते ते सर्व ठरलेलेच आहे ते अपरिहार्य, अटळ आहे; फक्त जीवास अज्ञात आहे ते योग्यसमयीं ज्ञात होत असते. हर एक क्षणाला स्थूल-सूक्ष्म देह या काळाचाच भक्ष्य बनत चालला आहे. अटळ व अखंड प्रवहरूपानें अनादि चालत आलेली, चाललेली, व अशीच चालत राहणारी ही-विनाशिता सर्वांच्या दृष्टीला विषय होऊन सर्वांस कळावी. अर्थात् सर्वांचेच देह हे कालाचे भक्ष्य आहेत, हे यांत म्हणजे सर्व संहारक मुखांत सर्वा सैन्य स्वतःच्या नाशासाठीं वेगानें शिरत आहे. व त्या मुखांत चिरडले जाऊन त्या सर्वांचा विश्वरूप ग्रास करीत आहे असें दाखवून, अर्जुनाला दिव्य दृष्टि देऊन विश्वरूप दर्शनाच्या निमित्तानें सूचित केले आहे. अटळ विषयाविषयीं शोक करीत न बसतां अर्जुना! तूं युद्ध-कर्तव्य अवश्य करावें. त्यापासून च्युत होऊं नयें, असें यांत सांगितलें आहे. ]

सांवळ्या, सुंदर श्रीकृष्णाचे मूळ निर्विशेष सत्सामान्य स्वरूप अनादि-निर्गुण अमायिक असेंच आहे. ते निरपेक्ष व्यापक आहे. तेंच या विश्वांत समव्याप्त आहे. ओतप्रोत भरले आहे, असें अर्जुनाच्या लक्षांत पूर्णपणें आले आहे. आजवर श्रीकृष्णास सखा, समवयस्क समजून थट्टा-विनोद, प्रसंग विशेषीं अवहेलनाहि करीत होता. आतां या सर्व पूर्व वागण्याविषयींचा त्यास पश्चात्ताप झाला. नंतर अर्जुनाने "देवा! त्रिभुवनांत, मावणार नाहींत एवढे अपराध माझे हातून घडले आहेत. तर ते आतां मातेप्रमाणें पोटांत घालावे व हे विश्वरूप आवरून पुनः शामसुंदर चतुर्भुज सौम्यरूप धारण करावे" अशी जेव्हां प्रार्थना केली [ ४९९ ते ६०८ ].

तेव्हां देव विस्मयानें युक्त होऊन म्हणतात 'अरे! माझे विश्वात्मक रूप तुला दाखविले आहे. या अलभ्य लाभानें संतोष न पावतां उलट भयभीत होऊन सकुंचित चतुर्भुज रूप पाहण्याची इच्छा करतोस. असा दुसरा 'धसाळ' कोणीच पाहिला नाहीं. तुला कोणती वस्तु लाभली आहे, हे न जाणतां भीतीनें काय बोलतोस ते कळत नाहीं. हे माझे निखळ ज्ञानस्वरूप म्हणजे विश्वव्यापक, अनंत, अविनाशी सर्वांचे आदिकारण; किंबहुना!! ज्याच्यापासून हे रामकृष्णादि अवतार झाले ते खरे सर्व श्रेष्ठ स्वरूप होय. हे स्वरूप पाहाण्याचे भाग्य ब्रह्मदेवासहि लाभले नाहीं. अशा माझ्या सर्वव्यापक 'विश्वरूप' दर्शनानें तूं स्वतःस धन्य मान. याचे भय मुळींच बाळगूं नकोस. याविना-चतुर्भुजादि सकुंचित मूर्ति तूं चांगली मानूं नकोस. प्रत्यक्ष अमृतानें तुडुंब भरलेला समुद्र अकस्मात् प्राप्त झाला तर त्यांत बुडून आपण मरून जाऊं म्हणून तो कोणी टाकील काय? एवढा मोठा सोन्याचा डोंगर आपणास नेता येत नाहीं, म्हणून कोणी टाकील काय? चिंतामणि नामक रत्न दैववशात् लाभले तर त्याचे ओझे होते म्हणून ते टाकण्याचा किंवा कामधेनु पोसवत नाही म्हणून दान देण्याचा हा प्रकार आहे. तसेंच सर्वव्यापक विश्वरूप सहजासहजीं तुला लाभले असतां तुझ्या मनांत गोंधळ कां व्हावा? अरे! गांवढळ अर्जुना! माझे जे हे 'विश्वरूप' तेच खरें आहे; पण तूं तेथे मन स्थिरकरण्याऐवजी त्याचे प्रतिकात्मक, परिच्छिन्न असें जे 'चतुर्भुजरूप' त्यावर तूं प्रेम करतोस, हे तुझें करणे म्हणजे शरीरास सोडून छायेसच आलिंगन देण्यासारखें आहे. म्हणून अजून तरी चतुर्भुज, परिच्छिन्न, देहधारी स्वरूप हेच ईश्वराचें खरें स्वरूप आहे, अशी मनोवृत्ति सोड, सोड. तिच्याविषयीं आस्था बाळगूं नकोस. माझें हे सर्व व्यापक 'विश्वरूप' तुला जरी भयजनक वाटत असलें तरी तेंच माझें खरें रूप आहे, असा तूं आपल्या मनाचा कृतनिश्चय कर. बाह्य अंतःकरणानें वरवर चतुर्भुज मूर्तीचा सख्यभक्ति सुखापुरता उपभोग घे; पण अन्तर्मन मात्र या विश्वरूपाचेच ठिकाणीं मालक कर. तेथेंच खरे प्रेम ठेव.

अर्जुना! तरीपण तुला वारंवार जी गोष्ट सांगत आहे. ती विसरूं नकोस. सर्वेश्वराचें 'विश्वरूप' हेच खरें स्वरूप होय. तूं ते 'विश्वरूप' पूर्वी कधींहि पाहिले नव्हतेस, ते अकस्मात् पाहिल्यानें पहिल्यान्दा भीति वाटणें साहजिक आहे; पण ती भीती तूं सोड. या सर्व व्यापक अशा विश्वरूपाचेच ठिकाणीं प्रेम सदैव संचले असो दे, ही भावना मुळींच सोडू नकोस, असें देव आवेशपूर्णतेने बोलले; पण पुनः अर्जुनाच्या प्रेमास्तव देव 'चतुर्भुज' झाले व त्यामुळें अर्जुनास पूर्ववत् सर्व दृश्य व चतुर्भुज मूर्ति दिसूं लागली. [ यांत निर्गुण, अमायिक परमात्म्याप्रमाणें देवाचें सगुण असें 'विश्वरूप' हि परिच्छिन्न नसून व्यापकच आहे, हे लक्षांत घेण्याजोगे आहे. सर्वव्यापक 'विश्वरूप' दर्शनानें भयभीत होऊन चतुर्भुज मूर्ति धारण करण्याची विनंती करून ते पारीच्छिन्न 'चतुर्भुज' रूप दर्शनानें आनंदित होणाऱ्या अर्जुनास 'धसाळ,' 'हेकाड,' 'गांवढळ,' 'आंधळा,' अशीं विशेषणें देऊन अर्जुनाच्या निमित्तानें जें जें कोणी देवास केवळ देहधारी मर्यादित, साकार, परिच्छिन्न समजतात त्या त्या सर्वांची ती समजूत भ्रान्त व चुकीची आहे, असें सूचित केले आहे. ]

श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं मूळ गीतेत स्पष्टपणें न सांगितलेला उपर्युक्त अभिप्राय श्रीकृष्णार्जुन संवादांत व्यक्त-विला आहे. तो खरोखरींच मुमुक्षूस चिंतनीय आहे. देवाचे विश्वात्मक व्यापक स्वरूप न जाणतां तो केवळ देहधारी, साकार मूर्तिस्वरूपच आहे, असें समजणें बरोबर नाहीं; तो एक तत्त्वज्ञानदृष्ट्या भ्रमच आहे, हे म्हणणे स्वभावतः असणाऱ्या लोकसमजुतीच्या व वरवर दिसणाऱ्या, रूढ अशा लौकिक भक्तीच्या विरुद्ध असल्यानें सहजीं कोणासहि पटणार नाहीं; पण विचारांतीं तेंच म्हणणें बरोबर आहे, असें लक्षांत येईल. सर्व विश्वांत देवच व्यापक आहे, असें जाणून सर्वभूतीं भगवत् भावानें अर्थात् निर्वैर, निर्मत्सर होऊन प्रेमपूर्वक स्वकर्म कुसुमांनीं केलेली पूजाच खरी ईश्वराच्या अपार संतोषास कारण आहे, असें या भक्तियोगांतील तात्पर्य होय. [ ६०९ ते ६३९ ].

जे हे 'विश्वरूप' तुला दाखविले, ते तपश्चर्या करून श्रीशंभूसहि पाहण्यास मिळाले नाही. तेथें वेदपठणाचा, तपाचा, दानाचा, यज्ञाचा अर्थात् कोणत्याहि साधनाचा लाग लागत नाहीं. चित्त जर अनन्यभक्तीनें भरून गेले, तरच देहाहंकार व द्वैत यांचा निरास होऊन, त्यांची आटणी होऊन माझा खरा आत्मत्वानें साक्षात्कार होईल. मग मी व तो हा भेद जाऊन सर्वत्र देवच उर्वरित राहतो. किंबहुना!! जीव परमेश्वरस्वरूपाशीं समरस होतो. 'साक्षात्कारानें', "जीवेशांचे सामरस्य" होते. [ ६४० ते ६९९ ].

[ अर्थात् सर्वत्र ब्रह्मभावरूप प्राप्त होतो ही श्रीज्ञानेशांनीं केलेली स्पष्टता अर्थभरित, तर्क सुसंगत, शास्त्रसंवादी व स्वानुभूतिगुणसंपन्न आहे. त्याचा थोडासा विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं. "**ब्रह्मसाक्षात्कार**" म्हणजे काय याचा विचार केल्यास श्रीज्ञानेशांनीं केलेली स्पष्टता सहजीं लक्षांत येईल. याविषयीं प्रथम श्रुति काय म्हणते याचा विचार करूं-"**यत् साक्षात् अपरोक्षात् ब्रह्म य आत्मासर्वान्तरः**" बृ० ३-४-१ जे साक्षात् अपरोक्षरूप म्हणजे स्वयंप्रकाशरूप ब्रह्म आहे तोच सर्वान्तर्यामी आत्मा होय. त्यास आत्मत्वानें जाणणें म्हणजे तत् स्वरूप होणें, म्हणजेच 'साक्षात्कार' होय.

साक्षात्कार म्हणजे परोक्षज्ञान नव्हे; तर आन्तरप्रत्यक्ष ज्ञान होय; पण सुख दुःख-साक्षात्काराप्रमाणें साक्षीभास्य नाहीं. कारण, त्या ब्रह्मज्ञानास श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ श्रीगुरुद्वारां-'**तत्त्वमस्या**'दि महावाक्यरूप बाह्य शब्द प्रमाणाचा, उपदेशाचा श्रोत्याच्या श्रवणाशीं संबंध हें बाह्यसाधन आहे. किंबहुना ! ! ब्रह्मज्ञान प्रबल प्रमारूप आहे. असा हा साक्षात्कार बुद्धिस्थ चिदाभासास-जागृतींत होतो "मी ब्रह्म आहें" असा साक्षात्कार झाल्यावर त्या वृत्तीचा विषय जें ब्रह्म त्याच्याशीं वृत्तीचा संबंध असल्याकारणानें ब्रह्माचें ज्ञान 'प्रत्यक्षरूप' आहे. अर्थात् 'वृत्तिव्याप्ति'च आहे, 'फलव्याप्ति' नाहीं. श्रीगुरुद्वारां झालेल्या महावाक्योपदेशानें शास्त्रीय शुद्ध अंतःकरणवृत्ति-अंतर्मुख होऊन, साक्षात्-अपरोक्षरूप अर्थात् अतिसन्निहित असलेल्या आत्म्यावरील अज्ञानाचे आवरण निवृत्त होऊन, आत्म्याचें स्वयंप्रकाशानें-सच्चिदानंद ब्रह्मरूपानें आपोआप ज्ञान होतें. हेंच ब्रह्मात्मैक्यज्ञान व हाच खरा ब्रह्मसाक्षात्कार होय.

अतिसन्निहित आत्म्याचा, सर्वांतर्यामी-आत्म्याचा, स्वयंप्रकाश आत्म्याचा, सर्वांस साक्षात्कार कां होत नाहीं ? याचें समाधान असें कीं, जीव हा 'अहंकार' वृत्ति व द्वैताभिनिवेश यांच्यामुळें बद्धतेस पावला आहे. अज्ञानकृत आवरण व अहंकार, द्वैत प्रतिबंधामुळें आपल्या अपरोक्षरूप, स्वयंज्योतिस्वरूप ब्रह्माचा साक्षात्कार होत नाहीं. म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-विवेकानें, ब्रह्मात्मैक्यज्ञानानें अज्ञानकृत आवरणाचा-निरास, व अहंकाररूप प्रतिबंध निवृत्त होतांच माझा-परमात्म्याचा साक्षात्कार होतो. अहंकाराची येरझार संपून तो पूर्णतया लोपला कीं; मग मी सर्वत्र परमात्माच पहात आहे, असें 'दृश्य-द्रष्टा'रूप द्वैतहि तेथें राहत नाहीं. अहंकार गेला कीं, जीव-भावाची विश्वासहित आटणी होऊन एकमेवाद्वितीय ब्रह्मस्थितिच राहते. जीव-शिवाचे सामरस्य होते, नव्हे तत्त्वतः जीव शिवस्वरूप सदाचा असतोच. स्वरूपदृष्ट्या जीव ब्रह्मरूप 'होणे' किंवा जीवभाव 'जाणे' हे कांहीं नाहीं; केवळ तसा 'व्यवहार मात्र' मध्यन्तरीच्या भ्रमामुळें होतो एवढेंच. दृश्य व तत्सापेक्ष द्रष्टा-असा ज्या साश्रय-सविषय अनुभूतीचा 'व्यवहार' होतो. त्या व्यवहार्य अनुभूतीचें अधिष्ठानभूत निर्विशेष, अव्यवहार्य सत्सामान्य अनुभूति स्वरूप उर्वरित राहणें हाच खरा-साक्षात्कार. तेथें अज्ञान व अज्ञानकृत आवरण नाहीं, अहंकार नाहीं, द्वैत वा द्वैताभिनिवेश नाहीं, मूर्च्छा नाहीं, स्वप्न नाहीं, निद्रा नाहीं, मरण नाहीं, बाह्य दृश्य प्रतीति नाहीं, पण शून्यहि नाहीं, म्हणजे ज्या सामान्य स्वयंप्रकाश अनुभूतीस 'नाहीं' म्हणण्याची सोय नाहीं. अशी ही साक्षात्कारात्मक सामरस्याची श्रीज्ञानेशांची स्पष्टता चिंतनीय वाटते ].

जगांत माझ्याविना दुसरें असें कांहींच नाहीं, अशा बोधानें सर्व कर्तव्यकर्में माझ्या करितांच करतो. तो ईश्वराशीं वरीलप्रमाणें-समरस होतो. माझ्याहून भिन्न भूतें आहेत, ही भाषाहि तो विसरतो. सर्व भूतांमध्यें तो मलाच पाहतो. त्यामुळें तो सहजच निर्वैर, निर्मत्सर होऊन सर्वत्र मलाच भजतो. तो भक्त प्रारब्धावशेष असेपर्यंत देहतादात्म्य-रहित ब्रह्मस्थितींत असतो व देहांतीं परब्रह्मरूप जो मीं त्या माझ्या देहरहित ब्रह्मरूपानें राहतो [ ६९६ ते ६९९ ].

अर्जुनानें व्यापक असें 'विश्वरूप' व एकदेशी सगुण श्रीकृष्णरूप या दोन्ही रूपांची तुलना करून पाहिली, तेव्हां कृष्णाकृति-ही लाभदायक आहे, असें त्यांस वाटलें, पण हे अर्जुनाचें मत देवास पटले नाहीं. कारण, व्यापक विश्वरूपाहून एकदेशी कृष्णरूप कनिष्ठ प्रतीचे आहे, हे देवांनीं दृष्टांतपूर्वक ठरविलें. त्या नंतर दोन्ही रूपांत कोणते रूप श्रेष्ठ आहे, असा प्रश्न अर्जुनानें विचारला. त्याचे उत्तर देव न रागावतां पुढील अध्यायांत देणार आहेत. सर्व-व्यापक परमेश्वरविषयक जो सद्भाव म्हणजे प्रेमलक्षणात्मक वृत्तिरूप भक्ति हीच कोणी एक अंजली असून तिच्यांत ओंव्यात्मक मोकळी फुले भरून ती विश्वात्मक विश्वरूपाच्या चरणद्वयांवर श्रीज्ञानेशांनीं समर्पिली, व या अध्यायाचा समारोप केला [ ६९९ ते ७०८ ].

[ या संपूर्ण अकराव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १४ पहावा. ]



★

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय बारावा

जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे । अनवरत आनंदें । वर्षतिये ॥ १ ॥ विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी । ते तुझिये गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥ २ ॥ तरी कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोकु जाळी । जरी प्रसादरस-कल्लोळीं । पुरें येसि तूं ॥ ३ ॥ योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे । सोऽहंसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ॥ ४ ॥ आधारशक्तीचियां अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाशपल्लकीं । परिये देसी निजे ॥५॥ प्रत्यक्ज्योतीचीं वोवाळणीं । करिसी मनपवनाचीं खेळणीं । आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ॥ ६ ॥ सतरावियेचें स्तन्य देसी । अनुहताचा हलरू गासी । समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ॥७॥ म्हणौनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं । या कारणें मी साउली । न संडीं तुझी ॥ ८ ॥ अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी । तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥ ९ ॥ म्हणौनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते । आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥१०॥ नवरसीं भरवीं सागरु । करवीं उचितें रत्नांचें आगरु । भावार्थाचे गिरिवरु । निफजवीं माये ॥ ११ ॥ साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवीं देशियेचिया क्षोणी । विवेक-वल्लीची लावणी । हों देईं सैंघ ॥ १२ ॥ संवादफळनिधानें । प्रमेयाचीं उद्यानें । लावीं म्हणे गहनें । निरंतर ॥१३॥ पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वाद अव्हांटे । कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं ॥ १४ ॥ श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें । राणिवे बैसवीं श्रोते । श्रवणाचिये ॥ १५ ॥ ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं । घेणें देणें सुखचिवरी । हों देईं या जगा ॥ १६ ॥ तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवें । तरी आतांचि हें आघवें । निर्मीन माये ॥ १७ ॥ इये विनवणीयेसाठीं । अवलोकिलें गुरुकृपादृष्टी । म्हणे गीतार्थेंसीं उठीं । न बोलें बहु ॥ १८ ॥ तेथ जी जी महाप्रसादु । म्हणौनि साविया जाहला आनंदु । आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥ १९ ॥

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय बारावा

हे शुद्ध सद्‌गुरु कृपादृष्टि माते! तुझा जयजयकार असो. कारण तूं निर्मल, उदार व निरंतर आनंदाचा वर्षाव करण्याविषयीं प्रसिद्ध आहेस १. हे गुरुकृपादृष्टे! विषयरूप सर्पानें मिठी मारल्यावर, दंश केल्यावर मूर्च्छित झालेल्या मनुष्याचें विष कांहीं केल्या जात नाहीं; पण तुझ्या योगानें उतरतें २. ज्याच्यावर तुझ्या प्रसादरूपी पाण्याच्या लाटांचा पूर आला म्हणजे संसारताप कोणाला पोळणार? किंवा शोक तरी त्यास कसा जाळूं शकेल? ३. हे स्नेहाळे! तुझ्या कृपेपासून सेवकाला योगसुखाचा-समाधिसुखाचा सोहळा लाभतो व 'मी ब्रह्मरूप आहें' अशा बोधाची जी सेवकाची हौस तीहि तूं पूर्ण करतेस ४. [भक्ताला] तूं आपल्या आधार शक्तीच्या अंकावर कौतुकानें बसवून वाढवितेस आणि त्यास हृदयाकाशरूपी पाळण्यांत घालून आपल्या उपदेशानें निजवून झोंके देतेस ५. ब्रह्मात्मैक्यज्ञानप्रकाशरूप आत्मज्योतीनें ओवाळणी करून त्यास मन व पवन यांची खेळणी देतेस. [मन व पवन त्याचे आधीन करून देतेस] आणि सेवकाकडून आत्मसुखाची बाळलेणी लेववितेस ६. सतरावी जीवनकलारूपी अमृतपान देऊन 'हंसः सोऽहं' या अखंड अनाहत ध्वनीचें गाणें गातेस व समाधिसुखाच्या बोधानें त्याची समजूत घालून [स्वस्वरूपी] निजवितेस ७. म्हणून तूं साधकांची माऊली आहेस; व तुझ्या चरणाच्या ठिकाणीं सर्व विद्या पिकतात [तूं सर्व विद्यानिधी असून तुझ्या आश्रयानेंच सर्व विद्या फलीभूत होतात.] याकरितां, मी तुझा आश्रय सोडीत नाहीं ८. हे सद्‌गुरु कृपादृष्टे! तुझी ज्याच्यावर दया होते तो सर्व विद्यारूप सृष्टीचा उत्पन्नकर्ताच होतो ९. म्हणून हे श्रीमान् अंबे, तूं आपल्या सेवकाच्या मनांतील इच्छा पूर्ण करणारी कल्पलताच आहेस; तर आतां हे माते! या गीतेचा अर्थ सांगण्याची तूं मला आज्ञा दे १०. माते! माझा हा ग्रंथ नवरसाचें सागरांनीं परिपूर्ण कर. उचित अशा अलंकार-रत्नाचे आगर होऊं दे. व भावार्थाचें उंच विशाल असें पर्वत निर्माण कर ११. या टीका लिहिण्यांत देशभाषारूप जमिनींत साहित्य सोन्याच्या खाणी उघडून सारासार विचाररूप वेलींचीं दाट भरपूर लावणी कर १२. त्यांत तत्त्वबोध होणाऱ्या संवादरूपी फळांचे ठेवे, मार्मिक सिद्धांताचे सतत राहणारे असें पुष्कळ बगीचे लावावीत १३. त्यांतहि पाखंडरूपी दरडी व वितंडवादरूपी आडवाटा मोडून कुतर्करूपी दुष्ट हिंसक जनावरें हाकून देऊन नाहींतशीं करावीत १४. मला श्रीकृष्णाचे गुण वर्णनांत समर्थ व उद्युक्त कर व नेहमी श्रोत्यांना श्रवणरूपी राज्यावर बसीव १५. मराठी भाषारूप नगरांत ब्रह्मविद्येचा इतका सुकाळ कर कीं, सर्व लोकांनीं सुखाच्याच देण्याघेण्याचा व्यवहार करावा १६. हे सद्‌गुरुकृपादृष्टे माये! तूं आपल्या कृपारूपी पदरानें मला नेहमीं पांघरूण घालशील तर आतांच याप्रमाणें ग्रंथनिरूपणामध्यें हे सर्वहि मी उत्पन्न करीन १७. एवढी विनंति ऐकल्याबरोबर श्रीगुरु निवृत्तिनाथांनी कृपादृष्टीनें श्रीज्ञानेश्वरांकडे अवलोकन करून सांगितलें कीं, तूं आतां गीतेचा अर्थ सांगण्यास सुरुवात कर. फार बोलूं नकोस १८. तेव्हां श्रीज्ञानेश्वरमहाराज मर्यादादर्शक 'जी जी' शब्द म्हणून आपण ही आज्ञा करून मला महाप्रसादच दिला आहे, त्यामुळें मला अतिशय आनंद झाला. आतां मी गीताग्रंथाचें निरूपण करितों, तिकडे लक्ष देण्याची कृपा करावी अशी त्यांनीं श्रोत्यांस प्रार्थना केली १९.

१ निर्मळ. २ उदार सद्‌गुरुमाउली. ३ निरंतर. ४ मूर्च्छा, ताटस्थ्य. ५ भाजी. ६ पुरानें. ७ मूलाधार चक्ररूपी शक्तीच्या मांडीवर. ८ हृदयाकाशरूपी पाळण्यांत. ९ झोंके. १० निजगुजानें, गुह्य उपदेशानें. ११ जीवात्मभाव ओंवाळून टाकितेस. १२ जीवनकलेचें. १३ हंसः-सोऽहं या अखंड ध्वनीचा. १४ गाणें. १५ समजूत. १६ विद्या. १७ आश्रय देई. १८ उत्पन्नकर्ता ब्रह्मदेव. १९ आपल्या सेवकाचे मनांतील इच्छा पूर्ण करणाऱ्या. २० उत्तम रत्नांचे. २१ खाण. २२ उत्पन्न करावें. २३ अलंकार-रूप. २४ देशभाषारूप. २५ जमिनींत. २६ पुष्कळ. २७ संभाषण फळरूपी ठेवा.

अर्जुन उवाच :—

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते । ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

तरी सकलवीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु । तो बोलता जाहला आत्मजु । पंडुनृपाचा ॥२०॥ कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज दाविलें । तें नवल म्हणौनि बिहालें । चित्त माझें ॥ २१ ॥ आणि इये कृष्णमूर्तीची सवे । यालागीं सोयँ धरिली जीवें । तंव नको म्हणोनि देवें । वारिलें मातें ॥ २२ ॥ तरी व्यक्त आणि अव्यँक्त । हें तूंचि एक निभ्रांत । भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥ या दोनी जी वाटा । तूंतें पावावया वैकुंठा । व्यक्ताव्यक्त दारवंठां । रिगिजे येथ ॥२४॥ पैं जे वांनी श्यातुंका । तेचि वेगळिये वाला येका । म्हणौनि एकदेशिया व्यापका । सरिसीं पाडू ॥ २५ ॥ अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी । तोचि दे अमृतलहरी । चुळी घेतलिया ॥ २६ ॥ हे कीर माझ्या चित्तीं । प्रतीति आथी जी निरुती । परि पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥ जें देवा तुम्हीं नावेक । अंगिकारिलें व्यापक । तें साचचि कीं कवतिक । हें जाणावया ॥ २८ ॥ तरी तुजलागीं कर्म । तूंचि जयाचें परम । भक्तीसी मनोधर्म । विकोनि घातला ॥२९॥ इत्यादि सर्वी परीं । जें भक्त तूंतें श्रीहरी । बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥ ३० ॥ आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसी जें कानडें । कायिसयाहि सांगडें । नव्हेचि जें वस्तु ॥ ३१ ॥ तें अक्षर जी अव्यक्त । निर्देश देशरहित । सोऽहंभावें उपासित । ज्ञानिये जें ॥ ३२ ॥ तयां आणि जी भक्तां । येरयेरांमाजीं अनंता । कवणें योगु तत्त्वतां । जाणितला सांगा ॥ ३३ ॥ इया किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला । म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥

श्रीभगवानुवाच :—

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते । श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

तरी अस्तुगिरीचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं । रश्मी जैसे किरीटी । संचरती गा ॥ ३५ ॥ कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पंडुसुता । तैसी नीचें नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥ परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु । तिये गंगेचिये ऐसा पाडिभरु । प्रेमभावा ॥ ३७ ॥ तैसे सर्वेंद्रियांसहित । मजमाजीं सूनि चित्त । जे रात्रिदिवस न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥

**अन्वयार्थ**—**एवम्**-अकराव्या अध्यायाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें –**सततयुक्ताः** –अहोरात्र भगवत्कर्मादिकांत युक्त होऊन–**ये भक्ताः**–जे मंद व मध्यम भक्त–**त्वां**–तुला–**पर्युपासते**-भजतात–तुझें ध्यान करितात–**अपि च**–आणि–**ये**–जे भक्त–**अव्यक्तम् अक्षरं पर्युपासते**–अव्यक्त ब्रह्माची उपासना–भक्ति–ध्यान करितात –**तेषां**–त्या दोन प्रकारच्या भक्तांतील–**योगवित्तमाः के**–अधिक योगवेत्ते कोण ?–त्यांतील अधिक श्रेष्ठ भक्त कोण ? १.

आतां सकलवीरशिरोमणि, सोमवंशाचा विजयध्वज व पंडुराजाचा मुलगा जो अर्जुन, तो बोलता झाला २०. " हे श्रीकृष्णा ! ऐकलें का ? तुम्हीं जें मला विश्वरूप दाखविलें तें अत्यंत अद्भुत असल्यामुळें माझ्या चित्तास भीति उत्पन्न झाली २१. आणि मला तुमच्या या सगुण मूर्तीची संवय असल्यामुळें माझ्या मनानें तिचीच आवड घेतली, तोंच देवा ! आपण " तेथें प्रेम ठेवूं नको ' असें बजावून माझा निषेध केला २२. तरी व्यक्त व अव्यक्त या दोन्हीं रूपांनीं निःसंशय तुम्हींच आहांत. सगुण भक्तीनें व्यक्त सगुणरूपाची व योगानें–निर्गुण उपासनेनें अव्यक्त म्ह० निर्गुण रूपाची प्राप्ति होतें २३. हें वैकुंठनायका ! श्रीकृष्णा ! तुमची प्राप्ति करून घेण्याकरितां [ भक्ती व योग ] या वाटा असून त्यांतील व्यक्त व अव्यक्त रूप तुझ्या स्वरूप प्राप्तीचें हे दोन उंबरे आहेत २४. हें पहा! शंभर भार वजनांच्या सोन्याच्या लगडीस जो कस असतो तोच कस त्या लगडींतील थोडें सोने निराळें करून त्यास लाविला तरी लागतो, म्हणून व्यापक अथवा एकदेशीय रूपाची योग्यता अगदीं सारखीच आहे २५. अमृताच्या समुद्रांत जी सामर्थ्याची थोरवी प्राप्त होते, तीच थोरवी अमृताच्या लाटेपासून चुळका भरून घेतल्यास प्राप्त होतें २६. आणि माझा अनुभवहि खरोखर तसाच आहे; पण याविषयीं मला तुम्हांला कांहीं विचारावयाचें आहे ते एवढ्याचकरितां कीं २७. देवा ! तुम्हीं जे क्षणभर व्यापक विश्वरूप धारण केलें होतें, तें खरेंच स्वरूप होतें किंवा ती केवळ लीला म्हणून दाखविलें आहें, हें समजण्याची माझी इच्छा आहे २८. माझ्या विचारण्याचा हेतु असा कीं, जो भक्त आपलीं सर्व कर्में तुमच्याचकरितां करून ज्याला तुमच्याशिवाय श्रेष्ठ असें जगतांत दुसरें कांहीं नाहीं व ज्यानें आपलें सर्व मनोधर्म तुमच्या भक्तीला विकून टाकलें आहेत २९. याप्रमाणें हे श्रीहरी ! जे भक्त सर्वतोपरी तुमचीच मूर्ती हृदयांत दृढ धारण करून उपासना करितात; ते ३०. आणि जें तुमचें स्वरूप ॐकारापलीकडे असून जें या वैखरी वाणीनें वर्णन करण्यास अशक्य आहे व कोणच्याहि वस्तुबरोबर ज्याची तुलना होत नाहीं ३१. जें अविनाशी, निराकार, इंद्रिय अगोचर, स्थलरहित, नामरहित, असल्यानें निर्देशरहित आहे. आणि ज्याची ज्ञानी लोक हे सोऽहंभावानें उपासना करितात ३२. त्या ज्ञान्यांमध्यें व भक्तांमध्यें, हें श्रीअनंता खरा योग तत्त्वतः कोणास समजला ? तें सांगा बरें " ३३. अर्जुनाच्या या बोलण्यानें जगद्बंधु श्रीकृष्ण संतोष पावून म्हणाले, वाहवा ! अरे अर्जुना ! प्रश्न करण्याची शैली तूं फार चांगली जाणतोस ! ३४.

**अन्वयार्थ**--**ये**-जे-**मयि**-माझ्या ठिकाणीं–माझ्या सगुण स्वरूपांत-**मनः**-मन-**आवेश्य**-स्थिर करून–माझ्या सगुण विश्वरूपांत मन लावून-**नित्ययुक्ताः**–सतत अहोरात्र युक्त–चित्त होऊन व-**परया श्रद्धया उपेताः**–अत्यंत श्रद्धेनें युक्त होऊन–**मां**–माझी–**उपासते**-उपासना करितात–मला भजतात–**ते**-ते सगुण भक्त–**मे**–मला–**युक्ततमाः**–अतिशय उत्तम भक्त–श्रेष्ठ उपासक, **असें**–**मताः**–संमत आहेत. सगुण ईश्वराची उपासना करणारें श्रेष्ठ असें मी समजतों २.

तुझ्या समजुतीकरितां अगोदर दृष्टान्त सांगतों. हे पहा ! अस्ताचलाच्या समीप सूर्यबिंब गेल्यानंतर लागलींच त्याच्या मागे जशीं किरणें जातात ! ३५. किंवा अर्जुना, पावसाळ्यांत नदी दररोज पाण्यामुळें अधिकच वाढते, त्याप्रमाणें माझी भक्ती करितांना ज्याच्या ठिकाणीं नित्य नवी वाढती श्रद्धा दृष्टीस पडते ३६. पण समुद्रास मिळाल्यावरहि जिच्यामध्यें मागून पाण्याच्या अनिवार लाटा येतच असतात, त्या गंगेप्रमाणें ज्यांच्या ठिकाणीं माझ्याविषयीं पूर्ण प्रेमभाव उचंबळत, वाढत असतो ३७. तसेंच दिवस व रात्र मनांत न आणितां कायावाचामनेंकरून माझ्याच स्वरूपीं दृढ चित्त ठेवून जें माझी उपासना करितात ३८. आणि याप्रमाणें जे भक्त

१ अद्भुत. २ भिऊन गेलें. ३ संवय, चटक. ४ आवड. ५ निवारण केलें. ६ सगुण. ७ निर्गुण. ८ भक्तीनें. ९ दरवाज्यानें. १०. कस. ११ शंभर भार वजनाच्या लगडीला. १२ विश्वरूप. १३ सारखी योग्यता. १४ अनुभव. १५ खरी.

१६ विराटरूप. १७ अंतःकरणीं. १८ अपरिचित, अवघड. १९ सारखें. २० अविनाशी. २१ ' तो मी ' या भावानें. २२ समयीं. २३ नित्य. २४ प्राप्त झाली, मिळाली असतांहि. २५ लोट, प्रवाह. २६ भर, अधिकपण. २७ घालून.

इयापरी जे भक्त । आपणपें मज देत । तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥ ३९ ॥

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते । सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥
संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः । ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

आणि येर तेही पांडवा । जे आरूढोनि सोऽहंभावा । झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥४०॥ मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे । ते इंद्रियां कीर जोगें । कायि होईल ? ॥४१॥ परी ध्यानाही कुवाडें । म्हणौनि एके ठायीं न संपडे । व्यक्तीसि माजिवडे । कवणेही नोहे ॥ ४२ ॥ जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें । जें पावूनि चिंतवणें । हिंपुटी जाहलें ॥ ४३ ॥ जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे । ऐसें म्हणौनि उपाये । उपजतीचि ना ॥ ४४ ॥ जें चळे ना ढळे । सरे ना मैळे । तें आपुलेनीचि बळें । आंगविलें जिहीं ॥ ४५ ॥ पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें । अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६ ॥ मग संयमाची धाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं । इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचिया ॥ ४७ ॥ अपानीं-चिया कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा । मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८ ॥ आशेचे लाग तोडिले । अधैर्याचे कडे झाडिले । निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥ ४९ ॥ वज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी । व्याधींच्या सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥ ५० ॥ मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा । तया चोजवले प्रभा । निमथावरी ॥ ५१ ॥ नवद्वारांचिया चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी । उघडिली खिडकी । ककारांतींची ॥ ५२ ॥ प्राणशक्तिचामुंडे । प्रहारूनि संकल्प मेंढे । मनोमहिषाचेनि मुंडें । दिधली बळी ॥ ५३ ॥ चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनुहताची सुडावणी । सतरावियेचें पाणी । जिंतिलें वेगीं ॥ ५४ ॥ मग मध्यमा मध्य विवरें । तेणें कोरिवें दादरें । ठाकिलें चवरें । ब्रह्मरंध्र ॥ ५५ ॥ वरी मकारांत सोपान । तें सांडोनियां गहन । काखे सूनियां गगन । भरलें ब्रह्मीं ॥ ५६ ॥ ऐसे जे समबुद्धी । गिळावया सोऽहंसिद्धी । आंगविताति निरवधी । योगदुर्गें ॥ ५७ ॥ आपुलिया साटोवाटीं । शून्य घेती उठाउठीं । तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥ ५८ ॥ वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे । ऐसें नाहीं आगळें । कष्टचि तयां ॥ ५९ ॥

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

आपणा स्वतःला माझे ठिकाणीं वाहून घेतात, त्यांनाच मी 'परम योगयुक्त' असें समजतों ३९.

**अन्वयार्थ**—**तु**–पण–**ये सर्वत्र समबुद्धयः सर्वभूतहिते रताः**–जे सर्व ठिकाणीं समबुद्धि–प्रत्येक वस्तुमध्यें ब्रह्मबुद्धि ठेवणारे व सर्व प्राण्यांच्या हितामध्यें निमग्न असलेले निर्गुणोपासक–निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे भक्त–**इंद्रियग्रामं संनियम्य**–सर्व इंद्रियांचें संयमन करून सर्व इंद्रियांना आपल्या ताब्यांत ठेवून–**अनिर्देश्यं**–ज्याच्या नांवानें निर्देश करतां येत नाहीं–**अव्यक्तं**–जें व्यक्त नाहीं–**सर्वत्रगं**–सर्व सृष्टींत व्यापून राहणारें–**अचिन्त्यं**–ज्याचें चिंतनहि करतां येत नाहीं–**कूटस्थं**–ज्याच्यामध्यें कोणताहि विकार होत नाहीं–**अचलं**–जें आपल्या अवस्थेपासून ढळत नाहीं–**च**–व–**ध्रुवं**–म्हणूनच जें नित्य आहे अशा–**अक्षरम्**–अक्षराची–ब्रह्माची–**पर्युपासते**–उपासना करितात–त्याचें अहोरात्र ध्यान करितात–**ते**–निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे–**माम् एव**–मलाच–**प्राप्नुवन्ति**–प्राप्त होतात, ते मलाच म्ह० निर्गुण ब्रह्माला प्राप्त होतात ३–४.

आणि अर्जुना ! दुसरे माझे जे ज्ञानी म्हणून भक्त आहेत, ते 'आपण ब्रह्म आहों' अशा वृत्तिवर आरूढ होऊन निराकार जें ब्रह्म तें प्राप्त करून घेण्याची खटपट करितात ४०. जें मनाला अचिंत्य व बुद्धिदृष्टीलाहि न समजणारें, तें खरोखर इंद्रियांना समजेल काय ? ४१. इतकेंच नव्हे तर जे ध्यानासहि गूढ आहे आणि व्यापक असल्यामुळें जे एके ठिकाणीं सांपडत नाहीं व ज्याला कोणताहि आकार नाहीं ४२. जे सर्व ठिकाणीं, सर्व रूपानें, सर्व कालांत [ देश–काळ–वस्तु भेदरहित ] असते. व ज्याची प्राप्ति झाली असतां जे चिंतनहि आपोआपच कंटाळून–थकून थांबते ४३. जें कधीं उत्पन्नहि होत नाहीं व जे नाशाहि पावत नाहीं; तसेंच जें "आहे" असेंहि म्हणतां येत नाहीं व 'नाहीं' असेंहि म्हणतां येत नाहीं, म्हणून ज्याच्या प्राप्तीविषयीं उपायच संभवत नाहीं ४४. जें चालत नाहीं व हालतहि नाहीं, जें संपत नाहीं व मलीन वा दूषितहि होत नाहीं, तें [ ब्रह्म ] ज्यांनीं आपल्या स्वतःच्या अंगबळानें स्वाधीन करून घेतलें आहे ४५. कारण, वैराग्यरूप मोठ्या अग्नीनें विषयरूप सैन्यें जाळून जें आपलीं होरपळलेलीं इंद्रियें मोठ्या कष्टानें, धैर्यानें आवरून धरिली ४६. मग इंद्रियांस आत्मसंयमनाचे पाशानें उफराटी फिरवून म्ह. अंतर्मुख करून हृदयाच्या गुहेंत तीं कोंडतात; ४७. आपानवायूच्या द्वाराला आसनाची बळकट मुद्रा लावून मूळबंधाचा बुरुज उभा करितात ४८. आशेचे संबंध तोडून टाकिले व अधीरपणाचे कडे ढासळून दिले व निद्रारूप अंधार पार नाहींसा करितात; ४९. मूळबंध आसनाच्या ज्वालाग्नीनें शरीरांतील सप्तधातूंची होळी करून व्याधींचीं शिरें प्राणापानरूपी तोफांना बळी म्हणून अर्पण करितात; ५०. मग कुंडलिनीचा टेंभा आधार चक्रावर उभा करून मध्यापर्यंतचा मार्ग प्रकाशित करून त्या उजेडांत आनंदानें–मस्तकापर्यंतचा मार्ग जाणला जातो ५१. शरीरांतील नऊ इंद्रियाच्या द्वारांच्या कवाडावर निग्रहाचे अडसर लावले व सुषुम्ना नाडीची किंवा कंठगत विशुद्ध चक्राची खिडकी म्ह. वाट मोकळी करतात ५२. प्राणशक्तिरूप [कुंडलिनी शक्तिरूपी] चामुंडादेवी असून तिच्या प्रीत्यर्थ संकल्परूपी मेंढे व मनोरूपी महिषांची मुंडें मस्तकें बळी देतात ५३. इडा व पिंगला या नाड्यांचे [ सुषुम्नेमध्यें ] ऐक्य करून व अनुहत ध्वनीचा गजर करून भ्रुकुटीमधील सतरावी जीवनकलेच्या तलावाचें पाणी [ अमृत ] जिंकतात ५४. मग सुषुम्ना नाडीच्या मध्यविवरांतील, त्या नाडींतील पोकळीमधील, कोरीव दादरानें, जिन्यानें वर चढून प्राणशक्ति वर नेऊन मस्तकांतील ब्रह्मरंध्राच्या उंचवट्यापर्यन्त मजल गांठतात ५५. नंतर ओंकाराची तिसरी मकार मात्रेची कठीण–जिन्याची शेवटची पायरी चढून व मूर्ध्न्याकाश खाकेस मारून म्ह. मस्तकाकाशाचा लय करून परब्रह्मास मिळतात ५६. याप्रमाणें सर्वत्र सारखी बुद्धि ठेवून ब्रह्मप्राप्ति "सोऽहं सिद्धि" प्राप्त करून घेण्याकारितांच योगादिक मोठे कठीण मार्ग किंवा किल्ले वेळ न लावतां स्वाधीन करून घेतात ५७. अशा प्रकारे अर्जुना, आपल्याला मोबल्यांत देऊन शून्य [ अव्यक्त, अक्षर, कल्पनाशून्य परब्रह्म ] अतित्वरित घेतात. तेहि मलाच येऊन मिळतात ५८. बाकी माझ्या प्राप्तीशिवाय योगाच्या बळानें म्हणून त्यांना अधिक कांहीं लाभ होतो असें मुळींच नाहीं. उलट जास्त आगळे कष्ट मात्र सोसावे लागतात ५९.

**अन्वयार्थ**—**अव्यक्तासक्तचेतसां तेषाम्**–अव्यक्त ब्रह्मामध्यें ज्याचें मन आसक्त झालें आहे अशा त्यांना–**क्लेशः**–क्लेश–दुःख – **अधिकतरः**– सगुणोपासकापेक्षां पुष्कळच अधिक होतें–**हि**–कारण–**देहवद्भिः**–व्यक्त देहावर अभिमान ठेवणाऱ्या–'हा देहच मी' असें समजणाऱ्या लोकांना–**अव्यक्ता गतिः**–अव्यक्त ब्रह्माची गति–**दुःखं**–मोठ्या कष्टानें–**अवाप्यते**–प्राप्त होते. म्हणून निर्गुणोपासकांपेक्षां सगुणोपासक चांगले ५.

जिहीं सकळ भूतांचिया हितीं । निरालंबीं अव्यक्तीं । पसरलिया आसक्ती । भक्तीवीण ॥ ६० ॥ तया महेंद्रादि पदें । करिताति वाटवेंधें । आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥ कामक्रोधांचें विलगे । उठावती अनेग । आणि शून्येंसीं आंग । झुंजवावें कीं ॥ ६२ ॥ ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वांवीं । मवांवा वारा ॥ ६३ ॥ उंनीं दिहाचें पेहुडणें । निरोधाचें वेल्हावणें । झाडासि सांजणें । चाळावें गा ॥६४॥ शीत वेढांवें । उष्ण पांघुरावें । वृष्टीचिया असावें । घरांआंतु ॥६५॥ किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा । भातारेंवीण करावा । तो हा योगु ॥६६॥ एथ स्वामीचें काज । ना बांपिकें व्याजें । परी मरणेंसीं झुंज । नीच नवें ॥६७॥ ऐसें मृत्युहूनि तीख । कां घोंटे कढत विख । डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ? ॥ ६८ ॥ म्हणौनि योगाचियां वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाचि शेलवांटा । भागा आला ॥ ६९ ॥ पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया पडती खाणें । तैं पोट भरणें कीं प्राणें । शुद्धी म्हणों ॥७०॥ म्हणौनि समुद्र बांहीं । तरणें आथि केंही" । कां गगनामाजीं पाईं । खोलिजेतु असे ? ॥ ७१ ॥ वळघलिया रणाची थाटी । आंगीं न लागतां कोंठी । सूर्याची पाउटी । कां होय गा ? ॥ ७२ ॥ यालागीं पांगुळा हेवां । नव्हे वायूसि पांडवा । तेवीं देहवंता जीवां । अव्यक्तीं गति ॥ ७३ ॥ ऐसाही जरी धिंवसा । बांधोनियां आकाशा । झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥ म्हणौनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा । जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥ ७५ ॥

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः । अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्में अशेखें । जियें कां वेर्णविशेखें । भागा आलीं ॥ ७६ ॥ विधीतें पाळित । निषेधातें गाळित । मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ ७७ ॥ ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठाईं । संन्यासूनि नाहीं । करिती कर्में ॥ ७८ ॥ आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानासिक भाव । तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥ ७९ ॥ ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर । ध्यानामिषें घर । माझें झालें ॥ ८० ॥ जयांचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी । भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ८१ ॥ ऐसें अनन्ययोगें । विकलें जीवें मनें आंगें । तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करी ॥ ८२ ॥

सर्व प्राणिमात्रांचे प्रिय, हितच निराश्रय व अव्यक्त असें जें ब्रह्म, तें सगुण भक्तीशिवाय प्राप्त करून घेण्याची जे इच्छा करितात, ६०. त्यांना वाटमारीं अशीं जीं इंद्रादिक पदें, तीं त्यास घातक इच्छा निर्माण करतात आणि ऋद्धिसिद्धीची जोडी ब्रह्मप्राप्तीच्या आड पडून राहतात ६१. कामक्रोधादिकांचे पुष्कळ उपद्रव उत्पन्न होतात व निराकार परब्रह्माची प्राप्ति करून घेण्याकरितां त्यांना केवळ शून्याशींच [ आकाररहिताशी ] झगडावें लागतें ६२. तहानेनें तहानच पिऊन तृप्त व्हावें, भूक लागली असतां भूकच खाऊन समाधान करावे लागतें व रात्रंदिवस हाताच्या वावांनीं निराकाराच्या प्राप्तीकरितां वाराच मोजीत बसावा लागतो; ६३. दिवसा उन्हांत निजणें, स्वैर इंद्रियांचा निरोध करणे हेच करमणूक वा उपभोग घेणें व झाडाबरोबर संवाद करणें हेंच मित्र-भावानें बोलणें होय ६४. थंडी नेसणें, ऊन पांघरणें व पावसाच्या घरांत बसणें; ६५. किंबहुना ! ! अर्जुना ! पतीशिवाय नित्य नवा अग्नि प्रवेश करणें [ सती जाणें ] अशा प्रकारचा हा योग [ वेदना देणारा ] होय. ६६. या ठिकाणीं पतीकरितां अग्निप्रवेश करण्याचें कांहीं काम नाहीं. किंवा हव्यकव्याचें, कुलाचाराचे निमित्त नसूनहि मृत्युबरोबर नित्य नवी झुंज-लढाई करावी लागते ६७. असें मृत्युहूनहि तीक्ष्ण आहे व कढत जें विष, तें पित्र-वेल कां ? अरे ! डोंगर गिळतांना तोंड फाटणार नाहीं काय ? ६८. म्हणून हे महावीरा ! जे असें योगसाधन करण्यास निघाले, त्यांच्या वाट्याला दुःखाचा शेलकाच वांटा आला ! असें समज ६९. हें पहा लोखंडाचे चणे जेव्हां दंतविहीन-बोचऱ्याला खाण्याचा प्रसंग येतो, तेव्हां ते त्यांचें पोट भरणें आहे. का प्राण देणें आहे, हें काय सांगावें बरें ! याचा तूंच विचार कर ७०. म्हणून समुद्र कोणी बाहूंनीं तरून जाणें शक्य आहे काय ? किंवा आकाशांत कोणी पायांनीं चालला आहे कां ? ७१. युद्धासाठीं समरांगणांत गेल्यावर अंगावर एकहि वार न होतां त्यास सूर्यलोक प्राप्त होईल काय ? ७२. वास्तव अर्जुना, ज्याप्रमाणें पांगळ्या माण-साला वायूबरोबर धांवण्याची स्पर्धा करतां येणार नाहीं, त्याप्रमाणें देहाभिमानी जीवाला निराकाराची प्राप्ति होणार नाहीं. ७३. असें असूनहि मनांत इच्छा धारण करून जे अव्यक्तप्राप्तीविषयीं या मार्गानें जाण्यास झटतात ते क्लेशास मात्र पात्र होतात. ७४. म्हणून पार्था ! या उलट ज्यांनीं व्यक्तोपासना भक्तिमार्गाचा स्वीकार केला आहे, त्यांना असे क्लेश सोसावे लागतच नाहींत ७५.

**अन्वयार्थ—तु**-पण-**ये**-जे सगुणभक्त-**मयि**-माझ्या ठिकाणीं-**सर्वाणि कर्माणि संन्यस्य**-सर्व कर्मांचा संन्यास करून-सर्व कर्में मला अर्पण करून-**मत्पराः**-मत्परायण होऊन-मीच ज्यांना श्रेष्ठ आहे-मजवांचून दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं असे होऊन-**अन्यन्यन एव योगेन**-विश्वरूप परमेश्वर जो मी, त्या मला सोडून दुसऱ्या कोणाच्याहि ठिकाणीं ज्यांचें चित्त जात नाहीं, अशा अनन्य योगानेंच-केवळ माझ्याच ठिकाणीं चित्ताला स्थिर करून-**मां ध्यायन्तः**-माझें ध्यान कर-णारे [ असे जे भक्त ] **उपासते**-माझी भक्ति करितात ६.

आपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें जीं कर्में करावयाची, तीं सर्व कर्में इंद्रियें सुखानें आचरितात; ७६. सर्व कर्में यथाविधि करून वेदाज्ञा पाळतात व निषिद्ध कर्में आच-रित नाहींत. कर्मापासून होणारी फळें, कर्में मला अर्पण करून जाळून टाकतात ७७. याप्रमाणें अर्जुना ! सर्व कर्में मला अर्पण करून कर्मांचा नाश करतात ७८. आणखीहि कायिक, वाचिक, मानसिक जीं जीं म्हणून कर्में करीत-असतात त्या सर्वांची प्रवृत्ति माझ्याशिवाय दुसरीकडे मुळींच नसते. ७९. असे जे निरंतर माझी सेवा-उपासना करून मत्पर होतात, ते माझ्या ध्यानाच्या निमित्तानें माझें राहण्याचें ठिकाण होतात ८०. यांची आवड माझ्याशीं देवघेव इत्यादि व्यवहार करून बिचारी मुक्ति व मुक्ति हीं गरीब कुळें समजून टाकून देते; म्ह० भक्तिपुढें त्यांना मुक्तीची किंमत वाटत नाहीं. ८१. याप्रमाणें अनन्यभावानें ज्यांनीं आपला जीव, मन व शरीर मला अर्पण केलें आहे, त्यांची एखादीच गोष्ट मी करतों असें काय सांगूं ? कारण, त्यांच्या सर्वच इच्छा मी पूर्ण करतों ८२.

**अन्वयार्थ—पार्थ**-हे अर्जुना !-**मयि**-माझ्या ठिकाणीं-**आवेशितचेतसां तेषां**-ज्यांनीं आपलें चित्त स्थिर ठेवलें आहे अशा त्यांचा-**अहं**-मी **न चिरात्**-अगदीं लवकर-**मृत्यु-संसारसागरात्**-मृत्यूनें युक्त अशा या संसारसागरापासून-**समुद्धर्ता**-उत्तम प्रकारें उद्धार करणारा-**भवामि**-होतों ७.

१ वाटमारेपणा. २ उपद्रव. ३ हाताच्या वावांनीं. ४ मोजावा. ५ उन्हांत. ६ निजणें. ७ विहार, क्रीडा करावी. ८ मित्रभावानें. ९ बोलावें. १० नेसावें. ११ कुळपरंपरागत. १२ निमित्त. १३ बाहुबळानें. १४ कोठेंहि. १५ चालता येतें काय.? १६ वार, प्रहार. १७ पैज. १८ धैर्य. १९ आश्रय करून राहिले. २० सर्व. २१ स्ववर्णानुसार.

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् । भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां ? ॥८३॥ तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां । कळिकाळ नोकोनियां । घेतला पट्टा ॥ ८४ ॥ एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ? ॥ ८५ ॥ तैसे ते माझें । कलत्र हें जाणिजे । कायिसेनिही न लजें । तयांचेनि मी ॥ ८६ ॥ जन्ममृत्यूचिया लाटीं । झळंबती इया सृष्टी । तें देखोनियां पोटीं । ऐसें जाहलें ॥ ८७ ॥ भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे । तेथ जरी कीं माझे । बिहिती ह्न ॥ ८८ ॥ म्हणौनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा । करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ ८९ ॥ नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं । तारू जाहलों ॥ ९० ॥ सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले । परिग्रहीं घातले । तरियावरी ॥ ९१ ॥ प्रेमाची पेटी । बांधली एकाचिया पोटीं । मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥ परी भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे । वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥ म्हणौनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता । तयांतें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥ ९४ ॥ आणि जेव्हांचि कां भक्तीं । दिधली आपुली चित्तवृत्ती । तेव्हांचि मज सूति । त्यांचिये नाटीं ॥ ९५ ॥ याकारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया । शिकिजे जैं यया । मार्गा भजिजे ॥ ९६ ॥

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय । निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं वृत्तिक । करूनि घालीं निष्टंक । बुद्धि निश्चयेंसीं ॥ ९७ ॥ इयें दोनीं सरिसीं । मजमाजीं प्रेमेसीं । रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ॥९८॥ जे मन बुद्धि इहीं । घर केलें माझ्या ठायीं । तरी सांगें मज काई । मी तूं ऐसें उरे ? ॥ ९९ ॥ म्हणौनि दीप पालवे । सवेंचि तेज मालवे । कां रविबिंबासवें । प्रकाशु जाय ॥ १०० ॥ उचललेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं । तैसा मनोबुद्धिपाशीं । अहंकारु ये ॥ १ ॥ म्हणौनि माझिया स्वरूपीं । मन बुद्धि इयें निक्षेपीं । येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ॥ २ ॥ यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं । आपली आण पाहीं । वाहतु असें गा ॥ ३ ॥

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् । अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥

अरे! फार काय सांगू!! पार्था! जो आपल्या मोतच्या उदरीं जन्म घेतो तो तिचा कितपत आवडता असतो बरे! [ हें काय निराळे सांगावयास हवे? तर नाहीं ] ८३. त्याचप्रमाणें माझे भक्त कोणी व कसलेहि कोणत्याहि स्थितींत असोत, त्यांना जसा मी आवडता आहे व तसेच तेहि मला आवडतें आहेत, आणि त्यांना त्रास देणाऱ्यांचा व कळीकाळाचाहि नाश करण्याचा व त्यांचा त्यास त्रास न पोचावा असा मी पतकरच घेतला आहे ८४. खरें पाहिलें तर, बाकी माझ्या भक्तांना आणि संसाराची चिंता असे असते काय? हें पहा! श्रीमंताच्या बायकोला कधीं कोरान्न मागण्याचा प्रसग येईल काय? ८५. तसेच माझे ते भक्त म्हणजे माझें कुटुंब [ लक्ष्मीइतकें प्रिय ] आहेत; असें मी जाणतो व तसेच जाणावे, मग त्यांचेवर कोणतेहि संकट आल्यास त्याची लाज मलाच नाहीं का? किंवा त्यांचे कोणतेहि काम करण्यांत मला कमीपणा वाटत नाहीं ८६. हीं संपूर्ण सृष्टि जन्ममृत्यूच्या लाटांत बुडताहे, गटांगळ्यां खात आहे, असें पाहून माझ्या पोटांत असें [ कसेंसेंच ] झालें ८७. व असा विचार आला कीं, भवसागराच्या खवळलेल्या लाटांची कोणाला भीति वाटणार नाहीं? कदाचित् तेथें असलेल्या माझ्या भक्तांनाहि त्याची भीति वाटेल ८८. म्हणून अर्जुना! सगुण साकार [ रामकृष्णादि ] अवतार धारण करून या मृत्युलोकीं त्यांच्या गांवाला मी धांवत आलों ८९. माझ्या सहस्रनामरूपी किंवा नामसंकीर्तनरूपी सहस्रावधि नावा तयार करून या संसाररूप सागरांत मी त्यांना तारक नावाडी झालों आहे, असें समज ९०. जे भक्त सडे म्ह. अंतर्बाह्य उपाधिरहित आहेत असें पाहिले त्यांना मी आपले ध्यानमार्गरूपी कांसेला लावले व जे परिवारासह असतात त्यांना नावेवर बसण्यास सांगतो [ त्यांना नामस्मरण करण्यास सांगितलें ] ९१. कांहीं भक्तांच्या पोटाला प्रेमरूपी पेटी बांधली व मग त्यांना मुक्तिरूप तटाला आणिले ९२. परंतु ते कांहीं असो ज्यांनीं म्हणून आपल्यास माझे भक्त म्हणविले आहे मग ते चतुष्पाद का असेनात; पण त्यांना मी वैकुंठाच्या राज्यावर बसविण्यास योग्य केलें ९३. म्हणून माझ्या भक्तांना कसलीहि चिंता नाहीं. कारण त्यांना तारणारा मी सदोदित सज्ज होऊन उभा आहेंच ना! ९४. अरे! ज्या वेळेस भक्तांनी आपली चित्तवृत्ति मला समर्पण केली याच वेळेस त्यांनीं आपल्या छंदांत मला घातले म्ह. मलाहि त्यांचा छंद लागतो ९५. त्याच कारणास्तव, हें भक्तराया धनंजया! आतां जर तुला या भक्तिमार्गाला लागावयांचें असेल तर सर्व चित्तवृत्ति मला अर्पण करण्याचा तुला हा मंत्र सांगितला आहे तो शीक म्हणजे झाले ९६.

**अन्वयार्थ**—**मयि एव**—माझ्यामध्येंच—**मनः**—आपलें मन—**आधत्स्व**—स्थिर कर. तूं आपल्या मनाला माझ्या सगुण विश्वरूपांत स्थाप—**मयिबुद्धिं निवेशय**—माझ्यामध्यें निश्चय करणाऱ्या बुद्धीला प्रविष्ट कर, तिलाहि माझ्या स्वरूपांतच राहूं दे. तूं आपलें मन व बुद्धि या दोन्ही चित्तवृत्तींना माझ्याच ठिकाणीं स्थिर केलेंस म्हणजे—**अतः ऊर्ध्वं**—मेल्यावर—**मयि एव**—माझ्या ठिकाणींच—**निवसिष्यसि**—तूं राहशील—**न संशयः**—यांत कांहीं शंका नाहीं ८.

अरे, तूं फक्त एक मन बुद्धिच्या निश्चयासहित माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं अखंड वतनदारच करून ठेव ९७. याप्रमाणें हीं दोन्हीं [ मन व बुद्धि ] प्रेमानें माझ्या स्वरूपांत बरोबर रीतीनें एकत्र होऊन माझ्या ठिकाणीं प्रविष्ट झालीं म्हणजे तूं सहजच मला प्राप्त होशील ९८. कारण, मन व बुद्धि यांनीं माझ्या ठिकाणीं कायमचे वास्तव्य केल्यावर मग तूं व मी अशा प्रकारचा दुजेपणा उरेल काय सांग बरें? ९९. म्हणून दिवा पदराच्या वाऱ्यानें मालवला तर लागलींच प्रकाश नाहींसा होतो किंवा सूर्यबिंब मावळल्याबरोबर प्रकाश नाहींसा होतो, १००. अथवा शरीरांतून बाहेर निघूं पहाणाऱ्या प्राणाबरोबर सर्व इंद्रियें हीं जशीं बाहेर जाण्यास निघतात त्याप्रमाणें मन व बुद्धि एकत्र होऊन जिकडे जातील तिकडे अहंकार हा आपोआप त्याच्याबरोबर येतोच येतो १. म्हणून माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं मन व बुद्धि हीं दोन्हीं कायम ठेव; एवढ्यानेंच सर्व व्यापक असा जो मी तोच तूं होशील २. अर्जुना! तुला फार काय सांगू! मी आपल्या गळ्याची शपथ वाहून सांगतों कीं, या माझ्या बोलण्यांत कांहीं अन्यथा म्ह. एक अक्षर देखील खोटें नाहीं १०३.

**अन्वयार्थ**—**अथ**—आतां [ मी वर सांगितल्याप्रमाणें ] **मयि**—माझ्या ठिकाणीं—**चित्तम्**—आपल्या मनाला—**स्थिरम्**—अचल—**समाधातुं**—स्थापावयास—**न शक्नोषि**—तूं समर्थ नसशील—**ततः**—तर मग—**धनंजय**—हे अर्जुना! **मां** — मला— **अभ्यासयोगेन** — अभ्यासयोगानें— मनाला वारंवार आवरून धरून माझ्याच ठिकाणीं तें स्थिर करण्याचा प्रयत्न करणें या अभ्यास पूर्वक योगानें—**आप्तुं**—प्राप्त होण्याची—**इच्छ**—तूं इच्छा कर ९.

अथवा हें चित्त । मनबुद्धिसहित । माझ्या हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥ ४ ॥ तरी गा ऐसें करीं । यया आठां पाहारांमाझारीं । मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥ ५ ॥ मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख । तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥ ६ ॥ जैसा शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटूं लागे । तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनि ॥ ७ ॥ मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें । हारपत अंवसे । नाहींचि होय ॥ ८ ॥ तैसें भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाजीं रिगतां । हळू हळू पंडुसुता । मीचि होईल ॥ ९ ॥ अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥ पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें । व्याघ्र सर्प प्रांजळें । केले एकीं ॥ ११ ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ १२ ॥ म्हणौनि अभ्यासासी कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मीळ ॥ १३ ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव । मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

कां अभ्यासाही लागीं । कसु नाहीं तुझिया अंगीं । तरी आहासी जया भागीं । तैसाचि आस ॥ १४ ॥ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमानु न संडीं । स्वजातीचा ॥ १५ ॥ कुळधर्मु चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥ १६ ॥ परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये । तो मी करितु आहें । ऐसें न म्हणे ॥ १७ ॥ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ १८ ॥ उणयापुरेंयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं । स्वजाती करूनि घेईं । जीवित्व आपुलें ॥ १९ ॥ माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ २० ॥ म्हणौनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं नेघें मती । अखंड चित्तवृत्ती । माझ्या ठायीं ॥ २१ ॥ एऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां अव्हांटा । रथु काई खटपटा । करीतु असे ? ॥ २२ ॥ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे । निवांतचि आर्पिजे । माझ्या ठायीं ॥ २३ ॥ ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना । तूं सायुज्य सदना । माझिया येसी ॥ २४ ॥

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः । सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

ना तरी हेंही तुज । नेदवे कर्म मज । तरी तूं गा बुझ । पंडुकुमरा ॥ २५ ॥ बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं । मातें बांधणें किरीटी । द्वाड

अथवा, आतां जर मन बुद्धि यांसहित तूं आपलें चित्त माझ्या हातीं विषयवासना-अस्पर्शित असें पूर्णपणें अर्पण करूं शकत नसशील ४. तर असें कर कीं, या आठ प्रहरांमध्यें मोजका एक क्षणभर तरी मन व बुद्धि मला देत जा ५. मग जितके निमिष तुझें चित्त माझें सुख पाहील, माझ्या सुखाचा अनुभव घेईल, तितकें तितकें निमिष पर्यंत तुझे चित्तांत विषयाविषयींची अरुचि उत्पन्न होईल ६. ज्याप्रमाणें शरदृतूचा प्रवेश झाला म्हणजे नद्यांचें पाणी कमी होऊं लागतें, त्याप्रमाणें जसजसें माझ्या स्वरूपानंदात तुझें चित्त गुंतेल, तसतसें तें प्रपंचांतून वेगानें बाहेर निघेल ७. अथवा ज्याप्रमाणें पौर्णिमेपासून चंद्रबिंब दिवसानुदिवस कमी कमी होत जाऊन अमावस्येला अगदींच नाहींसेच होते ८. त्याचप्रमाणें अर्जुना ! तुझें चित्त हळूहळू विषयोपभोगांतून निघून माझ्या स्वरूपीं प्रवेश करतां करतां शेवटीं तें मद्रूपच होईल ! ९. अरे ! अभ्यासयोग म्हणून ज्याला म्हणतात तो हाच एक आहे, असें पक्कें समज. यापासून प्राप्त होणार नाहीं, अशी कोणतीहि गोष्ट नाहीं ११०. अरे ! अभ्यासाच्याच बळानें कोणी अंतरिक्षांतहि संचार करितात, कोणी वाघ, सर्प अशा हिंस्र पशूंना देखील निर्वैर करतात ११. अभ्यासानें विषसुद्धां पचनीं पडतें, यानें समुद्रावरहि पायवाट होते व कोणी कोणी तर अभ्यासाच्या योगानें वेदासहि आटोक्यांत,हस्तगत करून घेतलें १२. म्हणून अभ्यासास कोणतीहि गोष्ट प्राप्त होणारी नाहीं, असें मुळीच नाहीं. याकरितां अभ्यासाच्या योगानें तूं मला येऊन एकरूपतेनें मीळ १३.

**अन्वयार्थ**—**अभ्यासे अपि**–वर जसा सांगितला तसा अभ्यास करण्यासहि–[ **चेत्**–जर तूं ]–**असमर्थः**–असमर्थ –**असि**–असशील तर मग–**मत्कर्मपरमः भव**–माझ्यासाठीं कर्म करणें हेंच एक काम कर–ईश्वरासाठीं कर्म करणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य समज. कारण–**मदर्थम् अपि**–माझ्यासाठीं–**कर्माणि कुर्वन्**–कर्में करणारा असा तूं–**सिद्धिं**–सिद्धीला–चित्तशुद्धि, योग–ज्ञानप्राप्ति या क्रमानें मोक्ष या सिद्धीस–**अवाप्स्यसि**–प्राप्त होशील १०.

किंवा अभ्यास करण्याचीहि जर तुझ्या अंगांत शक्ति नसेल तर हल्लीं तुझ्या आचरणाचा जो कार्यक्रम असेल तो तसाच चालू असूं दे १४. 'दमा'नें इन्द्रियांना कोंडूं नकोस, उपभोगास कमी करूं नकोस, तूं आपल्या जातीचा अभिमान सोडूं नकोस १५. आपलें कुलधर्म व कुलाचार यांचें यथाविधि आचरण कर; शास्त्रांनी जीं कर्में करण्यास योग्य म्हणून सांगितली असतील तीं कर व जी कर्में करण्यास अयोग्य म्हणून सांगितलीं असतील तीं करूं नकोस एवढेंच तूं केलेस म्हणजे सुखानें तुला हवें तसें वागण्याची मोकळीक दिली आहे १६. परंतु कायावाचामनेंकरून जसें जें व्यवहार होतील ते 'मी करीत आहें' असें तरी म्हणूं नकोस १७. [ कारण ] ज्या परमेश्वराच्या [ अकुंठित सत्तेमुळें ] हे विश्व [ विश्वांतील सारे व्यवहार ] चालले आहेत तोच [ कोणतेहि कर्म ] करणें [ कर्ता कोण ] वा न करणें [ अकर्ता कोण ] हें सर्व कांहीं जाणतो. [ दुसऱ्याचें कर्तृत्व तूं आपल्या अंगावर घेऊं नकोस म्हणजे झाले ] १८. अमुक कर्म परिपूर्ण झालें व अमुक कर्म परिपूर्ण न झालें तरी त्याविषयीं आपल्या मनांत हर्ष-खेद मानूं नकोस व तूं आपलें जीवित्व परमात्म्याशीं एकरूप करून टाक १९. असें पहा कीं. माळ्यानें जिकडे नेले तिकडे पाणी हे निवांतपणें, बिनतक्रार जाते, त्या पाण्याप्रमाणें मनांतील कर्तृत्त्वाभिमान टाकून [ प्राप्त कर्म निष्कामवृत्तीनें करणारें ] तुझें जीवित होऊं दे १२०. म्हणून कोणत्याहि कर्माच्या प्रवृत्तिनिवृत्तीचें ओझें बुद्धि आपल्यावर घेत नाहीं. कारण, चित्तवृत्ति माझ्या ठायीं अखंड असते २१. बाकी अर्जुना ! वाट सरळ आहे किंवा वांकडी आहे, याविषयीं रथ कांहीं काळजी वा वाटाघाट करीत असतो काय ? [ जिकडे त्यास न्यावें तिकडे तो जातो. ] २२. त्याप्रमाणें जें जें कर्म तुझ्या हातून घडेल तें तें थोडें आहे किंवा पुष्कळ आहे असें न म्हणतां एकनिष्ठेनें ते मला समर्पण कर म्हणजे झाले २३. अर्जुना, ! अशा प्रकारें तूं सर्व कर्मांविषयीं माझ्याच ठिकाणीं भावना धरलीस, [ सर्व कर्में मलाच समर्पण केलींस ] म्हणजे शरीरत्यागानंतर तूं सायुज्यमोक्षरूपीं माझ्याच गांवाला येशील २४.

**अन्वयार्थ**––**अथ** [ **चेत्** ] आतां जर–**एतत् अपि**–हेंहि–**कर्तुं**–करण्यास तूं–**अशक्तः**–असमर्थ–**असि**–असशील–**ततः**–तर मग–**मद्योगं**–सर्व कर्में मला अर्पण करून त्यांचें अनुष्ठान करणें या योगाचा–**आश्रितः**–आश्रय करून व–**यतात्मवान्**–आपल्या चित्ताचें संयमन करून–**सर्वकर्मफलत्यागं**–सर्व कर्मांच्या फलाचा त्याग–**कुरु**–कर ११.

किंवा हे पंडुकुमरा ! जर तुझ्यानें मला हीं सर्वहि कर्में समर्पण करवणार नाहींत, तर तूं आणखी असेंहि समजून घे कीं, २५. कर्म करण्याला उद्युक्त करणारी जी बुद्धि तिच्या अगोदर किंवा पाठीमागून अथवा कर्माच्या अगोदर किंवा अंतीं माझी

जरी ॥ २६ ॥ तरि हेंही असो । सांडीं माझा अंतिसो । परि संयतिसीं वसो । बुद्धि तुझी ॥ २७ ॥ आणि जेणें जेणें वेळे । घडतीं कर्मै सकळें । तयांचीं तियें फळें । त्यजितु जाय ॥ २८ ॥ वृक्ष कां वेली । लोटंती फळें आलीं । तैसीं सांडीं निपजलीं । कर्मै सिद्धें ॥ २९ ॥ परि मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें । हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं ॥ १३० ॥ खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजीं पेरिलें । कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥ ३१ ॥ अगा आत्मजेच्या विषीं । जिवु जैसा निरभिलाषी । तैसा कर्मीं अशेषीं । निष्कामु होईं ॥ ३२ ॥ वन्हीची ज्वाळा जैशी । वायां जाय आकाशीं । क्रिया जिरों दे तैसीं । शून्यामाजीं ॥३३॥ अर्जुना हा फलत्यागु । आवडे कीर असलगु । परी योगामाजीं योगु । धुरेचा हा ॥ ३४ ॥ येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न "विरूढे । एकचि वेळें वेळुझाडें । वांझें जैसीं ॥ ३५ ॥ तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे । किंबहुना येरझारें । चिरौं पडे ॥ ३६ ॥ पैं अभ्यासाचिया पाउटीं । ठाकिजे ज्ञान किरीटी । ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ॥ ३७ ॥ मग ध्यानासि खेंवें । देती आघवेचि भाव । तेव्हां कर्मजात सर्व । दूरी ठाके ॥ ३८ ॥ कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्यागु संभवे । त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ॥ ३९ ॥ म्हणौनि यावया शांति । हाचि अनुक्रमु सुभद्रापती । म्हणौनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥ १४० ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते । ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥१२॥

अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान । ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥ ४१ ॥ मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु । त्यागाहूनि भोगु शांतिसुखाचा ॥ ४२ ॥ ऐसिया या वाटा । इहींचि" पेणा सुभटा । शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणें ॥ ४३ ॥

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं । आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥ ४४ ॥ उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहींच नेणिजे । वसुंधा जेवीं ॥ ४५ ॥ कां रायाचे देह चाळूं । रंकौं परौतें गाळूं । हें न म्हणेचि कृपाळू । प्राणु पैं गा ॥ ४६ ॥ गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेंचि गा करूं । तोयें जैसें ॥ ४७ ॥ तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेसी धात्री । आपणचि जो ॥ ४८ ॥ आणि मी हे भाष नेणे ।

आठवण करणें हें जर तुला कठीण वाटत असले २६. तर तें देखील राहूं दे; परंतु एक कर ते म्हणजे तूं आपल्या बुद्धीचा विनियोग इंद्रियनिग्रह करण्यांत कर २७. आणि ज्या ज्या वेळीं जीं जीं कर्में घडतील त्या त्या वेळीं त्यांची त्यांची जी फळें त्यांची आशा तूं टाकून दे २८. ज्याप्रमाणें वृक्ष किंवा वेली आपल्यास फळें आलीं असतां त्यांची आशा न धरतां तीं टाकून देतात, त्याप्रमाणें जीं जीं कर्में पूर्ण होतील त्यांच्या त्यांच्या फळांची तूं आशा सोडून दे २९. परंतु मला मनांत आठवून किंवा मला अर्पण करण्याच्या उद्देशानें कोणतीहि कर्में करावींत हें कांहींहि नको तर सर्व निष्फळ होऊं दे १३०. ज्याप्रमाणें खडकावर पाऊस पडला असतां किंवा अग्नींत बीं पेरलें असतां किंवा स्वप्नांत पाहिलें असतां निष्फळ होतें, त्याचप्रमाणें जीं जीं कर्में तूं करशील तीं तीं स्वप्नवत् व्यर्थ मान ३१. अरे! ज्याप्रमाणें पिता आपल्या कन्येविषयीं केव्हांहि अभिलाष बाळगीत नाहीं, त्याप्रमाणें जीं जीं कर्में तूं करशील त्यांच्या फलप्राप्तीची मुळींच इच्छा करूं नकोस ३२. ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाळा [उपयोगाविना] आकाशांत व्यर्थ जाते, त्याप्रमाणें कर्मांची फळें शून्यांत म्ह० व्यर्थ जाऊं दे ३३. अर्जुना! कर्में करून त्यांच्या फळांचीं इच्छा न करणें हा जरी सामान्य सोपा मार्ग वाटत आहे; खरा तरीपण सर्व योगांमध्यें हा श्रेष्ठ योग आहे ३४. जसें वेळूचें झाड एक वेळ व्यालें म्हणजें पुनः वीत नाहीं त्याप्रमाणें कर्में करून त्याचा फलत्याग केला म्हणजे तीं कर्में पुनः अंकुरित म्ह० पुनर्जन्मास कारणीभूत होत नाहींत ३५. तसें यांच देहानें [ याच जन्मीं ] पुनः शरीरास येणें म्ह० देह धारण करणें संपते. किंबहुना!! जन्ममरणाच्या खेपावर दगड पडतो, म्ह० जन्ममरणाच्या फेऱ्यांतून त्याची सदाचीच मुक्तता होतें ३६. परंतु अर्जुना! अभ्यासाच्या योगानें प्रथम परोक्ष ज्ञान प्राप्त होतें व तशी परोक्ष ज्ञानप्राप्ति झाल्यावर ध्यान करितां येतें ३७. नंतर सर्व मनोवृत्ति व धर्म ध्यानाला आलिंगन देतात. ध्यानांत मग्न होतात; तेव्हां जेवढे म्हणून कर्म आहे ते सर्व आपोआपच दूर राहते ३८. जेव्हां कर्म आपोआप दूर रहातें, तेव्हां कर्म फलत्याग म्ह० फलाची इच्छा सहजच नाहींशी होते. असें झाल्यावर सर्व [ ब्रह्मस्थितिरूप ] शांतीहि आपल्या स्वाधीन होते ३९. म्हणून हे सुभद्रापते! शांति प्राप्त होण्याचा हाच एकमेवमार्ग-क्रम आहे; तेव्हां तुला आतां अगोदर अभ्यासच केला पाहिजे १४०.

**अन्वयार्थ**--**अभ्यासात्**-वर सांगितलेल्या अभ्यासाहून-**ज्ञानं**-ज्ञान-**श्रेयः हि**-अधिक प्रशंसनीय आहे हें तर प्रसिद्धच आहे. पण-**ज्ञानात्**-त्या ज्ञानाहूनहि-**ध्यानं**-ज्ञानासह केलेलें ध्यान-**विशिष्यते**-अधिक चांगलें आणि त्या तसल्या-**ध्यानात्**--ध्यानाहूनहि-**कर्मफलत्यागः**-ज्ञानध्यानयुक्त कर्मांच्या फलाचा त्याग अधिक चांगला आहे. कारण-**त्यागात्**-कर्मफलाचा त्याग केल्यानंतर-**अनन्तरं शान्तिः**-लागलीच संसाराची शांति होतें १२.

पार्था! अभ्यासापेक्षां ज्ञान हे सखोल व कठीण आहे. व ज्ञानापेक्षां ध्यान अधिक महत्त्वाचे व कठीण आहे. ४१. नंतर कर्मांच्या फलांची इच्छा सोडणें हें ध्यानापेक्षांहि उत्तम आहे व त्यागापेक्षांहि शांतिसुख, ब्रह्मरूपप्राप्तीचें सुख विशेष चांगलें आहे ४२. हे महावीरा! याप्रमाणें हे ब्रह्मरूपप्राप्तीचें मार्ग असून याच टप्प्यानें ज्यानें शांतीचे माजघर प्राप्त करून घेतलें आहे ४३.

**अन्वयार्थ**--**सर्वभूतानाम् अद्वेष्टा**--कोणत्याहि प्राण्याचा द्वेष न करणारा-**मैत्रः**-सर्वांशीं मित्रत्वानें राहणारा-**करुणः एव च**-दुःखी जीवांवर दया करणारा -**निर्ममः**-हा अमुक पदार्थ माझा आहे, असें त्याला कधीं वाटत नाहीं-**निरहंकारः**-'हा मी' हा अभिमान त्याच्या ठिकाणीं नसतो-**समदुःखसुखः**-दुःख व सुख हीं दोन्हीं त्याला एकसारखींच वाटतात-**क्षमी**-क्षमावान्-कोणी शिव्या दिल्या किंवा मारलें तरी हा मनांत क्षुब्ध होत नाहीं तर अगदीं शांत असतो १३.

सर्व व्यापक चैतन्याला जसा आपपरभाव नसतो तसा त्याच्या मनांत भूतमात्रांविषयीं द्वेष म्हणून मुळींच जाणत नसतो. [ कारण, त्याची सर्वत्र समदृष्टि असते ]. ४४. किंवा पृथ्वी ज्याप्रमाणें उत्तम मनुष्याचा भार सहन करावा व अधमाचा भार सहन करूं नये असा भेद मुळींच जाणत नाहीं ४५. अथवा कृपावंत प्राण ज्याप्रमाणें राजाचे देहांत श्वासोच्छ्वास करीत रहावे व रंकाच्या देहांत राहूं नये असें म्हणतच नाहीं; ४६. किंवा ज्याप्रमाणें, गाईची तहान भागवावी व वाघाला विषाप्रमाणें होऊन मारावें, असें करणें जसें पाण्याला ठाऊकच नसतें ४७. त्याप्रमाणें एकपणाच्या बोधानें सर्व प्राणिमात्रांशीं ज्याची सारखी मैत्री असून जो कृपेला स्वतः आपण आधारभूत असतो १४८.

१ महत्त्व, मोठेपणा, हव्यास. २ इंद्रियनिग्रहांत. ३ त्यागिती. ४ माझ्या प्रीत्यर्थ. ५ शून्यांत जाऊं दे. ६ कायेविषयीं. ७ निरिच्छ. ८ शून्यांत जाऊं दे, निष्फळ होऊ दे. ९ निश्चयेंकरून सोपा वाटतो. १० श्रेष्ठ.

माझें कांहींचि न म्हणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥ ४९ ॥ तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं । संतोषा उत्संगीं । दिधलें घर ॥ १५० ॥

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः । मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

वार्षियेवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु । तैसा निरुपचारु । संतोषी जो ॥ ५१ ॥ वाहूनि आपुली जाण । धरी जो अंतःकरण । निश्चया साचपण । जयाचेनि ॥ ५२ ॥ जीवु परमात्मा दोन्ही । बैसऊनि ऐक्यासनीं । जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥ ५३ ॥ ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि । अर्पी मनोबुद्धी । माझ्या ठायीं ॥ ५४ ॥ आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाहि चांगु । तरी माझा अनुरागु । सप्रेम जया ॥५५॥ अर्जुना तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु । तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ॥ ५६ ॥ हें ना तो आवडे । मज जीवाचेनि पाडें । हेंही एथ थोकडें । रूप करणें ॥ ५७ ॥ तरी पढियंतयाची काहाणी । हे भुलीची भारणी । इयें तंव न बोलणीं । परी बोलवी श्रद्धा ॥ ५८ ॥ म्हणौनि गा आम्हां । वेगां आली उपमा । एऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादु असे ? ॥ ५९ ॥ आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी । दुणा थांव उठी । आवडी गा ॥ १६० ॥ तयाही वरी विपायें । प्रेमळु संवादिया होये । तिये गोडीसी आहे । कांटाळें मग ? ॥ ६१ ॥ म्हणौनि गा पंडुसुता । तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता । वरी प्रियाची वार्ता । प्रसंगें आली ॥६२॥ तरी आतां बोलों । भलें या सुखा मीनलों । ऐसें म्हणतखेवीं डोलों । लागला देवो ॥ ६३ ॥ मग म्हणे जाण । तया भक्ताचें लक्षण । जया मी अंतःकरण । बैसों घालीं ॥ ६४ ॥

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः । हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥

तरी सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे । आणि जळचरीं नुबगिजे । समुद्रु जैसा ॥६५॥ तेवीं उन्मत्तें जगें । जयासी खंती न लगे । आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोकु ॥ ६६ ॥ किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां । तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ॥ ६७ ॥ जगचि देह जाहलें । म्हणौनि प्रियाप्रिय गेलें । हर्षामर्ष ठेलें । दुजेनविण ॥ ६८ ॥ ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु । याहीवरी भक्तु । माझ्या ठायीं ॥ ६९ ॥ तरी तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो । हें असो जीवें जीवो । माझेनि तो ॥ १७० ॥ जो निजानंदें धाल

आणि 'मी' ही भाषाहि ज्यास माहीत नसते. जो माझें असें कांहींच म्हणत नाहीं व सुख दुःख हीहि जाणीव ज्याचे मनांत सत्यत्वानें येत नाहीं ४९. त्याचप्रमाणें क्षमेविषयीं ज्याची पृथ्वीसारखी योग्यता आहे व संतोषाला ज्यानें आपल्या मांडीवर राहण्यास वरच दिले आहे १५०.

**अन्वयार्थ—सततं संतुष्टः**—सदा—संतुष्ट—जिवंत-राहण्यास अवश्य असलेल्या वस्तु मिळाल्या तरी ठीक, न मिळाल्या तरी ठीक—[ **सततं** ]—**योगी**—सदोदित शांत चित्त असणारा, मनाला केव्हांहि विक्षिप्त होऊं न देणारा—**यतात्मा**—मनाच्या प्रत्येक स्वाभाविक वृत्तींचा निरोध करणारा किंवा शरीरेंद्रियसंघातांचें नियमन करणारा—**दृढनिश्चयः**—आत्मतत्त्वाविषयीं ज्याचा निश्चय अतिशय दृढ झाला आहे—**मयि अर्पितमनोबुद्धिः**—जो माझ्या ठिकाणीं आपलें मन व बुद्धि यांना स्थिर करून राहिला आहे—**यः मद्भक्तः**—असा जो माझा भक्त आहे, ज्या माझ्या भक्तामध्यें हे सर्व गुण आहेत—**सः मे प्रियः**—तो मला प्रिय आहे १४.

वर्षाऋतुशिवाय देखील जसा समुद्र नेहमीं पाण्यानें परिपूर्ण भरलेला असतो तसा आनंदाचे उपचार केल्याशिवायहि, विषय—निरपेक्ष जो सहज आनंदांत निमग्न असतो ५१. जो आपलें अंतःकरण आपलीच शपथ घालून ताब्यांत धरून ठेवतो व ज्याच्या बळानें निश्चयाला खरेपणा असतो ५२. ज्याच्या हृदयरूपी मंदिरांत जीव परमात्मा हे दोन्हीं ऐक्याचें आसनावर बसून विराजमान होतात म्हणजे ज्याचा जीव—परमात्मैक्यनिश्चय असतो ५३. अशा योगसंपत्तीनें पूर्णत्वास पावला असून जो मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं अखंड अर्पण करितो; ५४. अंतरांत [ ब्रह्मात्मैक्य अनुभूतीच्या दृढतेनें ] ध्यानानें व बाह्यतः अष्टांग योगांपैकीं इतर साधनानें चांगल्या तऱ्हेनें तयार-सिद्ध होऊन देखील ज्याला माझ्या [ सगुण स्वरूपाविषयीं ] दृढ व अनन्य प्रेम असते ५५. अर्जुना! तोच भक्त, तोच योगी आणि तोच मुक्त असें समज. फार काय सांगावें! तो स्त्री व मी पति इतका मला तो आवडता आहे! ५६. छे! छे!! असेंहि नव्हे, तर तो मला माझ्या जीवापेक्षां जास्त प्रियकर आहे. परंतु त्यास हीहि उपमा येथें अपुरीच आहे ५७. तर, आवडत्या भक्ताची गोष्ट हा केवळ मला भुरळ पडणारा मंत्रच होय. ही बोलून दाखविण्यासारखी गोष्ट नाहीं, परंतु ती आवडच आमच्याकडून वदविते ५८. आणि म्हणून आम्हीं वर [ स्त्री व पति ] अशी उपमा चटकन् देऊन गेलों, नाहीतर प्रेमाचे कोठे र्णन करतां आलें आहे काय? ५९. अर्जुना! ह्या सर्व गोष्टी बाजूस ठेव, कारण आवडत्या मनुष्यांविषयीं गोष्टी निघाल्या असतां आवडीस दुप्पट बळ चढतें १६०. त्यांतूनहि दैववशात्, कदाचित् चर्चा करणारा श्रोताहि प्रेमळच भेटला, तर मग त्या गोडीला दुसरी उपमा देतां येईल काय? ६१. म्हणून अर्जुना! तूंच माझा आवडता असून तूंच आवडीच्या गोष्टी ऐकणाराहि आहेस. शिवाय माझ्या प्रियभक्ताचीच गोष्ट प्रसंगानुसार तुझ्याजवळ बोलण्याची वेळ आली आहे ६२. तर आतां काय होईल तें होवो, मी बोलतोंच या बोलण्याचा सुखाचा प्रसंग आला हेंहि आपलें भाग्यच समजतों. असें म्हणता क्षणींच देव डोलूं लागले ६३. व म्हणाले ज्या भक्तांना मी आपलें अंतःकरणच बसावयास घालतो त्यांची लक्षणें जाणून घे. ६४.

**अन्वयार्थ—यस्मात्**—ज्या माझ्या भक्तापासून—**लोकः** कोणताहि प्राणी—**न उद्विजते**—उद्विग्न होत नाहीं ज्या भगवद्भक्तापासून कोणालाहि संताप-क्षोभ होत नाहीं—**च**—व त्याप्रमाणें—**यः**—जो—**लोकात्**—कोणत्याहि प्राण्यापासून—**न उद्विजते**—उद्वेग पावत नाहीं—**च**—आणि—**यः**—जो **हर्ष अमर्ष भय उद्वेगः**—हर्ष, क्रोध, भय व खेद यांनीं—**मुक्तः** मुक्त असतो—**सः**—तो—**मे**—मला—**प्रियः**—प्रिय आहे १५.

तरी ज्याप्रमाणें समुद्र क्षोभला असतां त्यामुळें जलचरांना त्यापासून भय उत्पन्न होत नाहीं व जलचरांचा पुष्कळ समुदाय वाढला असतां समुद्रहि त्यास कंटाळत नाहीं ६५. त्याचप्रमाणें, उन्मत्त जगाच्या योगानें ज्याला खेद वाटत नाहीं, व ज्याच्या स्वतःच्या योगानें लोकांनाहि त्रास होत नाहीं ६६. फार काय सांगावें! अर्जुना! शरीर ज्याप्रमाणें अवयवांना कंटाळत नाहीं, त्याप्रमाणें आपण सर्वांचा जीव आहोंच अशी आत्मैक्य बुद्धि असल्यामुळें जो प्राणिमात्रालाहि कंटाळत नाहीं; ६७. जग हेंच त्याचें शरीर बनल्यामुळें ज्याला प्रियाप्रियादि द्वंद्व—म्ह० आवडते नावडते असा भेदभावच राहत नाहीं व अशा प्रकारें द्वैतभाव नाहींसा झाला म्हणजे ज्याच्या ठिकाणचे आनंद व क्रोध हे विकारद्वंद्वहि नाहींतसे होतात ६८. याप्रमाणें सुखदुःखादि द्वंद्वापासून विमुक्त असून त्याची ज्याला बाधा होत नाहीं, जो भय, चित्तक्षोभ इत्यादिकांनी रहित असतो आणि इतकी स्थिति प्राप्त झाली असूनहि तो माझी अनन्य भक्ति करतो ६९. तर त्याची मला फारच आवड असते. त्याच्याविषयींच्या प्रेमाचें मी काय वर्णन करूं? तर शब्दानें वर्णन करणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो, माझे प्राण हेच जणूं त्याचे प्राण आहेत १७०. अरे! जो आत्मानंदानें नित्य तृप्त झाला आहे, परिणाम म्हणजे [ जणुं

परिणामु आयुष्या आला । पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥ ७१ ॥

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः । सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

जयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा । सुखासि चढावा । जयाचें असणें ॥७२॥ मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परी वेचावें लागे शरीर । तिये गांवीं ॥ ७३ ॥ हिमवंतु दोष खाये । परी जीविताची हानि होये । तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥ ७४ ॥ शुचित्वें शुचि गांग होये । आणि पापतापही जाये । परी तेथें आहे । बुडणें एक ॥७५॥ खोलिये पारु नेणिजे । तरी भक्तीं न बुडिजे । रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ॥ ७६ ॥ संताचेनि अंगलगें । पापातें जिणणें गंगे । तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ॥ ७७ ॥ म्हणौनि असो जो ऐसा । शुचित्वें तीर्थां कुवासा । जेणें उलंघविलें दिशां । मनोमळ ॥७८॥ आंतु बाहेरी चोखाळु । सूर्य तैसा निर्मळु । आणि तत्त्वार्थींचा पायाळु । देखणा जो ॥७९॥ व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश । तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥१८०॥ संसारव्यथें फिटला । जो नैराश्यें विनटला । व्याधाहातोनि सुटला । विहंगु जैसा ॥ ८१ ॥ तैसा सतत जो सुखें । कोणीही टवंच न देखे । नेणिजे गतायुषें । लज्जा जेवीं ॥ ८२ ॥ आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृती नाहीं आंगीं । जैसें निरिंधन आगी । विझोनि जाय ॥ ८३ ॥ तैसा उपशमुचि भागा । जयासि आला पैं गा । जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥ ८४ ॥ अर्जुना हा ठावोवरी । जो सोऽहंभावो सरोभरी । द्वैताच्या पैलतीरीं । निगों सरला ॥ ८५ ॥ कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं भागीं । वांटूनियां आंगीं । सेवकै बाणे ॥ ८६ ॥ येरा नाम मी ठेवी । मग भजती वोज बरवी । न भजतया दावी । योगिया जो ॥८७॥ तयाचें आम्हां व्यसन । आमुचें तो निजध्यान । किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ ८८ ॥ तयालागीं मज रूपा येणें । तयाचेनि मज येथें असणें । तया लोण कीजे जीवेंप्राणें । ऐसा पढिये ॥ ८९ ॥

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति । शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥

जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे । म्हणौनि भोगविशेखें । हरिखेजेना ॥ १९० ॥ आपणचि विश्व जाहला । तरी भेदभावो सहजचि गेला । म्हणौनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥ ९१ ॥ पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही

कांहीं सर्व निषेधावधीभूत परब्रह्मच या सगुण साकार रूपानें ] आविष्कृत,अवतीर्ण झाले आहे. म्हणूनच तो पूर्ण ब्रह्मस्थितीरूपी स्त्रीचा जणूं कांहीं प्रिय पतिच होय ७१.

**अन्वयार्थ—अनपेक्षः**—देहादिकांसाठीं ज्यांची अत्यंत अपेक्षा—गरज असतें अशा अन्नवस्त्रादिकांविषयींहि अनपेक्ष—**शुचिः**—बाह्य शरीरशुद्धि व आंतील मनाची शुद्धि यांनीं शुद्ध-पवित्र-**दक्षः**—अनेक कर्तव्यें प्राप्त झालीं असतां त्यांना बरोबर जाणण्यास समर्थ—**उदासीनः**—मित्रादिकांचा पक्ष न घेणारा—निष्पक्षपाती—**गतव्यथः**—निर्भय—**सर्वारंभपरित्यागी**—या लोकच्या व परलोकच्या फलासाठीं केल्या जाणाऱ्या सर्व कर्मांचा त्याग करणारा, सर्व सकाम कर्में सोडणारा—**यः मद्भक्तः**—असा जो माझा भक्त—**सः मे प्रियः**—तो मला प्रिय आहे १६.

अरे अर्जुना !! त्याच्या ठिकाणीं इच्छेला मुळींहि प्रवेश नसतो व ज्याचे जीवितामुळें त्याच्या वृत्तींत सुखाचीच नेहमीं भर पडत असतें ७२. काशीक्षेत्र मोक्षप्राप्ति करून देण्याबद्दल खरोखर उदार व प्रख्यात आहे; परंतु त्या ठिकाणीं शरीर खर्चीं पडल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं ७३. हिमालय पर्वतावर गेलें असतां दोषांचें क्षालन होतें; परंतु तेथील हवा न मानवल्यामुळें जीवाची हानि होण्याचा दाट संभव आहे. परंतु जें सज्जन आहेत त्यांचा पवित्रपणा तसा नाहीं. [ जीवाचीं हानी न होतां खात्रीनें पवित्रता प्राप्त होते ] ७४. पावन करणाऱ्या गंगेचें उदकहि पवित्र आहे, त्यांत स्नान केल्यानें पाप व मनाचा ताप हीं दूर होतात; परंतु तेथें पाण्यांत बुडण्याचा फार संभव आहे ७५. तशी साधुसंतरूपी तीर्थांच्या [ ज्ञानाच्या ] खोलीस पार नाहीं तरी जो साधक भक्त तिच्या मार्गानें जाईल त्यास बुडण्याची भीती नाहीं तो न बुडतां व त्याची प्राणहानि न होतां जीवंतपणी त्याला प्रत्यक्ष, अविच्छिन्न मोक्ष प्राप्त होतोच ७६. उलट ज्या संतांच्या अंगस्पर्शानें गंगेचेंहि पातक नाहींसें होतें तेव्हां त्या संतसंगापासून किती पवित्रता प्राप्त होईल म्हणून सांगावें ? ७७. म्हणून हे असो जो असा साधु आहे, की तो आपल्या पवित्रपणानें तीर्थालाहि आश्रयभूत असतो व ज्यानें मनाचे सर्व विकार देशोधडीस लाविले ७८. तो सूर्याप्रमाणें अंतर्बाह्य विचारांत व आचारांत निर्मळ असून पायाळु मनुष्याला ज्याप्रमाणें द्रव्यदृष्टि असतें, त्याचप्रमाणें त्याला ब्रह्मतत्वाची दृष्टि असतें ७९. ज्याप्रमाणें आकाश हें सर्वव्यापक असून सर्व पदार्थांपासून अलिप्त आहे, त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वव्यापक असून आसक्ति नसल्यानें तें कशानेंहि लिप्त होत नाहीं १८०. ज्याप्रमाणें पारध्याचे हातून पक्षी सुटून गेल्यावर तो निर्भय व्हावा त्याप्रमाणें जो संसाराच्या काळजींतून दूर झालेला असतो, निरिच्छपणानें भूषित झालेला असतो; ८१. मेलेल्या मनुष्यास आपलें आंग उघडें पडलें तरीहि त्याबद्दल जशी लाज वाटत नाहीं तसा तो नेहमीं आत्मसुखांत रममाण असतो म्हणून त्याच्या चित्ताला कोणतीहि टोचणी वा दुःख नसतें ८२. आणि कोणतेंहि कर्म—आरंभ करण्यापूर्वीं त्याच्या मनांत कर्तृत्वाभिमान बिलकुल नसतो. ज्याप्रमाणें काष्ठरहित अग्नि आपोआप विझून जातो ८३. त्याप्रमाणें मोक्षप्राप्तीकरितां सांगितलेल्या अंगापैकीं उपशम [ शांति ] ज्याच्या वांट्याला आलेला आहे; ८४. अर्जुना ! अशा प्रकारें जो पुरुष " मी ब्रह्म आहे " अशा ऐक्यबोधानें ओतप्रोत भरलेला आहे तो द्वैताच्या पलीकडील तीरावर सहजच निघून जातो ८५. [तरीहि] भक्तीपासून प्राप्त होणाऱ्या सुखाकरितां आपणच आपली [ देव व भक्त अशा कल्पित ] दोन ठिकाणीं वांटणी करून, तो आपल्या ठिकाणीं 'सेवकत्व' धर्म स्वीकारतो ८६. व सेवकाहून जो दुसरा त्याचें नांव 'देव' असें ठेवून, जो योगी भक्ती न करणाऱ्या लोकांस भक्तिमार्ग—चांगली भजन पद्धती आचरून दाखवितो ८७. त्याचाच आम्हांला छंद—प्रीति असते. तो भक्त आमचें निजध्यान होतो. किंबहुना ! ! तो भेटेल तेव्हांच आम्हांस समाधान वाटते ८८. त्याच्याकरितां मला हे सगुणसाकार अवतार घ्यावे लागतात; व त्याच्याचकरितां मला या ठिकाणीं वास्तव्य करावें लागतें. आणि त्याच्यावरून मी माझे पंचप्राण ओंवाळून टाकतों; इतका तो मला आवडता असतो ! ८९.

**अन्वयार्थ—यः न हृष्यति**—जो इष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां हृष्ट होत नाहीं, हर्ष मानीत नाहीं—**न द्वेष्टि**—जो अनिष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां द्वेष करीत नाहीं—**न शोचति**—जो प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां शोक करीत नाहीं व—**न कांक्षति**—न मिळालेल्या वस्तूची इच्छा करीत नाहीं—**शुभाशुभपरित्यागी**—शुभ व अशुभ कर्मांचा परित्याग करणारा—**भक्तिमान् यः**—असा जो भक्तिवान् असतो—**सः मे प्रियः**—तो मला प्रिय आहे १७.

जो ब्रह्मात्मैक्य प्राप्तीच्या लाभासारखें व त्यापेक्षां उत्तम असें दुसरें कांहींच समजत नाहीं, म्हणून जो कोणत्याहि एकाद्या विशेष उपभोगापासून आनंदित होत नाहीं १९०. जो आपणच आत्मबोधानें विश्व झाला, त्यामुळें दुजाभाव सहजच गेला आहे म्हणून ज्या पुरुषाचें मनांतून द्वेष सदाचाच नाहींसा झाला ९१. जे खरोखर आपलें

न वचे । हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ ९२ ॥ आणि जयापरौतें कांहीं नाहीं । तें आपणपेंचि आपुल्या ठायीं । जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ॥ ९३ ॥ वोखटें कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे । रात्रिदिवस न घेटे । सूर्यासि जेवीं ॥ ९४ ॥ ऐसा बोधुचि केवळु । जो होवोनि असे निखळु । त्याहीवरी भजनशीळु । माझ्या ठायीं ॥ ९५ ॥ तरी तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें । नाहीं गा साचोकारें । तुझी आण ॥ ९६ ॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः । शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं । रिपुमित्रां दोहीं । सरिसा पाडु ॥ ९७ ॥ कां घरींचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडावा । हें नेणेंचि गा पांडवा । दीपु जैसा ॥ ९८ ॥ जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली । दोघां एकचि साउली । वृक्षु दे जैसा ॥ ९९ ॥ नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडु । गाळितया कडु । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥ अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भावो ऐसा । मानापमानीं सरिसा । होतु जाय ॥ १ ॥ तिहीं ॠतूं समान । जैसें कां गगन । तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २ ॥ दक्षिण उत्तर मारुतां । मेरु जैसा पंडुसुता । तैसा सुखदुःखप्राप्तां । मध्यस्तु जो ॥ ३ ॥ माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका । तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ ४ ॥ आघवियां जगा एक । सेव्य जैसें उदक । तैसें जयातें तिन्ही लोक । आकांक्षिती ॥ ५ ॥ जो सबाह्यसंगें । सांडोनियां लागें । एकाकीं असे आंग । आंगीं सूनी ॥ ६ ॥

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् । अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

जो निंदेतें नेघे । स्तुति नें श्लाघे । आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ ७ ॥ तैसे निंदे आणि स्तुति । मानु करूनि एके पांती । विचरे प्राणवृत्ती । जनीं वनीं ॥८॥ साच लटिकें दोन्ही । बोलोनि न बोले जाहला मौनी । जो भोगितां उन्मनी । आरायेना ॥ ९ ॥ जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे । पाउसें- वीण न सुके । समुद्रु जैसा ॥ २१० ॥ आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं । तैसा न धरीच कहीं । आश्रयो जो ॥ ११ ॥ आघवाची आकाश-

अबाधित सत्य आत्मवस्तुस्वरूप आहे ते कल्पांतींहि नाहींसे व्हावयाचे नाहीं; असें मनांत पक्कें समजून जो गतगोष्टीचा मुळींच शोक करीत नाहीं; ९२. ज्या आत्मस्वरूपापेक्षां उत्तम वस्तु या जगांत दुसरी कोणतीच नाहीं, ती परमात्मवस्तु जो आपल्या ठायीं स्वतःच होऊन राहिला, तो आत्मभिन्न कसल्याहि गोष्टीची इच्छा करीत नाहीं ९३. ज्याप्रमाणें सूर्याला रात्र व दिवस हा भेद मुळीं माहीतच नसतो, त्याप्रमाणें आत्मस्वरूपापुढें ज्याला वाईट अगर चांगलें हें कांहींच वाटत नाहीं ९४. याप्रमाणें जो केवळ शुद्ध अखंड ज्ञानस्वरूप होऊन असतो आणि त्याशिवाय आणखी भजनशील म्हणजे माझ्या भजनांत आपला काळ घालविणारा असतो ९५. त्या भक्ताप्रमाणें आम्हांस दुसरें आवडतें असें कोणीहि नातलग नाहीं, हें तुझ्या गळ्याची शपथ वाहून मी खरोखर सांगतों ! ९६.

**अन्वयार्थ**–**शत्रौ च मित्रे च समः**–शत्रु व मित्र या दोघांच्याहि ठिकाणीं एकसारखा व्यवहार करणारा–**तथा** त्याचप्रमाणें–**मानापमानयोः**-मान अपमान यांमध्यें सम–त्या दोहोंनाहीं एकसारखेंच मानणारा–**शीतोष्णसुखदुःखेषु समः**–शीत, उष्ण, सुख, दुःख यांमध्यें एकसारखीच भावना ठेवणारा–**संगविवर्जितः**–कोठेंहि आसक्ति न ठेवणारा १८.

तसेंच पार्था ! ज्याच्या मनांत वांकडेपणाची गोष्टहि नसते आणि जो शत्रु व मित्र या दोघांचीहि सारखीच योग्यता मानतो; ९७. किंवा अर्जुना ! आपल्या घरच्या लोकांना तेवढा उजेड पाडावा व परक्यांना मात्र अंधार पाडावा, हें ज्याप्रमाणें दिवा जाणतच नाहीं ९८. जो आपल्यावर तोडण्याकरितां घाव घालतो किंवा ज्यानें आपली लागवड केली त्या दोघांनाहि झाड जशी सारखीच सावली करितें; ९९. किंवा ऊंस हा जो त्यास पाणी घालून वाढवितो त्यासच गोड. व जो त्याला चरकांत घालून गाळतो त्यास कडु, असा कधींच लागत नाहीं २००. त्याप्रमाणें अर्जुना ! शत्रुमित्रभाव ज्याच्या मनांत मुळींच नसतो तसाच जो मानापमानाचे समयीं समबुद्धि ठेवतो; १. आकाश ज्याप्रमाणें तिन्हीं ऋतूंत सारखेंच असतें, त्याप्रमाणें जो थंडी व उन्हाळा या दोहोंस सारखेंच मानतो; २. अर्जुना ! मेरु पर्वत ज्याप्रमाणें दक्षिण व उत्तर या दोन्ही दिशांकडील वाऱ्यास सारखाच मानतो, व अचल असतो त्याप्रमाणें सुखदुःख प्राप्त झालें असतां जो आपल्या मनाची निश्चलता, समता तत्त्वतः ढळूं देत नाहीं; ३. रावापासून रंकापर्यंत चांदणें सर्वांस सारखेंच सुखकर असतें, त्याप्रमाणें जो प्राणिमात्रास सारखाच प्रिय असतो ४. सर्व जगाला पाणी एक सारखेच सेव्य वा प्रिय आहे, त्याप्रमाणें ज्याची [ भक्ताची ] तिन्ही लोक इच्छा करितात; ५. जो मनाचे अंतर्बाह्य होणाऱ्या विषयाचे संबंध व तसेच पुढें प्राप्त होणारा विश्व संबंध सोडून एकांतांत राहून आपलें मन आपल्या स्वस्वरूपीं चिरस्थिर करून सुख भोगतो ६.

**अन्वयार्थ**–**तुल्यनिंदास्तुतिः**–निंदा स्तुति यांना समान मानणारा–**मौनी**–वाणीचें नियमन करणारा **येनकेनचित् संतुष्टः**–शरीर जीवंत राहण्यापुरतें जे कांहीं मिळेल त्यानें संतुष्ट होणारा–**अनिकेतः**–ज्याचें एक नियत–नेमलेलें राहण्याचें स्थान नाहीं, जेथें राहील तेंच त्याचें घर असा व–**स्थिरमतिः**–स्थिर बुद्धि–ज्याची परमार्थाविषयींची बुद्धि स्थिर असते, डळमळीत नसते–**भक्तिमान् नरः**–असा जो भक्तिमान् पुरुष–[ **सः** ]–**मे प्रियः**–तो मला प्रिय आहे १९.

जो दुसऱ्यानें आपली निंदा केली असतां खिन्न होत नाहीं व स्तुति केली असतां चढून जाऊन आपल्यास धन्याहि मानीत नाहीं. ज्याप्रमाणें आकाश सर्वव्यापक असून त्याला कशाचाहि संसर्ग होत नाहीं ७. त्याप्रमाणें निंदा वा स्तुति यांचा मनावर कांहीं एक परिणाम न होऊं देतां त्यांची सारखीच गणना करून जो प्रपंचांत व वनांत आपली वृत्ति प्राणाप्रमाणें उदास अशी सारखीच ठेवून वागतो ८. खरें व खोटे भाषण मुखांतून निघाले असतां संकल्पवृत्ति नसल्यानें त्याचे मौन मोडत नाहीं. व अमनस्क सहज-ब्रह्मस्थितीचा उपभोग घेण्यांतच नित्य रममाण होऊन तेथून विन्मुख होत नाहीं ९. ज्याप्रमाणें पाऊस न पडला तरी समुद्र आटून सुकत नाहीं त्याप्रमाणें आपल्या इच्छेप्रमाणें जरी कांहीं गोष्टी घडल्या, तरी जो संतोषित होत नाहीं व कांहीं गोष्टी इच्छेविरुद्ध घडल्या, तरी खिन्नतेस पावत नाहीं; २१०. आणि जसे वायूला एके ठिकाणी वसती करून राहणे नसते, तसा जो कोठेंहि आश्रय धरून रहात नाहीं ११. तर जसा वायु सर्व आकाशभर नित्य वास्तव्य करून रहातो

१ वाईट. २ वाटत नाहीं. ३ भासत नाहीं. ४ पूर्ण शुद्ध. ५ आवडते, जिवलग. ६ खरेपणानें. ७ वांकडेपणाची. ८ सारखेंच मानतो. ९ परक्यांत. १० तोडण्यासाठीं.

११ सारखा. १२ ऋतूंत. १३ वायूला. १४ आल्हादित्वानें. १५ चांदणें, १५ अंतर्बाह्य. १७ संबंध. १८ घालून, ठेवून. १९ महत्व मानीत नाहीं. २० गणना. २१ वागतो.

स्थिति । जेवीं वायूसि नित्य वसती । तेवीं जगचि विश्रांति- । स्थान जया ॥ १२ ॥ हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ १३ ॥ मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था । तरी तयातें मी माथां । मुकुट करी ॥ १४ ॥ उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक । परी मानु करिती तिन्ही लोक । पायवणियां ॥ १५ ॥ तरी श्रद्धावस्तूसी आदरु । करितां जाणिजे प्रकारु । जरी होय श्रीगुरु । सदाशिवु ॥ १६ ॥ परी हे असो आतां । महेशातें वानितां । आत्मस्तुति होतां । संचारु असे ॥ १७ ॥ ययालागीं हें नोहे । म्हणितलें रमानाहें । अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ॥ १८ ॥ जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हातीं । रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥ १९ ॥ कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडी बांधी करी । कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ २२० ॥ म्हणौनि गा नमस्कारूं । तयातें आम्हीं माथां मुकुट करूं । तयाची टांच धरूं । हृदयीं आम्हीं ॥ २१ ॥ तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणीं । तयाची कीर्ति श्रवणीं । आम्हीं लेवूं ॥ २२ ॥ तो पहावा हे डोहळे । म्हणौनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पुजूं तयातें ॥ २३ ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनि । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ २४ ॥ तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे । किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २५ ॥ तेणेंसीं आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र ? । परी तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २६ ॥ तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें । जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २७ ॥ जो हा अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत । भक्तियोगु समस्त- । योगरूप ॥ २८ ॥ तया मी प्रीति करी । कां मनीं शिरसा धरीं । येवढी थोरी । जया स्थितीये ॥ २९॥

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते । श्रद्दधाना: मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रिया: ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्याय: ॥ १२ ॥

ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य । करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥२३०॥ तेसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचे ठायीं विस्तरे । जीवीं जयां थारे । जे

तसे सर्व जग हेंच ज्यांचें विश्रांतिस्थान आहे; १२ हें विश्वच माझें घर आहे, असा ज्याचा दृढनिश्चय झाला आहे, किंबहुना ! ! स्थावर जंगमात्मक अखिल विश्व जो आपणच स्वतः बनला आहे १३. आणि अर्जुना ! अशा पूर्णत्वास पोहोंचला असूनहि ज्याची माझ्या भजनामध्यें पूर्ण उत्सुकता, आस्था, प्रीति आहे, त्याचे काय कौतुक सांगूं ! ! त्याला मी आपल्या मस्तकावर मुगुटाप्रमाणें धारण करितों १४. अरे ! माझ्या पायाचें तीर्थ घेऊन त्रिभुवनांतील सर्व लोक आपल्यास धन्य मानतात. असा सर्व श्रेष्ठ जो मी, तोच मी आपल्या [ निःसंदेह बोध असूनहि जो भक्ति करतो त्या ] भक्तांला मस्तकावर मुगुटाप्रमाणें धारण करतो यांत नवल विशेष असें कांहींच नाहीं. कारण, उत्तम वस्तुपुढें मस्तक नम्र करणें हा न्यायच आहे १५. तर अशीं ज्याची माझ्या ठिकाणीं पूर्ण श्रद्धा आहे, त्याचा आदरसत्कार कसा करावा, ही गोष्ट श्रीशंकर श्रीगुरु होतील तरच समजून घेतां येईल अशी आहे १६. परंतु ही गोष्ट राहूं दे, कारण, श्रीशंकराचें वर्णन करूं लागलें म्हणजे खरोखर आपली स्तुति केल्याप्रमाणें होणार आहे. [ कारण, मी व शंकर एकच, हे असो, असे ] १७. म्हणून लक्ष्मीपति म्हणतात, " अर्जुना ! हा दृष्टांत या ठिकाणीं बरोबर नाहीं, तर अशा माझ्या भक्तांना मी आपल्या मस्तकावर धारण करतों १८. कारण, तो पुरुष, चौथी पुरुषार्थसिद्धि जो मोक्ष तो आपल्या हातांत घेऊन भक्तिमार्गानें जात असतां जगाला मोक्ष देत व भक्तीचा कित्ता घालून देत निघाला १९. तो ब्रह्मरूप असलेला, मोक्ष देण्यास पूर्ण अधिकारी असल्यामुळें मोक्षाची बांध–सोड करितो, इतका समर्थ असूनहि पाण्याप्रमाणें तो नम्र असतो २२०. म्हणूनच त्याला आम्ही नमस्कार करतों, त्याला आपल्या मस्तकावर मुगुटाप्रमाणें धारण करितों व त्याची टांच म्हणजे श्रीवत्सलांछन चिन्हहि आम्ही आपल्या हृदयावर धारण करितों २१. त्याचे गुणरूपी अलंकार आम्ही आपले वाणीकडून धारण करवूं [ त्याचे गुणवाद आम्ही आपल्या वाणीनें गाऊं ] व त्याचे कीर्तिरूपी अलंकार कानांकडून धारण करवूं [ त्याचे यश कोणी गाईलें असतां आम्ही ते कानांनी ऐकूं ] २२. असें जे माझे भक्त आहेत त्यांना पहावें असे डोहाळे आम्हांस झाल्यावरून, नेत्ररहित असा जो मी तो डोळे अर्थात् अवतार धारण करून त्यास पाहतों व नेहमीं माझ्या हातांत असणाऱ्या क्रीडेच्या लीलाकमळानें आम्ही त्यांचें पूजन करितों २३. दोन हातांवर दुसरे दोन हात म्ह. चतुर्भुजरूप धारण करून त्यांचें शरीरास आलिंगन देण्याकरितांच मी अवतरलों आहें ! २४. त्यांच्या संगतीच्या सुखातिशयानें, देहरहित जो मी, त्या मला देह धारण करावा लागला ! फार काय सांगावें ! ते माझे जीव कीं प्राण असे निरुपम आवडते आहेत ! २५. तेच एक आमचे परम मित्र आहेत, असें म्हणण्यांत नवल विशेष ते काय ? इतकेंच नव्हे, तर जे त्यांचें चरित्र ऐकतात २६. व जे माझ्या भक्तांच्याच चारित्राची प्रशंसा करितात, तेहि मला माझ्या प्राणाहून अधिक आवडतात. हे अगदीं खरें आहे २७. अर्जुना ! तुला जो हा संपूर्ण रीतीनें योग सांगितला, तो भगवत्प्राप्तीच्या उपायानें भरलेला असा योगरूप संपूर्ण 'भक्तियोग' आहे असे जाण २८. त्या भक्तियोगाच्या स्थितीची अशी ही एवढी थोरवी आहे कीं भक्तियोगयुक्त पुरुषावर मी स्वतः प्रीति करितों आणि ज्याला [ ध्यानरूपानें ] आपल्या मनांत व मस्तकावर धारण करितों २९.

**अन्वयार्थ**––**तु**–पण–**ये श्रद्दधानाः मत्परमाः भक्ताः**–जे श्रद्धावान् मत्परम झालेले भक्त–माझे एकनिष्ठ भक्त– **इदं यथोक्तं धर्म्यामृतं**–हें वर सांगितलेले धर्माला सोडून नसलेले–धर्मरूप अमृत–मोक्षाचें साधन– **पर्युपासते**–करितात–**ते**–ते श्रेष्ठ–**मे**–मला–परमेश्वराला **अतीव**–अतिशयच–**प्रियाः**–प्रिय आहेत २०.

त्या ह्या भक्तियोगाच्या रम्य, अमृतवर्षाव करणाऱ्या व धर्मास अनुकूल अशा गोष्टी ऐकून जे त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतात २३०. त्याप्रमाणें त्या योगाचे ठिकाणीं पूर्ण

---

१ नम्र करावें. २ पायाच्या तीर्थास. ३ वर्णितां. ४ रमानाथानें. ५ मोक्ष. ६ मोक्षरूप धनाची सोडबांध करतो. ७ नम्रता धरतो. ८ श्रीवत्सलांछन. ९ सुखाकरितां. १० निराकाराला. ११ प्राणापलीकडे. १२ खरें. १३ धर्मास अनुकूल. १४ व्यापणे. १५ स्थिर होणे.

अनुष्ठिती ॥ ३१ ॥ परी निरूपिली जैसी । तैसीच स्थिति मानसीं । मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥ ३२ ॥ परी मातें परम करूनि । इये अर्थी प्रेम धरूनि । हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥ ३३ ॥ पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी । उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥ ३४ ॥ तें तीर्थ तें क्षेत्र । जगीं तेंचि पवित्र । भक्ति कथेसि मैत्र । जयां पुरुषां ॥ ३५ ॥ आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन । ते वांचूनि आन । गोमटें नाहीं ॥ ३६ ॥ तयांचें आम्हां व्यसन । ते आमुचें निधिनिधांन । किंबहुना समाधान । ते मिळती तैं ॥ ३७ ॥ पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पंडुसुता । ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ॥ ३८ ॥ ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें । बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥३९॥ राया जो निर्मळु । निष्कलंक लोककृपाळु । शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ॥२४०॥ पैं सुरसहायशीळु । लोकलालनलीळु । प्रणतप्रतिपाळु । हा खेळु जयाचा ॥ ४१ ॥ जो धर्मकीर्ति धवळु । अगाध दातृत्वें सरळु । अतुळबळें प्रबळु । बळिबंधनु ॥ ४२ ॥ जो भक्तजनवत्सलु । प्रेमळजन प्रांजळु । सत्यसेतु सकळु । कलानिधी ॥ ४३ ॥ तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा । सांगे येरु दैवाचा । आइकतु असे ॥ ४४ ॥ आतां ययावरी । निरूपिती परी । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ ४५ ॥ तेचि रसाळ कथा । मऱ्हाठिया प्रतिपंथा । आणिजेल आतां । अवधारिजो ॥ ४६ ॥ ज्ञानदेव म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्हीं । हें पढविलों जी स्वामी । निवृत्तिदेवीं ॥ २४७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां भक्तियोगोनाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ श्लोक २०, ओंव्या २४७.



श्रद्धायुक्त आदर ठेवून ज्यांच्या मनांत हा भक्तियोग विस्तार पावतो व उत्तम रीतीनें ठसतो व त्याजविषयीं आपलें मनांत पूर्ण विचार करून जे त्याचें प्रत्यक्ष आचरण करितात; ३१. व आतां मीं सांगितल्याप्रमाणें ज्यांच्या मनाची खरोखर स्थिति होत असतें. त्यांचें मनांत हा भक्तियोग म्हणजे चांगल्या शेतांत पेरणी केली असतां जसें उत्तम पीक होते, तसें उत्तम फल प्राप्त करून देणारा होतो ३२. परंतु मला परमश्रेष्ठसाध्य मानून व माझ्या या भक्तिसाधनाविषयीं प्रेम धरून मीच सर्वस्व आहें असें समजून जे भक्तियोगाचा स्वीकार करतात ३३. तेच या जगतांत माझे भक्त व योगी होत; आणि म्हणूनच पार्था, त्यांच्याविषयीं मला अखंड अतिशय उत्कंठा लागलेली असतें ३४. ज्या पुरुषांना भक्तिकथा अत्यंत आवडते, तेच या जगतांत आमचें तीर्थ; तेच क्षेत्र व तेच पवित्र आहेत; ३५. त्यांचें आम्हीं ध्यान करतों, तेच आमचे पूजनीय पूर्ण दैवत आहेत, त्यांच्याशिवाय आम्हीं दुसरी आवडती वा चांगली गोष्ट कोणतीहि मानीत नाहीं ३६. त्यांचाच आम्हांला नाद–छंद लागतो व तेच आमच्या ठेव्याची खाण होत; फार काय सांगावें ! तें जेव्हां आम्हांस भेटतात तेव्हांच आमचें खरें समाधान होतें ३७. हे पंडुसुता ! माझ्या प्रेमळ भक्तांच्या कथा जे सांगतील तींच आमची परमदेवता आहे असें आम्हीं समजूं ३८. संजय धृतराष्ट्रास म्हणतोः–जो सर्व जगास व आपल्या भक्तास आनंद देणारा आहे व जो सर्व जगाला उत्पन्न करणारा मूळ कारण आहे, असा जो मुकुंद तो याप्रमाणें बोलला ३९. राजा धृतराष्ट्रा, ! जो परमात्मा निर्मळ, निष्कलंक, लोकांवर पूर्ण कृपा करणारा, शरणागतांचें रक्षण करणारा, शरण जाण्यास योग्य आहे ४०. देवांना साह्य करणें हेंच ज्याचें शील–स्वभाव आहे व लोकांचें पालन करणें हीच ज्याची लीला आहे. व शरणागतांचें रक्षण करणें हाच ज्याचा खेळ आहे ४१. जो धर्म कीर्ति यांनीं स्वच्छ, उज्वलतेनें शोभणारा, दान करण्यांत ज्याचा अगाध सरळपणा आहे व निरुपम, अतुलनीय बलवान् असूनहि जो बळीच्या प्रेमबंधनानें मात्र स्वतःच बद्ध झाला आहे ४२. जो भक्त जनांचा कनवाळु आहे, प्रेमळजनांशीं मोकळ्या मनानें वागणारा सोपा आहे, सत्याचरणीं जनांचा तारक, सत्य हाच ज्याचे प्राप्तीचा सरळ पूल आहे आणि चौदा विद्या–चौसष्ट कला यांचा निधि ४३. तो भक्तांचा राजा वैकुंठनायक श्रीकृष्ण भगवान् दैवशाली श्रोता असलेल्या अर्जुनास ‘ भक्तियोग ’ सांगतां झाला व त्यानें तो ऐकला ४४. संजय आणखी म्हणतोः–हे राजा धृतराष्ट्रा, यापुढें कथा सांगण्याचा जो प्रकार आहे, तो ऐक ४५. तीच रसभरित कथा मराठी भाषेंत मी रूपांतरित करून सांगेन आपण ती ऐकावी ४६. श्रीज्ञानदेव म्हणतातः–श्रोतेहो, तुम्हांसारख्या संतांना आम्हीं शरण जावें, त्यांची सेवा करावी हेंच आम्हांस आमच्या श्रीगुरु निवृत्तीनाथांनीं शिकविलें आहे ! २४७.

१ चांगल्या शेतांत. २ अत्यंत श्रेष्ठ. ३ ठेवा. ४ बोलतात. ५ सर्व जगाला आनंद देणाऱ्या. ६ जगाला उत्पन्न करणाऱ्या. ७ शुद्ध, कलंकरहित. ८ शरण जाण्यास योग्य. ९ देवांना साह्य करण्याचा स्वभाव आहे ज्याचा असा. १० लोकांचे पालन करणें हीच ज्याची लीला आहे. ११ शरणागतरक्षक. १२ शोभणारा. १३ निरुपम बळानें. १४ सप्रेम भक्तांना सुलभ. १५ खऱ्या रीतीनें वागणारांचा तारक. १६ सार्वभौम. १७ भक्तांचा. १८ पद्धत. १९ भाषेंत.



# अध्याय संगति व बाराव्या अध्यायाचें तात्पर्य

" भक्तियोगु समस्त । योगरूप ॥ " अ. १५-२८.

श्रीज्ञानेशांच्या मतें हा बारावा अध्याय-म्हणजे उपासनाकांड व ज्ञानकांड, यांचा दुवा आहे. परमेश्वर-प्राप्तीचें ' अनन्यभक्ति ' हेंच एकमेव साधन आहे, असें अकराव्या अध्यायाचे शेवटीं सांगितल्यावर त्या ' अनन्य-भक्ति ' साधनाविषयीं खुलासेवार विचार करणें ओघानेंच प्राप्त होते. व्यापक ' विश्वरूप ' दाखविणाऱ्या अकराव्या अध्यायानंतर सगुणोपासनेचा पुरस्कार व गौरव करणारा हा बारावा अध्याय आला आहे. त्याचे कारण सांगतांना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं; " स्वकर्म कुसुमांनीं, निष्काम-कर्मोपासनेनें ईश्वरप्रसादें करून व श्रीगुरुसंप्रदाय लब्ध, असें जें जीव-शिवैक्याचें, जगत्-ईश्वरैक्याचें ' साच '; पण ' कोंवळे ' जें ज्ञान-उद्‌भूत होतें, तें ' परिपक्व ' पक्के म्हणजेच मागील-अध्यायाचें शेवटीं सांगितलेल्या ' साक्षात्कार ' रूपीं अनुभूतींत, अद्वेष्टादि प्रभृति, किंवा-अमानित्वादि ज्ञानीभक्तलक्षणांमध्यें अर्थात् साधकांच्या त्या साधनानुष्ठानद्वारां पर्यवसित होण्याकरितांच हा बारावा अध्याय सांगितला आहे."

निष्काम कर्म व निष्कामभक्ति यांपैकीं-कांहींहि करावयाचें असो, त्यास परमेश्वराच्या सर्वव्यापक स्वरूपाचें परोक्षज्ञान कां होईना, पण असले पाहिजे. देवाचे स्वरूपच माहित नसेल तर भक्त, भक्ति तरी कोणाची करणार ! कारण, असें विश्वव्यापक परमेश्वराचें ' ज्ञान ' हाच कर्म उपासनेचा डोळा आहे. ' **सर्वं खलु इदं ब्रह्म** " असें परोक्ष-ज्ञान, हें ' कोंवळे '-म्हणजे बौद्धिक ज्ञान असते, तें तत्त्व बुद्धीला-समजलेलें असते; अशा शास्त्रसंवादि, परोक्षरूप-कोंवळ्या ज्ञानानें केलेलें निष्काम कर्म किंवा निष्कामभक्ति साक्षात्कारात्मक ब्रह्मात्मैक्यानुभूतीचें, निश्चित फलपर्यव-सायी साधन असते. ती अनुभूती लाभणें म्हणजेच कोंवळे ज्ञान परिपक्व झाले-म्हणजे मग ज्ञानोत्तर कर्तव्यबुद्धिरहित, पूर्व-संस्कारानुरूप होणारी कर्में किंवा भक्ति ही त्या ज्ञान्याची लक्षणरूप असते व साधकांस तीच-साधनरूप असते. म्हणून अद्वेष्टादि ज्ञानीभक्त-लक्षणें वा भक्तीचें स्वरूप, अभ्यासापासून शांतीपर्यंत भक्तीच्या पायऱ्या सांगणारा हा अध्याय आहे. या गीतेच्या अध्यायावरील-भाष्य करण्यापूर्वी प्रस्तावनात्मक लिहिलेल्या ओव्यांमध्यें श्रीज्ञानेश्वरमहाराज श्रीगुरुकृपादृष्टीवर प्रेमळ मातेचें रूपक करून तिला नमन-प्रार्थना करतात. आई ज्याप्रमाणें लहान मुलाला मांडीवर घेऊन वाढविते त्याप्रमाणें श्रीगुरु-आपल्या शिष्यास परमार्थसाधनेंत मदत करतात. त्याचे निरनिराळे लळे पूर्ण करून, त्या निरनिराळ्या अनुभूतिद्वारां त्यास समाधीपर्यंत नेऊन पोचवितात; हें पहिल्या दहा ओवींत श्रीज्ञानेशांनीं प्रतिपादिलें आहे. हे माते ! माझा ग्रंथ नवरसांच्या सागरांनीं परिपूर्ण कर, उचित अशा अलंकारात्मक रत्नांचा आगर होऊं दे. त्यांत रसालंकाराच्या आविष्कारद्वारां वर्णिलेल्या " गीतेच्या भावार्थाचें " उत्तुंग, विशाल असें पर्वत निर्माण कर. [ या ओंवींतच श्रीज्ञानेशांच्या या गीतेवरील व्याख्यानांस " भावार्थ दीपिका " कां म्हणतात याचे उत्तर सांपडते ]. तसेंच या मराठी भाषेच्या जमिनींत साहित्य सोनीयाच्या खाणी उघडून, विवेक वेलीचीं भरपूर लावणी कर. तत्त्वबोध-द्वारां हितकर संवादरूपी फळांचे ठेवे व निरंतर राहणाऱ्या मार्मिक सिद्धांतरूपी बागा लाव, पाखंडरूपी दरडी, वितंड-वादरूपी आडवाटा मोडून कुतर्करूपी हिंस्र पशूंचाहि नाश कर. मला श्रीकृष्णगुणीं सरते कर. श्रोत्यांना श्रवण सुखाच्या राज्यावर बसीव. या मराठीच्या नगरींत विषयाची स्पष्टता करून ब्रह्मविद्येचा सुकाळ कर. साऱ्या जगांत घेणे-देणेंहि ब्रह्म-सुखाचेच होऊं दे. अशी प्रार्थना केल्यावर श्रीगुरु निवृत्तिनाथांची " गीतार्थ " सांगण्याची आज्ञा मिळतांच अत्यंत उल्हसित अंतःकरणानें श्रीज्ञानेश्वरमहाराज गीतेवरील " **भावार्थ-दीपिका** "-रूपीं टीकेला प्रारंभ करतात [ १ ते १९ ].

अकराव्या अध्यायांत अर्जुनाच्या इच्छेप्रमाणें देवांनीं त्यास " विश्वरूप " दाखविलें त्यांत विशेषेंकरून अति-भयानक रूप पाहिल्यामुळें अर्जुन अत्यंत भयभीत झाला. म्हणून त्यानें " मला आपल्या सगुण चतुर्भुजरूपाचीच संवय असून तेच अधिक लाभदायक असें वाटतें, मला पसंत पडते. म्हणून देवा ! हे विश्वरूप टाकून पूर्वींचें सौम्य असें-चतुर्भुजरूप दाखवा " अशी प्रार्थना केली. देवांनीं त्याचा निषेध करून परिच्छिन्न सगुण-साकार-रूपापेक्षां

विश्वरूप श्रेष्ठ असल्याचें सांगितलें व सौम्य चतुर्भुजरूप धारण केलें. देवास व्यक्त व अव्यक्त या स्वरूपांमधील श्रेष्ठत्वाविषयीं पुनः विचारावेसे अर्जुनास वाटत होते; पण देव रागावतील म्हणून या बाराव्या अध्यायाच्या आरंभीं-अर्जुनानें " देवा ! आपण धारण केलेलें व्यापक ' विश्वरूप ' खरेंच होते कीं, क्षणभर कौतुक म्हणून दाखविलें, हें जाणून घेण्यासाठीं मी आपणांस विचारणार होतो " असें म्हणून मूळचीच शंका; पण आडपडद्यानें विचारली कीं, " अव्यक्ताची उपासना करणारें ज्ञानी व तुझ्यासाठींच कर्म करून, तुलाच परम समजून, तुझी सर्वभावें भक्ति करणारें-भक्त या दोघांत तत्त्वतः " योग " कोणी जाणला ते मला सांगा " देवहि आपल्या व्यापक स्वरूपाविषयींच, पण अतिशय खुबीदारपणानें प्रश्न-विचारल्याचें पाहून संतोषित होऊन त्याचें या अध्यायाचें अखेरपर्यंत उत्तर देतात [ २० ते ३४ ].

[ विश्वरूपोपलक्षित निर्गुण निरपेक्ष अव्यक्तरूप, व्यापक ' विश्वरूप, ' व्यक्त सापेक्ष अव्यक्तरूप आणि देहधारी चतुर्भुजरूप, अशी परमेश्वराची तीन रूपें आहेत. त्यांपैकीं चतुर्भुज परिच्छिन्न, मूर्ति स्वरूपासच खरें समजणाऱ्या सर्वच लोकांस, ' धसाळ, ' ' गांवढळ, ' आंधळे, असें म्हणून त्या एका रूपाचा निरास केला आहे. आतां राहतांपैकीं राहलेली ' निर्गुण ' व व्यापक, विश्वात्मक ' विश्वरूप ' अशी दोनच रूपें राहिली. त्या दोन रूपांमधील श्रेष्ठतेविषयींच अर्थात् निर्गुण अव्यक्ताची कर्मसंन्यासपूर्वक भक्ति करणारें ज्ञानी व विश्वरूपानें व्यक्त झालेल्या व्यापक, पण सगुण-साकाराची स्वकर्मद्वारां भक्ति करणारें भक्त, यांत ' तत्त्वतां कवणें योगु जाणितला ' असा अर्जुनाचा प्रश्न आहे हें या प्रसंगीं लक्षांत असणें जरूर आहे ].

देव म्हणतात अर्जुना ! माझ्या विश्वरूपाचें ठिकाणीं सेंद्रियासहित अंतःकरण दृढ ठेवून जे भक्त सर्वभावानें रात्रंदिवस माझी भक्ति करतात ते भक्त मी श्रेष्ठ प्रतीचें आहेत असें मानतों. याशिवाय दुसरें ' सोऽहम् ' या वृत्तीवर आरूढ होऊन निरवयव अव्यक्ताची उपासना करणारेंहि मलाच प्राप्त होतात. म्हणजे व्यक्तोपासक व अव्यक्तोपासक हे दोन्हीं खरें भक्त असतील तर मलाच प्राप्त होतात; तरीपण त्यांतल्यात्यांत अव्यक्त निर्गुणोपासकांपेक्षां व्यक्तोपासक हें चांगलें म्हणजे ' भक्तिपंथ ' हा बहुत सुलभ-सोपा आहे. त्या सगुण भक्तिमार्गास डावलून निर्गुण ब्रह्मस्वरूप प्राप्त्यर्थ अनुष्ठावयाचा योगमार्ग तो अतिशय अवघड आहे. त्यांत कष्टापेक्षां अधिक कांहीं मिळतें, असें मुळींहि नाहीं. किंबहुना ! ! हा योग करणें म्हणजे पतिविना नित्यनवा अग्निप्रवेश करणें होय. म्हणून तो मार्ग क्लेशाकारक आहे. म्हणून याहून दुसरें जे भक्तिपंथास लागले ते हें दुःख जाणतच नाहींत, उलट वर्णाश्रमधर्माप्रमाणें प्राप्त कर्तव्यकर्में निरहंकार व निस्पृह होऊन करून मला अर्पण करण्याची ' भक्ति ' करतात. हीं कर्में मला देऊन कर्मफलें जाळतात काया-वाचा-मन यांच्या क्रियांची प्रवृत्ति मजव्यतिरिक्त अन्यत्र नसतें, असें जें एकनिष्ठ भक्तीनें जीव-शरीर व मन यासह मला विकलेले असतात; त्यांचें काय एक मीं करतो म्हणून सांगूं ? कारण, सर्वच मी करतों [ ३५ ते ८२ ].

किंबहुना ! ! एकदां माझा भक्त म्हणून ठरला कीं, मग त्यास संसाराच्या चिंतेची गोष्टच कशाला ? जन्ममरणरूपी संसारसागराच्या क्षोभानें कदाचित् माझे भक्त भीतील म्हणून अर्जुना ! मी सगुणरूप धारण करून त्या भक्तांच्या गांवाला धांवत आलों. माझी सहस्रावधि नांवें ह्याच कोणी नावा त्या तयार करून भवसागरांतून भक्तांना तारणारा मी नांवाडी झालों. म्हणून माझ्या भक्तांना एकहि चिंता करण्याचें कारण नाहीं, कारण त्यांचा उद्धार करण्यास मी सदाच तयार आहे. अधिकारानुरूप त्यांना साधनानुष्ठानाचा मार्ग दाखवून त्यांचा मी उद्धार करतो. म्हणून अर्जुना ! ! या भक्तिमार्गाचा तूं अवलंब कर. मन व बुद्धि ही माझ्या स्वरूपीं सदाची राहिली तर मग मी व तूं असें द्वैत उरेल काय ? एवढ्यानें " सर्वव्यापि " जो मी तोंच तूं होशील यांत यत्किंचितहि अन्यथा नाहीं [ अनन्य प्रेम लक्षणात्मक भक्ति; दृढस्वरूपाची नामभक्ति केल्यास त्या भक्तीविषयीं श्रीहरीला करुणा निर्माण होते व तो श्रीहरि आपण जर त्याची जिज्ञासाबुद्धीनें भक्ति केली तर, त्यास शिष्यबुद्धीनें शरण गेलो तर, आपले श्रीगुरुत्व पत्करून आपल्याला ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा उपदेश करितो, अशी भक्ताच्या उद्धाराची देवच चिंता वाहतो. शिवाय "सर्वव्यापि" हे श्रीज्ञानेशांनीं हेतुगर्भ विशेषण योजून देवांनीं ' विश्वरूप ' धारण करून व्यक्त झालेल्या स्वरूपाचाच निर्देश केल्याचे ध्वनित केले आहे असें तात्पर्य आहे ] [ ८३ ते १०३ ].

निश्चयात्मक बुद्धि, संकल्प-विकल्पात्मक मन ही दोन्ही अखंड प्रेमपूर्वक माझ्या स्वरूपीं ठेवणें हीच भक्ति होय;

पण संसारासक्त जीवास मन–बुद्धि सर्वदा भगवत्‌भक्तींत ठेवणें आतिशय अवघड असतें. कारण, मन हें पूर्व-संस्कारामुळें साधनानुष्ठानांतून वारंवार भ्रष्ट होत असतें. याचा अर्थ हें अशक्य आहे, असा मात्र नाहीं. मन–बुद्धीला ध्येयनिष्ठा व अनुष्ठेय तत्परता एकदम प्राप्त झाली नाहीं तरी 'अभ्यासा'नें हळूं हळूं प्राप्त होते. म्हणून अर्जुना ! असें कर कीं, या आठ प्रहरांपैकीं मोजके निमिषभर, मन–बुद्धि साधनानुष्ठानाचें ठिकाणीं स्थिर करण्याचा प्रयत्न कर, म्हणजे साधननिष्ठेची व साध्याची जशी जशी त्या मनाला गोडी निर्माण होईल, तशी तशी विषयाविषयीं अरुची निर्माण होईल. चित्त भोगांतून निघून माझ्यामध्यें प्रवेश करतां करतां तुझें तें चित्त हळूं हळूं वाढत्या व चढत्या अभ्यासानें भोगांचा पूर्णतया त्याग करून मत्स्वरूपच होईल. असें त्याच त्या साधनाचें पुनः पुनः अनुष्ठान करणें यासच "अभ्यासयोग" म्हणतात. या अभ्यासयोगाच्या बळावर एऱ्हवीं असाध्य असणाऱ्या गोष्टीहि साध्य होतात. म्हणून तूं अभ्यासानें माझ्या स्वरूपीं एकरूप हो [ १०४ ते ११३ ].

पण ज्या विषयासक्त जीवांना साधनानुष्ठान रोजच्या आठ प्रहरांपैकीं क्षणभर देखील जमत नाहीं त्याचें करितां उपाय सांगतों. ज्यांना भोग टाकण्याचें जमणार नाहीं त्यांनीं आपली प्राप्त कर्में यथाविधि करावीत. ज्या परमेश्वराच्या अकुंठित सत्तेनें हे विश्व चालले आहे, तोच कोणतेहि 'करणें' व 'न करणें' हे सर्व जाणत आहे. त्याच्याच सत्तेनें हीं कर्में होतात, अशी आपल्या मनाशीं खूणगांठ बांधावी. अरे ! माळ्यानें जिकडे नेलें तिकडे तिकडे बिनतक्रार जाणाऱ्या पाण्याप्रमाणें, निरभिमानपणानें आग्रहरहित वृत्तीनें कर्म करणारें असें तुझें जीवित होऊं दे, हेंच यांत वर्म आहें. सर्व कर्में निरहंकारत्वानें माझ्या ठिकाणीं समर्पण कर. अर्जुना ! अशा माझ्या स्वरूपानुसंधानानें देहत्यागानंतर माझ्या 'सायुज्य मुक्ति' रूप घरीं येशील [ यांतहि 'सायुज्य मुक्ति' या पदानें चतुर्भुज सगुण–साकार रूपाशीं ऐक्य होते असें नव्हे तर अविनाशी, व्यापक स्वरूपाशींच ऐक्य होते असें ध्वनित केलें आहे [ ११४ ते १२४ ].

√ मला कर्म अर्पण करावयाचें; पण त्याचें कर्तृत्व व फल मात्र देवाला द्यावयाचें हेहि ज्या जीवांना जमणार नाहीं त्यांना देव सोपा उपाय सांगतात. त्यांनीं सर्व कर्में ईश्वरार्पण केली नाहींत तरी चालेल; पण ती आपल्या स्वतःकडेहि घेऊं नयेत. ती कर्में जणुं आपण केलीच नाहींत अशा निरहंकार वृत्तीनें राहिलें तरीहि ती कर्में पुढील जन्मद्वारां सुखदुःख भोग देण्यासाठीं उर्वरित राहणार नाहींत. कर्म प्रेरणा देणाऱ्या बुद्धीचा प्रेरक परमात्माच आहे असा निश्चय करणें म्हणजेच बुद्धीच्या पाठीशीं देवास बांधणें होय. ते कर्म पूर्ण झाल्यावर परमात्म्यास अर्पण करणें किंवा कर्म अंतःकरण शुद्धिद्वारां परमात्मप्राप्तीस कारण आहे म्हणून अंतिम साध्य परमात्माच आहें, असा निश्चय करणें म्हणजेच देवास बुद्धीच्या पुढें बांधणें होय. कर्मारंभींच कर्तृत्वमद सोडून कर्म करणें हेंच कर्माआधीं देवास बांधणें होय व शेवटीं फलाभिलाषा सोडून केलेलें कर्मफळहि सहजच ईश्वर समर्पण होतें हेंच कर्मा–शेवटीं देवास बांधणें होय. बुद्ध्यधिष्ठान व बुद्धीचें अन्तिम साध्यरूप वैभव देवच असून देवासाठींच कर्में करून देवच त्याचें परम साध्य करणें हेंहि एक साधनच आहे. याच शरीरानें पुनः शरीरास येणें संपतें. किंबहुना ! ! जन्ममरणाच्या खेपा सदाच्याच बंद पडतात. या रीतीनें अभ्यास, ज्ञान, ध्यान व कर्मफलत्याग अशा पायरी पायरीनें चढून माझी सर्वोत्तम पूर्ण अद्वयब्रह्मस्थिति, जिज्ञासूंना, साधकांना प्राप्त होतें [ १२९ ते १४३ ].

[ यापुढें श्रीज्ञानेशांच्या मतें 'ज्ञानकांड' चालूं झालें आहे ]. ही देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थिति ज्यांनीं संपादिली आहे. त्याचें अंगीं आदर्शभूत, अशीं अनेक लक्षणें आपोआप वसतीला येतात. त्यांपैकीं कांहीं प्रमुख लक्षणें सांगतों. तो परमात्म्याशीं एकरूप झालेला असल्यामुळें त्याचा 'आपपरभाव' नाहींसा झालेला असतो. [ प्रमाता ब्रह्मरूप झाल्यामुळें संपूर्ण प्रमेयाची त्यास ब्रह्मरूपतेनें प्रतीति येतें ].

"आपणचि विश्व जाहला" किंबहुना चराचर आपणचि जाहला अशी त्याची व्यापकानुभूति असते. मग आपलाच आपण द्वेष कसा करूं शकेल ? मग सहजच भेदभाव जातो. मग स्वचे स्वला भय कसें संभवेल ? सर्व-भूतमात्रांवर "आत्मौपम्य" बुद्धीनें प्रेम करीत असतो. त्याची सर्वभूतमात्रांशीं मैत्री असते. तो विषय निरपेक्ष, निरुपचार, भोग निरपेक्ष आनंदांत असतो. ज्यांच्या अंतःकरणरूपी मंदिरांत जीव व परमात्मा दोन्ही ऐक्यरूपी आसनावर बसून शोभतात, असा जो ब्रह्मात्मैक्य ज्ञानैश्वर्य संपन्न आहे, त्याची देहतादात्म्य भ्रांति नष्ट झालेली असते. त्यामुळें 'अहम्' अध्यास म्हणजे 'मी' व 'ममाध्यास' म्हणजे 'माझें' हेहि नष्ट होतात. त्याच्याकडून जगास

तर त्रास होत नाहींच, पण जगाच्या उन्मत्तपणानेंहि ज्यास खेद वाटत नाहीं, ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारी साधूला देहाहंकारच उरला नाहीं. तो देहसंबंधी सुखदुःख, मानापमान, हर्षामर्ष, भय उद्वेग, निंदास्तुति या सर्व द्वंद्वापासून सहजच विमुक्त असतो, हे काय निराळे सांगावें ! अर्थात् त्यांच्या विषयींचा मिथ्यात्व निश्चय असल्या कारणानें ती द्वंद्वें त्यास स्पर्शहि करीत नाहींत. तो नित्यानंदानें तृप्त असल्यानें सहजच निर्वासन असतो. कर्मारंभ तरी कशासाठीं करावयाचा ! म्हणून सदा संतुष्ट असतो. विषयवासनारहित भक्तच खरा पवित्र असतो. 'आपणचि विश्व जाहला' त्यास निराळें घर वा आश्रम कसा असणार ! अतएव सहजच "अनिकेत" आहे. आत्मलाभापेक्षां दुसरा कोणताहि लाभ श्रेष्ठ व गोमटा नसल्यामुळें त्यास भोगविशेषाच्या लाभ-हानि होण्यापासून हर्षामर्ष मुळींच संभवत नाहींत. तसेंच त्यास इतरांपासून कांहीं एक मिळवावयाचें नसते. कारण, त्यास स्वतःचे असें कर्तव्य व कर्तव्यबुद्धि राहिलेलीच नसते, तरीपण तो ज्ञानीभक्त चौथी पुरुषार्थसिद्धि जी मुक्ति ती आपल्या हातांत घेऊन भक्तिपंथद्वारां साऱ्या जगाला देत निघाला. त्याच्या सहवासानें गंगादिक तीर्थेहि पवित्र होतात, इतकेंच काय पण त्याच्या 'सहज-सगुण भक्तीनें' नित्यतृप्त असा जो मी तोहि इतका वेडा होतो कीं, त्याची संगती घडावी म्हणून अचक्षु, अनेत्र, अहस्त अशी माझी निरुपाधिक स्थिति ती बाजूला ठेवून स्वेच्छामय विग्रहधारण करून भक्तिप्रेमसुख मी भोगतो. मला हे भक्त तर प्राणापेक्षांहि अधिक आवडतात, यांत काय आश्चर्य, पण त्यांचे जे अमृत-मधुर चरित्र ऐकतात, जे भक्तचरित्राची वाखाणणी करतात तेहि आम्हाला प्राणापेक्षां अधिक आवडतात. तसेंच जे श्रद्धापूर्वक त्याचे अनुष्ठान करून अनुभव घेतात, जे पुरुष माझ्या प्रेमळभक्तांची कथा गातात, ते पुरुष आम्ही आपले श्रेष्ठ दैवतच समजतो. [ १४४ ते २३८ ].

अशी ही भक्तकथा श्रीकृष्णांनींहि अतीव आनंदित होऊन सांगितली. [ श्रीज्ञानेश्वरमहाराजहि या सगुण भक्तीचे निरुपम वर्णन करण्यांत पूर्ण रमलेले आपणास दिसतात. यथार्थ ज्ञान व सगुणविषयक प्रेमलक्षणात्मक वृत्ति याचा अपूर्व संगम झाल्याचा त्यांच्या व्याख्यानांत आपणांस विशेषत्वानें आढळांत येतो. तसेंच श्रीज्ञानेशांनीं तोच भक्त, तोच योगी व तोच मुक्त असें त्याचे समीकरण केल्याचे दिसून येते. निर्मळ, निष्कलंक, लोककृपाळु, शरणागता प्रतिपाळु, धर्मकीर्ति धवळु, सत्यसेतु इत्यादि गौरवपूर्ण विशेषणांच्या योजनेस पाहिले कीं "श्रीकृष्णगुणीं सरते" करण्याविषयीं या अध्यायाच्या प्रारंभीं केलेल्या प्रार्थनेंतील त्यांची श्रीकृष्णावर असलेली नितान्त भक्ति अभिव्यक्त झाल्याची-सफळ झाल्याची दिसते. समष्टि विश्वरूपीं किंवा व्यष्टि शरीररूपीं नाशिवंत उपाधींमध्यें अविनाशी अनुस्यूत स्वरूप आहे त्याचे ध्यान, चिंतन करणे जरूर आहे. याच अध्यायांत आरंभीं सांगितल्याप्रमाणें सर्व कर्में करून अनन्ययोगानें त्याचे ध्यान करणारे भक्त त्याच्या अव्यय स्वरूपाचें ध्यान करतात. विश्वव्यापक अव्यय स्वरूपाचा मुळींहि विसर न पडूं देतां नित्यशः स्मरण करणे संसारासक्तीमुळें प्रथमतः आवडीचे नसते, पण माझ्या व्यक्त किंवा सगुण स्वरूपाची भक्ति आरंभीं आठप्रहरांपैकीं अल्पकाल स्थिर राहून केली तरी पुढे तो मंद अधिकारी विषयाविषयीं अरुचि व साध्याविषयीं रुचि निर्माण होऊन तो अधिकारीहि साधननिष्ठेच्या द्वारां भक्तिपंथावर सदाचाच स्थिर होतो, असा भगवंताचा 'भक्तियोग' विषयक समस्त अभिप्राय श्रीज्ञानेशांनी येथें व्यक्तविला आहे].

यानंतर भगवंताचा व्याख्यान करण्याचा प्रकार ऐका. असें संजय धृतराष्ट्रास म्हणाला. तीच रसपूर्ण कथा मराठी भाषेंत सांगितली जाईल. ती आपण एकावी. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. स्वामी श्रीगुरुनिवृत्तिदेवांनीं आम्हास हे शिकविले आहे कीं, "आम्ही तुम्हा संतांची सेवा करावी," असें सांगून त्यांनीं या अध्यायाचा समारोप केला आहे.

[ या संपूर्ण बाराव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १९ पहावा. ]

